# दृष्टीदोष

पूर्वीच्या काळांत, गुन्हेगार व लुटारूंनाच नव्हे, तर भुरट्या चोऱ्या करणारांनादेखील कडक शिक्षा दिली जात असे. त्यांच्या गळ्यांत एक लांकडी खोडा अडकवला जात असे आणि त्याला दिवसभर उन्हांत बसवून ठेवीत.

रतन नांवाच्या एका माणसाने गांवाबाहेर चरत असलेल्या एका बैलाला पकडले, त्याच्या गळ्यांत दोरी बांधली, आणि तो बैलाला घेऊन जाऊं लागला. एका गवळ्याने ही चोरी बघितली आणि ग्रामाधिकाऱ्याकडे जाऊन त्याला ही बातमी दिली. ग्रामाधिकाऱ्याने नोकर पाठवून रतनला पकडून आणले. त्याच्या गळ्यांत खोडा अडकवला आणि सूर्यास्त होईपर्यंत भर उन्हांत बसून राहायची त्याला शिक्षा दिली. थोड्या वेळानंतर गावांतल्या किशनने जेव्हां हे दृश्य बघितले, तेव्हां आश्चर्याने त्याने रतनला विचारले, ''हे रे काय? तुझ्या गळ्यांत हा खोडा कशासाठी बांधलाय?''

''काय सांगू तुला? माझं नशीबच वाईट आहे बघ!'' रतनने उत्तर दिले. किशनने विचारले, ''सरळ काय ते सांग. असं कां झालं?''

''मी गांवातून बाहेर चाललो होतो. हिरव्यागार शेताजवळ एक मोठी चांगली दोरी मिळाली. झालं, मी ती फक्त घेतली. मी कांहीएक दुसरं चुकीचं केलं नव्हतं.'' रतन म्हणाला.

''रस्त्यांत मिळालेली दोरी उचलली म्हणून इतकी कठोर शिक्षा?'' किशनने चकित होऊन विचारले.

''त्या दोरीच्या दुसऱ्या टोंकाला किमान पांच-सहाशें रुपये किंमतीचा एक बैल होता. माझी अधू नजर म्हणून तो बैल कांही मला दिसला नाही.'' रतनने दीनवाण्या स्वरांत म्हटले.

- मनोहर





# संजीवच्या विद्या

गंगापूरमधें राहणारा संजीव एका शेतकरी परिवारांत जन्मला होता. तो शेतावर काम करीत होता, पण एकीकडे पंडितांच्याजवळ शिकून त्याने शास्त्रांचा अभ्यासदेखील केलेला होता. कविता पाठांतरात, गाणीं म्हणण्यांत, व चित्रकलेंत त्याला रुची होती. त्याचा पिता धर्मराज त्याला एके दिवशी म्हणाला, "कांहीतरी एका गोष्टीवर ध्यान केंद्रित कर. अनेक गोष्टी शिकताना एखाद्या विषयांत दुर्लक्ष झालं तर तुझ्या पुढील आयुष्यांत तुला त्याचा त्रास होईल, व जीवन कठीण होईल." बाप मुलाला असा नेहमीच इशारा देत होता.

पण आपल्या पित्याच्या बोलण्याशी संजीव सहमत नसे. तो त्यांना म्हणायचा, "बाबा, आता दिवस बदलले आहेत. हल्लींच्या दिवसांत सुखाने जगायचं असेल तर पहिल्याप्रमाणें एकाच प्रकारच्या शिक्षणावर अवलंबून राहाता येत नाही. मला खूप गोष्टी शिकायच्या आहेत."

धर्मराजच्या मालकीची दहा एकर जमीन होती. पूर्वी तो दोन एकरांचाच मालक होता. पण त्याने शेतीवर पूर्णपणें लक्ष दिले आणि भरपूर कमावले. त्याच्या वडिलांनी काढलेले कर्ज धर्मराजने फेडले, आणि अडचणींत असलेल्या आपल्या भावाला मदत केली. दोन बहिणींची लग्नें त्याने केली. नुकताच त्याने आपल्या मुलीचा विवाहही चांगल्या प्रकारे साजरा केला होता. इतकं सगळं होऊन देखील त्याला आपल्या मुलाची सारखी काळजी वाटत असे. कारण संजीवला गांव सोडून शहरांत स्थायिक व्हायची फार इच्छा होती. कुणी कांही सांगायच्याआगोदरच तो स्वत: विषयी लांबलचक भाषण ठोकायला सुरवात करीत असे. आता तर ती त्याची संवयच होऊन बसली होती.

"सारखं स्वत:विषयी बोलायची संवय सोडून दे. प्रथम इतरांबद्दल माहिती जाणून घेण्याचा प्रयत्न कर. त्यांतून कांही उपयोगाची गोष्ट असेल तर ती शिकून घे. असं जर केलं नाहीस तर तुझी प्रगती कधी होणार नाही. जिथें असशील तिथेंच राहाशील." अशा शब्दांत धर्मराज नेहमी त्याला उपदेश करीत असे.





एके दिवशी संजीवचा मामा सीताराम त्यांच्या घरी आला. त्याने आग्रहाने सांगितले कीं त्याच्या मुलीसाठी संजीव हा अगदी योग्य पती ठरेल. धर्मराजला ही सोयरीक मान्य होती, पण संजीवने म्हटलं, "मी अनेक विद्यांमधे प्रवीण आहे. ज्या मुलीशी माझा विवाह होईल, तिला निदान मला माहीत असलेल्या निम्म्या विद्या तरी येत असल्या पाहिजेत. तुमची मुलगी राधा जर माझ्याशी लग्न करण्याची इच्छा करीत असेल, तर तिला अनेक प्रकारच्या विद्यांचा अभ्यास करावा लागेल."

"कोणत्या विद्यांमधे तू पारंगत आहेस हे मला ठाऊक नाही. तुझी ख्याती कांही मी कुणाकडून अद्याप ऐकली नव्हती. इतक्या गोष्टी शिकून तुला त्याचा कांही फायदा झाला कीं नाही, हेही मला माहीत नाही. या विद्यांचा उपयोग करुन घे, कुणा राजाच्या दरबारांत नोकरी कर; म्हणजे मग त्या विद्या राधा शिकेल." सीतारामने उत्तर दिले.

आता संजीवच्यासमोर हे एक आव्हान उभे राहिले. तो लगेच राजधानीला गेला. तिथें पोंचल्यानंतर एका धर्मशाळेंत त्याने मुक्काम ठेवला. तिथे एका मध्यवयीन, मिशाळ गृहस्थांशी त्याची भेट झाली. संजीवने आपले सर्व गुणगान त्याला ऐकवले व म्हटले, "राजाच्या दरबारांत नोकरी मिळवण्यासाठी इथें आलो आहे. मला खात्रीने इथें नोकरी मिळेलच. पण अजून पगार किती मागावा याबद्दल माझा निर्णय होत नाही."

त्या वयस्कर व्यक्तीने म्हटले, "तू सांगितलेल्या सविस्तर माहितीवरुन हे उघडच आहे कीं तुला अनेक विषयांची चांगली माहिती आहे. पण राजाच्या दरबारांत असल्या विद्येचा उपयोग नसतो. जर तुला खड्गयुद्ध येत असेल तर तुला नक्कीच नोकरी मिळेल."

"खड्गयुद्ध? थोडंफार माहीत आहे. पण त्यांत प्राविण्य मिळवायला गुरुची आवश्यकता असते. इथें मला ही विद्या शिकवणारा एखादा गुरु आहे कां?" संजीवने विचारलं.

"इथें वीरवर नांवाचा एक गुरु आहे. खड्गविद्येसाठी त्यांच्याहून जास्त चांगला शिक्षक दुसरा कुणीही नाही. शिवाय योग्य लोकांना ते विनामूल्य शिकवतात." त्या वयस्कर गृहस्थाने सांगितले.

दुसऱ्याच दिवशी, संजीव वीरवरच्या घरीं गेला आणि आपल्या येण्याचे कारण त्याने सांगितलं. त्याने संजीवला नीट न्याहाळून पाहिलं व म्हटलं, "तू तर चांगला तगडा दिसतोस, चुणचुणीत आहेस. जर मन लावून शिकलास तर आठवडाभरांत खड्गविद्येत प्रवीण होऊं शकशील." असं म्हणून



त्याने संजीवला आपला शिष्य बनवलं.

संजीवनेदेखील आठ दिवसांतच खड्गविद्या शिकून घेतली आणि गुरुने त्याच्या हुशारीची भरपूर प्रशंसा केली.

एका आठवड्यानंतर त्याच धर्मशाळेंत त्याला तो वयस्कर गृहस्थ भेटला. संजीवने त्याला सांगितले कीं दुसऱ्या दिवशी राजदरबारांत संजीवला नोकरी मिळणार होती. त्यावर तो गृहस्थ उद्गारला, "अरेरे, फारच वाईट झालं. कालच एका तरुणाने खड्गविद्येचे प्रात्यक्षिक दाखवून राजाच्या दरबारांत नोकरी मिळवली. परंतु राजाच्या कोषागारांत जमाखर्चाची रोज देखरेख करण्यासाठी एखाद्या लायक माणसाची जरुरी आहे. तिथें प्रयत्न कर. तुला जर ही नोकरी हवी असेल तर प्रथम गणितज्ञ भास्करला जाऊन भेट. कोषागारांतल्या हिशेबाची पद्धत जरा निराळी असते. ते तुला हे काम सोप्या पद्धतीने करायला शिकवतील."

दुसऱ्याच दिवशी संजीव भास्करला भेटला आणि आठ दिवसांतच जमाखर्च लिहिण्याचे शिक्षण त्याने शिकून घेतले. जरी त्याने त्यांतल्या बारकाव्यांसकट ही पद्धत शिकून घेतली होती, तरी तीन दिवसांपूर्वी एका सुयोग्य तरुणाला ती नोकरी मिळून गेली. परंतु संजीव कांही निराश झाला नाही. पुन्हां ते वयस्कर गृहस्थ जेव्हां भेटले तेव्हां संजीवने त्यांना विचारलं, "राजदरबारांत आणखी एखादी नोकरी मिळण्यासारखी आहे कां?"

"अरे, दर आठवड्याला तू नवीन शिक्षण घेतो आहेस आणि ढोरमेहनत करतो आहेस. तुला त्याचा थकवा येत नाही कां?" त्या गृहस्थांनी विचारले. "मी विद्येचा भुकेला आहे. विद्याभ्यासाची मेहनत करताना मला मुळींच थकवा येत नाही." संजीवने बढाईखोर स्वरांत सांगितलं.

"तुझ्या मामाने आव्हान दिलं म्हणून तू इथें आलास, त्याला आता महिना होऊन गेला. अजून तुला राजाच्या दरबारांत नोकरी कांही मिळालेली नाही. त्यापेक्षां तू जर गंगापूरला परत गेलास आणि आपण हारलो असं मान्य केलंस तर जास्त चांगलं! तुझ्या वडिलांना शेतीच्या कामांत तू चांगली मदत कर."

त्या व्यक्तीने सल्ला दिला. त्यावर संजीव नाराजीने म्हणाला, "माझ्या मामाने दिलेले आव्हान मी स्वीकारले, त्यांत कदाचित मी हारणार असेन; पण त्यांनी जे मत तुच्छतेने व्यक्त केलं, कीं ज्या विद्या मी शिकलेल्या होत्या, त्या साऱ्या निरुपयोगी आहेत, ते मत मला खोडून काढायचे आहे. एक ना एक दिवस मी राजदरबारांत नोकरी मिळवीनच."



"राजाच्या दरबारांत नोकरी मिळवण्यासाठी तुझे ज्ञान अपूर्ण आहे." त्या वयस्कर गृहस्थांनी म्हटले.

"मग तर मी तुमच्याशी पैज लावतो. जर राजाच्या दरबारांत मी नोकरी मिळवून दाखवली, तर तुम्ही मला काय द्याल?" संजीवने विचारले.

"राजदरबारांत नोकरी मिळवण्याच्याबाबतीत जर तू पैज लावलीस, तर तू केव्हांही ती जिंकणार नाहीस." त्या गृहस्थांनी उत्तर दिलं.

"इतक्या ठामपणें हे तुम्ही कसं सांगू शकता?" संजीवने नवलाने विचारलं.

"मी ठामपणें सांगतोय, कारण मीच राजा आहे!" त्या गृहस्थांनी सांगितलं.

संजीव चकित होऊन कांही क्षण बोलूंच शकला नाही, पण त्याचा चेहरा पडला. लौकरच तो भानावर आला, आणि त्याने राजाच्या पायांना स्पर्श करुन, वांकून प्रणाम केला.

राजाने त्याला प्रेमाने उठवले नि म्हटले, "जर तुला माझ्याबद्दल खरोखरच आदर वाटत असेल तर माझं म्हणणं ऐक आणि आपल्या गांवी तू परत जा." "महाराज, आपण हरप्रकारे माझी परीक्षा घेतली आहेत. मग आपल्या दरबारांत मला नोकरी आपण कां देत नाही?" संजीवने दीनवाण्या स्वरांत विचारलं. त्याच्या या प्रश्नावर हंसून राजाने म्हटले, "तुझ्यांत वाजवीपेक्षां जास्त घमेंड आहे. तुला वाटतं कीं तुला सारं कांही येतं! पण कुठल्याही विषयांत तुला प्राविण्य मिळालेलं नाही. दर वेळेला तुला नोकरी मिळायला हवी होती पण मिळाली



नाही. पण याबद्दल तू कधी खोल विचार केलाच नाहीस."

हे ऐकून संजीवला जरा धक्का बसला, तरी पण त्याने विचारले, "महाराज, मी कोणतीही विद्या चटकन शिकतो हे तर आपण मान्य केलेलं आहेच ना?"

"पण विद्येचं शिक्षण किती प्रमाणांत घेतलंस तू? राजदरबारांतल्या नोकरीसाठी आवश्यक प्रमाणांत शिक्षण घेण्याचा तू प्रयत्न केलास कां?" राजाने म्हटलं.

राजाचे बोलणे ऐकून संजीव जास्त दुःखी होऊन म्हणाला, "आता मला माझ्या स्वभावांतला दोष समजला. प्रत्येक विषयाचं ज्ञान योग्य तितक्या प्रमाणांत शिकण्यावर आपण जोर देऊन जे सांगितलंत, त्याप्रमाणेंच मी करीन. पण कृपा करुन आपल्या दरबारांत आपण मला नोकरी द्यावी."

''सुरवातीलाच असा विचार केला असतास तर मी तुला दरबारांत अवश्य नोकरी दिली असती. विद्येमधें प्राविण्य मिळवण्याची कांही तुला विशेष ओढ नव्हती. कोणत्याही विद्येत प्राविण्य मिळवण्याकडे तू दुर्लक्ष करीत होतास, म्हणूनच मी माझे मत सांगितले. जे कांही झालं ते तुझ्या दुर्दैवामुळे झालं आहे.'' राजाने म्हटलं.

''पण माझं म्हणणं आहे कीं आपल्याला विनंती करण्याच्या बाबतीत कांही मी हलगर्जीपणा केला नाही. आपणच महाराज आहात हे कळल्याबरोबर लगेच मी नोकरी मागितली.'' संजीवने अजीजीने सांगितलं.

त्यावर राजाने म्हटलं, ''आपण एका महिन्यापूर्वी भेटलो होतो. दर वेळेला मी तुला राजदरबारांतल्या नोकऱ्यांसंबंधी माहिती देत होतो. पण मी कोण आहे आणि या गोष्टी मला कशा माहीत आहेत, याबद्दल तू कधी विचारच केला नाहीस. याचं कारण काय ते तुला आहे कां माहिती? कारण तू नेहमी फक्त स्वतःचाच विचार करीत असतोस. जर तू माझ्याबद्दल थोडासा जरी विचार केला असतास, तर मी कोण आहे ते तू नक्कीच ओळखलं असतंस. जो दुसऱ्यांना ओळखण्यांत दिरंगाई करतो, अशा माणसाला राजदरबारांत कोणतेही स्थान नसते.''

हे बोलणे ऐकून संजीवने लाजेने मान खाली घातली. महाराजांच्या सांगण्यानुसार तो गंगापुरला परत गेला. आपल्या पित्याकडे शेतीचे काम शिकायला त्याने सुरवात केली आणि त्या कामांत मनापासून कष्ट केले. नंतर त्याचे लग्न राधाशी झाले व ती सर्वजण आनंदात राहू लागली. त्याने आजपर्यंत शिकलेल्या इतर विद्यांचे बारकावे तो आता गांवातल्या तरुण मुलांना शिकवू लागला. ते तरुण कौतुकाने म्हणत, ''जर राजाच्या दरबारांत तुम्हाला नोकरी मिळाली असती, तर आमचे फारच नुकसान झाले असते. मग इतक्या चांगल्या गोष्टी आम्ही कसे शिकलो असतो? बरं झालं, तुम्ही गांवी परत आलात ते!''

हे ऐकून, आपलं वेगवेगळ्या विषयांचे ज्ञान निरुपयोगी ठरले नाही याचा संजीवला अत्यानंद झाला. त्याबरोबरच आपले उच्च विचार व विद्या, यांच्याबद्दल तिखटमीठ लावून उगीचच कौतुक करीत बसायची त्याची जुनी संवयही नाहीशी झाली.







# अस्वल्या मांत्रिक

## 2

*(कालीवर्मा नांवाचा क्षत्रिय युवक नोकरीच्या शोधांत फिरत होता वाटेतच त्याला गांवकऱ्यांनी दरोडेखोरांबद्दल सांगितले. कालीवर्माने गांवातल्या तरुणांना जमवून दरोडेखोरांचा निःपात केला. त्यानंतर तो राजधानीजवळ पोंचला, तेव्हां जितकेतु राजाच्या घोडदळाने त्याच्यावर हल्ला केला व त्याला बंदी बनवले. त्यानंतर....)*

चंद्रशिला नगराचे घोडेस्वार कालीवर्माला घेऊन नगरांत गेले. अनेक सैनिक एकाच माणसाला घोड्यावर बांधून नेत होते. ते पाहून कांही लोकांनी प्रमुख घोडेस्वाराला विचारलं, कीं घोड्याला बांधून कुणाला नेत आहेत? त्यावर त्या प्रमुखाने मोठ्या अभिमानाने म्हटलं, ''कोण, हा बंदी होय? याचं नांव तर कालीवर्मा आहे. हा आपल्या राज्याचाच नव्हे, तर आपल्या शेजारच्या उदयगिरि राज्याचा राजा दुर्मुखचादेखील प्रबळ शत्रू आहे. याला पकडायला आम्ही अरण्यामधे किती हाल नि कष्ट सोसले आहेत, त्याचे वर्णन करता येणे अशक्य आहे.''

चंद्रशिला आणि उदयगिरी, या दोन्ही राज्यांचा शत्रू बनलेल्या कालीवर्माची बातमी ऐकून कांही लोक घोडदळाच्या पाठोपाठ राजमहालाकडे जाऊं लागले. घोडदळाचा नेता जेव्हां राजवाड्याच्या आवारांत शिरला तेव्हां त्याने आपले सैनिक तिथेच उभे केले आणि तो आंत गेला. एका शिपायामार्फत त्याने जितकेतु राजाला निरोप पाठवला कीं त्याने कालीवर्माला



पकडून आणलेलं आहे.

त्यावेळीं जितकेतु आपल्या मुख्य मंत्र्याबरोबर शेजारच्या राज्यावरच्या हल्ल्याविषयीं चर्चा करीत होता. कालीवर्माला बंदी बनवून आणल्याची बातमी ऐकून तो फारच प्रसन्न झाला व म्हणाला, ''महामंत्री! मला वाटलं होतं कीं कालीवर्माच्यामुळें आपल्याला शेजारच्या देशाशी युद्ध करायची बहुतेक वेळ येणार आहे. तो आपल्या हातांत सांपडला आहे. आता तुम्हीच सांगा, याला जिवंतपणीं दुर्मुखकडे पाठवूया कीं याला फांसावर लटकावून त्याचे प्रेत पाठवायचे?''

''महाराज! दुर्मुख महाराजांच्या पत्रावरुन ह्या दोन्ही गोष्टी त्यांना मान्य आहेत. पण त्यापूर्वी ह्याच कालीवर्माने लुटारुंना उदयगिरीच्या राज्यांत पळवून लावले आहे याचा पुरावा आपल्याला हवा; नाहीतर दुर्मुखमहाराजांशी आणखी दुसरा कांहीतरी बखेडा निर्माण व्हायचा!'' मंत्र्याने विचार मांडला.

''पण राजद्रोही कालीवर्माला बंदी बनवून इथें आणले आहे असा आपल्या घोडदळाच्या नायकाने निरोप पाठवला आहे ना!'' जितकेतु राजा म्हणाला.

''कालीवर्मा नांवाचे अनेक लोक असू शकतील तेव्हां आपण प्रत्यक्ष जाऊन त्यांचे म्हणणे ऐकून घ्यावे व न्याय करावा.'' मंत्र्याने सल्ला दिला.

त्यानंतर राजा व मंत्री महालाच्या बाहेरच्या आवारांत आले. तिथें लोकांची एकच भाऊगर्दी जमली होती. ती बघून राजाला आश्चर्य वाटले. मंत्रीमहाशयांच्या सांगण्यावरुन घोडेस्वारांनी कालीवर्माच्या दोऱ्या सोडल्या आणि त्याला घोड्यावरुन खाली उतरवले.

कालीवर्मा घोड्यावरुन खाली उतरुन उभा राहिला आणि राजा व मंत्री यांच्याकडे निर्भयपणें बघत म्हणाला, ''महाराज! आपल्या सैनिकांनी अरण्यांत अचानक माझ्यावर हल्ला केला आणि मला पकडले होते. आपण त्यांना योग्य शिक्षा करावी.''

हे बोलणें ऐकून राजा जितकेतु तर विस्मयाने बघतच राहिला. तो म्हणाला, ''माझ्या गेल्या दहा वर्षांच्या कारकीर्दीत कोणत्याही गुन्हेगाराने इतक्या धिटाईने माझ्याशी आजवर बोललेलं नाही!''

मंत्र्याने संतापून आपला हात उगारला व कालीवर्माला तो म्हणाला, ''अरे दुष्टा! महाराजांची अनुमती घेण्यापूर्वीच तू बडबड केलीस, त्याबद्दल तुझे डोके उडवता येईल. पण आम्हाला तू कोण आहेस ते समजायला हवं, म्हणून तुझा प्राण वांचला आहे. चंद्रशिला नगराजवळच्या अरण्यांत राहाणाऱ्या दरोडेखोरांना तूच उदयगिरी राज्यांत



पळवलंस ना? तुझं नांव काय आहे?''

''माझं नांव कालीवर्मा आहे. मी ह्याच राज्याचा नागरिक आहे. हे खरं आहे कीं आपल्या देशांतल्या जनतेची संपत्ती आणि धान्य लुटणाऱ्या दरोडेखोरांशी मी गांवकऱ्यांच्या मदतीने सामना केला. त्यांत त्यांचे कांही लोक मारले गेले. पण त्यांतले कांही चोर पळून आपल्या राज्याच्या सीमेपार उदयगिरीच्या अरण्यांत पळून गेले असावेत. अशा परिस्थितींत याची जबाबदारी माझ्यावर कशी काय येते?'' कालीवर्माने आपली बाजू मांडली.

त्याचे बोलणें ऐकून मंत्र्याला फारच राग आला. तो चिडून म्हणाला, ''महाराज, मी ह्याला एक प्रश्न विचारला, त्याचे त्याने सरळ उत्तर दिले तर नाहीच, उलट तो आपल्यालाच प्रश्न विचारतो आहे. आपण त्याला योग्य शिक्षा द्यावी.''

जितकेतु राजाने एकवार कालीवर्माकडे भेदक नजरेने बघितले व म्हटले, ''म्हणजे आपल्याला ज्याला शिक्षा द्यायची आहे तो हाच कालीवर्मा आहे तर! हे बघ कालीवर्मा, माझ्या संमतीशिवाय तू माझ्या कांही नागरिकांचा वध केला आहेस. त्यामुळें शेजारच्या राजाशी अकारण वितुष्ट आले आहे. म्हणून मी तुला मृत्युदंडाची शिक्षा देत आहे.''

ही आज्ञा ऐकून कालीवर्मा हतबुद्ध झाला. पण लगेच स्वत:ला सावरुन राजाला म्हणाला, ''महाराज! ही शिक्षा मला आपण कोणत्या न्यायसूत्राखाली देत आहात? माझे वडील आपल्या पिताश्रींच्या सेवेत होते. एका युद्धांत ते धारातीर्थी पतन पावले. मीही आपल्या सेवेंत रुजूं व्हावे या हेतूने माझे गांव सोडून इतक्या दूर



आलो आहे. जनतेला लुटणाऱ्या लुटारुंचा नायनाट केला म्हणून आपण मला मृत्युदंडाची शिक्षा कां देत आहात?''

''हा तर तुझा अगोचरपणा आहे!'' मंत्री कडाडून म्हणाला व सैनिकांकडे वळून त्याने आज्ञा केली, ''तुम्ही महाराजांची आज्ञा आत्ता ऐकली आहेत ना? तर मग या कालीवर्माला नगराच्या वेशीवर असलेल्या खैराच्या वनांत फांसावर लटकवा, आणि नंतर त्याचे प्रेत उदयगिरीच्या महाराजांकडे पाठवण्याची व्यवस्था करा.''

मंत्र्याच्या तोंडचे हे शब्द ऐकल्याबरोबर सारा जनसमुदाय बिथरला. त्यांच्यापैकी कांहीजण मोठ्याने ओरडूं लागले, ''ही किती अन्यायाची गोष्ट आहे महाराज! आपण कालीवर्माला जी शिक्षा फर्मावली आहेत, त्याच्या बाबतीत आपण पुन्हां एकदा नीट विचार करायला हवा. कालीवर्माने आमच्यावर उपकार केले आहेत.''



''ही आणखी एक आश्चर्याची गोष्ट! महाराजांना सल्ला देणारे विद्वान ह्या नगरींत आहेत तर!'' असं उपहासाने म्हणून मंत्र्याने दांत ओंठ खात सैनिकांना आज्ञा दिली, ''त्या ओरडून बोलणाऱ्या राजद्रोह्यांना पकडून कारागृहांत डांबून ठेवा!''

मंत्री बोलल्यानंतर घोड्यावर स्वार असलेल्या सैनिकांनी आपले घोडे गर्दीत घुसवले. लोक घाबरुन सैरावैरा धावूं लागले. ते पाहून जितकेतु प्रसन्न होऊन हंसतहंसत म्हणाला, ''या असभ्य लोकांना दंडनीतीच नमवूं शकते. महामंत्री! तुम्ही अगदी योग्य वेळीं ही आज्ञा दिलीत!'' असे मंत्र्याचे कौतुक करुन राजा आपल्या महालाकडे वळला. मंत्रीही त्याच्यापाठोपाठ महालांत गेला.

लोकांची गर्दी पांगल्यानंतर घोडदळाचा नायक कालीवर्माच्याजवळ आला व म्हणाला, ''तू राजाची आज्ञा ऐकलीस ना? अरेरे, बिचारा! तुला इतक्या लहान वयांतच हे जग सोडून जावे लागणार आहे त्याबद्दल मला खरोखरच वाईट वाटतं. परंतु महाराजांची आज्ञा म्हणजे दगडावरची रेघ असते.''

मंत्र्याचे बोलणें ऐकून अगोदरच संतापाने कालीवर्मा चरफडत होता. त्याने तलवार म्यानांतून काढण्याचा प्रयत्न केला, पण विचार बदलून तो बोलूं लागला, ''तुमच्या राजाची आज्ञा ही किती मूर्खपणाची आहे हे कांही लोकांना माहिती असलं तरी इतरांनी ते समजून घेण्याचा प्रयत्नदेखील केला नाही. शेजारच्या देशांतल्या राजाला भिऊन जनतेचे भले करणाऱ्या माझ्यासारखा नागरिकाला महाराज फांसावर लटकवायला निघालेले आहेत. हा तर घोर अन्याय आहे.''

''राज्याचे हित फक्त महाराजांनाच समजते. तुला वा मला त्यांतले काय समजणार? चांगलं आहे. चल, तुला ज्या खैराच्या रानांत फांशी द्यायला सांगितले आहे, तिथें सावकाश पोहोचेपर्यंत महाराजांना दया येईल व कदाचित तुझी शिक्षा रद्द केल्याची आज्ञा येऊं शकेल. यापूर्वी कांही अपराध्यांची अगदी अशी शेवटच्या क्षणीं फांशीची शिक्षा माफ झालेली आहे.'' घोडदळाचा नायक समजावत होता.

वास्तविक कालीवर्माने अशी आज्ञा होईल ही आशा धरलेली नव्हतीच. कोणत्या तरी उपायाने आपण या सैनिकांपासून आपला बचाव करायचा असा त्याने विचार केला होता. मनांत त्याने ठरवलं होतं कीं नगराची वेस ओलांडली कीं नंतर आपण हा सुटकेचा प्रयत्न करायचा.

आपल्या सैनिकांना सावधान करीत नायकाने कालीवर्माला म्हटले, ''आता तुझ्या



हातांत हातकड्या घातल्या पाहिजेत.'' असं म्हणून तो कालीवर्माच्याजवळ आला.

''कांही क्षणांमधे मरणाऱ्याच्या हातांत हातकड्या कशाला हव्यात? मी पळून बिळून जाईन म्हणून तुम्ही घाबरलात कीं काय? घ्या, हवं तर माझी तलवार तुम्ही घ्या. इतक्या साऱ्या हत्यारबंद सैनिकांच्या मधें मी निःशस्त्र माणूस, कसा पळून जाऊं शकेन?'' हे शब्द उदगारत कालीवर्माने म्यानांतून तलवार उपसली आणि घोडदळाच्या नेत्याच्या हातांत दिली.

तो नायक खूष होत म्हणाला, ''कालीवर्मा, असं म्हणतात कीं मरणाऱ्याची इच्छा पूर्ण केली कीं पुण्य लाभतं. जर तू पळून निसटायचा प्रयत्न केलास तर आम्ही इथे दहा घोडेस्वार आहोत. आमच्या दहाजणांच्या तलवारी तुझ्या शरीराची चाळण करतील. तेव्हां खबरदार राहा!''

त्यानंतर कालीवर्माच्या पुढें पांच सैनिक व त्याच्या पाठीमागून पांच सैनिक, असे चालत सर्वजण नगराच्या सीमेपार जायला निघाले. त्यावेळीं वाटेंत दिसणारे नागरिक जितकेतु राजाच्या दुष्टपणाची उघडपणें निंदा करीत होते.

एक प्रहर चालल्यानंतर सारेजण नगराच्या सीमेलगतच्या खैराच्या वनाजवळ आले. त्या राई लगत उंच डोंगराचा कडा होता. एक डोंगरातला झरा वीसतीस फुटांवरुन खाली दगडांवर कोसळत होता. त्याचा मोठा आवाज भीतीदायक वाटत होता.

घोडेस्वारांबरोबर झाडींत शिरताना कालीवर्माने पळून जायला सोयीची जागा पाहाण्यासाठी चारी बाजूंना नजर फेंकत नायकाला विचारले. ''तुम्ही लोक मला इथें फांशी देणार आहात कां?''

नायक त्याला कांही उत्तर देणार त्याच्या आधीच रेड्यावर बसलेली एक काळी व्यक्ती समोरुन येताना त्यांना दिसली. रेड्यावरची ही



व्यक्ती डोक्यापासून पायापर्यंत एका काळ्या बुरख्यांत होती. फक्त पायांपाशी बुरख्याला भोकें होती.

त्या व्यक्तीने आपल्या हातांतला परशू वर उचलून घोडेस्वारांच्या दिशेने जोराने येत पुकारले, "कोण आहात तुम्ही? या प्रधान मांगाच्या हातून यापूर्वी शिरच्छेद झालेल्या लोकांची भुतें आहात? कीं नवे नवे शिरच्छेद करण्यासाठी आलेले लोक आहात?"

तो आडदांड रेडा आपल्या दिशेने येतो आहे हे पाहून घोडे बिथरले आणि जोरजोराने खिंकाळत इकडे तिकडे पळायला लागले. ही संधी पळून जायला चांगली आहे, असे वाटून कालीवर्मा आपल्या घोड्याला पुढे नेणार होता, तितक्यांत रेड्यावर बसलेली व्यक्ती वेगाने त्याच्याजवळ आली. त्याच्या घोड्याचा लगाम हाताने पकडत ती व्यक्ती म्हणाली, "भुताप्रेतांना ही असली झाडें फार प्रिय असतात. म्हणून लुटारु व दरोडेखोरांना राजा या जागींच मृत्युदंडाची शिक्षा देतो. तू कोण आहेस, डाकू कीं देशद्रोही?"

"मी या दोन्हींपैकी कुणीही नाही. पण मला हे सांग कीं तू कोणत्या जातीचे पिशाच आहेस?" कालीवर्माने त्याच्या हातांतून आपल्या घोड्याचा लगाम खेंचण्याचा प्रयत्न करीत म्हटले. तोपर्यंत आसपास विखुरलेले सारे घोडेस्वार तिथें येऊन पोंचले. रेड्यावर बसलेल्या व्यक्तीकडे रागाने पहात घोडदळाचा नायकाने विचारले, "अरे, कोण हा धटिंगण? तुझ्या शरीरांत एखाद्या भुताबिताने तर प्रवेश केलेला नाही ना?"

त्यावर रेड्यावर बसलेल्या व्यक्तीने कालीवर्माच्या घोड्याचा लगाम सोडून देत म्हटले, "नगरांतल्या प्रमुख मारेकऱ्याला तू अरे-तुरे करतोस काय? कोणत्याही दिवशी तुलादेखील राजा मृत्यूची शिक्षा देईल, आणि माझ्याकडे वध करायला पाठवील त्यावेळीं मी आपल्या या धारदार परशूने एका घावांत तुला मारुन टाकीन."

"अरे दारुड्या! मला हा अपमान सहन होणार नाही." असं म्हणतानाच त्याने झटकन आपली तलवार म्यानांतून काढली. क्षणार्धातच कालीवर्माने मारेकऱ्याच्या हातांतला परशू खेंचला आणि घोडदळाच्या नायकाच्या मानेवर त्याने वार केला.

त्या नायकाचे डोके दूरवर जाऊन पडले, त्यावेळी दुरुन कुठूनतरी आवाज आला, "आदि अस्वलाचा विजय असो! हे तरुणा! तू अत्यंत पराक्रमी आहेस."

*- क्रमशः*







वेताळ कथा

# धीनाथचा सल्ला

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले व ते खांद्यावर टाकून तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, "राजन, तुझी सहनशक्ती अपार आहे. राजाला सल्ला देण्यासाठी बहुधा मंत्री व राजगुरु यांची नेमणूक करतात. ते कितीही निपुण असले तरी कधीकधी त्यांचा सल्ला चुकीचा नसतो. ते मुद्दाम करतात असं नाही, पण तसं होत राहातं. तू कुणाच्या सल्ल्यावरुन इतके कष्ट करीत आहेस?

मला वाटतं देशाचा राजा आणि गावातला अधिकारी यांचे निर्णय अचूक



असतात. उदाहरणार्थ, मी तुला एका ग्रामाधिकाऱ्याचा सल्लागार धीनाथ नांवाचा पंडित होता. त्याची गोष्ट मी तुला सांगतो ती ऐक. म्हणजे तुला थकवाही जाणवणार नाही आणि तुझा विचार देखील बदलूं शकेल.'' आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

श्रीपुर गांवचा अधिकारी श्रीनाथ याला आपला गांव सर्वांत उत्तम ठरला पाहिजे अशी तीव्र इच्छा होती. म्हणून त्याने धीनाथ नांवाच्या पंडिताला सल्ला देण्यासाठीं नियुक्त केले.

धीनाथ योग्य तऱ्हेने न्याय निवाडा करीत होता. कुणी चांगले काम केले तर त्याचे कौतुक, सत्कार केला जाई, पण त्यापूर्वी त्याची पूर्ण चौकशी केली जात असे. चुकीला शासन व सत्कृत्याला सन्मान, असा त्याचा विचार असे. गांवकऱ्यांचा त्याच्या निर्णयावर अतूट विश्वास होता.

त्या गांवचा एक रहिवासी त्रिमूर्ती आता पन्नाशीला आला होता. ह्या वयांत त्याला एक असाध्य आजार झाला व त्याने अंथरुण धरले. दुसरे उत्पन्न नसल्यामुळें त्रिमूर्तींचा बेकार मुलगा त्रिकाम भीक मागू लागला. एकदा तो धीनाथच्या घरी भीक मागायला गेला.

धीनाथने त्याला विचारले, ''तू विशीतला धडधाकट तरुण आहेस. आजवर वडिलांच्या कष्टावर जगलास; आता ते आजारी पडलेत तर तू इतरांच्या कमाईवर कां जगतो आहेस? भीक मागणे हा अपराध आहे. हा तुझी पहिलीच वेळ आहे म्हणून मी शिक्षा देणार नाही. पण पुन्हां कधी गांवात भीक मागताना दिसलास तर कोठडींत टाकीन.''

धीनाथची सूचना ऐकून त्रिकाम घाबरला. तो गांव सोडून पळून गेला. आता त्रिमूर्ती अनाथ झाला. तेव्हां धीनाथने ग्रामाधिकाऱ्याला म्हटले, ''गांवातल्या दीनदुबळ्या व अनाथ लोकांना मदत करणें हे आपले कर्तव्य आहे. त्रिमूर्तीची शुश्रूषा करण्यासाठी गांवातला एक माणूस रोज त्याच्याकडे जायला हवा, व त्याची देखभाल केली जावी.''

ग्रामाधिकाऱ्याला ह्या सल्ला कांही आवडला नाही; पण आपली नापसंती न दाखवता तो म्हणाला, ''हा सल्ला द्यायला उशीर झाला आहे असं मला वाटतं. जेव्हां त्याचा मुलगा इथें होता, तेव्हां अशी सूचना तुम्ही दिली असतीत तर बरं झालं असतं! आता समजा, गांवकऱ्यांनी



त्रिमूर्तींच्या पालन-पोषणाचा भार आपल्यावर घेतला, तरी ते त्रिमूर्तींचं भिक्षा मागणंच नाही कां होणार? तुम्ही तर माझ्यासमोर एक धर्मसंकट उभं केलं आहेत.''

''त्रिकाम अनाथ नाही, तो अपंग, असहाय-देखील नाही. तो फारच आळशी आहे. आळशांनी भीक मागणें हा गुन्हा आहे. त्रिमूर्ती भीक मागत नाही. त्याला न सांगता सवरता आपण ही मदत त्याला करणार आहोत.'' धीनाथने आपली बाजू मांडली.

श्रीनाथला हा खुलासा पटला. त्याने लागलीच तशी व्यवस्था केली. आता श्रीपुरमधेंही प्रत्येक गांवात असतात तसे कांही दुष्ट, द्वाड, लोक होते. ते अशा संधीची वाट पहात असतातच. भीम, रंगा व मंगल ते तिघे तरुण त्यांच्यापैकी होते. तिघांनी एकत्र बसून विचार ठरवला आणि ते तिघेजण श्रीनाथला भेटायला गेले. त्यांनी श्रीनाथला सांगितलं.

''आमचे आईवडील आता म्हातारे झाले आहेत. आमच्याच्याने त्यांचा सांभाळ होऊं शकत नाही. म्हणून आमची आपल्याला विनंती आहे कीं गांवाच्या कचेरींत आम्हाला तिघांना नोकरी देण्याची सोय करावी. आपण जो पगार ठरवून द्याल त्यांतून आम्ही आमचे कुटुंब सांभाळूं, व आपल्या आईवडिलांचीही देखभाल करूं.''

श्रीनाथने त्यांची मागणी सपशेल नाकारली. ''आपण नोकरी दिली नाहीत तर आम्हाला काम



शोधायला दुसऱ्या गांवी जायला लागेल. तेव्हां आमच्या आईवडिलांची जबाबदारी कुणा गांवकऱ्यावर सोंपवायची व्यवस्था तुम्ही कराल कां? हा आमच्यावर धडधडीत अन्याय आहे.'' भीमने म्हटलं.

त्याचवेळी नेमका धीनाथ तिथे आला. ही मागणी ऐकून तो त्या तिघांना म्हणाला, ''गावांतल्या नागरिकांची व्यवस्था पाहाण्याची जबाबदारी श्रीनाथ यांच्यावर आहे. तुम्ही तिघेही गांव सोडून जायला तयार आहात कां?''

''आम्ही गांव सोडून कां जायचं नि कुठे जायचं?'' तिघांनी एकदम जोरांत विचारले.

त्यांचा हा उद्धट प्रश्न ऐकून श्रीनाथ एकदम नाराज झाला. त्याने लागलीच त्या तिघांवर बहिष्काराची शिक्षा ठोठावली. लौकरच ते तिघेही गांवाबाहेर नाईलाजाने गेले.



त्यांना ही शिक्षा दिल्यानंतर श्रीनाथ जरा विचारांत पडलेला होता. त्याने धीनाथला म्हटले, ''मला एक काळजी जरूर वाटते आहे, कीं अशा तऱ्हेने आणखी किती कुटुंबांचा सांभाळ आपल्या डोक्यावर पडणार आहे?''

''तुम्ही निष्कारण घाबरुं नका. हे तिघे अगदी वाह्यात आहेत. बरं झालं, तुम्ही त्यांना गांवाबाहेर हाकललंत! आता तुम्ही लौकरच बघाल कीं त्रिकाम परत घरी येईल आणि तुमची क्षमा मागेल.'' धीनाथने अस्वस्थ झालेल्या श्रीनाथला दिलासा देण्यासाठी म्हटलं.

कांही दिवसांनंतर श्रीनाथला समजलं कीं त्रिकाम, भीम, रंगा आणि मंगल जवळच्याच सत्यपुर गांवात राहात आहेत आणि कष्टाच्या कमाईवर जगत आहेत. पण अद्यापही त्यांचा उडाणटप्पूपणा कांही कमी झालेला नव्हता. श्रीनाथच्यामुळें आपल्याला हे कष्ट करावे लागत आहेत म्हणून वेळोवेळीं ते त्याला शिव्या घालीत होते.

''त्यांनी चूक केली म्हणून मी त्यांना शिक्षा दिली. जोपर्यंत ते आपली चूक कबूल करणार नाहीत व आपली वर्तणूक सुधारणार नाहीत, तोपर्यंत त्यांचा उत्कर्ष होणारच नाही.'' श्रीनाथ धीनाथला म्हणाला.

आठ दहा दिवसानंतर श्रीनाथला वाटले कीं आपण सत्यपुरला जावे आणि त्यांची अवस्था बघावी. त्याने एका बैलगाडीची सोय केली. तो बैल चांगला तगडा व धष्टपुष्ट होता. तो गाडीवानही अनुभवी व कुशल होता. श्रीनाथ एकटाच गाडीतून निघाला.

श्रीपुराहून सत्यपुरला जाताना वाटेंत वीरपुर, धृवपुर, गृहपुर या गांवांतून जावे लागत होते. श्रीनाथची गाडी वीरपुर ओलांडून धृवपुर गांवाच्या वेशीवर पोंचल्यावर गाडीचे एक चाक रस्त्यावरच्या एका मोठ्या दगडावर चढले. या आकस्मिक अपघातामुळें श्रीनाथ जमिनीवर घसरुन पडला. त्याला मार लागल्यामुळें त्याची शुद्ध हरपली. गाडीवान धनियाही खाली आपटला. गाडीचे चाक त्याच्या अंगावर उलटले. त्याला उठता येईना. तो तिथेच पडून राहिला.

त्यावेळीं भीम कांही कामासाठी सत्यपुराहून धृवपुरला जात होता. त्याने हे दृश्य पाहिले. त्याने बैलाचा कासरा पकडला आणि गाडी सरळ केली. श्रीनाथ व धनियाला उचलून त्याने गाडींत



घातले, आणि धृवपुरांतल्या एक चांगल्या वैद्याकडे त्यांना नेले.

वैद्याने पूर्ण तपासणी केली आणि सांगितले कीं धनिया लौकच बरा होईल. पण श्रीनाथला शुद्धीवर यायला एक आठवडा लागेल. श्रीनाथची शुश्रूषा नीटपणें करायली हवी आणि एक माणूस चोवीस तास त्याच्यावर लक्ष ठेवायला हवा. त्याच्या औषधपाण्याचा खर्चही बराच येणार होता.

त्या वैद्याने पुढे म्हटले, ''माझ्या घरी त्याला ठेवायला व त्याच्यावर उपचार करायला मी तयार आहे. पण बरा झाल्यानंतर जर त्याने शुश्रूषा-उपचाराचे पैसे द्यायचे नाकारले तर माझे पैसे तू दिले पाहिजेस. ही अट मान्य असली तरच मी आवश्यक ते उपचार सुरुं करीन.''

भीमाने वैद्यांची ही अट मान्य केली. तो स्वत:च श्रीनाथबरोबर तिथें राहिला आणि त्याने त्याची सेवाशुश्रूषा केली. तीन दिवसानंतर श्रीनाथ शुद्धीवर आला. भीमाने अगदी निगुतीने सेवा केली म्हणूनच श्रीनाथ लवकर शुद्धीवर आला असं वैद्याने सांगितले. आणखी तीन दिवसांत श्रीनाथ खडखडीत बरा झाला.

त्या दरम्यान धनियाचीही प्रकृति ठीक झाली व त्याला हिंडायफिरायची शक्ती आली. तो श्रीपुरला गेला आणि त्याने ही बातमी इतरांना सांगितली. श्रीनाथला बघायला लागलीच त्याचे कुटुंबिय, धीनाथ व आणखी कांही गांवकरी धृवपुरला गेले. सर्वांनी वैद्यबुवांचे व भीमाचे आभार मानले व कौतुक केले.



''मी माझे व्यावसायिक कर्तव्य केले. त्याशिवाय परमेश्वराची कृपाही होती. त्याखेरीज मी जास्त कांही केले नव्हते.'' वैद्याने सांगितले.

''माझी फार मोठी चूक झाली होती. आम्ही तिघे रोज देवाजवळ प्रार्थना करुन मागणी करीत होतो कीं आमची चूक सुधारण्याची एक संधी आम्हाला द्यावी. परमेश्वराने अशा तऱ्हेने माझी विनंती ऐकली तर!'' भीमाने उत्साहाने म्हटले.

श्रीनाथने लगेच वैद्यबुवांनी सांगितलेली उपचाराची रक्कम दिली व त्यांचा त्याने सत्कारही केला. घरी परत आल्यानंतर भीमावर घातलेली बहिष्काराची सजा रद्द करावी, व त्याला गांवातच नोकरी द्यावी असे त्याला वाटले. हा विचार त्याने धीनाथला सांगून म्हटले, ''भीमाला पश्चात्ताप झालेला आहे. त्याला नोकरी द्यावी असा माझा विचार आहे. तुमचे काय मत आहे?''

धीनाथने उत्तर दिले, "माझं कांहीही मत नाही. पण यापुढें मात्र तुम्ही प्रवास करूं नये आणि गांवाबाहेर जाऊं नये असं मला वाटतं. कारण बेजबाबदार व उद्दाम वर्तणुकीबद्दल शिक्षा झालेले अजून तिघेजण आसपास आहेतच."

वेताळाने ही गोष्ट सांगून विक्रमार्कला म्हटले, "राजन्, धीनाथ भले मोठा पंडित असेल, परंतु त्याच्या मनांत दया, करुणा वा क्षमा काडीमात्र नाही. जर योग्य वेळींच भीमची मदत मिळाली नसती तर श्रीनाथ जिवंत राहिला नसता. आपल्याला जीवदान देणाऱ्या भीमला गांवातल्या कचेरींत नोकरी देऊन आपली कृतज्ञता व्यक्त करावी असे साहजिकच श्रीनाथला वाटले. पण धीनाथने त्यावर आपली शंका व्यक्त केली आणि श्रीनाथला सावध केले. त्याच्या या मनोवृत्तीमुळें त्याच्या स्वभावांत माणुसकी, विवेक, सारासार विचारशक्ती यांचा अभाव आहे असं वाटत नाही कां? माझ्या या शंकेचे समाधानकारक उत्तर तुला माहीत असूनही जर तू बोलला नाहीस, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील."

त्याला विक्रमार्काने उत्तर दिले, "मनुष्य हा जनावरांपेक्षां निराळा आहे. कारण दया, करुणा, प्रेम, असे सात्विक भाव मानवाच्या मनांत असतात. पण चांगले किंवा वाईट कोण आहे हे ओळखूनच हे भाव इतरांबद्दल दाखवायचे असतात. परमेश्वराने भीमाची चूक सुधारण्याची संधी देण्यासाठी ही घटना घडवली हे भीमाचे म्हणणे चूक आहे. म्हणूनच धीनाथने श्रीनाथला सल्ला दिला कीं भीमाप्रमाणे आणखी तीन लोक आहेत, म्हणून त्याने गांवाबाहेर जाऊं नये. भीमाला गांवात नोकरी देणे श्रीनाथला सहज शक्य होते, पण त्यामुळें त्या तिघांचा दुरावा व कडवटपणा जास्तच वाढला असता, आणि त्यांनी अशा संधीची वाट पहात डाव साधला असता.

धीनाथच्या या सल्ल्यामुळें त्याला वेगवेगळ्या स्वभावाच्या माणसांची चांगली परीक्षा आहे हे दिसून येते. त्यांचा हा सल्ला सर्वस्वी योग्य व उचित आहे."

राजाचे मौनभंग करण्यांत यशस्वी झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.








## सागराची पूजा



भारताच्या पश्चिम किनारपट्टीवरचे मच्छीमार लोक मकर-संक्रांतीला समुद्राची पूजा करतात. या जलधीला माता ते मानतात आणि अन्न देणारी म्हणून अन्नपूर्णेश्वरी म्हणतात. ही रुढी व पूजा, या जमातींना केवळ एकत्र आणण्याचेच काम करतात असे नव्हे, तर त्यांना पर्यावरणाचे महत्व, मनःपूर्वक श्रद्धेने काम करणें व समुद्रदेवतेचा मान राखणें, या गोष्टीही शिकवतात.

गुजरातेंत मकरसंक्रांत हा उत्सव सूर्याचा उत्तरेकडे प्रवास सुरुं झाला म्हणून साजरा करतात. या आनंदाच्या सणाच्या वेळीं सर्व वयाचे लोक एकत्र येऊन पतंग उडवतात.

आकाशांत हजारो विविधरंगी पतंग उडत असतात, नि त्याचे ठिपके विखुरलेले दिसतात. पतंग उडवण्याच्या स्पर्धा ठिकठिकाणी दिसतात. त्यामुळें सगळीकडे वातवारण उत्साही व प्रफुल्लित असते.

## वारसा यादीतली शिलाचित्रें

भीमबेटका ह्या मध्य प्रदेशांतल्या सुप्रसिद्ध गुंफा आता युनेस्कोच्या 'जागतिक वारसा' यादींत नोंदल्या गेल्या आहेत. या गुंफात मेसोंलिथिक काळांत (इ.स.पू. ३५०० आणि २००० पर्यंत) केलेली भित्तीचित्रें आहेत. भोपाळच्या विक्रम विद्यापीठाचे प्राध्यापक वाकणकर यांनी या गुहांचा शोध लावला. इथें जवळजवळ ५०० गुहा आहेत. बहुतेक सर्व चित्रांत महाभारतांतल्या कथा आहेत. या जागेचे नांवदेखील पांडुपुत्र भीमसेन, ह्याच्यावरुन पडले आहे.



भारतीय दंतकथा - २१

# केवळ एका काठीपायी



वनाचार्य या श्रेष्ठ ऋषींचे राम व प्रकाश हे शिष्य होते. दोघेही अत्यंत बुद्धिमान व अभ्यासू होते. वेद, उपनिषदें व इतर अनेक पुराणांचा त्यांनी अभ्यास केलेला होता. कित्येक सिद्धीही त्यांना अवगत होत्या.

वनाचार्यांचा आश्रम सरयू नदीच्या किनाऱ्यावर होता. परंतु त्यांचे गुरु मात्र हिमालयांतल्या एका खोऱ्यांत राहात होते. एके दिवशी त्यांना एक यात्रिक भेटला आणि त्याने निरोप सांगितला कीं वनाचार्यांच्या गुरुजींनी त्यांना त्वरित येऊन भेटावयास सांगितले आहे.

वनाचार्य उठून उभे राहिले. "मला लगेच गेले पाहिजे." त्यांनी आपल्या शिष्यांना सांगितले. "तुम्ही सारेजण स्वत:ची काळजी घ्या."

आश्चर्यचकित होऊन शिष्यांनी विचारले, "गुरुजी, इतकी घाई कशासाठी?"

"गुरुजींच्या बोलावण्यापेक्षां इतर कोणतेही जास्त महत्वाचे काम शिष्याला असत नाही. मला लगेच जायला हवे." वनाचार्यांनी सांगितले.

"पण गुरुजी, आश्रमाच्या कामाची आपण व्यवस्था लावून नंतर आपण गेलात तर नाही कां चालणार?"

"सारं कांही आपोआप सुरळीतपणें चालेल." त्यांनी उत्तर दिलं.

"आपण केव्हां परत येणार आहात?" शिष्यांनी विचारले.

"माहीत नाही, कदाचित येणार देखील नाही!"

वनाचार्यांना जास्त संवाद नको होता. त्यांनी नदी ओलांडली आणि हिमालयाची वाट धरली. त्यांचे दोन्ही शिष्य व गांवातले चाहाते यांनी त्यांना नदीकांठावरुन निरोप दिला.



राम आश्रमांतच राहिला, पण प्रकाश आपल्या गांवी गेला आणि तिथे साधुवृत्तीने राहूं लागला. हळुंहळूं त्याच्या भोवती शिष्य गोळा झाले आणि तो प्रकाशबाबा म्हणून प्रसिद्ध झाला. परंतु तो अतिशय साधेपणाने राहात होता. एका लहानशा झोंपडीत तो राही. त्याच्याजवळ त्याच्या थोड्याशा कपड्यांखेरीज एक पितळेचे भांडे, आणि एक काठी, इतकेच सामान होते.

रामदेखील आता रामबाबा झाला होता, पण तो सुखासीन आयुष्य जगत होता. हे जेव्हां प्रकाशला समजले, तेव्हां त्याला वाईट वाटले. रामच्या एका श्रीमंत जमीनदार शिष्याने रामला एक मोठे प्रशस्त घर बांधून दिले होते, व नोकरचाकरांची देखील व्यवस्था केलेली होती. जमीनदाराच्या घरुन रोज स्वादिष्ट भोजन रामसाठी पाठवले जात होते.

"हे अध:पतन!" असा विचार प्रकाशबाबाच्या मनांत आला. भौतिक सुखाच्या जंजाळात सांपडल्याचे धोके व तोटे आपल्या मित्राला सांगावेत असे प्रकाशने ठरवले. प्रवास करीत तो रामबाबाच्या आश्रमांत पोंचला. आपण जे ऐकलं होतं ते कांही खोटं नाही हे त्याला दिसलं. "अरे मित्रा, अशा चैनीच्या आयुष्याला तू चटावला आहेस हे तुला योग्य वाटतं कां? तुझ्या आयुष्याचे प्रयोजन फार वेगळे आहे. तू इथून माझ्याबरोबर चल आणि माझ्या आश्रमांत राहा. तिथें तुला तुझी ज्ञानसाधना व आत्म्याची उन्नती पुन्हां करायला वेळ मिळेल."

"कशासाठी? देवाची इच्छा हीच असली तर?" रामबाबा म्हणाला.

त्याचवेळेला गुरुकुलांतला त्यांचा एक जुना मित्र तिथें घाईघाईने येऊन म्हणाला, "वनाचार्य गुरुजी नदीच्या पलीकडच्या तीरावर आले आहेत. तिथें ते थोडाच वेळ थांबणार आहेत. तुम्हाला दोघांना भेटण्याची त्यांची इच्छा आहे. बहुधा, तुम्ही दोघांनीही त्यांच्याबरोबर हिमालयांत यात्रेला जावे असा त्यांचा विचार असावा!"



''किती चांगला योगायोग आहे हा! नेमका आजच मी इथें आलो आहे!'' प्रकाशबाबाने म्हटले. पण किंचित कुरकुरत त्याने पुढें म्हटले, ''पण जर गुरुजींनी खरोखरच आपल्याला त्यांच्याबरोबर जायला सांगितलं, तरी माझ्या शिष्यांना ही माहिती मी कळवणार तरी कसा?''

''ते गुरुजी पाहातील.'' रामबाबाने उत्तर दिलं. परंतु रामबाबानेही याविषयीं कुणालाच कांहीही सांगितलं नाही.

दोघेही सरयू नदीच्या कांठाकडे निघाले. तिथे असलेली नाव प्रवाशांनी भरलेली होती. फारतर दोघे किंवा तिघांसाठीच जेमतेम जागा शिल्लक होती.

अचानक प्रकाशबाबाला आपल्या काठीची आठवण झाली. ती काठी सुरेख, गुळगुळीत होती आणि त्याला सुबकशी मढवलेली मूठ होती.

''राम, तू पुढे जा. मी माझी काठी तुझ्या घरी विसरलो आहे, ती घेऊन येतो. मी नंतरच्या नावेत बसून येईन.'' प्रकाशबाबाने म्हटले.

रामबाबा आणि गुरुजींचा निरोप आणणारा मित्र, हे दोघे नावेत अगोदर चढून बसले होते. नावाड्यांनी वल्ही मारायला लगेच सुरवात केली.

घटकाभरांत प्रकाशबाबा काठी घेऊन परत नदीकांठावर येऊन बसला. पण नदीच्या वरच्या अंगाला अचानक पाऊस पडून पूर आला. त्यामुळे पलीकडच्या तीरावर पोंचलेली नाव इकडे पुन्हां आली नाही. पुराचे पाणी ओसरेपर्यंत प्रकाश-बाबाला नदीपार करणें अशक्य होते. जोराचा पाऊस सुरुं झाला. पूर ओसरायला एकच काय, जास्त दिवसदेखील लागले असते.

प्रकाशबाबा एका दगडावर बसला आणि त्याला अश्रू आवरेनात. सुखासीन जीवनाबद्दल आपण मित्राला उपदेश केला, तो आपला मूर्खपणा होता असे त्याला वाटले. राम वैभवांत राहूनदेखील त्याला कोणत्याही गोष्टीची अभिलाषा नव्हती. त्याने आपला निर्णय शिष्यांना सांगितला नव्हता. परमेश्वर सर्वांची काळजी घेईल असे त्याला वाटत होते.

पण प्रकाश जरी वरकरणी साधे आयुष्य जगत होता, तरी सामान्य काठीमधे त्याचा जीव अडकला होता. किरकोळ वस्तूच्या पाशांतून त्याची सुटका झालेली नव्हती. वनाचार्य गुरुजींच्या सहवासांत राहण्याची सुवर्णसंधी त्याने निष्कारण गमावली - केवळ एका काठीपायी!

*- विश्ववसू*





# खास बातम्या



## झाईझाई जिवंत आहे

**टा**यगनचे पिल्लूं आता १८० दिवस जगले आहे त्यामुळें वाघ-सिंहापासून जन्मलेल्या या बछड्याने इतिहासांत नोंद व्हावी असा विक्रम केला आहे. झाई झाई असे नामकरण झालेले हे पिल्लूं २७ मार्चला जन्मले होते. त्याची निगराणी चीनमधल्या हूनान प्रांतातल्या चांगशा अभयारण्यांत होत आहे. दोन प्राण्यांच्या संकरापासून जन्मलेली पिल्लें बहुधा फार काळ जगत नाहींत, पण झाईझाई मात्र सगळ्या बाळपणांतल्या समस्यांना समर्थपणें तोंड देऊन म्हातारपणापर्यंत जगेल अशी अभयारण्याच्या अधिकाऱ्यांना खात्री वाटते आहे.

## वालुकाशिल्पांना पारितोषिक

**ब**र्लिनमधे झालेल्या वालुकाशिल्पांच्या स्पर्धेत ओरिसामधला सुदर्शन पटनाईक हा एकमेव भारतीय स्पर्धक होता. इतर देशांतून आलेले एकोणीस स्पर्धक होते. पहिला क्रमांक रशिया व दुसरा नेदरलंडला मिळाला. पटनाईकने गणेशाचा बाळूची मूर्ती तयार केली. सव्वीस वर्षांचा पटनाईक गेली तेरा वर्षे हा छंद जोपासतो आहे. ओरिसांत तो एक शाळा चालवतो आणि पन्नास विद्यार्थ्यांना तिथें वालुका-शिल्प बनवण्याचे शिक्षण देतो.



# सांवलीने वाचवले

तुरुंगाच्या कोठडींत ज्यो एर्डमन विचारांत गढला होता. गांवातल्या एका महत्वाच्या राजकारणी असामीला ठार मारण्याचा प्रयत्न करण्याचा आरोप त्याच्यावर होता.

एके दिवशी संध्याकाळीं, तुरुंगाधिकारी एका अनोळखी पाहुण्याला घेऊन आला. हा कैदी दचकून उठला आणि त्या परक्या माणसाकडे एकटक पाहूं लागला.

"अरे मित्रा, घाबरुं नकोस! मी जॉन वॉटसन, एक वकील आहे. मी तुझा बचाव करायला आलो आहे, आणि कोणतीही फी न घेता!" तो उंच मध्यमवयीन गृहस्थ म्हणाला.



त्या वकीलाने सकाळच्या वर्तमानपत्रात ही बातमी वाचली होती. २२ मे १९१० रोजीं रविवारी दुपारी बरोबर २.२५ वाजता त्या गांवच्या एका राजकीय पक्षाचा नेता, विली बॅनिस्टर, हा नेहमीप्रमाणे फिरायला जाऊन परत आला. घराच्या पुढच्या पायऱ्यांवर त्याला एक कातडी बॅग दिसली. त्या बॅगेच्या किल्ली लावायच्या भोकांतून एक पांढरा धागा निघून तो त्याच्या घराच्या दरवाजाच्या कडीला लावलेला होता.

बॅनिस्टरने पोलिसांना बोलावले. गुप्तचरांचा एक गट तिथे आला आणि त्यांनी ती बॅग उघडली. त्यांत एक पिस्तुल व सुरुंगाच्या दारुच्या कांड्या होत्या. पांढरा धागा त्या पिस्तुलच्या चापाला बांधलेला होता.

वर्तमानपत्रांतल्या बातमीने त्या वकीलाच्या मनांत शंकेचे मोहोळ उत्पन्न केले. त्याला हा एक बनाव वाटत होता. त्याचा हा ग्रह जास्तच बळकट झाला. कारण लगेच संशयिताला तुरुंगात टाकले होते. तो तडक तुरुंगाकडे गेला.

"तुम्ही तुमचा वेळ निष्कारण माझ्यावर खर्च करता आहात. मला तो बॅनिस्टर मुळींच आवडत नाही आणि नुकतंच आमचं जरासं वाजलं देखील होतं. त्याशिवाय गुन्हा घडला त्यावेळीं मी दुसरीकडे होतो हे सिद्ध करायला माझ्याजवळ कुणीही साक्षीदार नाही, कीं कांही इतर पुरावा नाही. माझ्यापाशी मित्र नाहीत, साक्षीदार नाहीत, आणि जामीनावर सुटायला तितके पैसेदेखील नाहीत!"

पण जॉन वॉटसनने ऐर्डमनचा खटला चालवायचा व त्याचा बचाव करायचाच, हा निश्चय केला होता. "घाबरुं नकोस! तू गुन्हा केला आहेस हे सिद्ध करायला देखील पुरेसा पुरावा दिसत नाही!"

खटला चालू असताना सात साक्षीदारांनी ठामपणें सांगितलं कीं २२ मेच्या दुपारी २.२५ वाजता बॅग सांपडण्यापूर्वी त्या प्रत्येकाने जो एर्डमनला बॅनिस्टरच्या घराजवळ बघितले होते.

त्यांच्यानंतर दोन प्रमुख साक्षीदार आल्या - पांढरे लांब झगे घातलेल्या दोन चिमुरड्या मुली! पहिल्या साती साक्षीदारांनी या मुलींना त्या घरांसमोरुन जाताना पाहिले होते. त्या दोघींनी सांगितलेली गोष्ट साधी व सरळ होती.

त्या रविवारी दुपारीं १.५० वाजता चर्चमधून त्या दोघी घरी परत जात होत्या. त्यावेळीं त्या बॅनिस्टरच्या घरावरुन गेल्या. त्यांनी जो एर्डमनला पाहिले होते. तो घाईघाईने त्या घराच्या मागच्या गल्लींत वळला. त्याने चौकडीचा शर्ट घातला होता, निळी टोपी घातली होती आणि चालताना तो जरासा लंगडत होता.

त्यांच्यासमोर आरोपीच्या पिंजऱ्यांत बसलेल्या जोच्या अंगात चौकडीचा शर्ट होता. त्याला चालायला सांगितले तेव्हां तो चालताना जरासा लंगडत होता. त्याला एक निळी टोपी



दाखवली. ती त्याने आपली असल्याचे कबूल केले.

खटला संपल्यासारखाच होता. आरोपीचा वकील जॉन वॉटसन याने एक सुस्कारा सोडला. पण त्याने अद्याप आशा सोडली नव्हती; त्याने आणखी एक प्रयत्न करुन पाहायचे ठरवले. मोठ्या जड अंतःकरणाने तो हळूंहळूं उठला आणि त्या दोघी बहिणींजवळ गेला.

"मला सांगा, तुम्ही चर्चमधून बाहेर पडल्यानंतर काय काय केलंत?"

"आम्ही आमचा फोटो काढून घेतला."

"तुम्ही कुठल्या स्टुडिओंत गेला होता कां?"

"नाही, नाही, आपल्या म्हाताऱ्या पाद्रीबाबांनी तो काढला. आम्ही ना, नुसत्या चर्चच्यासमोर उभ्या राहिलो होतो."

"हा फोटो तुमच्याजवळ आहे कां?"

"हो तर! हा बघा माझ्या हातांतल्या पिशवींतच आहे. हा घ्या तुम्ही! आमच्याजवळ



त्याची आणखी एक कॉपी आहे की!" छोटी मुलगी म्हणाली.

या प्रश्नोत्तरानंतर न्यायाधीशांनी सकाळचे काम संपल्याचे जाहीर केले. जॉन वॉटसन कोर्टातून निघून समोरच्या उद्यानांत जाऊन बसला. तो फोटो हातांत घेऊन त्यावर तो विचार करीत होता. चित्रांत चर्चच्या समोर लांब पांढरे झगे घातलेल्या दोघी पोरी फारच गोड दिसत होत्या. त्यांच्या साक्षीमुळें जास्त कांही सांगण्यासारखे राहिले नव्हते. तो फोटो निरखून पाहात होता. त्यांतून कांही धागा सांपडेल कां?

अचानक एक बारीकसा मुद्दा त्याला त्या फोटोंत आढळला. त्याच्या डोक्यांत कल्पनांची एकच गर्दी उसळली. कांहीतरी हातांतून निसटतंय अशी त्याला मनांत खुटखुट वाटत होती. तो फोटो हातांत धरुन तो तसाच चर्चकडे गेला आणि चर्चच्यासमोर उभा राहिला. त्याच्या डोक्यावरती चर्चच्या घंटेचा मनोरा दिसत होता आणि त्यावर असलेल्या मोठ्या घड्याळाने धाणऽऽऽ, धाण ऽऽऽ, असे दोन वाजल्याचे टोले दिले.

वॉटसनने एक टॅक्सी पकडली आणि तो वेधशाळेच्या कचेरींत गेला. तिथे त्याला खगोलशास्त्रज्ञ भेटला. त्याच्याशी बोलून वॉटसन घाईघाईने कोर्टात गेला. त्या खटल्यामधें आपल्याला कांही नवीन पुरावा सादर करायचा आहे या मुद्यावर त्याने काम स्थगित करण्याची विनंती केली.

दुसऱ्या दिवशी सकाळीं कोर्टात पाय ठेवायला जागा नव्हती. वॉटसनकडे कांहीतरी सनसनाटी बातमी आहे अशी अफवा गावांत पसरली होती.

आरोपीतर्फे पहिल्या साक्षीदाराला पुकारण्यांत आले. तो एक लहानखुरा, तगडा गृहस्थ होता. त्याला छोटीशी दाढी आणि करड्या रंगाच्या मिशा होत्या.

"सर, आपण युनिव्हर्सिटीत खगोलशास्त्राचे प्राध्यापक आहात ना?"

"होय"

"हा एक फोटो आहे. आपण कृपया हा नीट पहावा. हा फोटो कोणत्या वेळेला काढला असेल ते आपण सांगू शकाल कां?"

"होय, मी नुसती वेळच नव्हे, तर कोणत्या दिवशी हा काढला आहे तो दिवसदेखील सांगू शकेन."

"आपण इतकं खात्रीपूर्वक कसं सांगू शकता?"



कोर्टांत सर्वजण शांत होते. खगोलशास्त्रज्ञाने आपली दाढी जरा कुरवाळली, मिशांवरुन हात फिरवला आणि विचार करीत उत्तर तो सावकाश बोलू लागला.

"ते अगदीच सोपं आहे. इथें पहा, या फोटोंत तुम्हाला एक सांवली दिसते आहे कां? ती चर्चच्या मनोऱ्याच्या निमुळत्या टोंकाची सांवली आहे. आता सांवलीचा कोन मोजला कीं त्या दिवशी किती वाजले होते ते बरोबर सांगता येतं."

"तर मग हा फोटो कोणत्या वेळीं काढलेला आहे ते आम्हाला बरोबर सांगावे."

"२२ मे १९१०च्या दुपारीं ३.१० ला कॅमेऱ्याचे बटन दाबले गेले होते."

एका शास्त्रज्ञाकडून असा बिनचूक पुरावा मिळाल्यानंतर फिर्यादीचे सात साक्षीदार व त्या दोन लहान मुली, यांच्या साक्षी शंकास्पद व डळमळीत ठरल्या गेल्या. जरी त्यांनी आरोपीला प्रत्यक्ष त्या जागीं पाहिले होते, तरी ती रहस्यमय बॅग तिथें २.२५ वाजता सांपडली होती; त्यानंतर पंचेचाळीस मिनिटांचा वेळ होऊन गेलेला होता व त्यानंतर त्यांनी त्याला पाहिले असणार! त्यांची आठवण धूसर असल्याची शक्यता जास्त होती.

खगोलशास्त्रज्ञाची उलटतपासणी घेण्याचे धारिष्ट्य कुणालाच झाले नाही. त्याचे गणिती हिशेब आणि पुरावा अचूक व भक्कम होता. रात्रभर तो ही आंकडेमोड करीत होता. सकाळीं उठून त्याने चर्चसमोरच्या जागेचे पुन्हां निरीक्षण केले होते. एका निरपराध्याला अन्यायी शिक्षा भोगावी लागू नये म्हणून त्याने इतकी मेहनत घेतली होती.

शेवटी, खटला निकालांत निघाला आणि आरोपीची निरपराधी ठरुन सुटका झाली. परंतु, कांही लोकांना वाटले कीं फोटोमधल्या एका सांवलीमुळे ही जादू कशी काय घडली असेल?

एका वर्षानंतर, हे चिंतातुर लोक चर्च-समोरच्या प्रांगणात जमले, आणि त्यांनी आपले फोटो काढून घेतले. जेव्हां फोटो तयार झाले, तेव्हां त्या टोंकाची सांवली अगदी त्या मुलींच्या फोटोंत पडली होती, तशीच व अगदी त्याच कोनात, त्या दिवशी पडली होती.



## बंगालची एक लोककथा

# नदीची मुलें

**को**णे एके काळी प्रजेवर प्रेम करणारा एक राजा होता. तो त्यांची नीट काळजी घेत असे. त्याच्या मंत्रीगणांकडून व गुप्तचरांकडून त्याला प्रजाजनांची माहिती मिळत असे. तरीही लोकांना कांही अडचणी आहेत कां, ते जाणून घ्यायची त्याची मनस्वी इच्छा असे. म्हणून तो वेष पालटून, राज्यांत अधूनमधून हिंडत असे व प्रजेची सुखदुःखें जाणून घेत असे.

एक दिवस तो आपल्या एका सरदाराच्या घरासमोरुन जात होता. मध्यरात्र झालेली होती. राजा घराजवळ आला तेव्हां एक खिडकी उघडी दिसली. आंतून मंद प्रकाश दिसत होता आणि त्याला बोलण्याचा आवाज ऐकूं आला. तीन



तरुणी आपल्याला कसा नवरा आवडेल ते एकमेकींना सांगत होत्या.

"तुम्हाला माहिती आहेच कीं मला स्वादिष्ट पदार्थ खायला खूप आवडतात. जरा राज्याच्या स्वयंपाक्याशीं माझे लग्न झाले तर मला राजा-राणींच्या ताटांत पडतात तसे उत्तमोत्तम पदार्थ खायला मिळतील." एकीने म्हटले.

"मी जर मंत्र्याशी लग्न केलं तर मला त्यांच्या-बरोबर देशविदेशांत, सगळीकडे फिरता येईल. मला नवीन गांवे, माणसे पाहायला किती आवडते ते तुम्हाला ठाऊक आहेच!" दुसरीचा आवाज आला. थोडा वेळ शांतता होती. नंतर पुन्हां तेच आवाज ऐकूं आले." तू कां ग गप्प आहेस? तू सांग ना; तुला कुणाशी लग्न करायला आवडेल?"

राजाला आता तिसरा आवाज कानावर आला. "जर महाराजांनी माझ्याशी लग्न केले तर मी त्यांना गोजिरवाणी मुलें देईन" त्यावर हंसत खिदळण्याचा आवाज आला.

राजा तिथून तडक निघाला व राजवाड्यांत परतला. तो विचार करूं लागला. त्याला दोन राण्या होत्या, परंतु एकीलाही मूल नव्हतं. राजाने तर्क केला कीं त्या तिघीजणी बहिणी असाव्यात. त्याला वाटले कीं त्यांच्यापैकी जिला राजाशी



लग्न व्हावं असं वाटलं, तिला आपली तिसरी राणी करावी.

दुसऱ्या दिवशी, त्याने पालखी पाठवून त्या तिघींना राजवाड्यांत बोलावून घेतले. राजाने दरबारांत मुलींना व त्यांच्या वडिलांना बोलावले व जो संवाद त्याने ऐकला होता तो सर्वांना सांगितला. "मी तुमच्या थोरल्या मुलीचे लग्न राजवाड्यांतल्या प्रमुख बल्लवाचार्याशी लावून देईन, आणि दुसरीचे लग्न आमच्या मंत्र्यांशी करुन देईन."

धाकट्या मुलीबद्दल आता राजा काय सांगणार आहे ते ऐकायला तो सरदार आतुर झाला होता. ती मुलगीही आळीपाळीने राजा व आपले वडील यांच्याकडे पाहात होती.

राजा प्रसन्नपणें हंसत सरदाराला म्हणाला, "आणि तुमच्या तिसऱ्या मुलीशी लग्न करुन तिला पट्टराणी बनवण्याची माझी मनीषा आहे." तिघींच्या आनंदाला पारावार राहिला नाही.

तिन्ही लग्नांचा सोहळा मोठ्या थाटामाटांत संपन्न झाला आणि तिघीजणी आपापल्या घरीं सुखाने नांदायला लागल्या. कांही दिवसांतच थोरल्या दोघी बहिणींना समजून चुकलं कीं त्यांना मध्यम परिस्थितींतच समाधान मानावे लागणार होते. पण त्यांची धाकटी बहीण मात्र राणी होउन अगदी थाटांत जन्मभर राहाणार होती. त्यांच्या मनांत मत्सराची भावना निर्माण झाली. पण नव्या राणीला मात्र त्या दोघींबद्दल खूप प्रेम होते. तिच्या मनांत आले कीं जर त्या दोघींपैकी एकीने जरी



राणी होण्याचे स्वप्न बाळगले असते, तर तिचे लग्न दुसरीकडे झाले असते. म्हणून तिला आपल्या बहिणींबद्दल नेहमीच कृतज्ञता वाटत असे.

लौकरच नव्या राणीला डोहाळे लागले आणि तिने आपल्या बहिणींना मदतीला बोलावले. राजानेही आनंदाने संमती दिली. दोघी बहिणी राजवाड्यांतच राहायला आल्या. राणीला मुलगा झाला आणि दोघी बहिणींनी एका दासीला फितवले; त्या बाळाला एका टोपल्यांत ठेवले आणि राजवाड्याच्या शेजारीच असलेल्या नदींत टोपली सोडून दिली. एक छोटे कुत्र्याचे पिलूं त्यांनी आणले आणि राणीच्या पुढ्यांत धरले. "जर देवाची हीच इच्छा असेल, तर हे पिलूं मी माझे बाळ म्हणून स्वीकारीन." दुःखी अंतःकरणाने राणी रडत म्हणाली.



वर्षभरानंतर राणीला पुन्हां एक गुटगुटीत, गोजिरवाणा मुलगा झाला. त्या बहिणींनी पुन्हां एकदा तोच दुष्ट प्रयोग केला आणि ते बाळ एका टोपलीत घालून नदींत सोडले, आणि राणीच्या पुढ्यांत एक मांजराचे पिल्लूं आणून ठेवले. पुन्हां एकदा बिचाऱ्या राणीने ''देवाची इच्छा'' म्हणून हे दान स्वीकारले.

आणखी एका वर्षानंतर, राणीने एका गोड मुलीला जन्म दिला. बहिणींनी याही पोरीला टोपलीत घालून नदींत सोडून दिले आणि एक सुरेख मातीची बाहुली आणून राणीच्याजवळ ठेवली. या घटनांमुळे राणीप्रमाणेंच राजाही फारच दुःखी झाला.

त्या मध्यरात्रींचा तिचा आवाज अजून त्याच्या कानांत घुमत होता. ''जर महाराजांनी माझ्याशी लग्न केले, तर मी त्यांना गोजिरवाणी मुलें देईन.''

वेषांतर करुन राज्यांत फेरफटका मारण्याची राजाची पद्धत त्याने तशीच पुढे चालू ठेवली होती. पण आता लोक राणीविषयी कांहीबाही बोलायला लागले होते. कांही लोक तर कुत्रा, मांजर व मातीच्या बाहुलीला जन्म देणारी ही राणी, एक चेटकीण असली पाहिजे असा आरोप करायला लागले. कुणीकुणी तर हा राजघराण्याला व राज्याला अपशकुन आहे असे मानायला लागले. या राणीने राजवाड्यांत राहू नये असे कांहीजणांनी सुचवले. म्हणून राजाने राणीला अरण्यांत सोडून दिले.

त्या नदीच्या कांठावर एक ब्राम्हण राहात होता. एक दिवस तो नदीवर रोजच्यासारखा स्नान करायला गेला तेव्हां त्याला एक टोपली वाहात येताना दिसली. त्यांत एक नवजात बालक बघून त्याला खूपच आश्चर्य वाटले. त्याने ती टोपली धरली आणि ते बाळ घेऊन तो घरी गेला. त्याने बायकोजवळ ते मूल दिले. त्या दोघांना मूलबाळ नव्हते. म्हणून त्यांनी या बाळाचे संगोपन मोठ्या प्रेमाने आणि निगुतीने केले.

वर्षभरानंतर पुन्हां एक टोपली त्या ब्राम्हणाला दिसली. ते बाळही त्याने घरी नेले. त्या दोन्हीं मुलांमधे कांहीतरी साम्य होते. आणखी एका वर्षानंतर पुन्हां एकदा एक टोपली वाहात येताना दिसली. या खेपेला टोपलींत एक नवजात मुलगी होती. ती छोटीदेखील या इतर दोन मुलांसारखी दिसत होती. या ब्राम्हण दांपत्याने तिन्ही मुलांचा मोठ्या मायेने सांभाळ केला. त्यांची नांवे त्यांनी मदन, मोहन व मोहिनी अशी ठेवली.

एके दिवशी ब्राम्हण अचानक गंभीररीत्या आजारी झाला आणि मरण पावला. त्या दुःखाने थोड्याच दिवसांत त्याची पत्नीदेखील वारली. ही तिन्ही मुलें वाढत्या वयाची होती. आता आपणच आपला मार्ग शोधला पाहिजे हे त्यांच्या लक्षांत आले.

एक दिवस त्यांच्या घरी एक अनाहूत पाहुणा आला. राजा अरण्यांत मार्ग चुकला होता. या मुलांच्या घरांतला मिणमिणता उजेड बघून तो यांच्याकडे आला. राजा थकलेला होता. तहानभुकेने व्याकुळलेला होता. मुलांनी त्याला भोजन दिले आणि रात्रीं झोंपण्यासाठी अंथरुण देऊन विश्रांति घेण्यास सांगितले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं उठल्यानंतर आपण कोण आहोत हे राजाने मुलांना सांगितले. जेव्हां केव्हां त्यांना कांही मदत हवी असेल तेव्हां त्यांनी अवश्य येऊन मागावी असे सांगितले.

राजधानींत परत गेल्यानंतर त्याने या मुलांना सोन्याच्या मोहरांनी भरलेली एक थैली पाठवली. त्यांना कोणतीही उणीव भासूं नये अशी राजाची इच्छा होती.

मोहिनीला जेव्हां कळलं कीं त्या देशाचा राजाच त्यांचा एका रात्रीपुरता अतिथी होता, तेव्हांपासून आपणही राजवाडा नसला, तरी एका मोठ्या वाड्यांत राहावं अशी तिला तीव्र इच्छा वाटत होती. तिच्या प्रेमळ भावांनी तिची ही इच्छा पूर्ण केली. ते तिघेही त्यांच्या नव्या मोठ्या घरांत राहायला गेले. मोहिनीने तो वाडा सजवला व सुरेख बाग लावली. वाड्याचे रंगरुप जास्त खुलून दिसायला लागले.

एके दिवशी एक योगी त्या वाटेने येत होता. नदीच्या कांठावर पण अरण्याच्या मधेच ही सुंदर इमारत पाहून त्याला आश्चर्य व आनंद वाटला. ''या घरांत कांही कमी आहे कां?'' मोहिनीने त्याला विचारले. योग्याने सुचवले कीं त्या घरांत सोनेरी झाड, सोनेरी पिंजऱ्यात एक सोनेरी मैना, आणि सोनेरी धनुष्य असावे. या सर्व वस्तू एका उंच पर्वतावरच्या राजवाड्यांतून आणता येणे सहज शक्य होते. तिथे कसे जायचे त्याबद्दलच्या सूचनाही त्याने सांगितल्या. योगी तिथून गेल्यानंतर भावाबहिणींनी याबाबतींत चर्चा केली व प्रथम मदनने त्या पर्वतावरच्या वाड्यांत





जायचे असे सर्वांनी मिळून ठरवले. निघण्यापूर्वी मदनने मोहिनीला एक तलवार दिली आणि म्हटले, ''जरा मला कांही झालं तर या तलवारीची झळाळी कमी होईल.''

कांही दिवस व महिने उलटले, पण तलवारीची चकाकी कायम राहिली. मदन सुखरुप होता हे मोहिनीला समजत होते. पण एके दिवशी सकाळीं तिने बघितलं तर तलवार निस्तेज व मलिन दिसूं लागली होती.

कारण मदन जेव्हां त्या वाड्याच्या पायऱ्या चढायला लागला, तेव्हां कुणीतरी ओरडलं, ''मदन, पुढें पाऊल टाकूं नकोस!'' पण पायऱ्या चढताना पाठीमागे बघूं नकोस, असं तर योग्याने सांगितलंच होतं. म्हणून त्याने त्या ओरडण्याकडे दुर्लक्ष केलं. दोन पायऱ्या चढल्यानंतर पुन्हां त्याला तो आवाज ऐकूं आला.'' मदन, मी पण तुझ्याबरोबर येतोय.'' त्याला वाटलं त्याचे वडील त्याला बोलावत आहेत. तो मागे वळला, आणि दुसऱ्याच क्षणीं त्याचा दगड होऊन तो खाली पडला.

भावाचा शोध घेण्यासाठी मोहनने जायचे ठरवले. त्याने मोहिनीला एक बांसरी दिली. जर त्याला कांही झाले, तर त्या बांसरीचे दोन तुकडे होतील असे त्याने सांगितले.

मदनही राजवाड्याच्या पायऱ्यापर्यंत पोंचला. दोन पायऱ्या चढल्यानंतर त्याला भावाचा आवाज ऐकूं आला. ''मोहन, मी तुझ्या मागून येतोय. माझ्यासाठी थांब ना!'' मोहनला त्या तीन वस्तू प्राप्त करण्यापेक्षां आपल्या भावाचा शोध घेणे जास्त महत्वाचे होते. त्यानेही मागे वळून बघितले आणि दगड होऊन तो खाली पडला.

बांसरीचे दोन तुकडे झालेले बघून मोहिनीला धक्काच बसला. ती दिवसभर रडत होती. दुसऱ्या दिवशी, तिने धीर एकवटला आणि भावांचा शोध घेण्यासाठी तिने जायचे ठरवले.

वाटेंत तिला समजलं कीं तिचे दोन्ही भाऊ त्याच वाटेने गेले होते. ती पुढे जात शेवटी त्या वाड्याच्या पायऱ्यापर्यंत पोंचली. आजूबाजूने येणाऱ्या हांका व आवाजांकडे तिने मुळीच लक्ष दिले नाही. ती धिटाईने सगळ्या पायऱ्या चढून वर गेली. समोरच एक चौक होता. त्यांत सोनेरी झाड होते. एक सोनेरी पिंजरा त्या झाडाला टांगलेला होता व त्या पिंजऱ्यात एक सोनेरी मैना होती. ती बोलायला लागली. ''मी तुझ्या आज्ञेची



वाट पहाते आहे. तिथें एका नगाऱ्यावर सोनेरी धनुष्य ठेवलेले आहे. ते धनुष्य उचलून त्या नगाऱ्यावर आपट. तुझे भाऊ जे दगड होऊन पडले आहेत, ते तो आवाज ऐकून पुन्हां जिवंत होतील.''

मैनेने जे कांही करायला सांगितलं ते मोहिनीनी सारं कांही तंतोतंत केलं. ''आता माझ्याजवळ सोनेरी धनुष्य व सोनेरी मैना, दोन्ही आहेत. पण माझे भाऊ जे सोनेरी झाड शोधायला इकडे आले, ते झाड मला कसं मिळेल?'' मोहिनीने विचारलं. मैना म्हणाली, ''त्या धनुष्याने टोंक त्या झाडाला लावले कीं ते झाड तुझ्या भावाच्या हातांत येईल.''

''मोहिनी? तू इथें आली आहेस!'' मदन व मोहन या दोघांनी आश्चर्याने विचारले.

''मी तुम्हाला सारं कांही नंतर सांगेन. पण आत्ता, या क्षणीं, तुम्ही एकाने हे धनुष्य उचला आणि त्याचे टोंक सोनेरी झाडाला लावा. म्हणजे ते झाड तुमच्या हातांत येईल.''

मोहिनी अधीरपणें म्हणाली. लौकरच तिघेही त्या वाड्याच्या पायऱ्या उतरुन पर्वतावरुन खाली आले व आपल्या घरी पोंचले.

कांही दिवसानंतर त्यांनी राजाला आपल्या सुंदर वाड्यावर जेवायला बोलावले. सारा वाडा हिंडून पाहिल्यानंतर राजा थक्क झाला. नंतर ते सर्वजण जेवायला बसले. जेवायचे पदार्थ हिरे, माणके व मोती यांचे बनवलेले होते.

''हे विचित्र वाटतंय!'' राजा न राहवून उद्गारला. त्यावर ती सोनेरी मैना लगेच म्हणाली, ''जर एखादी स्त्री कुत्रा, मांजर किंवा बाहुलीला जन्म देऊं शकते तर हिरेमोती शिजवून त्यांचे भोजन केले तर काय झाले?''

राजाला मैनेच्या बोलण्यांतला गर्भितार्थ लक्षांत आला. त्याने मैनेला विचारले, ''पण मग माझी मुलें कुठे असतील?''

''ही काय, आपल्या डोळ्यांच्या समोरच आहेत! ते कुत्र्याचं नि मांजराचं पिलूं व मातीची बाहुली ही त्या दोघी मत्सरी बहिणींनी राणीसाहेबांना दिलेली होती. आपण जाऊन त्यांना घेऊन या!!'' मैनेने राजालाच आज्ञा केली.

बिचारा राजा सरळ अरण्यांत गेला. राजाने तिसऱ्या राणीला हद्दपार केल्यापासून ती अरण्यांत राहात होती.

राजाने तिला भेटून क्षमा मागितली. दोघेही आपल्या मुलांच्या घरी परत आले आणि आईवडील व मुलांची भेट झाल्यानंतर सर्वांना अतिशय आनंद झाला.



# भारताची ओळख -

१. दिल्लीतला लाल किल्ला शाहजहानने बांधला होता. आग्ऱ्यांतला लाल किल्ला कुणी बांधला?

२. अमृतसर इथले सुवर्णमंदिर बांधण्याबाबतीत कोणत्या दोन शीख गुरुंचे नांव घेतले जाते?

३. भारतांतली सर्वांत मोठी मशीद कोणती व कुठे आहे? ती कुणी बांधली?

४. सध्यांचे राष्ट्रपती भवन आणि पूर्वीचे व्हॉईसरॉय हाऊस हे एका टेकडीवर बांधलेले आहे. तिचे नांव सांगा.

५. एका मुघल सम्राटाने पत्नीसाठी समाधी बांधली, दुसऱ्या एका सम्राटाच्या पत्नीने आपल्या पतीसाठी समाधी बांधली. दोन्ही सम्राट व त्यांच्या पत्नींची नांवे काय?



६. भारताचे सर्वांत मोठे प्रवेशद्वार वरील चित्रांत दिसते आहे. ही इमारत कुठे आहे व ती कुणी बांधली?

७. हैद्राबादची प्रसिद्ध खूण म्हणजे चार मिनार - याचा इतिहास एका रोगाच्या सांथीशी जुळलेला आहे. हा काय संदर्भ आहे?

८. मुंबईतले 'गेटवे ऑफ इंडिया' व दिल्लीतले 'इंडिया गेट' ही दोन्ही स्मारकें कोणत्या घटनांची निशाणी आहे?

९. महाराष्ट्रांतला एक मोठा राजवाडा ब्रिटिशांनी राजकीय कैद्यांना स्थानबद्ध करण्यासाठी वापरला होता. हा वाडा कुठे आहे? तिथल्या अटकेंत असताना त्यापैकी एक कैदी मरण पावला? ती व्यक्ती कोण होती?

१०. अजंठा व वेरुळच्या लेण्यांचे विशेष महत्व कोणते?

*(उत्तरें पुढील महिन्यांत)*

## डिसेंबर प्रश्नावलीची उत्तरे

१. एम्.सी. मेहता
२. राऊरकेला
३. होयसळ
४. कार्तिकेय किंवा सुब्रम्हण्यम
५. मुखलिसगड
६. चोमो
७. लवंग
८. ग्रंथ
९. गुरबचन सिंग रांधवा
१०. सी.राजगोपालाचारी





# विष्णु पुराण

**क्षी**रसागरात जो त्रिकूट पर्वत आहे, त्याला लोखंड, चांदी व सोन्याची तीन शिखरे आहेत. त्या शिखरांच्या मध्य भागावर फळांनी लदलदलेल्या वृक्षांचे एक मोठे अरण्य आहे. त्या अरण्यात गर्जेन्द्र नावाचा एक मदोन्मत हत्ती आपल्या दशलक्ष कोटी हत्तिणींसह विहार करीत, तहान भागविण्यासाठी, त्या वनाच्या मध्य भागी असलेल्या सरोवराकडे निघाला.

तहान भागवून घेतल्यावर त्याला जलक्रीडा करावीशी वाटले आणि तो आपल्या हत्तीणींसह पाण्यांत उतरला व जलक्रीडा करूं लागला. तो देहभान विसरुन जलक्रीडेत लीन झाला असतां त्याचा उजवा पाय एका भयंकर मगरीने धरला.

असह्य वेदनेने विव्हळ होऊन तो हत्ती ओरडत असतां सर्व हत्तीणी घाबरुन जाऊन किनाऱ्यावर गेल्या व गर्जेंद्रावर ओढवलेल्या महाभयंकर प्रसंगाकडे पाहून आक्रोश करीत रडत राहिल्या. मगरीच्या पकडीतून गजेन्द्राला कसे सोडवायचे हे त्यांना कळेना.

गर्जेंद्राने स्वतः आपली सुटका करुन घेण्यासाठी नाना प्रकारे आदळआपट केली, परंतु सर्व फुकट. इतर हत्ती भूकतहान भागवायला इतर ठिकाणी जाऊन येत व किनाऱ्यावर उभे राहून डोळ्यांतून पाणी काढीत राहिले. सरोवरांत हत्ती व मगरीची झुंज चालूच होती.

हत्ती मगरीला आपल्या सुळ्यांनी टोचीत होता. मगर उड्या मारमारुन हत्तीच्या अंगाचे लचके तोडी. हत्तीचे सर्वांग रक्तबंबाळ झाले.

हत्ती सोंडेने मगरीला आवळून धरी, तर मगर आपल्या खडबडीत शेपटीने हत्तीला बडवून काढू लागली.



हत्तीने मगरीवर उभे राहून तिला पायाखाली चिरडून टाकायचा प्रयत्न केला, तर मगर खोल पाण्यात स्वतःचे अंग नेऊन हत्तीचे प्रयत्न निष्फळ करी. मगर सोडून गेली असे वाटून किनाऱ्यावर जाण्यासाठी धावे, तर तेवढ्यांत हत्ती मगर त्याचा पाय धरुन नेऊन त्याला पाण्यांत बुडवी. अशा तऱ्हेने हत्ती व मगरीचे द्वंद्व एकसहस्त्र वर्षे चालू होते.

गजेंद्राने स्वतःच्या शक्तीवर अवलंबून राहून शौर्याने लढत दिली. हळूंहळू त्याची शक्ती क्षीण होत गेली, मगर तर पाण्यांतच राहणारी. पाण्यांत तिची शक्ती अपरंपार. हत्तीचं रक्त पिऊन पिऊन ती आणखी जास्त शक्तिशाली झाली. तिच्या तोंडातून आपली सुटका नाही, हे त्याला चांगले कळले.

''मी तहान भागवायला या सरोवरावर आलो होतो. पाणी प्याल्यावर पुन्हां सरोवरांत कां उतरलो? माझ्या या मूर्खपणामुळेच मी मगरीच्या तोंडात सांपडलो.

''माझं आतां कोण रक्षण करणार? कोणाला बोलवू? मी स्वतःचं रक्षण करू शकत नाही, तरी माझ्या मनांत मी स्वतःला वाचवूं शकेन अशी आशा मात्र आहे. त्या आशेमुळेच रक्षण व्हावे अशी मी आशा करतो आहे. तर मग आशेला कांहीतरी आधार आहे, तो म्हणजेच देव! त्याला सांकडे घालतो!

देव, भगवान, ईश्वर या भावनेचे मूळ अशा देवा! सर्व कारणांचं मूळ कारण असा तूच आहेस!

माझ्यासारखे गर्विष्ठ, मंदमती व मदोन्मत, त्यांच्यावर मोठे संकट येईपर्यंत तुझी आठवण काढीत नाहीत. निरुपाय झाल्याशिवाय तुझी गरज त्यांना वाटत नाही.'' अशा तऱ्हेने अनेक प्रकारे स्वतःची निंदा करीत असतां मगरीच्या पकडीमुळे होत असलेली वेदना थोडी कमी झाल्यासारखी वाटली.

गजेंद्र देवाचे स्मरण करुन स्वतःला दोष देऊं लागला. त्या क्षणांपासूनच मगरीचे सुळे लुळे पडू लागले, छातीत धडधड सुरुं झाली. तरी जास्त चिडून जाऊन तिने हत्तीच्या पायाचा कडकडून चावा घेतला.

''प्राण्यांवरचे संकट, वेदना व दुःख तू हरण करीत आलास! तू सर्वव्यापी आहेस! तेव्हां सर्व देवांच्या देव! या जगाची सृष्टी करणाऱ्या देवा! माझे रक्षण कर म्हणून मी जितक्या जोराने हांक मारीत आहे, तितक्याच वेगाने येऊन देवा, तू माझं रक्षण करशील, असा माझा विश्वास आहे. तू नक्कीच रक्षण करु शकशील!



''तूच सर्वस्व आहेस हे वचन मनात चिरस्थायी असल्याची ओळख न होऊ देणाऱ्या देवा! माझ्यासारख्या दीनांपर्यंत पोचण्याची जबाबदारी तुझीच नाही का?

''माझ्या अंगातली सर्व शक्ती नष्ट झाली आहे, डोळ्यांतलं पाणीसुद्धा वाळून गेले आहे, तुझे स्मरण करुन हांका मारण्याची शक्तीसुद्धा अंगात राहिली नाही. कण्हण्याची शक्तीही राहिली नाही, शुद्धीसुद्धां जाणार!

''माझं रक्षण कर किंवा करुं नकोस, तुझी इच्छा! तुला सोडून मला दुसरा आधार नाही!'' असे म्हणत गजेन्द्राने उरलेली सर्व शक्ती एकवटून सोंड उंच करुन हांक मारीत असल्यासारखे सरळ वर पाहिले.

मगरीच्या अंगातली शक्ती कमी होऊ लागल्यासारखी झाली. जिभेंत त्राण नसल्यासारखं व कंठातून स्वर उमटत नसल्यासारखं भासलं.

आपण जिवंत आहों की नाही अशा स्थितीत डोळे मिटून पडला असतां तो तसाच कांही हालचाल न केल्यासारखा पडून राहिला.

तेव्हां विष्णु प्रगट झाला.

सर्व आकाश त्याच्या रूपांत एक झालं. तो एका अणूसारखा गजेंद्राला दिसला.

आल्याबरोबर विष्णूने आपले सुदर्शन चक्र सोडले आणि आपला अभयहस्त गजेन्द्राच्या दिशेने धरला. सुदर्शन चक्र प्रचंड वेगाने गेले आणि मगरीचे डोके कापले गेले.

ती मगर म्हणजे मुळांत एक गंधर्व होता. त्याचे नांव 'हुहू' असे होते. देवल नावाचे एक ऋषी पाण्यात उभे राहून सूर्याला अर्घ्य देत असतां



त्या गंधर्वाने मगरीसारखं खोल पाण्यांतून जाऊन ऋषीचा पाय धरला. त्या ऋषीने ''मगरीसारखा पडून रहा!'' असा त्याला शाप दिला. विष्णूच्या सुदर्शन चक्राने त्याचे डोके कापल्याबरोबर तो गंधर्व शापमुक्त झाला.

मगरीच्या पकडीतून सुटलेल्या गजेंद्राला धरून विष्णूने सरोवराबाहेर ओढले आणि त्याच्या गंडस्थलावर हात फिरविला. तो स्पर्श होतांच गजेंद्र अर्धमेल्या स्थितीतून पुन्हां पुनर्जन्म झाल्यासारखा उठला व त्याला पूर्वजन्माचे स्मरणही झाले.

गजेंद्र हा पूर्वजन्मी विष्णुभक्त इंद्रद्युम्न नांवाचा राजा होता. विष्णूचे ध्यान करून तो ध्यानस्थ बसला असतां अगस्त्य ऋषी आले व त्याचे त्यांच्याकडे लक्ष गेले नाही. अगस्त्यांना राग आला आणि 'मदोन्मत्त हत्ती होऊन तू जन्माला ये' असा शाप त्यांनी दिला. त्याच राजाने गजेंद्र



होऊन आतां मोक्ष प्राप्त केला.

गजेंद्र मोक्षानी ही कथा सूत मुनीनी नैमिषारण्यात जो सत्रयज्ञ झाला, त्यावेळी शौनकादि मुनींना सांगितली.

मुनीकथा ऐकून सूत ऋषींना म्हणाले - ''मुनींद्रा! गजेंद्रमोक्षाची ही कथा ही फक्त हत्तीपुरतीच दिसत नाही. तर सर्व जीवकोटीला, त्यांतल्या त्यांत मुख्य करून मानवाला, अनेक बंधनातून व संकटांतून मुक्त होण्यास उदाहरण स्वरुप होऊ शकेल नाही कां?''

सूत म्हणाला - ''होय तर! गजेन्द्र मोक्षाचा अंतरार्थही आहे! कोणीही कशाही तऱ्हेने त्याचा अन्वयार्थ लावून घ्यावा. काळ हा विष्णूच्या आधीन असतो. कालचक्रांत कित्येक समस्या, कष्ट, व संकटे उत्पन्न होतात व नाहीशी होतात.''

मुनी म्हणाले - ''मुनिवर्य! गजेंद्र मोक्ष आख्यानकावरून कारण व कारक तो विष्णूच आहे; अशा विष्णूच्या कथा ऐकाव्या असे मनाला वाटते आहे. तुझ्या समोर आम्ही लहान बालकांसारखे आहोत. म्हणून विष्णूविषयी जे कांही विशेष आहे ते आम्हाला सहजी कळेल अशा रीतीने तू सांगावेस, अशी आमची सर्वांची तुला हात जोडून विनंती आहे. व्यास मुनींच्या तोंडी सर्व अष्टादश पुराणे व इतिहास व त्यांतील विशेष अंश ऐकून तू एकट्याने समजून घेतला आहेस. तेव्हां विष्णु पुराणातील त्या कथा तू आम्हाला सांग.''

सूत मुनींना ऋषी म्हणाले ते ऐकून आनंद झाला व ते म्हणाले - ''ठीक, तर ऐका. व्यास मुनींनी विष्णूच्या अनेक लीला व त्यांतील सर्व विशेष अर्थ महाभागवतात रचून ठेवला आहे व त्यांनी आपला मुलगा शुक याला त्याचा उपदेश केला आहे. विष्णूच्याविषयी आख्याने ऐकून या भवसागरातून मुक्ती मिळावी या हेतूने परीक्षित राजाला त्या शुक मुनींनी सर्व कथा सांगितल्या. गजेंद्राचा मोक्ष करण्यासाठी विष्णूने जो अवतार धारण केला तो 'आदिमूळ अवतार!'

विष्णूने अनेक अवतार धारण केले. त्यांतील मुख्य असे दशावतार धारण नांवाने ओळखले जाणारे दहा अवतार आहेत.

'नार' म्हणजे 'नीर' म्हणजे पाणी. पाण्याला मूळ कारण असा विष्णू 'नार' शब्दावरुन 'नारायण' झाला. नारायणातूनच 'नीर'ची सृष्टी झाली. विष्णूने जलचर म्हणजे मत्स्य रूपात अवतार धारण केला. तोच मत्स्यावतार! दशावतारात मत्स्यावतार हा प्रथम होय!

विष्णू पाण्याने भरलेल्या नील मेघासारखा,



निळ्या रंगाचा असतो. मेघांत जशी वीज असते. तसा विष्णू तेजस्वी असतो. त्यांतून आलेले पाणीसुद्धा तेज:पुंज असते व त्याचा शुभ्र प्रकाश नित्य निर्मळ असतो. तेच पाणी धारणोदक क्षीरसागर होय!

त्या क्षीरसागरात अनंत असा काळ शेषनागरूपे अनेक वलये करुन राहातो. शेषनागाला सहस्रफणे असतात. अंत नसलेल्या अशा अनंत शेषनागावर शेषशायी होऊन विष्णू पहुडला असतांना त्याच्या नाभीतून निघालेल्या नाळावर एक विशाल पद्म निघाले. त्यावर ब्रह्मदेव जन्मला. त्या ब्रह्मदेवाने सर्व सृष्टी केली.

अनंत अनंत असा काळ युगेयुगे चालू असतो. कृत, त्रेता, द्वापर व कली अशा चार युगांचे मिळून एक महायुग होते. सहस्र युगांचा एक कल्प हा ब्रह्मदेवाचा एक दिवस होय, तो दिवस पुरा झाला की ब्रह्मदेवाला झोप येते. तोच कल्पांत, तेव्हां सर्व सृष्टी अंधकारमय होऊन जाते. विष्णूतून निघालेल्या संकर्षणाग्नीच्या तापाने सर्व जगत भस्मीभूत होते.

प्रलय कालाचा वायू सुरु होतो व काळे ढग एकावर एक चढत येऊन सर्व आकाशांत व्याप्त होतात आणि हत्तीच्या सोंडेसारखी जलधारांची वृष्टी होते. स्वर्ग, भूमी व पाताळ त्रिलोक महापुरांत बुडून जातात. जिकडे पहावे तिकडे पाणीच पाणी दिसत असते. अशा तऱ्हेने प्रलय होतो. अशा तऱ्हेने ब्रह्मदेव झोपत असतां जी रात्र होते, तोच प्रलय काळ! तीच कल्पांत जवळ येत असल्याची



वेळ! सत्यव्रत नांवाचा राजर्षी नदीवर आंघोळ करून आणि नारायणाचे ध्यान धरून अर्घ्य देऊ लागला.

त्यावेळी त्याच्या ओंजळीत सोनेरी रंगाचा एक छोटासा मासा आला. सत्यव्रत त्याला नदीत सोडायला निघाला तेव्हां तो चिटुकला मासा म्हणाला - ''ए राजा! आमची माशांची जात चांगली नाही. मोठे मासे सर्व लहान माशांना खातात. त्यांच्या हातांतून निसटलो तरी कोळी जाळ्यांत पकडून आमचा जीव घेतात. म्हणून तुझ्या आश्रयाला मी तुझ्या ओंजळीत आलो. मला अशा निर्दयपणाने सोडू नकोस!''

सत्यव्रताने तो मासा आपल्या कमंडलात घालून राजधानीला नेला. सत्यव्रत महाराज राज्य करीत असतां तपश्चर्या करीत असल्यामुळे राजर्षी झाला होता. तो एक विष्णुभक्त होता व थोर ज्ञानीही होता.

कमंडलूत ठेवलेला चिटुकला मासा दुसऱ्या दिवशी खूप वाढला आणि कमंडलांत उड्या मारीत सत्यव्रताला म्हणाला - ''राजा, मला याच्यातून काढ व थोड्या मोठ्या जागेत पोंचव.''

त्या माशाला राजाने उचलून एका हौदात पोंचविला. मासा कांही वेळाने इतका मोठा झाला की त्याला जागचे हालताही आले नाही. तेव्हां सत्यव्रताने त्याला एका लहानशा डबक्यांत नेऊन सोडले.

मासा वाढतच गेला. डबक्यांतून, सरोवरातून, शेवटी त्याला समुद्रांत पोंचवावे लागले, इतका तो वाढतच राहिला.

तेथे पोंचल्यावर तो मासा राजाला म्हणाला - ''ए राजर्षी! मी तुझ्या आश्रयाला आलो होतो आणि तू आतां मला समुद्रांत टाकून देत आहेस कां? हा काय न्याय झाला? मगरी व देवमासे मला गिळणार नाहीत का?'' माशाने राजाला विचारले.

राजा सत्यव्रत त्याला म्हणाला - ''अरे, मोठ्या मिशावाल्या माशा! याहून जास्त मी करण्यासारखं काय आहे, तूंच सांग!

क्षणोक्षणी शत योजन वाढण्याची शक्ती असलेल्या तुला कोणीच गिळूं शकणार नाही, होय की नाही?''

*(क्रमशः)*







# रक्ताचे नाते

बलिया गांवात बलराम नांवाचा एक गरीब तरुण राहात होता. त्याला कुणी नातेवाईक नव्हते. तो मोलमजुरी करुन पोट भरत असे. रात्रीं झोंप आली कीं जिथें असेल तिथे तो आडवा होऊन झोंपी जात असे.

एका रात्रीं तो एका घराच्या ओटीवर झोंपायला गेला. पण झोंप येईना म्हणून तो नुसताच या कुशीवरुन त्या कुशीवर वळत होता. त्यावेळीं एक तरुणी तिथें आली आणि दुसऱ्या समोरच्या घराच्या ओट्यावर बसली. तिथे बसल्यानंतर तिने जवळचे एक गठुळें सोडले आणि त्यांतली वस्तू काढून ती भराभरा खाऊं लागली.

तिला पाहून प्रथम बलराम घाबरला होता. त्याला वाटलं कीं ती कुणी हडळ असली पाहिजे. भिऊन त्याने आपले डोळे गच्च मिटून घेतले. थोड्या वेळानंतर धीर एकवटून त्याने डोळे उघडले आणि तिला विचारले, ''तू कोण आहेस?''

ती तरुणी चकित होऊन उठली आणि हळूंच म्हणाली, ''मी मनोहरची मुलगी आहे. ''इतक्या रात्रीं तू इथें कां आलीस?'' बलरामने करड्या स्वरांत विचारलं.

त्या तरुणीने चांचरतच म्हटले, ''तुम्ही याच गांवातले आहात कीं नाही, ते मला माहीत नाही. माझी आई वारल्यानंतर माझ्या वडिलांनी दुसरे लग्न केले. माझी सावत्र आई अगदी दुष्ट आहे. मला नीट खायला देत नाही. सारखी टोंचून बोलत असते, घरांतलं सगळं काम मला करायला लावते! आज माझे वडील आणि माझी सावत्र आई कांही कामाला म्हणून बाहेर गेले आहेत. ते कोणत्याही क्षणीं येऊन थडकतील, म्हणून घरांत ठेवलेल्या पुऱ्या मी इथें आणून खाते आहे.''

ह्यावर बलराम हंसत म्हणाला, ''आणि सकाळीं तुझ्या आईला कळेल कीं कुणीतरी पुऱ्या खाल्ल्या आहेत, आणि त्या खाणारी तूच आहेस! मग चांगली अद्दल घडेल, आणि मार मिळेल.''

''त्या सगळ्या नंतरच्या गोष्टी. अगोदर मला या चविष्ट पुऱ्या तर खाऊं देत.'' त्या तरुणीने बेदरकारपणे म्हटले.

- दयानंद -



"हे बघ, तुझे वडील मनोहर हे माझे मामा आहेत. जेव्हां माझे आईवडील मरण पावले, तेव्हां मी दहा वर्षांचा होतो. त्यावेळीं तू सहा वर्षांची होतीस त्यावेळीं मी तुमच्याकडे राहात होतो. तुझे वडील माझाही सांभाळ करीत होते तुझ्या सावत्र आईनं दोनतीन वेळीं माझ्यावर चोरीचा आळ घेतला. तेव्हां तुझ्या वडिलांनी मला खूप मारलंही, आणि शेवटी मला घरातून बाहेर काढलं. तेव्हांपासून मी मजुरी करतो आणि माझे पोट भरतो. जिथें जागा मिळेल, तिथें पथारी पसरतो. आता आठवलं, तुझं नांव सुनीता आहे ना?''

तिने "होय'' म्हटले आणि बलरामकडे एकदा रोखून बघितले, व ती तिथून निघून गेली.

सुनीता निघून गेल्यानंतर त्याला जुन्या काळांतल्या आठवणी येऊं लागल्या. अनेक विचार मनांत घोंघावूं लागले. जेव्हां त्याचे आईवडील जिवंत होते तेव्हां ते नेहमी म्हणत कीं सुनीता तुझी बायको होणार! आणि त्यावर मनोहर आणि त्याची पहिली बायको खळखळून हंसत असत.

पण मनोहरची दुसरी पत्नी घरांत आली आणि सारेच चित्र बदलले होते. सावत्र आई सुनीताचा छळ करुं लागली, घरांतले काम तिच्याकडून करुन घेतले तरी सुनीताला धड खायला प्यायला देत नव्हतीच. बलरामच्या मनांत आलं कीं मामाला जाऊन भेटावं आणि सुनीताशी आपला विवाह करण्याचा प्रस्ताव मांडावा. त्यांना आपण आश्वासन द्यावे कीं त्यांची शेती व घरांतल्या कामकाजात मदत करुं व त्यांना उतारवयांत आपण मदतीचा हात देऊं! हा विचार पक्का करुन सकाळींच उठून बलराम मनोहरमामाच्या घरी गेला. त्यावेळीं मनोहर घराच्या ओसरीवर बसला होता. त्याची पत्नी सुजाता दरवाज्याजवळ बसून भाजी निवडीत होती.

बलरामला बघून मनोहर आधी प्रेमळपणे हंसला, पण दुसऱ्याच क्षणाला त्याने कठोर स्वरांत प्रश्न केला, ''इथें घरीं कशाला आलास? कांही काम असलं तर वाटेंत भेटला असतास, तरी चाललं असतं कीं!''

बलरामने न घाबरता म्हटले, ''मामा, तुम्हाला माहीत आहेच कीं माझं म्हणून असं कुणीही घरांत नाही. सुनीता खेरीज तुम्हालाही दुसरं कुणी जवळचं नाही. आम्ही लहान होतो तेव्हां तुम्ही वडील मंडळींनी आमचं लग्न ठरवलं होतंत, ते आठवतंय ना? तर मग तुम्ही आमचं लग्न लावून द्या. मी तुमची, तुमच्या शेतीवाडीची व घरांतली



सारी जबाबदारी माझ्या डोक्यावर घेईन. तुम्हाला आणि मामींना नेहमी सुखांत ठेवीन.''

त्याचे बोलणें ऐकून मनोहर तर थक्कच झाला. बलरामकडे पाहून त्याने म्हटले, ''हे बघ बलराम, त्या सगळ्या जुन्या गोष्टी होत्या, जुने विचार होते. तुझे आईवडील वारल्यानंतर तुला माझ्याकडेच ठेवून तुझा उत्कर्ष व्हावा म्हणून मी प्रयत्न केला. पण तुझ्या मामीला मात्र अजून तू एक चोर आहेस असंच वाटतं. तिच्याकडे दुर्लक्ष करुन मी माझा वेगळा असा कांही निर्णय घेऊं शकणार नाही.''

सुजाताने त्यांचे बोलणें नीट लक्ष देऊन ऐकले होते. ती खूप संतापली. आणि रागाच्या भरांत तावातावाने बाहेर येऊन तिने बलरामला फटकारले, ''ए ठोल्या, तू नालायक आहेस, एक चोर आहेस. उगीच आमच्याबरोबर प्रेमाने वागण्याचं नाटक करुं नकोस. सुनीताचे लग्न केव्हां करायचे नि कुणाशी करायचे, हे पाहायला तिचे आईवडील समर्थ आहेत. पुन्हां कधी हा विषय तोंडातून काढलास तर तुझे हातपायच तोडून टाकीन. चालता हो इथून अगोदर! आत्ताच्या आत्ता नीघ!''

संतापाने ती बेभान झाली, तिचे हातपाय कांपायला लागले आणि ती बेहोष होऊन धाडकन जमिनीवर पडली.

मनोहर आणि सावत्र आईचा चढलेला आवाज मागील दारी धुणें धूत असलेल्या सुनीताला ऐकूं आला. ती धावतच पुढीलदारीं आली. आता काय करावं ते तिला समजेना. बलरामने घाईघाईने जाऊन गांवचे वैद्य भद्राचारी



यांना बोलावून बरोबर आणले. त्यांनी सुनीताला निरनिराळ्या झाडांच्या पानांचा रस पाजला आणि तिला शुद्ध आली. ते सुजाताला म्हणाले, ''अग, काय हे? मी तुला कितीतरी वेळां आजपर्यंत सांगितले आहे तुला उच्च रक्त दाबाचा त्रास आहे. बारीकसारीक गोष्टींवरुन उगीचच तू चिडलेस. आता तुला जर दीर्घायुष्य हवे असेल तर तुला किमान तीन महिने तरी अंथरुणावर पडून संपूर्ण विश्रांति घेतली पाहिजे.

त्याचबरोबर, रोज सकाळ संध्याकाळ सर्पगंधा वेलीची कोंवळी पानें कुस्करुन त्याचा रस प्यायला हवा! या वेलींचे रान आपल्या गांवाच्या पश्चिम भागातल्या राणा पहाडावर चांगलेच फोफावलेले आहे. रोज ही ताजी कोंवळी पानें आणायची, ती पाने कुस्करुन त्यांचा रस काढायचा आणि प्यायचा. याची व्यवस्था कर

आणि आपल्या रागावर व्यवस्थित नियंत्रण ठेव."

भद्राचारी वैद्य निघून गेल्यानंतर सुजाताने केविलवाण्या स्वरांत सुनीताला म्हटले, "मी वेदांत सांगते आहे किंवा साधुसंतांसारखं बोलतेय, असं समजू नकोस. सुनीता, जोपर्यंत माणसाच्या अंगात ताकद असते, रग असते, तोपर्यंत दुसऱ्या माणसांची त्याला जरुरी नाही असं वाटत असतं. खरं म्हणजे मी तुला नीट प्रेमाने वागवून तुझं पालन-पोषण करायला हवं होतं. पण मी तसं मुळीच केलं नाही. एखाद्या दुष्ट बाईप्रमाणें तुझा छळ केला. त्या पापाची शिक्षा आता मला देवाने दिली आहे. माझी चांगली शुश्रूषा कर असं कांही मी तुला सांगू शकणार नाही. माझ्या पापाची सजा मला भोगलीच पाहिजे कीं!"

तिचे हे शब्द ऐकून सुनीताचे मन द्रवले आणि ती म्हणाली, "माई, तुम्ही मला शिव्या दिल्यात, रागावलात, मारलेत; मलाही तुमचा राग येत असे, तरी पण मी तुम्हाला आपली आईच मानते. तुम्ही लौकरच चांगल्या बऱ्या व्हाल. मी हरप्रकारे तुमची नीट देखभाल करीन."

मनोहर हे दृश्य मुकाट्याने बघत होता. बलराम पुढे होऊन म्हणाला, "मामा, तुम्ही मुळींच काळजी करूं नका. मी रोज सर्पगंधा वेलींची कोंवळी पाने घेऊन येईन आणि नंतर कामावर जाईन. फक्त तुम्ही मला इतकंच कबूल करा कीं मी आलो कीं तुम्ही माझ्यावर चिडणार नाही."

सुजाता त्याला कांहीतरी सांगणार होती, तितक्यांत मनोहर म्हणाला, "आपल्या माणसांचं प्रेम संकटाच्यावेळींच कळून येतं. त्यालाच रक्ताचं नातं असं म्हणतात ना! मी ह्याचा मामा आहे, म्हणूनच तुझ्यासाठी आपल्या मामीसाठी रोज डोंगरावर जाऊन सर्पगंधाची पानें आणण्याची जबाबदारी त्याने आपण होऊन स्वीकारली आहे. आता तरी तुझ्या लक्षांत आलं कां?"

सुजाताला बोलता येईना. ती कांपऱ्या हाताने डोळे पुसूं लागली. तिला रडूं आवरेना. नंतर थोड्याच दिवसांत सुनीता आणि बलराम यांच्या अखंड सेवाशुश्रूषेमुळें सुजाताची प्रकृति लौकर सुधारली.

सहा महिन्यांतच तिने त्या दोघांचे लग्न लावून दिले. पतीशी विचारविनिमय करून तिने बलरामला घरजांवई म्हणून आपल्या घरी कायमचाच राहायला बोलावून घेतले.







# कोल्ह्याची चाल-वाघाचे हाल

एकदा एका जंगलात एक कोल्हा व एक लांडगा यांची भेट झाली. दोघेही आपसांत गप्पा मारायला लागले.

बोलताबोलता लांडग्याने अचानक कोल्ह्याला विचारले, "या किरकोळ गप्पा राहूं देत. सांग मला, तुझं शिक्षण कुठपर्यंत झालंय?"

"माझं शिक्षण कांही पूर्ण झालं नाही ही गोष्ट खरी आहे." कोल्ह्याने गुळमुळत सांगितलं. "हे बघ, मी तुझ्यापेक्षां जास्त शिकलेलो आहे. यापुढे मला 'अहो-जाहो' म्हणत जा - अरेतुरे नाही. समजलं?" लांडगेबुवांनी आपला मोठेपणा मिरवत म्हटले.

नेमका त्याचवेळेला एक वाघ डरकाळी फोडून झाडीतून त्यांच्या रोखाने आला. तेव्हां कोल्ह्याने विनयपूर्वक लांडग्याला विचारले, "अहो, आपण आता काय करायचं?" पण वाघाला बघून लांडगा चांगलाच घाबरला होता. कांही उत्तर देण्याच्या परिस्थितींत तो नव्हताच.

वाघ तर त्या दोघांवर झडप घालण्याच्या तयारींत होता. आपली शेपटी डौलाने हलवत वाघाने त्यांना विचारले, "तुम्ही दोघे पळून जायचा विचार करता आहात कीं काय? माझ्या तावडीतून आता तुमची सुटका नाही."

कोल्ह्याने लगेच म्हटले, "मालक, आम्ही आपल्याच दर्शनाला निघालो होतो. पण आपण समोरच आलात हे आमचं सौभाग्य आहे! आम्ही एका विचित्र संकटात सापडलो आहोत. आपण खूप विद्वान आहात, आपली ज्ञानसंपदा अफाट आहे. आमची खात्री आहे कीं या समस्येचे निराकरण आपल्याखेरीज कुणीही करूं शकणार नाही."

कोल्ह्याची ही स्तुतीस्तोत्रें ऐकून वाघ हुरळला. तो अतिशय खूष झाला. मागील पाय वांकवून तो आरामांत बसला आणि त्याने विचारले, "बोला, काय समस्या आहे तुमची?" कोल्ह्याने विनयाने मान खाली घातली व म्हटले, "मालक, मी मोठ्या

- मुकुंद गर्गी -



धीराने अरण्यांत फिरत होतो. तेव्हां प्राणाची बाजी लावून मी दोन सशांची शिकार केली आणि ते ससे बरोबर घेऊन आलो, ते या लांडगेबुवांनी पाहिले. ते माझ्यापेक्षां जास्त शिकलेले आहेत, म्हणून या दोन सशांपैकी एक त्यांना हवा आहे. पण हे मला कांही पटत नाही. मी त्यांना एक ससा द्यायला मुळींच तयार नाही."

कोल्ह्याची समस्या ऐकून वाघाने लांडग्याला नीट नखशिखांत न्याहाळले आणि विचारले, "अगोदर तुला सांगायला हवं कीं तुझं शिक्षण कुठपर्यंत झालं आहे?

हे गुरगुरत बोलणे ऐकून लांडगा थरथर कांपायलाच लागला. त्याच्या तोंडातून शब्द फुटेना. तेव्हां कोल्हा पुढे होऊन म्हणाला, "मालक, त्याला म्हणायचं आहे कीं त्याच्या तोंडात जितके दांत आहेत, तितक्या विद्यांचे शिक्षण त्याने घेतलेले आहे."

"असं आहे होय! तर मग तुम्हा दोघांपेक्षां मीच जास्त शिकलेला आहे." असं म्हणत वाघाने आपला भयंकर जबडा पसरला आणि आपले तीक्ष्ण दांत विचकले. त्याचे ते भेसूर हंसणे पाहून लांडगा फारच घाबरला आणि बघताबघता एकदम बेहोष झाला. त्यावर आश्चर्य प्रकट करीत वाघाने विचारलं, "हे काय?"

"मालक, यांत विशेष आश्चर्याची गोष्ट कांही नाही. शिक्षणांत आपण आमच्यापेक्षां श्रेष्ठ आहात हे मान्य करुन आपल्या धारदार दांतांना तो प्रणाम करीत आहे. अप्रत्यक्षपणें आपण आमची समस्या सोडवलीच आहेत. कृपा करुन आपण जर आमच्या गुहेकडे याल तर ते दोन्ही ससे मी



आपल्याला भेट देईन." वाघाचा आनंद गगनांत मावेना. त्याने मनोमन विचार केला कीं प्रथम दोन्ही लुसलुशीत सशांचा समाचार घ्यावा आणि नंतर मग या दोघांनाही खावे.

'ठीक आहे, व्हा पुढे. मी तुमच्या मागोमाग येतो आहे." असं म्हणून वाघ उठून उभा राहिला.

कोल्हा वाघाला डोंगरांतल्या मध्यभागी असलेल्या एका चिंचोळ्या गुहेकडे घेऊन गेला व म्हणाला, "मालक, मी इथें थांबतो. हे लांडगेदादा गुहेंत जातील आणि ते दोन्ही ससे घेऊन येतील."

"बरं बरं. त्याला लौकर जायला सांग. पोटांत कावळे कोकलताहेत." वाघाने मोठी जांभई देत म्हटले.

कोल्ह्याने जी गुहा निवडली होती, ती फारच अरुंद होती. पण वाघाच्या तावडीतून वांचण्यासाठी लांडग्याला त्यांत शिरणें भाग पडले.

बराच वेळ झाल्यानंतर देखील लांडगा कांही परत आला नाही, तेव्हां कोल्ह्याने वाघाला विचारले, "मालक, जर आपली संमती असेल तर मी गुहेंत जाऊन लांडगेदादा काय करतो आहे ते निदान पाहून येऊं कां?

"ठीक आहे. मी तुला जायला संमती देतो आहे. मात्र तुम्ही दोघेही ते दोन्ही ससे घेऊन तावडतोब परत या हां!" वाघाने बजावले.

वाघ वाट बघत बराच वेळ बसून राहिला. पण कोल्हा नि लांडगा परत यायचं कांही चिन्ह दिसेना. नाखुषीने वाघ उठला आणि त्याने गुहेकडे आपला मोहरा वळवला.

त्याने गुहेच्या तोंडात आपले डोकें घातले, पण त्याला पुढें सरकता येईना. खूपवेळां प्रयत्न करुन पाहिल्यानंतर तो निराश झाला, व या दोघांना शिव्या देत तिथून निघून गेला.

थोड्या वेळानंतर कोल्हा व लांडगा यांना वाटलं कीं वाघ आता गेला असेल. त्यांनी गुहेच्या तोंडाशी येऊन खात्री करुन घेतली आणि नंतरच दोघेही गुहेबाहेर आले.

लांडग्याने कोल्ह्याच्या चतुराईबद्दल त्याची वाखाणणी केली. तो म्हणाला, "तुझं शिक्षण जरी माझ्यापेक्षां कमी असलं तरी तुझ्या अकलेची मात्र कमाल आहे. तुझ्या बेरक्या चालीनें तू वाघाला चीत केलंस खरं!"

कोल्ह्याने खवचटपणें उत्तर दिलं, "अहो, ही सगळी तुमची कृपा!"





# श्रीमंती-गरिबी

एका गांवात धनगुप्त नांवाचा एक व्यापारी होता. आयुष्यभर खूप कष्ट करुन त्याने भरपूर संपत्ती गोळा केली होती. उतारवयांत त्याला अर्धांगवायू झाला व त्याने अंथरुण धरले. तेव्हां त्याला फार वाईट वाटायला लागले. ''माझे सारे आयुष्य मी पैसे मिळवण्यांतच घालवले. माझ्या कमाईतून लोकांच्या उपयोगी पडेल असे एकही काम मी केले नाही.'' असे विचार मनांत वारंवार येऊं लागले. तेव्हां त्याने आपल्या मुलगा श्रीगुप्त याला जवळ बोलावून त्याला समजावले, ''बाळ, साऱ्या आयुष्यभरांत मी जनतेच्या उपयोगाचे एकही काम करुं शकलो नाही. कुणा दीनदुबळ्या माणसाला कधी मदत केली नाही. तुला आवश्यक असेल तेवढी संपत्ती तू स्वतःसाठी ठेव आणि उरलेल्या पैशांतून एक धर्मशाळा बांधून घे.'' असं सांगून धनगुप्ताने कायमचे डोळे मिटले.

आपल्या पित्याचे अंतिम संस्कार व क्रियाकर्म पूर्ण केल्यानंतर श्रीगुप्त व्यापारांत दंग झाला. त्या वर्षभरांत धंद्यात त्याला अपेक्षेहून बराच जास्त फायदा झाला. त्याला आपल्या वडिलांचे शब्द आठवले.

श्रीगुप्ताने विचार केला, ''कदाचित पुढच्या वर्षी धंद्यात नुकसान होण्याची देखील शक्यता आहे. पुढच्यावर्षी जर नेहमीपेक्षां जास्त नफा झाला तर मग मी धर्मशाळा बांधायला पैसे देईन. नाहीतर उगीचच पैसे खर्च कशासाठी करायचे?''

दुसऱ्या वर्षीदेखील त्याला दुप्पट फायदा झाला. तरीदेखील त्या फायद्याने त्याचे समाधान झाले नाही. धर्मशाळा बांधायचा विचार त्याने पुन्हां पुढें ढकलला.

एकदा रात्रीच्यावेळीं आपले हिशेब तपाशीत तो बराच वेळ जागा होता. त्या वेळीं कुणीतरी एकजण असह्य वेदनेने कण्हत, कळवळत त्याच्या घराबाहेरच्या ओट्यावर येऊन बसला. श्रीगुप्ताने माडीवरुन खिडकींतून वाकून पाहिले. एक म्हातारा पण आंधळा भिकारी तिथें कण्हत होता, आणि आपली झोळी व भांडे चांचपडत शोधण्याचा प्रयत्न करीत होता.

तेवढ्यांत दुसरा एक भिकारी लंगडतच तिथें ओट्यावर आंधळ्या भिकाऱ्याजवळ येऊन बसला. त्याने विचारले, ''जगत, तू कां कण्हतो आहेस रे? काय झालंय तुला?'' जगतने केविलवाण्या स्वरांत म्हटलं, ''अरे नारायण, तू आहेस होय? मी पडलो आंधळा! सकाळीं भीक मागायला बाहेर पडलो तो पाय लचकला आणि सूज आली. म्हणून कुठे जाता आले नाही. आज मूठभर धान्यदेखील मिळाले नाही. एकीकडे पायाचा ठणका थांबत नाही, आणि दुसरीकडे पोटांत आगीचा डोंब उसळलाय. माझे हाल होताहेत, ते काय सांगू तुला?''

नारायणने जगतच्या पायाकडे बघितले. पाय फारच सुजला होता. नारायणने आपल्या झोळींतून एक भांडे बाहेर काढले व तो म्हणाला, ''तुझ्या पायाची वेदना कांही मी कमी करुं शकणार नाही. पण तुझ्या भुकेसाठी मी कांहीतरी करुं शकतो.'' आणि त्याने जगतकडे ते भांडे दिले.

''तू यांतलं कांही खाल्लं आहेस कीं नाही? कीं सगळंच जेवण मला देतो आहेस?'' आश्चर्य वाटून जगतने नारायणला विचारले.

''दोघांच्यासाठी बरोबरीने वाटले आहे. माझा भाग मी घेतला आहे ना!'' नारायणने म्हाताऱ्याच्या भांड्यात दोन मुठी भात घालताना उत्तर दिले.

वरुन खिडकींतून हे दृश्य बघणाऱ्या श्रीगुप्ताचे डोळे उघडले. त्याचा अंतरात्मा जागा झाला व म्हणाला कीं जे आपल्याकडे आहे, ते इतरांना वांटून देणारा नारायणच खरा श्रीमंत आहे. पण कुणालाच कांहीही देऊं न शकणारा जगत - त्याची खरोखरीच गरीबी आहे. आणि मी मात्र धनवान असून गरीब आहे.

श्रीगुप्त माडीवरुन खाली आला. त्याने दार उघडून त्या दोन्ही भिकाऱ्यांना घरांत बोलावले आणि स्वतः त्यांना पोटभर जेवायला वाढले, व त्यांना तिथें घरांत आश्रय दिला. दुसऱ्या दिवशी सकाळीं वैद्यांना बोलावून त्याने जगतच्या पायावर इलाज करवला. लागलीच त्याने धर्मशाळा बांधण्याच्या कामाला सुरवात केली.

श्रीमंती व गरिबी यांतले खरे मर्म श्रीगुप्ताला त्यादिवशी समजले. तेव्हांपासून पैसे मिळवण्या-बरोबरच परोपकारी कामें करण्यांत तो सहभागी होऊं लागला आणि त्याप्रमाणें आपल्या पैशांचा सदुपयोग करायला तो शिकला.



- २५ वर्षांपूर्वीं चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट -



# स्वार्थी मोठेपणा

भानुमतीला आपल्या श्रीमंतीची फार घमेंड होती. त्यामुळे तिने आपल्या नणंदेला मदत करायचे-देखील नाकारले. व्यापारांत नुकसान झाल्यामुळें नणंदेच्या परिवाराची आर्थिक परिस्थिति वाईट झाली होती. ती विजयवाड्याजवळच्या एका गांवात राहात होती.

नुकताच तिचा नवरा वारला होता, त्यामुळें तिला बिचारीला कुणाचा आधार राहिला नाही. आपल्या एकुलत्या एक मुलीसह, अरुणाबरोबर ती मोठ्या मुष्किलीने दिवस कंठीत होती. भानुमती तिला भेटायला गेली होती. पण तिने कोणत्याही प्रकारें मदत करायचे आश्वासन दिले नाही, व ती घरी परतली होती.

पण यावेळीं मात्र भानुमतीला सोळा वर्षांच्या अरुणाला घरी आणणे भागच पडले, कारण अरुणाच्या आईचा मृत्यू झाला व तिचा एकमेव आधारही संपला. धार्मिक क्रियाकर्म व दिवस संपल्यानंतर जेव्हां भानुमती परत जाणार होती, तेव्हां त्या गांवातल्या तीन प्रमुख गांवकऱ्यांनी तिला सांगितलं, ''हे बघ भानुमती, आपल्या नणंदेच्या मुलीला तुझ्याबरोबर घरी घेऊन जा. ती तुझ्या नणंदेची एकटीच मुलगी आहे हे विसरुं नकोस. तिच्या पालनपोषणाची जबाबदारी तुझ्यावरच आहे. ती तू पार पाडली नाहीस तर जगांत तुझी छी: थू होईल'' जेव्हां त्या तिघांनी फार जोर धरला तेव्हां भानुमतीचा निरुपाय झाला. पण तिने मनांतल्या मनांत ठरवलं होतं कीं तिच्याकडून सगळं काम करवून घ्यायचं!

दुसऱ्याच दिवशी भानुमतीने घरकामाची जबाबदारी अरुणावर टाकली. अरुणाला वाईट वाटलं, पण ती तरी बिचारी काय करणार? निमूटपणें ती कामाला लागली.

त्या घरीं एकूण पांचजण राहात होते. तिचा एकुलता एक मुलगा सूरज, भानुमतीचा सख्खा भाऊ पद्मनाभ, आणि त्याच्या दोन मुली. साऱ्या गांवात बातमी पसरली होती कीं पद्मनाभची मुलगी मालती, हिच्याशी सूरजचे लग्न होणार होते.

सूरज सुस्वभावी होता, हुशार वाटत होता. परंतु, घरांत असणाऱ्या कामधामाशी त्याचा कांही संबंध येत नसे. त्याला तिथें कांही महत्व नव्हतं. सारी जबाबदारी पद्मनाभने स्वतःवर घेतलेली होती. शेतांत काय पिकतंय, धान्य काय किंमतीला विकायचं, एक ना दोन! सगळे निर्णय तोच घेत असे. म्हणून शेतकरी आणि व्यापारी त्याच्याशी बोलणी करीत आणि त्याचा निर्णय अंमलात आणत असत.

घरांतल्या डागडुजीपासून सणावारी कोणते पकान्न बनवायचे, यांचे सारे निर्णय त्याची थोरली मुलगी मालती ही घेत असे.

''तुझे मामा गेल्यापासून माझा भाऊच हा सारा व्याप सांभाळतो आहे. मालती नसती तर हे घर चालणारच नाही.'' भानुमती अधूनमधून मोठ्या अभिमानाने अरुणाला सांगायची. एक दिवस सूरजने पद्मनाभला म्हटले, ''या वर्षी आपण भात लावण्याऐवजी तूर, मूग आणि उडीद लावू या. माझा एक मित्र शहरांतून आला आहे. तो म्हणत होता कीं या गोष्टींना तिकडे चांगली किंमत येते.'' हे बोलणें अरुणानेही ऐकले.

त्यावर पद्मनाभ कोरड्या स्वरांत म्हणाला, ''छे, तो अगदीच मूर्खपणा होईल. सर्वांनी तेच पिकवायला सुरवात केली तर आपल्याला थोडाच फायदा होणार आहे? ते कांही नाही, आपण भातच लावायचं!''

''पण मामा, आजूबाजूच्या शेतांतून भातच लावतात. डाळींना योग्य अशी त्यांची जमीन नाही. तिथें पीक चांगलं येत नाही. म्हणून ते भाताचे पीक घेतात ना!'' सूरज म्हणाला.

''हे बघ, तुझ्या बोलण्यांत केवळ मूर्खपणा



आहे, त्यांत कांही अर्थ नाही. शहरांतून माहिती जमवून लोक येतात, आणि खडकाळ जमिनींतदेखील सोन्यासारखं पीक येईल म्हणून सांगतात. कोणत्याही परिस्थितींत आपण हा वेडेपणा करायचा नाही व आपल्या शेतांत भातच लावायचं!!'' सूरजचे बोलणें खोडून काढत पद्मनाभने सांगितलं.

''नाही हो, तसं नाही मी म्हणत...'' सूरजला पुढें आणखी कांहीतरी सांगायचं होतं. पण भानुमतीने त्याला मधेंच थांबवून म्हटले, ''सूरज, अरे, तुझे मामा मोठे आहेत, अनुभवी आहेत, त्यांचं ऐक. त्यांना विरोध करायची संवय लावून घेऊं नकोस.'' त्यानंतर ती आपल्या भावाला म्हणाली, ''भाऊ, सूरज अजून अल्लड आहे, त्याला कसला आलाय अनुभव? तुम्हाला जे योग्य वाटेल तेच करायचं. सूरजच्या बोलण्याचा

कृष्णराव



राग मानूं नका.'' हे शब्द ऐकताना अरुणाने सूरजकडे पाहिले.

त्याचा चेहरा पार उतरला होता. आणि त्याच वेळेला मालती मात्र गालांतल्या गालांत हंसत होती. ''या अशा परिस्थितींत मला तर इथें काडीची किंमत नाही. पण घराचा मालक असून सूरजलादेखील इथें मुळीच किंमत नाही. माझ्यापेक्षां त्याची परिस्थिती जास्त केविलवाणी आहे.'' अरुणाने मनांत विचार केला.

त्यानंतर महिनाभरांतच देवीचे नवरात्र येणार होते. तिथली फार पूर्वीपासून प्रथा होती कीं गांवातल्या अनेक प्रमुख व्यक्ती एकेक दिवसाचा कार्यक्रम आयोजित करीत होते व त्याचा आर्थिक भारही आनंदाने उचलीत होते.

जेवणें झाल्यानंतर सर्वजण आरामशीरपणें बसले होते. तेव्हां पद्मनाभ म्हणाला, ''दरवर्षी आपल्याबतीने जे गुरुजी भागवताचे पठण करतात, त्यांची प्रकृति यंदा बरी नाही. आपल्याला दुसऱ्या कुणाला तरी बोलावलं पाहिजे.''

सूरज उत्साहाने म्हणाला, ''मामा, बरंच झालं! दुसऱ्या कुणालाही बोलावूं नका. यंदा भागवत पठण नको. नाहीतरी गांवातला मातबर शेतकरी राम तो कार्यक्रम दर वर्षी ठेवतोच. नटराज नाटक मंडळींचे लोक माझ्या परिचयाचे आहेत. मी त्यांच्याशी बोलतो आणि इथें त्यांना महिषासुरमर्दन नाटकाचा प्रयोग करायला सांगतो. गांवकऱ्यांना हा नवा कार्यक्रम आवडेल आणि आपल्यालाही त्याचे श्रेय मिळेल.''

त्यावर पद्मनाभ ताडकन म्हणाला, ''तुला अक्कल केव्हां येणार तेच मला कळत नाही. खर्चाची गोष्ट सोडून दे; पण जर कुणी विचारलं कीं देवीच्या नवरात्रांत नाटक कसं केलंत, तर त्यांना आपण काय उत्तर देणार? आपली इभ्रत धुळीला मिळेल.''

प्रत्येक लहानमोठ्या बाबतींत पद्मनाभ आपला मोठेपणा मिरवीत होता आणि सूरजला हिणवीत होता. ही गोष्ट अरुणाला बिलकुल आवडत नव्हती.

परंतु या घटनेनंतर बरोबर सातव्या दिवशीच नटराज नाटक मंडळींतर्फे एक इसम आला आणि गांवातल्या कांही प्रमुख व्यक्तींना भेटला. त्या लोकांना त्या इसमाने सांगितलं कीं नाटक मंडळीने इथें महिषासुर मर्दन नाटकाचा प्रयोग विनामूल्य सादर करण्याची इच्छा व्यक्त केली आहे. त्यासाठी त्या ज्येष्ठींची परवानगी मागण्यासाठी



तो आला होता. गांवातल्या प्रमुख मंडळींनी खूष होऊन त्याला परवानगी दिली. कारण त्यांनाही वाटले कीं हा नवा मनोरंजनाचा उपक्रम सर्वांना आवडेल.

सूरजलादेखील हे ऐकून आनंद झाला. जरी त्याच्या मामांनी त्याची सूचना धिक्कारली होती, तरीदेखील त्याचा मनोदय पूर्ण होणार होता. पौर्णिमेच्या दिवशी नाटकाचा प्रयोग झाला आणि सगळ्या ग्रामस्थांना तो फारच आवडला.

प्रयोग संपल्यावर नाटक मंडळीच्या अध्यक्षांनी रंगमंचावर येऊन सांगितले, ''आपणा सर्वांना आमचा प्रयोग आवडला, त्याबद्दल आम्ही आपले आभारी आहोत. परंतु मला एक गोष्ट आपल्याला सांगितली पाहिजे. आम्ही हा प्रयोग विनामूल्य करणार आहोत असं जे आम्ही अगोदर जाहीर केलं होतं, ते मात्र खरं नाही. त्यासाठी आम्ही देवीची व आपणा सर्व प्रेक्षकांची क्षमा मागतो. कांही दिवसांपूर्वी एक तरुण आम्हाला भेटायला आला. प्रयोगासाठी जे मानधन आम्ही मागितलं, ते त्याने आम्हाला दिलं. पण त्याचे नांव जाहीर करूं नये अशी त्याने अट घातली. त्याचे काय कारण होते, ते आम्हाला ठाऊक नाही. परंतु आपण सर्वांनी जी प्रयोगाची स्तुती केलीत, आमचा सन्मान केलात, तो केवळ या तरुणामुळेच आम्हाला मिळाला आहे. म्हणून त्याचे नांव सांगितल्याखेरीज आम्हाला स्वस्थ बसवणार नाही. त्या तरुणाचं नांव आहे सूरज!'' नाटक मंडळीच्या अध्यक्षांचे हे निवेदन ऐकून सूरज चकित झाला.

घरी परत येताना या रहस्यामागे कोणाचा हात असूं शकेल याचाच विचार त्याच्या मनांत घोळत होता. गांवकरी त्याच्याभोवती गोळा



झाले आणि त्याला म्हणूं लागले, "अरे सूरज, तू असं कांही करुं शकशील असं आम्हाला कधीदेखील वाटलं नव्हतं. तू तर अगदी छुपा रुस्तुम निघालास! आपल्या मामाच्या ओंजळीने पाणी पिणारा भोळसट आहेस असंच आम्ही धरुन चाललो होतो. आत्ता लक्षांत येतंय कीं तू खूपच हुशार आणि प्रेमळ आहेस."

दुसऱ्या दिवशी जेव्हां सूरज घरांत एकटाच होता, तेव्हां अरुणा त्याला भेटली व त्याला म्हणाली, "जे काल झालं त्याचं तुला खूप आश्चर्य वाटतंय ना? या घटनेमागे माझा हात आहे. त्याबद्दल मी तुझी माफी मागते. आपला ग्रामाधिकारी आमचा जवळचाच नातेवाईक आहे. माझ्या आईने मरण्यापूर्वी माझ्याजवळ एक छोटीशी रक्कम दिलेली होती. आपला जुना गडी नारायण याच्याबरोबर ते पैसे देऊन ग्रामाधिकाऱ्याला खरी परिस्थिती मी कळवली. तेव्हां ग्रामाधिकारी नारायणला म्हणाला, "अरे, अशा चांगल्या कल्पनेसाठी मी स्वतः खर्च करीन कीं! अरुणा कांही मला परकी नाही!" आणि त्यांनी पुढची सारी व्यवस्था लगेच केली. सूरज म्हणून जो तरुण नाटक मंडळीला भेटायला गेला, तो ग्रामाधिकाऱ्याचा मुलगा आहे. मी पाहिलं कीं मामांच्याशी विरोध करुन सामना करणे कांही तुला जमणार नाही. म्हणून मीच हा उपद्व्याप केला. निदान आता तरी तू स्वतः निर्णय घ्यायला सुरवात कर आणि त्याप्रमाणे वागायला लाग. मामांच्या मोठेपणांत स्वार्थ लपलेला आहे. तुला त्यांच्या दडपणाखालून बाहेर पडायला शिकलं पाहिजे."

सूरजने प्रसन्नपणें म्हटलं, "अरुणा, यंदा देवीच्या नवरात्रांत जे कांही घडलं, ते एक वेगळ्या प्रकारचे महिषासुर मर्दनच आहे. या क्षणापासून शेतीकामाचे व घरांतल्या व्यवहाराचे जे कांही निर्णय घ्यायला लागतील, ते माझे निर्णय असतील. त्याच्याबरोबर मी आणखी एक महत्वाचा निर्णय अगोदर घेतला आहे."

"महत्वाचा निर्णय? तो कोणता?" अरुणाने उत्सुकतेने विचारलं. "मी निर्णय घेतला आहे कीं जन्मभर तू माझी मंत्रीणबाई होशील. आणि तुझा सल्ला मी नेहमीच पाळत जाईन." सूरजने हंसून म्हटलं.

अरुणाला त्यांतला गर्भितार्थ समजला आणि तिने हंसतमुखाने लाजत खाली मान घातली.







# अस्वल्या मांत्रिक

## 3

*(जंगलातल्या गांवात राहणाऱ्या लोकांना चोर, दरोडेखोरांच्या हल्ल्यांतून मुक्त करणाऱ्या कालीवर्माला शेजारच्या राजाला भिऊन जितकेतु राजाने मृत्युदंडाची शिक्षा सुनावली. जेव्हां त्याचा शिरच्छेद करणार होते, तेव्हां वध करणाऱ्याच्या हातांतून परशू खेंचून कालीवर्माने घोडदळाच्या नेत्याचेच शिर उडवले. त्यावेळी "आदि अस्वल" अशी गर्जना त्याला ऐकूं आली. त्यानंतर ....)*

"आदि अस्वल..." ही गर्जना ऐकून सर्व घोडेस्वार वळून त्या दिशेकडे पाहूं लागले. कालीवर्माने घोड्यावरुन खाली उडी घेतली. त्यापूर्वी त्याने घोडदलाच्या नेत्याजवळ जी आपली तलवार दिली होती, ती घेऊन म्यानांत ठेवली. तितक्यांत डोंगरावरच्या एका धबधब्याच्यामागून एक भलीमोठी व्यक्ती समोर आली.

"हा कुणीतरी मांत्रिक असावा" असा विचार मनांत येऊन पळून जावे कीं काय असे कालीवर्माला वाटले. पण त्याला शंका आली कीं घोडेस्वार त्याला थांबवतील. म्हणून तो त्यांच्या-कडे निरखून पाहूं लागला. पण ते सगळेजण घाबरून, भांबावून गेले होते आणि धबधब्याच्या दिशेकडे पाहात होते.

धबधब्याच्या मागून ओरडत येणारी व्यक्ती आता गुडघ्याइतक्या खोल पाण्यांतून कांठावर आली. त्या भीमकाय थोराड माणसाने अस्वलाचे कातडे पांघरले होते. हातांत दंडुका होता. त्याच्या



मुठीवर असलेले अस्वलाचे हिरेजडित मुख चमकत होते.

तोपर्यंत पळून जाण्याचाच कालीवर्माचा विचार होता, पण त्याच्याकडे येत असलेल्या त्या विचित्र पोशाख केलेल्या माणसाकडे तो भारुन गेल्यासारखा बघत राहिला. घोडेस्वार आणि रेड्यावर बसलेला मांगदेखील भेदरुन थरथरत होते.

अस्वलाचे कातडे धारण केलेला त्यांच्या-जवळ येऊन म्हणाला, "मला माहीत आहे कीं जर मी त्या क्षणाला "आदि अस्वल" ही घोषणा केली नसती तर आणखी रक्त पात झाला असता. तुम्हाला माहीत आहे कां? माझं नांव अस्वल्या मांत्रिक आहे."

कांही क्षण सगळेच स्तब्ध राहिले. कालीवर्माने उजव्या हातांतली तलवार आणि डाव्या हातांतला मारेकऱ्याचा परशू वर उचलला व तो अस्वल्या मांत्रिकाला म्हणाला, "अहो महाशय! आम्ही न विचारताच तुम्ही आपले नांव सांगितलेत, हे चांगलं झालं. आताच तुम्ही रक्तपाताविषयी बोललात! पण नीट ऐका, आता जर माझ्या वाटेत येऊन कुणी मला थांबवायचा प्रयत्न केलाच तर आणखी कांही डोकी उडवली जातील." असं म्हणून कालीवर्माने घोडा वळवला.

"अरे तरुणा! जरा वेळ थांब कीं! तू फारच साहसी दिसतो आहेस." असं म्हणून अस्वल्या मांत्रिकाने रेड्यावर बसलेल्या मांगाला आपल्या दंडुक्याने टोकले. आणि विचारले, "ए, तोंडावरुन बुरखा घेतलेल्या, तू या अरण्यांतला पिशाच्च आहेस कीं राजाने नेमलेला प्रमुख वध करणारा आहेस?"

"महाशय, मी पिशाच्च नाही पण वध करणारा मात्र आहे, महाराज ज्यांना मृत्यूची शिक्षा देतात, त्यांचा शिरच्छेद करणें हे माझे काम आहे." त्या वधिकाने उत्तर दिले. मांत्रिकाला पाहून त्याचा रेडा पळायचा बेतांत होता, त्याला चुचकारत बधिक बोलत होता.

त्यावेळीं अस्वल्या मांत्रिकाने घोडदळाच्या नायकाचे प्रेत पुन्हां पुन्हां निरखून बघत म्हटले, "तर मग शिरच्छेदाच्या शिक्षेतून निसटलेल्या, आणि एका राजसेवकाचे डोके उडवून पळून जाणाऱ्या एक गुन्हेगाराला तुम्ही कसे-काय वागवणार आहात?"

"महाराज, मी निःशस्त्र आहे. माझा परशू गुन्हेगार कालीवर्माने जबरदस्तीने हिसकावून घेतलेला आहे" त्या सेवकाने जड स्वरांत उत्तर दिले.

वध करणारा सेवक व घोडेस्वार यांना हा



मांत्रिक आपल्याविरुद्ध चिथावतो आहे हे काली-वर्माच्या लक्षांत आले. हातांतला परशू त्या वधिकाकडे देत कालीवर्मा म्हणाला, "अरे बुरखेधारी भुता! हा घे तुझा परशु! जर तुझ्यांत हिंमत असेल तर माझी वाट रोखण्याचा प्रयत्न करुन पहातोस कां?"

दुसऱ्याच क्षणीं वधिकाने आपल्या चेहऱ्या-वरचे अवगुंठन काढून दूर फेंकले आणि गदगदलेल्या स्वरांत तो कालीवर्माला म्हणाला, "कालीवर्मा, तू महान वीर आहेस. या अरण्यांतल्या भैरवाची शपथ घेऊन सांगतो कीं माझा अभिमान पार गळाठला आहे."

कालीवर्माने घोडेस्वारांना विचारले, "सांगा, तुम्हा लोकांचा काय निर्णय आहे? तुम्ही तुमच्या नायकाची काय दशा झाली ते पाहिलंत ना?"

"शिरच्छेदाच्या शिक्षेची अंमलबजावणी करणाऱ्यापैकी एक मेला व दुसऱ्याने शस्त्र खाली ठेवले, ही बातमी आम्ही महाराजांना जाऊन सांगू. पण तुमचा रस्ता रोखून आमचा जीव गमावण्या-इतके आम्ही मूर्ख नाही." ते घोडेस्वार घाबरत म्हणाले.

"तुम्ही खरं बोललात." असं म्हणून कालीवर्माने घोड्याला टांच दिली.

पण अस्वल्या मांत्रिकाने कालीवर्माच्या घोड्याचा लगाम खेंचला व तो ओरडून म्हणाला, "अस्वल पादगुरु! अखेरीस आपल्याला जशा व्यक्तीची जरुर होती, तो आता सांपडला आहे." कालीवर्माकडे वळून तो पुढे म्हणाला, "कालीवर्मा, इथें लोकप्रसिद्ध महान मंत्रवादी अस्वल्या मांत्रिक उपस्थित आहे, हे मात्र तू



विसरलेला दिसतोस!" लहानपणापासूनच कालीवर्माला मांत्रिक वगैरे मंडळींबद्दल तिळमात्र आदर वा उत्सुकता नव्हती. असले कितीतरी लोक त्याने आपल्या गांवात व आजूबाजूच्या गांवातही बघितलेले होते.

अस्वल्या मांत्रिकाचे बोलणें ऐकून कालीवर्माला वाटले कीं हा मांत्रिक त्याचा अपमान करतो आहे. त्याने मांत्रिकाला चिडून उत्तर दिले, "अरे वा महाशय! आपलंच नांव अस्वल्या मांत्रिक आहे ना? तसं तुमचं नुसतं नांव ऐकलं तरी भीती वाटते. पण आत्ताच तुम्ही आणखी एका अस्वलाचं नांव घेतलं होतंत. ते कोण आहेत? माझ्यासारख्या सामान्य माणसाला कोणते अस्वल कसे असते ते कुठे ठाऊक आहे? ते लक्षांत ठेवणेंदेखील मुष्कील आहे."

कालीवर्माने अस्वल्या मांत्रिकाच्या नांवाची टिंगल केली खरी, तरीदेखील अस्वल्या मांत्रिक



नाराज झाला नाही. उलट तो हंसून म्हणाला, ''माझ्या गुरुजीचं नांव अस्वल पाद आहे. माझं नांव अस्वल्या मांत्रिक आहे. यापुढें होणारी अद्‌भुत कामगिरी पाहून तू खूष होणार आहेस. तेव्हां नांवातल्या या किरकोळ साम्याबद्दल उगाच काळजी करुं नकोस.''

''घरांतून बाहेर पडल्यानंतर ज्या संकटांशी मला दोन हात करावे लागले, ते पाहून माझे मन पार विटले आहे. मला आता जमेल तितक्या लौकर आपल्या गांवी परत जाऊन शेतीवाडी करण्यांत रस आहे. त्यांत मी समाधानी राहीन.''

असं म्हणून कालीवर्मनें परशु बधिकाकडे फेंकला, आणि बेदरकारपणें तो घोड्यावर स्वार झाला.

घोडा हलला, दहाबारा टापा टाकल्यानंतर तो आता जोरांत पळायला लागणार, त्यापूर्वींच अस्वल्या मांत्रिक उंच आवाजांत ओरडला,

''कालीवर्मा, थांब! तू समोरुन येणाऱ्या लोकांना पाहिलंस तरी कां?''

ही धोक्याची सूचना ऐकताच कालीवर्मनें समोरच्या दिशेकडे बघितले. एका मोठ्या वृक्षाच्यामागून तिथे घोडेस्वार वेगांत येत होते. त्यांच्या मधे एक रेशमी कपडे व मोठी पगडी घातलेला एकजण होता. त्याच्या दोन्ही बाजूंना चिलखत घातलेले दोघेजण होते. त्यांच्या हातांत तलवारी होत्या आणि खांद्यावर चमकणाऱ्या ढाली होत्या.

त्यांना पाहून कालीवर्मनें घोडा थांबवला. घोडेस्वारांच्या मधोमध असलेल्या त्या पगडीधारी व्यक्तीने हात वर केला आणि कालीवर्माकडे खुणेने इशारा करीत तो त्या वधिकाला म्हणाला, ''अरे, तू शहरांतला प्रमुख मारेकरी. महाराजांनी या गुन्हेगाराला शिरच्छेदाची शिक्षा दिली होती ना, मग आत्तापर्यंत त्या आज्ञेचे पालन कां झाले नाही?''

तो मारेकरी वधिक रेड्यावरुन खाली उतरला आणि काय उत्तर द्यावे या विचारांत होता, तोपर्यंत अस्वल्या मांत्रिक त्या पगडीधारी इसमाजवळ जाऊन म्हणाला, ''जितकेतु महाराजाचा प्रधानमंत्री जीवगुप्त तो तूच ना?''

राजा व मंत्री यांचा अनादराने उल्लेख करणारा हा प्रश्नकर्ता कुणीतरी कपटी बैरागी असला पाहिजे असे जीवगुप्त मंत्र्याला वाटले.

त्याने रागाने डोळे वटारुन म्हटले, ''शिपायांनो, अगोदर ह्याला लाथ मारुन हाकलून द्या.''

मंत्र्याची आज्ञा ऐकून मंत्र्याशेजारी उभे असलेले घोडदळांतले सैनिक तलवारी उपसणार होते. पण मांत्रिकाच्या हातांतला मंत्रदंड पाहून ते भयभीत झाले. घोडे खिंकाळत मागे सरायला लागले.

''सरकार! त्या बैराग्याच्या हातांत जो मंत्रदंड आहे, त्याच्या मुठीवर अस्वलाचे मस्तक आहे ते आपण पहा. आत्ताच त्याने तोंड उघडले तेव्हां त्याच्या डोळ्यांतून अग्नीच्या ठिणग्या पडत होत्या.'' सैनिकांनी उत्तर दिले.

जीवगुप्ताने अस्वल्या मांत्रिकाच्या हातांतल्या मंत्रदंडाच्या मुठीवरचे अस्वलाचे मस्तक पाहिले, व कुत्सितपणें हंसत त्याने विचारले, ''अरे बैराग्या, तुझे बोलणें आणि हावभाव पाहून तू तर एक घमेंडखोर माणूस दिसतो आहेस. तू मंत्रतंत्र, जादूटोणा वगैरे शिकलेला आहेस की काय?''

हे शब्द ऐकून अस्वल्या मांत्रिकाने डोळे रोखून मंत्र्याकडे पाहिले आणि भेदक स्वरांत तो मंत्र्याला म्हणाला, ''अशी म्हण आहे कीं संन्याशाला सिद्धी मिळाली कीं त्याचा बैरागी बनतो. आणि अशा प्रकारे सरडाही आपला रंग बदलतो. पण मी संन्यासी नाही किंवा बैरागीही नाही. मी अस्वल्या मांत्रिक आहे. आदि अस्वलाचा विजय असो.'' असं म्हणून त्याने आपल्या मंत्रदंडाने जवळच्या एका झाडाच्या खोडावर जोराने मारले.

त्याबरोबर त्यांतून ठिणग्या पडायला लागल्या व कांही क्षणांतच मोठा जाळ होऊन तो वृक्ष जळून खाक झाला. जीवदत्त मंत्र्याचा घोडा बिथरला आणि घाबरुन पळायला लागला. मंत्र्याच्या संरक्षकांनी आपापले घोडे घाबरलेल्या मंत्रीमहाशयांजवळ आणले.



कांहीं वेळ सगळेजण चकित होऊन गप्प होते. दुरुन हे सारे दृश्य बघत असलेला कालीवर्मा घोड्याला अस्वल्या मांत्रिकाजवळ घेऊन आला व म्हणाला, ''अरेच्च्या, तुम्ही तर सामान्य मायावी मांत्रिक नाहीत. तुम्ही महान मंत्रवादी आहात. या कपटी व दुष्ट मंत्र्याची तुम्ही पार हबेलंडी उडवून दिलीत. त्यासारखे त्याला नीट राज्य करायला कां शिकवत नाही?''

''शाबास तरुणा! तू नुसताच धाडसी नाहीस, बुद्धिमानदेखील आहेस. माझ्या मनांतली गोष्ट तू ओळखलीस!'' अशा शब्दांत त्याने कालीवर्माची स्तुती केली.

मांत्रिकाने मंत्र्याला विचारले, ''माझ्या शक्तीची तुझी ओळख आता झाली आहे. आता सांग, इथें या लोकांना आज्ञा देणारा कोण असूं शकेल? तू कीं मी?''

त्यावर मंत्री कांपऱ्या स्वरांत बोलला,

"अस्वल्या मांत्रिक महाशय, आपली शक्ति मी स्वतःच्या डोळ्यांनी आत्ताच पाहिली. आपण फक्त इथेंच नाही, तर राजवाड्यांत जाऊन जितकेतु महाराजांना देखील आज्ञा आणि सल्ला देऊं शकाल."

अस्वल्या मांत्रिक त्या वधिकाला म्हणाला, "अरे ऐक! तू दुसऱ्यांची डोकी उडवतोस ना, तर मग ती जोडून शिवून टाकण्याची कलाही तुला माहीत असेल. घोडदळाच्या या नेत्याचे मस्तक त्याच्या धडावर शिवून टाक आणि त्याला दोरीने घोड्यावर बांधून टाक."

वधिकाने थोड्याच वेळांत आपले हे काम पूर्ण केले आणि घोडदळाच्या नेत्याचे प्रेत घोड्यावर बांधून बसवले. पण घाईघाईत त्याने चेहरा पाठीकडे तोंड करुन शिवला होता. त्यामुळें असं वाटत होतं कीं उलटीकडे तोंड करुन हा स्वार घोड्यावर बसला आहे.

ही चूक बघून जीवगुप्त मंत्र्याखेरीज इतर सर्वजण अस्वल्या मांत्रिकाबरोबर हंसायला लागले. मांत्रिकाने जीवगुप्ताकडे त्वेषाने बघितले आणि त्याला आज्ञा केली, "अे मंत्र्या! आता तू या मारेकऱ्याच्या रेड्यावर बैस आणि तो तुझ्या घोड्यावर बसेल."

थरथर कांपत असलेला जीवगुप्त रेड्यावर स्वार झाला, त्याच प्रमाणे तो मारेकरी वाधिक मंत्रीमहाशयांच्या घोड्यावर स्वार झाला आणि त्याने आपल्या हातांत लगाम धरला. त्यानंतर अस्वल्या मांत्रिकाने सगळ्यांना नगराच्या दिशेने चलण्याची आज्ञा दिली.

जितकेतु राजाच्या मंत्र्याची अशी फजिती झालेली पाहून कालीवर्माला आनंद झाला. तो म्हणाला, "ही मिरवणूक पाहून नगरांतले लोक जरुर खूष होतील. आता मात्र मी माझ्या गांवी जातो."

असं म्हणून घोड्यावर स्वार होऊन कालीवर्मा निघणार तेवढ्यांत अस्वल्या मांत्रिकाने आपला मंत्रदंड उचलून म्हटले, "कालीवर्मा, तू माझी आज्ञा ऐकली नाहीस कां?"

"आज्ञा? कोणती आज्ञा? इथें मला आज्ञा करणारा कोण आहे?" असं म्हणत कालीबमनि म्यानांतून तलवार उपसली.

*(क्रमशः)*







वेताळ कथा

# अनंताची आकांक्षा

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां त्या झाडाजवळ गेला. त्याने शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले आणि नेहमीसारखी त्याने स्मशानाची वाट धरली. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने राजाला विचारले, "राजन्, तू विद्यावान, अनुभवी आहेस, तरीसुद्धां या स्मशानांत तू विनाकारण कष्ट झेलतो आहेस. तुला हे सगळं कां करायचं आहे? कुणीतरी स्वार्थी, कपटी माणूस तुला फसवून तुझ्या चांगुलपणाचा तर फायदा घेत नाही ना? असल्या ढोंगी लोकांच्या जाळ्यांत सांपडून अनंतानेदेखील घोडचूक केली होती. आपली कार्यसिद्धी झाल्यानंतरदेखील तो परोपकार करायला अविचारीपणाने विसरला. त्याची गोष्ट नीट ऐक. म्हणजे तुझा थकवाही दूर



होईल.'' आणि वेताळाने अनंताची पुढील कहाणी सांगितली.

''फार पूर्वीची गोष्ट आहे ही! सत्कीर नांवाचा राजा मंदारक देशांत राज्य करीत होता. विराज हा त्याचा एकुलता एक मुलगा होता. त्याला बाळपणींच गोविल गुरुजींच्या गुरुकुलांत शिक्षण घेण्यासाठी पाठवले होते.

त्या गुरुकुलांत एकूण दहा विद्यार्थी शिक्षण घेत होते. त्यापैकीं अनंताखेरीज इतर सर्वजण विराजच्या बाबतींत जरुरीपेक्षां जास्त आदरभाव दाखवीत होते. राजकुमार आपल्यावर नाराज होईल आणि कांहीतरी शिक्षा देईल, म्हणून ते घाबरत होते. परंतु अनंताने मात्र पहिल्या दिवसापासून त्याच्याशी मैत्री केली. शांत व नम्र स्वभावाचा अनंत विराजला आवडला होता. दिवसेंदिवस त्यांची मैत्री वाढत चालली होती.

पण विराजला आपण राजकुमार आहोत याचा गर्व होता. त्याशिवाय तो जरासा मूर्खही होता. कधी कधी भावनेच्या भरांत तो अनंतावर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करीत असे. पण अनंताने ते कधी फारसे मनावर घेतले नाही. तो विराजशी नेहमीसारखाच खेळीमेळीने वागत असे.

गुरुजी जे शिकवत ते विराजला अनेकवेळां समजत नसे. पण हे तो गुरुजींना कधी सांगत नसे. फावल्या वेळांत तो अनंतकडून विषय समजावून घेई. अनंत त्याला मनापासून शिकवीत असे. विराजला जर नीट समजलेले नसले, तर अनंत दोनतीन वेळांदेखील त्याला अभ्यासाचा तो भाग समजावून सांगायचा.

अनंतमुळें विराजला अभ्यासाची गोडी लागली. जेव्हां गोविलगुरुजींच्या हे लक्षांत आलं, तेव्हां विराजला प्रोत्साहन देण्यासाठी त्यांनी त्याची भरपूर प्रशंसा करण्यास सुरवात केली. त्यावेळी विराज अनंताला म्हणाला, ''अनंत, आज गुरुजींनी माझी स्तुती केली खरी, पण त्याचे सारे श्रेय तुला द्यायला हवे. तुझा चांगुलपणा मी कधी विसरणार नाही. जेव्हां मी ह्या देशाचा राजा होईन, त्यावेळीं मी तुला माझा प्रधानमंत्री नेमीन.''

विराजचे हे बोलणे ऐकून अनंताला खूप आनंद झाला. गुरुजींना जेव्हां हे समजले, तेव्हां त्यांनी विराजचे जरा जास्तीच गुणगान करीत म्हटले, ''पुत्रा, मानवाला जनावरांपेक्षां वेगळे, कांही उत्तम गुण असतात, त्यापैकीं एक आहे - कृतज्ञता! तुझा दिलदारपणा खरंच कौतुकास्पद आहे. अनंतच्या बाबतीत तुझी उदारबुद्धी हे तुझ्या मोठेपणाचे चिन्ह आहे, तुझ्या विशाल



अंतःकरणाचे ते प्रतिबिंब आहे. तू अनंताला जो शब्द दिला आहेस, त्याचे मात्र कोणत्याही परिस्थितींत पालन कर!''

विराजने होकारार्थी मान डोलावली. पण त्यानंतर मात्र परिस्थिती बदलत गेली. विराज शिक्षणांत पुढें आला, पण त्याचबरोबर त्याचा दुरभिमानही वाढत गेला. शिक्षणक्रम पूर्ण होण्याच्या सुमारास तर तो आपले वचन विसरला आहे, याची जाणीव इतरांना झाली.

शिक्षणक्रम संपल्यानंतर अनंत गोविल-गुरुजींना म्हणाला, ''गुरुजी, मला अजून विद्या संपादन करायची इच्छा आहे. आपली संमती असेल तर आरवली पर्वतराजीजवळ कृष्णचंद्र गुरुजींच्या गुरुकुलांत मला कांही काळ अध्ययन करायची इच्छा आहे. त्यानंतर जर जरुरी वाटली, तरच मी विराजला त्याच्या बोलण्याची आठवण करुन देईन.''

गुरुजी प्रसन्न होऊन म्हणाले, ''त्या महान गुरुचे शिष्यत्व तू पत्करलेस, तर तुझी पात्रता खूपच वाढेल. तुझ्या जीवनाचे सार्थक होईल. जा, माझा तुला आशिर्वाद आहे.''

विराजने गुरुदक्षिणा दिली. आणि तो राजधानीला परत गेला. त्यानंतर सहा वर्षे उलटली. विराजचा राज्याभिषेक साजरा झाला. तो गादीवर आला आणि त्याने सुप्रतीकला प्रमुख सल्लागार प्रधानपद दिले. विराजच्यापुढें लाळघोटेपणा करुन त्याच्या होला हो म्हणण्याची सुप्रतीकची संवय होती. आता त्याच्या शब्दानुसार सारा कारभार सुरुं झाला.



सुप्रतीक आणि विराजराजाने मिळून नव्या राज्यपद्धतीनुसार अनेक बदल केले, सुधारणा केल्या. पण नागरिकांच्या ते पचनी पडले नाही; व जनता नाराज झाली. लोक राजाच्या विरोधांत बोलूं लागले. या स्थितीचा फायदा घेण्यासाठी शत्रूराजा वाट बघतच होता. विराजला गुप्तचरांकडून माहिती कळली कीं कोणत्याही क्षणीं शत्रू आपल्यावर हल्ला करणार आहे. विराज घाबरला. त्याने सुप्रतीकला सल्ला विचारला.

सुप्रतीकला ही फारशी मोठी समस्या आहे असे मुळी वाटलेच नाही. त्यांत विशेष लक्ष न घालता त्याने उथळपणे उत्तर दिले, ''त्यांत घाबरायचं कशासाठी, महाराज? आपण सैनिकांचे पगार वाढवूं आणि तरुणांना सैन्यांत भरती व्हायला लावूं. शत्रूने आपल्यावर हल्ला करण्याअगोदर आपणच शत्रूवर हल्ला करुं या. त्यांचे राज्य आपल्याला मिळाले कीं आपली कीर्ति सगळीकडे पसरेल.''



"तू तर असा बोलतो आहेस, कीं जणूं हा डाव्या हाताचा खेळ आहे. आपल्या खजिन्यांत तेवढा पैसा शिल्लक नाही, हे तुला ठाऊक नाही कां?" राजाने विचारलं.

त्यावर सुप्रतीक तोंडभर हंसून म्हणाला, "महाराज, रिकाम खजिना भरण्याचा एक उपाय आहे. दक्षिणी पर्वत आपल्याला ठाऊक आहे ना?"

विराजला दक्षिणी पर्वताबद्दल माहिती होती. मंदारक देशाच्या उत्तरेला जो उंच पर्वत होता त्याला दक्षिणी पर्वत म्हणत. त्या पर्वतावर एक प्राचीन देवालय आहे.

त्याच्याजवळ देवनागरी लिपींत एक शिलालेख कोरलेला आहे. मंदिराच्या समोरच्या सरोवरांत मध्यभागी एक डोह आहे. मंत्रतंत्र जाणणारा, साहशी किंवा कुणी निःस्वार्थी तरुणाने त्या डोहांत प्रवेश केला आणि तिथल्या रक्षक यक्षाला जिंकले तर त्याला तिथला नवनिधी प्राप्त होईल. जर तो तरुण पराजित झाला तर त्याला नरकयातना भोगाव्या लागतील. असे त्या शिलालेखावर लिहीलेले होते.

सुप्रतीकच्या बोलण्यानंतर विराजला ही कथा आठवली. तो शुष्क स्वरांत म्हणाला, "दक्षिणी पर्वताच्या बाबतीत विचार कशाला करायचा? प्राणावर उदार होऊन जिवाची बाजी लावायला मी तयार नाही."

सुप्रतीक हंसून म्हणाला, "महाराज, मी आपण जावं असं थोडंच म्हटलंय? मी ऐकलंय कीं कृष्णचंद्र गुरुजींकडे अनंताने मंत्रशास्त्राचा बराच अभ्यास केलेला आहे व त्यांत तो पारंगत आहे. इतर विद्यांचाही त्याचा उत्तम अभ्यास आहे. सध्यां तो आपले श्रेष्ठ व्यापारी कस्तुरी यांच्याकडे पाहुणा म्हणून राहातो आहे. अनंत खूपच धाडसी व निःस्वार्थी आहे असं कळलं. राज्याच्या कल्याणासाठी आपण त्याला दक्षिणी पर्वतावर जायला सांगावं. जर तिथला निधी घेऊन तो परत आला तर त्याला आपण भारंभार सोनं देऊं! आता सांगा, यावर आपलं काय मत आहे?"

अनंतचे नांव ऐकून विराज चमकला. त्याने क्षणभर विचार केला आणि सुप्रतीकचा प्रस्ताव स्वीकारला. लगेच अनंताला बोलावणे धाडण्यांत आले.

अनंतला विराजने मोठ्या प्रेमाने मिठी मारली. नंतर त्याला दक्षिणी पर्वतावरुन धनराशी आणण्याची कल्पना आणि त्याची सारी माहिती सांगितली. विराजचे बोलणे अनंतने लक्षपूर्वक



ऐकून म्हटले, "राजन, आपण दोघे एकमेकांना चांगले ओळखतो. आपल्या इच्छेनुसार दक्षिणी पर्वतावर मी अवश्य जाईन."

आपल्या शब्दाप्रमाणें एक चांगला मुहूर्त पाहून अनंत दक्षिणी पर्वतावर गेला आणि मंत्राचे पठण करीत तो सरोवरांत उतरला.

विराजही अनंतच्याबरोबर आलेला होता. सरोवराच्या कांठावर बसून विराज अनंताची वाट पहात बसला. थोड्या वेळानंतर त्याने पाहिलं कीं अनंत सरोवराच्या पाण्यांतून बाहेर येत होता. त्याचे तोंड उजळ दिसत होते, शरीरकांती चमकत होती.

विराज लागलीच अनंताच्याजवळ गेला व उत्सुकतेने विचारुं लागला, "अनंत, धनराशी मिळाली कां? कुठे आहे?"

अनंताने मंदस्मित करीत म्हटले, "चलावं महाराज, मी आपल्याला दाखवतो. तिथे मुळींच धोका नाही." असं म्हणून त्याने विराजचा हात पकडला आणि तो पुन्हां सरोवरांत उतरला. त्या सरोवराच्या तळाशी सूर्याच्या किरणांसारखे चमकणारे नवरत्नांचे ढीग त्यांना दिसले. विराज मंत्रमुग्ध होऊन बघतच राहिला.

अनंताने शांतस्वरांत म्हणाला, "महाराज, मी हा जो अमूल्य निधी मिळवला आहे, तो आपल्या इच्छेनुसार देशाच्या कल्याणासाठी याक्षणींच आपल्याला सुपुर्द करतो. पण त्याच्याबदल्यांत मला सोने नको."

विराजने चकित होऊन विचारले, "तर मग तुला काय हवंय?"

"आपण पूर्वी गुरुकुलांत असताना मला एक



वचन दिलेलं होतंत. त्यानुसार मला आपण आपला प्रधानमंत्री म्हणून नेमणूक करावी. मला हेच हवं आहे.'' अनंताने गंभीर स्वरांत म्हटलं.

ही मागणी ऐकून विराज थक्क झाला. पण लगेच त्याने खाली मान घालून अनंताचे पाय धरले आणि गदगदलेल्या आवाजांत म्हटलं, ''महानुभाव, तुम्ही सर्वसाधारण मानव नव्हेत! या क्षणापासून तुम्हीच माझे प्रधानमंत्री आहात. आपल्या अनुमतीखेरीज मी श्वासदेखील घेणार नाही.''

ही गोष्ट सांगून वेताळाने म्हटले, ''राजन्, तो निधी घेण्याच्यामागे विराजचा स्वार्थ अगदी स्पष्टपणे दिसून येतो. परंतु विद्यावान व धाडसी अनंताचे वागणे मात्र जरा चमत्कारिक वाटते, आणि जरा अविचारी देखील वाटते कीं नाही? जर तो खरोखरच नि:स्वार्थी आहे तर त्याने ती धनसंपदा निमूटपणें विराजच्या हातांत सोंपवायची, आणि त्याबद्दल कांही मागण्या-शिवाय निघून जायला हवे होते. किंवा त्या निधीतला वांटा मागायचा! विराज कपटी आहे, शब्द न पाळणारा आहे, हे माहीत असूनदेखील त्याने प्रधानमंत्री होण्याची जाहीर मागणी कां केली? माझ्या या शंकांची उत्तरें माहीत असून-देखील जर तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

विक्रमार्कानि म्हटले, ''देशाचे हित प्रथम पाहाणारा अनंत निश्चितच नि:स्वार्थी आहे. त्याकरीता त्याने गुरुकुलांत भावी महाराजांना मदत केली. विराज कपटी, स्वार्थी असूं शकेल. पण त्यावेळची देशाची स्थिती लक्षांत घेऊन अनंताने प्रधानमंत्रीपद मागितले. एकीकडे रिकामा खजिना, दुसरीकडे शत्रूराज्य हल्ला करण्याच्या तयारींत सज्ज असलेले; अशा वेळेला-देशाचे प्रथम रक्षण करणें हे अनंताचे कर्तव्य होत नाही कां? त्याच्या या मागणीवरुन त्याची देशभक्ती व राजकीय धोरणीपणा स्पष्ट दिसतात. त्यांत विवेक किंवा अविचारीपणा याचा प्रश्न येत नाही.''

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : कृष्णप्रसाद यांची रचना)*





# खास बातम्या

## दोघांमुळें संख्या वाढली!



जगांत नामशेष होण्याच्या मार्गावर असलेल्या प्राण्यांच्या एका जातींत आणखी एक जीव जन्मला आहे. सिंगापूरच्या 'झू' मधें डोन लंगूर जातीच्या माकडांची प्रथमच उत्पत्ती झाली आहे. या 'झू' मधें आणखी एका लंगूरचा जन्म झाल्याचे अधिकाऱ्यांनी कळवले आहे. ही जात व्हिएतनाम व लाओस या भागांतच आढळते. या दोन लंगूर पिलांना पाहायला बरीच गर्दी होते आहे. कारण 'झू' च्या अधिकाऱ्यांनी या दोन्हीं पिलांना नांवे सुचवण्याची स्पर्धा जाहीर केली आहे.

## चालत्या गाडींत काव्यपठण

नुकतीच कन्याकुमारीपासून नवी दिल्लीपर्यंत एक नवीन गाडी रेल्वेने सुरुं केली आहे. या गाडीचे नांव तिरुकुरल एक्सप्रेस असून निघाल्यापासून चवथ्या दिवशी ती दिल्लीला पोंचते. उद्घाटनाच्या पहिल्या सफरीवर कन्याकुमारीजवळच्या कोलतूर या गांवातली पांच वर्षांची चिमुरडी प्रतीक्षा होती. या सबंध प्रवासांत तिने सर्व वीस डब्यांमधून फेरी मारली व प्रवाशांच्यासाठी तिने तिरुक्कुरल या संपूर्ण काव्याचे पठण केले. प्रवास संपेपर्यंत तिने यांतले सर्व १,३३० श्लोक म्हणून दाखवले. हे महाकाव्य तिरुवालुवार याने सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी लिहीले होते.



भारतीय दंतकथा - २२

# तिसरा वर

दोन तरुण मित्र रस्त्यावरच्या एका छोट्या उपाहारगृहांत गप्पा मारीत बसले होते तेव्हां एक अनोळखी इसम त्यांच्याजवळ आला. "ही हिऱ्याची आंगठी तुम्हाला खरेदी करायची आहे कां?" त्याने त्यांना विचारले.

त्या दोघांपैकी विपुल श्रीमंत होता, पण चंद्रकांत मात्र एक गरीब शिक्षक होता. त्याला ती आंगठी विकत घेणे परवडणारे नव्हते. पण विपुलला मात्र ती आंगठी किंमती व चांगली वाटली.

"ही आंगठी तुम्ही कुणाकडून घेतली होती?" विपुलने विचारले.

"ते मी तुम्हाला सांगणार नाही. पण तुम्हाला जर ती विकत घ्यायची नसेल तर मी जवाहिऱ्याकडे जाऊन ती विकून टाकीन. मला पैशांची अतिशय निकड आहे म्हणून मी ही तुम्हाला दाखवली." तो इसम म्हणाला.

विपुलने त्या इसमाला घरी येण्याचे निमंत्रण दिले. विपुल व चंद्रकांत यांच्याबरोबर तो इसम मोठ्या उत्साहाने विपुलच्या घरी गेला. विपुलने त्याच्याशी मैत्री केली. घरी पोंचल्याबरोबर विपुलने त्या आंगठीची किंमत चुकती केली. पण तो त्या इसमाला लगेच जाऊं देईना. "आता रात्र होईल. इतकी रोख रक्कम घेऊन तुम्ही एकटे रस्त्यावरुन जाऊं नका," त्याने सांगितले. चंद्रकांतनेही मित्राच्या बोलण्याला दुजोरा दिला. म्हणून त्या त्रयस्थाने तिथें रात्रीं मुक्काम करायचे ठरवले.

चंद्रकांत आपल्या घरी परत गेला. विपुलने या पाहुण्यासाठी चविष्ट जेवण व उत्तम मद्याची व्यवस्था केली होती. दोन्हींचा मनसोक्त आस्वाद घेतल्यानंतर पाहुण्याची जीभ जरा सैलावली. तो खुषींत आला आणि ती आंगठी त्याला कुणी आणि कशी दिली हे त्याने विपुलला सांगितले.







त्या गांवाजवळ एक अरण्य होते. तिथें एक मांत्रिक राहात होता. तो मांत्रिक दर महिन्याच्या अमावास्येला मध्यरात्री एक यज्ञ करीत असे. आणि त्यानंतर कोणत्याही व्यक्तीची त्यावेळी व्यक्त केलेली इच्छा पूर्ण करण्याची अद्भुत शक्ती त्याला तेवढ्या वेळेला प्राप्त होत होती. या वाटसरुने तिथें जाऊन त्या मांत्रिकाला प्रसन्न केले होते. मांत्रिकाने एक मंत्र म्हटला आणि त्याला त्या यज्ञकुंडातली चिमूटभर विभूति दिली, व तीन वेळां पापण्यांची उघडमीट करुन तीन वर मागण्यास सांगितले.

हा बिचारा वाटसरू इतका गोंधळून गेला कीं त्याला फक्त हिऱ्याची आंगठीच आठवली. ज्या क्षणीं ती आंगठी तिथें उत्पन्न झाली, त्या क्षणीं तो जास्तच बावचळला व गप्प राहिला. उरलेली वेळ संपली. नंतर मात्र आपण एखादे राज्य तरी मागायला हवे होते, असे त्याला राहून राहून वाटायला लागले होते.

विपुलला त्याने ही कथा सांगितली. दुसऱ्या दिवशीं न्याहारी केल्यानंतर तो समाधानाने तिथून निघून गेला.

विपुलने आपला विश्वासू मित्र चंद्रकांत याला बोलावणें धाडले. विपुलने त्या मांत्रिकाकडे जायचे ठरवले होते. पण एकट्याने जायला तो घाबरत होता. चंद्रकांतने त्याच्यासोबत यावे असे विपुलने सुचवले.

चंद्रकांतला ही साहसी कल्पना मुळीच पटली नाही. "नशिबाने तुझ्याजवळ सर्व कांही आहे. आता तुला उगीच हांव कशाला हवी? तुला आता हवे आहे फक्त आंतरिक समाधान; प्रामाणिकपणे आणि सचोटीने जगण्यांतला आनंद तुला पुरेसा आहे!"

"पैशाखेरीज इतर कांही वरदान मी मागणार नाही असं तुला कां वाटलं?" विपुलने प्रतिप्रश्न केला.

"हे बघ, मित्रा, कोणतीही गोष्ट मिळवण्याचे दोन रास्त मार्ग असतात. ती गोष्ट कष्ट करुन तरी मिळवता येते, किंवा दैवाने ती तुम्हाला विनासायास प्राप्त होते! मांत्रिकाकडून तू कांही मिळवावे असे जर म्हणालास तर ते या दोन्ही प्रकारांत येऊं शकत नाही. कोणतीही गोष्ट कृत्रिम मार्गाने बळकावण्याचा प्रयत्न जर कुणी केला, तर त्याचे वाईट परिणाम होतात व पश्चात्ताप होतो." चंद्रकांतने धोक्याचा इशारा दिला.

पण मांत्रिकाला भेटायचा विपुलने निश्चयच केला होता. आपल्या मित्राबद्दल सहानुभूति व त्यापेक्षांही जास्त म्हणजे विपुलने कांही चुकीचे वागूं नये या भावनेपोटी चंद्रकांत विपुलबरोबर मांत्रिकाकडे गेला.

हे दोघे मित्र अरण्यांत जाऊन मांत्रिकाच्या झोंपडीजवळ पोंचले, तेव्हां अमावास्येची वेळ



जवळ आलेली होती. त्या मांत्रिकाने त्यांचे स्नेहाने स्वागत केले. ते पाहून या दोघा मित्रांना आश्चर्य वाटले. पण मांत्रिकाला वाटले कीं हे अरण्यांत मार्ग चुकलेले पांथस्थ आहेत. म्हणून त्याने त्यांना जेवायला वाढले. "आजची रात्र माझ्या झोंपडीत तुम्ही अवश्य राहा. मी आता यज्ञाला बसणार आहे आणि ते कर्मकांड पूर्ण झाले कीं हे अरण्यांतले घर कायमचे सोडून मी जाणार आहे." मांत्रिकाने त्यांना सांगितले.

"पण महाराज, हे अरण्य आपण कायमचे कां सोडून देणार आहात?" विपुलने विचारले. "वत्सा, त्याची चिंता तुला कशाला हवी? पण तुम्हाला सांगायला कांही हरकत नाही. मी इथें दर अमावास्येला रात्रीं एक यज्ञ करतो. मला कांहीतरी साध्य करावयाचे आहे. आज रात्रीचा यज्ञ झाला कीं माझे ते काम पूर्ण होणार आहे." मांत्रिकाने खुलासा केला.

"पण मला सांगा कीं तुम्ही चिमूटभर विभुति एखाद्या माणसाला देता आणि त्याला तीन इच्छा व्यक्त करायला सांगता आणि त्याची इच्छापूर्ती होते, हे खरं आहे कां?" विपुलने विचारले.

हा प्रश्न ऐकून मांत्रिकाचा चेहरा ताठर झाला. "तुम्हाला कुणी सांगितलं? बहुतेक तो हिऱ्याची आंगठी मागणारा मूर्खोबा असेल. तरी मी त्याला कुणापाशी कांहीही बोलायचं नाही असं निक्षून बजावलं होतं. मला त्याची दया आली म्हणून मी त्याला वरदान दिलं होतं."

"तुम्ही माझ्यावर देखील तशीच कृपा कां करत नाही?" विपुलने विचारले.

मांत्रिकाने हंसून म्हटले, "अरे बाबा, प्रेम, कृपा अशी मागून मिळत नसते. एखाद्याबद्दल दया वाटते, किंवा वाटत नाही. तुझ्याशी दयावंत होण्याचं मला तरी कांही एक कारण दिसत नाही."

"पण जर माझ्यावर तशी कृपा केलीत तरी त्यांतून तुमचे नुकसान तर मुळीच होणार नाही. मग तुमची कुरकुर कशासाठी आहे?" विपुलने हट्टच धरला होता.

"पण तुला मात्र ती कृपा फार महागांत पडेल! मी तुला पुन्हां सांगतो आहे, माझ्या यज्ञाच्या कामांत तू लुडबूड करूं नकोस." मांत्रिकाने रागावून सांगितले.

"पण, जोपर्यंत तुम्ही मला इच्छापूर्तीचे वर देण्याचे मान्य करीत नाही. तोपर्यंत मी तुम्हाला यज्ञ चालूं ठेवूं देणार नाही. तुमच्या साऱ्या तयारीत मी त्रास देत राहीन आणि त्यांत रात्र संपून जाईल." विपुलने आता मांत्रिकाला धमकी दिली.

"खरंच कीं काय!" मांत्रिक गंभीरपणें पुटपुटला.

चंद्रकांतला हे सारे असह्य होत होते. "विपुल, मी पाया पडतो, महाराजांच्या कार्यांत विघ्न आणूं नकोस. त्याचे वाईट फळ तुला मिळेल."



त्याने मित्राला सावध करायचा प्रयत्न केला. "तू मधें पडूं नकोस. बाजूला हो. अशी सोन्यासारखी संधी मी हातांतून घालवणार नाही" विपुल गुरगुरला. चंद्रकांत नाईलाजाने चार पावलें मागे सरला, आणि झोंपडीच्या पडवींत उभा राहिला. त्याला कांही सुचत नव्हते. मांत्रिकाने अग्नी प्रज्वलित केला आणि कांही मंत्रांचे पठण करीत यज्ञ सुरुं केला. विपुल त्याच्याजवळच उभा होता. कांही वेळानंतर मांत्रिकाने चिमूटभर रक्षा कुंडातून उचलली आणि विपुलच्या तळहातावर ठेवली. विपुलने कोणते वर मागितले ते कांही चंद्रकांतला ऐकूं आले नाहीत, पण मांत्रिकाच्या चेहऱ्यावरती एक छद्मी हास्य मात्र आगीच्या ज्वाळांच्या प्रकाशांत चंद्रकांतला स्पष्ट दिसले.

"मी तुझी इच्छा पूर्ण केली आहे. मला ती तुला नाकारता आली नाही. किंवा तुला फसवणेंही शक्य नव्हते, कारण, माझ्या कर्तव्यपूर्तीसाठी मला प्रामाणिक राहाणें आवश्यक होते. पण आता मात्र तूं चालता हो आणि मला शांतपणे राहूं दे." मांत्रिकाने कडवटपणे सांगितले.

विपुलने त्याला औपचारिकपणें वांकून प्रणाम केला, आणि तो पळतच चंद्रकांतकडे आला. दोघेही घरी निघाले.

सकाळ झाली तेव्हां ते गांवाच्या चौकांत पोंचले. त्यांनी नदीवर स्नान केले. कांहीतरी उत्सव होता म्हणून बरेच गांवकरी तिथें जमलेले होते. त्यांच्याकडे अहंमन्यतेने बघत विपुल मित्राला म्हणाला, "लौकरच हे सगळेजण माझे प्रजाजन होतील, कारण मी सम्राटपद मागितले आहे."

"हा वर तू मागितला होतास कां?" चंद्रकांतने विचारले.

"हा अनेकांपैकी एक वर आहे."

"दुसरे वर कोणते आहेत?"

"एक वर म्हणजे मला कधीही कोणताही रोग होऊं नये आणि मी कधीही म्हातारा होऊं नये!"

"पण तू दीर्घायुष्य कां मागितलं नव्हतंस?"

"किती रे भोळा आहेस तू? आता मी कधी म्हातारा होणार नाही, म्हणजे मी सदैव तरुणच राहीन. नाही कां?"

एकाएकी विपुलचा चेहरा पांढरा पडला. त्याच्या छातींत दुखायला लागले आणि तो खाली कोसळला.

"किती मूर्ख आहे मी! मी जो वर मागितला त्याचा अर्थ असाही होतो कीं मी म्हातारा होईपर्यंत जगणार नाही!"

तो जोराने कण्हला आणि त्याने शेवटचा श्वास घेतला.

- किन्वावसू



# अठराचे कोडे

३० जुलै १९४५ रोजी हॉलीवुडमधे सूर्य नुकताच उगवला होता. अचानक, एका झुडुपाच्यामागून दोन इसम आले आणि त्या निर्मनुष्य रस्त्यावरून जाणाऱ्या एका व्हॅनला त्यांनी अडवले. त्यांतला एकजण उंच, शेलाटया व जरा अस्वस्थ दिसत होता. आणि दुसरा ठेंगणा, जाडगेला व शांत वाटत होता. पिस्तुलाचा धाक दाखवून त्यांनी गाडींतल्या दोघांना खाली उतरवले. त्यांचे डोळे बांधले, हातपाय बांधले, आणि दोघांनाही जवळच असलेल्या एका झाडाला बांधून टाकले.

हे दोघे कोण होते? काय करीत होते? त्या व्हॅनमधले सामान त्यांनी बाहेर काढले - चांदीच्या नाण्यांनी भरलेल्या सहा मोठ्या थैल्या, आणि कोऱ्या करकरीत डॉलर्सच्या नोटांनी भरलेले एक पुठ्ठ्याचे मोठे खोकें - त्यांनी हे सामान जवळच उभ्या केलेल्या दुसऱ्या एका मोटारींत घातले आणि सकाळच्या धुक्यांत त्यांची गाडी दिसेनाशी झाली.



भर दिवसाढवळ्या घातलेला हा एक धाडसी दरोडा होता. ती व्हॅन हॉलीवुड स्टेट बँकेची होती. त्या दोघाजणांनी हळूं हळूं प्रयत्न करुन येणाऱ्याजाणाऱ्यांच्या मदतीने आपली सुटका करुन घेतली. ते दोघेही घाबरले होते आणि पार बावचळून गेले होते. ही घटना इतक्या वेगाने घडली कीं त्यांना स्वतःचा बचाव करणें सुचले नाही. दोघेही फारच दुःखी होते. कारण ती रक्कम लॉकहीड कंपनीला त्यांच्या कर्मचाऱ्यांच्या पगारासाठी देण्याचे काम त्यांच्यावर सोंपवलेले होते.

त्या चोरांनी एक गंभीर गुन्हा केला होता. चोरी व दुसऱ्यांना पळवून नेण्याचा आरोप त्यांच्यावर लागला. ते पैसे लवकर मिळवायचे असल्यामुळे त्या खटल्याचा निकाल लवकर लागणें आवश्यक होते. पोलिस व गुप्तहेर खात्याला हे चांगलेच आव्हान होते.

दरोडेखोरांनी मागे कांही खूण ठेवली होती कां? शेंकडो लोकांची चौकशी झाली. बँकेच्या त्या दोघा कर्मचाऱ्यांचीही कसून चौकशी केली गेली. त्यांच्यापैकी एकाला आठवलं कीं त्याचे डोळे बांधतेवेळी त्या ठेंगण्या चोराच्या शर्टावर एक बिल्ला त्याला दिसला होता, तो लॉकहीड कंपनीच्या बोधचिन्हाचा बिल्ला होता. आपण याच कंपनीत काम करतो आहोत हे दाखवण्यासाठी त्या चोराने त्याचा उपयोग केला होता.



एक दिवस एका पोलिस अधिकाऱ्याला एक रिकामी सोडून दिलेली मोटार आढळली. त्या गाडींत एक फाटकी चिठ्ठी सांपडली. त्यावर एक नांव व पत्ता खरडलेला होता. लगेच त्या पत्त्यावर पोलीस गेले. एका स्त्रीने दार उघडले. पोलीसांना बघून तिला आश्चर्य वाटले.

"आम्ही कांही तपास करायला आलो आहोत" त्या पोलीसाने नम्रपणें सांगितले.

"जरुर करा! चालू द्या!" त्या मध्यमवयीन स्त्रीने सहज उत्तर दिले. तिचे नांव मिसेस ॲबेलर्ड होते.

घरांत शोधल्यानंतर, गुप्त पोलीस बागेंत गेले. तिथें बाईची मुले चेंडू घेऊन खेळत होती. एकाएकी चेंडू जो उडाला तो कुंपणाच्या टोकाला एक खोपट होते, त्याच्या दाराखाली गेला. मुलें पळतच चेंडू आणायला गेली; पण त्या दाराला कुलूप होते.

"त्या तिथें काय आहे?" एका अधिकाऱ्याने विचारले. "गेले कांही आठवडे दोघाजणांनी ते भाड्याने घेतलेलं आहे. पण गेले कांही दिवस ते दोघेजण परत आलेले नाहीत." ॲबेलर्ड बाईनी उत्तर दिले.

पोलिसांनी त्या खोपटाचे दार फोडून उघडले. मुलांना चेंडू मिळाला म्हणून ती खूष झाली. पण पोलीसांना जास्त आनंद झाला. कारण तिथें जमिनीवर पसरलेल्या सामानांत एका शर्टावर लॉकहीड कंपनीचा बिल्ला टांचलेला होता, एक स्वयंचलित बंदूक आणि बँकेच्या दोघा कर्मचाऱ्यांची रिव्हॉल्व्हर्स होती.

पोलीसांनी तो बिल्ला लॉकहीड कंपनीत नेला. पण त्याचा नंबर आणि त्यांच्या कर्मचाऱ्यांची नांवे यांचा मेळ बसेना. त्या चोरांनी मूळ नंबर उचकटून काढून त्यावर खास पेनने एक दुसरा खोटा नंबर लिहिला होता. पण शास्त्रीय तपासणींत



दुपारी अचानक एका लहानशा उपाहारगृहांत जॉन्सनसमोर उभे राहिले. त्याच संध्याकाळीं हार्डीलाही त्यांनी त्या परिसरांत रेंगाळताना पाहिले. दोघांनाही तुरुंगात डांबले. आपण निर्दोष आहोत असं ते विनवत होते.

जेव्हां पैशासंबंधी त्यांना विचारले तेव्हां सुरवातीला त्यांनी कांही दाद दिली नाही. नंतर मात्र त्यांनी सांगितलं कीं ते पैसे कुठे लपवले आहेत ती जागा प्राण गेला तरी ते सांगणार नव्हते! परंतु एका रात्रीं, जॉन्सनच्या गादीखाली एका डब्यांत पाणी ठेवलेले दिसले. त्यांत पोलीसांना एक डॉलरची जुनी नोट तरंगत होती.

त्या बिल्ल्यामधून कांही धागे आढळले. मूळ नंबराचे आंकडे होते ते कळले.

पोलीसांनी लॉकहीडच्या कर्मचाऱ्यांची यादी तपासायला सुरवात केली. जुना नंबर एका उंच, काटकुळा व अस्वस्थ हालचाली असणाऱ्या जॉन्सन नांवाच्या माणसाला दिलेला होता. त्याचा हार्डी नांवाचा एक ठेंगणा, जाड्या व सुस्त स्वभावाचा मित्र होता. तोही तिथेच कामाला होता. गुन्हेगारांचा सुगावा अखेरीस लागला होता.

पण हे दोघे विलंदर मित्र कांही आता या कंपनीत कामाला नव्हते. कंपनी सोडल्यानंतर ते कुठे गेले असावेत? कंपनीच्या नोंदणीपुस्तकांत असलेले त्यांचे फोटो घेऊन पोलीस एका दिवशी

हा विक्षिप्त प्रकार काय असावा? पैसे लपवल्याच्या जागेची ही एक खूण असेल कां? कदाचित एका ओल असलेल्या जागी ती लूट त्यांनी लपवली असावी. म्हणून डॉलरची नोट पाण्यांत कुजायला किती दिवस लागतील, ते पाहाण्यासाठी आरोपींनी तो प्रयोग केला असेल!

त्या दोघा चोरांना निरनिराळ्या कोठड्यांत ठेवलेले होते, परंतु एका संरक्षक शिपायाच्या मदतीने ते एकमेकांना सांकेतिक चिठ्ठ्या पाठवत होते. पण गुप्तहेरांना ते सर्व निरोप मिळत होते.

त्यांतल्या कांही चिठ्ठ्यांवर ''१८'' ही संख्या आणि ''कागद'' हा शब्द होता. एकांत लिहीले



होते, ''जर आपण इथें फार काळ राहिलो, तर हिंवाळी पावसामुळें कागद कुजेल'' दुसऱ्या चिठ्ठींत होते, ''माझी धाकटी बहीण ते गोळा करुं शकेल. पण तिला तिथें पोंचायचे म्हणजे...''

'कागद' म्हणजे पैसे होते कां? तसं असेल, तर ते एका अत्यंत ओलसर जागी ठेवलेले होते आणि एका तरुण मुलीला त्या जागेवर पोंचणे कठीण होते. पण मग ''१८'' याचा काय संदर्भ असावा? कुठल्या तरी रस्त्याला तो खुणेचा आंकडा तर दिला नसेल?

पोलीस व गुप्तहेरांच्या चौकस नजरेला एक रस्ता दिसला; त्या रस्त्यांत एका दगडावर ''१८'' हा आंकडा लिहीलेला होता. जवळच एक लहानशी पायवाट होती. ती पुढे एका स्मशानभूमीच्या सभोवार दहा फूट उंचीचे तारेचे कुंपण घातलेले होते, तिथपर्यंत ती वाट जात होती.

एक पोलीस ऑफीसर उद्‌गारला, ''खरंच, थडग्याचा दगड ही लक्षांत राहाण्याजोगी खूण आहे!''

''खरंच की! एका तरुण मुलीला हे उंच तारेचे कुंपण चढणें शक्यच नाही!'' दुसरा म्हणाला !

या रहस्यकथेतले धागे उलगडत चालले होते. त्या अधिकाऱ्यांनी ती दफनभूमी पिंजून काढली. ते कांहीतरी खूण सांपडेल म्हणून ते शोधत होते आणि ती त्यांना दिसली. एका सैनिकाच्या थडग्याच्या मागें मातीचा ढीग, पालापाचोळा नि काटक्या होत्या. त्याचा मृत्यू १८९८ मधें झालेला होता!

त्यांनी त्या जागी खणले आणि त्या जागी नीट व्यवस्थित खोलवर पुरलेले ते पैसे सांपडले. चांदीच्या नाण्यांच्या सहा थैल्या आणि नोटांनी गच्च भरलेले एक खोकें सुरक्षित होते.

तुरुंगातल्या त्या दोघांना ही माहिती कळवली. प्रथम त्यांचा विश्वास बसेना, पण नंतर त्यांनी मानले, व आपला गुन्हा कबूल केला.



## वाचकांसाठी कथास्पर्धा

### सर्वोत्कृष्ट कथेला रु. २५०/-चे पारितोषिक



पुढील कथा वाचा -

रामतीर्थ हा रायदुर्गचा एक सधन व्यापारी होता. त्याच्याकडे अनेक नोकर होते. नारायणवर सर्व खोल्या स्वच्छ ठेवण्याची कामगिरी सोंपवली होती. प्रत्येक वस्तू पुसून तो नीटसपणें ठेवत असे.

एके दिवशी जमिनीवर एक नाणें पडलेले त्याला दिसले. ते उचलून त्याने ते आपल्या मालकांना दिले. "तुझा प्रामाणिकपणा पाहून मला आनंद झालाय. हे नाणें तुलाच बक्षीस म्हणून ठेव." रामतीर्थानि म्हटले.

कांही दिवसांनंतर घरांतून एक हिऱ्याचा हार गायब झाला. रामतीर्थानि प्रत्येक नोकराला त्या हाराबद्दल विचारले, पण कुणीच तो पाहिला नव्हता किंवा घेतला नव्हता.

**सर्वांच्या शेवटी नारायणला विचारले :**

- नारायणने हार बघितला होता किंवा नव्हता?
- जर त्याने बघितला असेल, तर त्याने त्याचे काय केले?
- नारायणचा खुलासा ऐकून रामतीर्थाची काय प्रतिक्रिया झाली?
- नोकराला बक्षिसी देण्यांत रामतीर्थाचे बरोबर होते कां?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा आणि एका पाकिटांत घालून आमच्याकडे पाठवा. पाकिटावर कथास्पर्धा असा स्पष्ट उल्लेख असावा.

खालील कुपन भरुन त्यासोबत जोडा.

**शेवटची तारीख २९ फेब्रुवारी २००४**

नांव .................................................. वय ..................

जन्मतारीख ........................ शाळेचे नांव ..........................

घरचा पत्ता ......................................................................

..............................................................................

.................................................. पिनकोड ..................

पालकांची सही                                                स्पर्धकाची सही

**CHANDAMAMA INDIA LIMITED**

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.



# सफल यात्रा

जेव्हां काशीराज्याचा कारभार ब्रम्हदत्त सांभाळत होता, तेव्हां बोधिसत्त्वाचा जन्म एका व्यापारी कुटुंबात झाला. बाळपणापासूनच तो वडीलधाऱ्यांकडून व्यापाराचे बारकावे शिकत आला होता. प्रत्येक बाबतींत तो सर्व बाजूंनी विचार करी व नंतर निर्णय घेत असे. अशा प्रकारे त्याने आपले ज्ञान, संयमी विचारशक्ती, वाढवली होती. वयाने मोठा झाल्यानंतर पांचशे बैलगाड्यांवर माल लादून पूर्वेपासून पश्चिमेला, आणि पश्चिमेहून परत पूर्वेकडे, असा तो वरचेवर फेऱ्या करीत असे. त्याने व्यापारांत भरपूर फायदा कमावला होता.

काशीनगरींत मंदमती नांवाचा आणखी एक व्यापारी राहात होता. तो नांवाप्रमाणेच होता. भोळा, खुळा आणि बावळा! एकदा बोधिसत्व नेहमीसारखा गाड्यांवर माल लादून व्यापारी दौऱ्यावर जायची तयारी करीत होता. तेव्हां मंदमतीने त्याच्याबरोबर जायची इच्छा प्रकट केली.

बोधिसत्वाने मंदमतीला म्हटले, "आपल्या दोघांच्या बैलगाड्या जर एकाच वेळी निघाल्या तर मार्ग अरुंद वाटेल आणि प्रवास जास्त लांबेल. एकाच वेळीं माल विकायचा असला तर दाम कमी करावा लागेल. म्हणून आपण जर एका पाठोपाठ एक असे गेलो तर ते सोईस्कर व सुखावह होईल. आता अगोदर तू पुढे जायचंस कीं माझ्यामागून यायचंस ते तूच ठरव. तुझ्या मनाला योग्य वाटेल तो निर्णय घे."

मंदमतिने आपल्या मनाशी विचार केला, "मी अगोदर पुढे गेलो तर त्याचा किती प्रकारांनी लाभ होईल! वाट निर्वेध, मोकळी असेल, जमीन ओली, दमट नसेल, मग प्रवासांत कांही अडथळे येणार नाहीत. बैलांना भरपूर वैरण मिळत राहील, सगळ्या माणसांना ताजी फळें, भोजन मिळेल. जिथें जाईन, तिथें मी सांगीन त्या किंमतीला माल विकून टाकता येईल."

याविषयी बोधिसत्वदेखील विचार करत होता, "अगोदर पुढें जायच्याऐवजी मी मागाहून गेलो तर नंतर ते जास्त चांगले ठरेल. वाट कठीण



असली तरी ती नरम होईल, साफ होईल. पुढे जाणाऱ्या लोकांना पाणी कुठे आहे त्याचा शोध घ्यावा लागेल. आणि पाणी मिळाले नाही तर त्यांना वाटेंत विहीरी खोदाव्या लागतील. पण नंतर त्या विहीरीचा त्या वाटेवरुन जाणाऱ्या वाटसरुंना चांगला उपयोग होईल. नव्या प्रदेशांत जायचं तर आपण किंमती वाढवून सांगता येणार नाहीत. आपल्या अगोदर जे जातात, त्यांनी मालाच्या किंमती ठरवलेल्या असतात. त्या किंमती लक्षांत ठेवून विक्री केली तर कांही अडचण येत नाही. बैलांना हिरवा चारा, पाणी यांचीही चांगली सोय होते.''

जेव्हां मंदमतीने म्हटलं कीं प्रथम त्याचा तांडा जाईल, तेव्हां बोधिसत्त्वाने त्याचे म्हणणे मान्य केले. मंदमतीलाही खूप आनंद झाला कारण आता त्याला सर्व सुखसोयी पहिल्याप्रथम मिळणार होत्या. आपली कल्पना बोधिसत्वाने स्वीकारली म्हणून मंदमती स्वतःवर फारच खूष झाला.

मंदमतीला ज्या पहिल्या मुक्कामाला जायचं होतं, ते गांव त्याच्या गांवापासून साठ कोस अंतरावर होतं. दोन गांवामधे ओसाड वाळवंट होतं, ते पार करुनच पहिला मुक्काम गांठता आला असता. म्हणून मंदमतीने प्रवासाची तयारी केली. तेव्हां भरपूर खाद्यपदार्थ आणि पाणी घेण्याची काळजी घेतली. बोधिसत्वावर आपण कशी मात केली आहे या आनंदात मंदमती आपल्या साथीदारांना घेऊन प्रवासाला निघाला.

मंदमतीचा तांडा कांही दिवसांचा प्रवास करीत त्या वाळवंटाजवळ पोंचला. थोडे अंतर पार केल्यानंतर त्यांना एक अद्‌भुत बैलगाडी दिसली. त्या गाडीला उत्तम जातीचे पांढरेशुभ्र बैल जोडलेले होते. त्या गाडीसमोर धनुष्यबाण, तलवारी, घेऊन सैनिक उभे होते. गाडीमधे एक राजस पुरुष मोठ्या रुबाबांत बसलेला होता. गाडीच्या चाकांना चिखल लागलेला होता. सर्वांच्या हातांत कमळें होती.

त्या राजस पुरुषाने मंदमतीला म्हटले, ''तुम्हाला माहीत आहे कां, इकडे किती जोरांत पाऊस पडला होता ते! जिकडे तिकडे पाणीच पाणी झालं होतं. अरण्याचा त्या बाजूचा भाग तर पाणीमय झालाय. साऱ्या गांवांतून पाणी शिरलंय. तुम्ही सर्वजण त्या दिशेलाच जाता आहात ना? मग ही पाण्याची पिंपे कशाला बरोबर? उगीचच इतके ओझे वाहून नेता आहात तुम्ही. छे, छे, ते सगळं पाणी ओतून टाका आणि आरामांत प्रवास करा.''

त्या गाडींत बसलेला तो पुरुष व त्याच्या-



बरोबर असलेले इतर सर्व लोक हे नरभक्षक यक्ष होते. त्या वाळवंटातून जाणाऱ्या प्रवाशांना ते अशा प्रकारे सल्ला देत असत; आपल्या गोड, मधुर भाषणाने त्यांना भारुन टाकीत असत. आणि जेव्हां ते प्रवासी तहानेने व्याकुळ होऊन तडफडत असत, तेव्हां हे नरभक्षक त्यांना मारुन खात असत.

बिचाऱ्या मंदमतिला या दुष्ट कारस्थानांतली गोम समजली नाही. त्याने त्यांचे बोलणे खरे मानले आणि पाण्याची भरलेली पिंपे ओतून दिली व तो पुढे जाऊं लागला. त्या राजस पुरुषाने दाखवलेले अरण्य दूरवर दिसत होते, पण मंदमतिचा तांडा बरेच अंतर कापून पुढे गेला, तरी अरण्यापर्यंत कांही त्यांना पोंचता आले नाही. पाऊस पडल्याचीही कांही खूण दिसत नव्हती.

तहानेने सारेजण फारच व्याकुळले. थेंबभर पाणीही त्यांनी ठेवले नव्हते. त्यांना शोष पडला आणि एकामागोमाग एक, असे ते पाण्याअभावीं तडफडत मरण पावले. बैलही थकून गेले होते. जी माणसें व जनावरें मेली, त्यांना यक्षांनी खाऊन टाकले व त्यांची हाडें मात्र त्या वाळवंटात फेंकून दिली. चाळीस दिवसांनंतर बोधिसत्वाने आपला ताफा त्याच मार्गाने नेला. त्यानेही या प्रदीर्घ प्रवासाला पुरेल इतके पाणी व खाद्यपदार्थ बरोबर घेतलेले होते.

ते वाळवंटात शिरले त्यावेळीच बोधिसत्वाने आपल्या माणसांना सांगितले, ''माझ्या अनुमती शिवाय थेंबभर पाणीदेखील वांया घालवायचं नाही कुणी! असल्या ओसाड प्रदेशांत विषारी झाडें असतात. मी सांगितल्याखेरीज कोणत्याही अनोळखी झाडाचे फळ वा पान तोडून खायचे नाही, हे अगदी नीट लक्षांत ठेवा.''



वाळवंटात जरा पुढे गेल्यानंतर तो राजस पुरुष पुन्हां प्रकट झाला आणि जे त्याने मंदमतीला सांगितलं तेच त्याने बोधिसत्वाला सांगितलं.

त्यावर बोधिसत्वाने उत्तर दिलं, "आपण हे आम्हाला सांगायची कांही आवश्यकता नाही. आम्ही व्यापारी आहोत. जोपर्यंत आम्हाला पाणी दिसत नाही, तोपर्यंत आम्ही कांही आमची पिंपे रिकामी करणार नाही. पाणी डोळ्यांना दिसलं कीं नंतर आमचा भार कमी करण्याबद्दल विचार करुं."

त्यावर कांहीही न बोलता तो पुरुषाच्या रुपांतला यक्ष आपल्या लवाजम्यासकट निघून गेला.

पण कांही लोकांना त्याचे बोलणें खरे वाटले, व पाणी ओतून द्यावे असे त्यांचे मत होते. त्यावर त्यांना बोधिसत्वाने समजावले, "या भागांत एखादे सरोवर किंवा नदी असल्याचे तुम्ही कधी ऐकले होतेत कां? हा माणूस म्हणत होता कीं इथें मुसळधार पाऊस पडला. पण अजून आपल्याला हवेंतला गारवा कां जाणवला नाही? आभाळांत पावसाचे ढग तरी दिसले कां? वीज कडाडलेली ऐकूं आली कां? आपल्याला जे लोक दिसले, ते यक्ष होते. आपण तहानेने मरावे म्हणजे त्यांना आपल्याला खाता आले असते असा त्यांचा डाव होता. जे व्यापारी त्यांच्या बोलण्याला भाळले, त्यांना या यक्षांनी संपवलं असेल. आपल्याला त्यांचे अवशेष रस्त्यांत दिसूं शकतील."

बोधिसत्वाने म्हटल्याप्रमाणेंच थोड्या अंतरावर गेल्यावर त्यांना बैलगाड्या व त्यांतला माल दिसला. चारी बाजूला जनावरांचे व माणसांचे सांगाडे विखुरलेले होते. ते दृश्य भयानक होते.

"बघा, मंदमती किती मूर्ख निघाला ते! परक्या माणसावर विश्वास ठेवून त्याने पाणी फेकून दिलं असेल, त्याचा हा परिणाम!" बोधिसत्व आणि त्याची माणसें त्या रात्रीं तिथेंच थांबली. सकाळीं उठल्यावर त्यांनी चांगल्या स्थितींत असलेला सगळा माल गोळा केला. नंतर ते त्यांच्या ठरलेल्या गांवात गेले आणि भरपूर नफा मिळवून दुसरा माल घेऊन आपल्या घरी सुखरूप परत आले.







# विष्णु पुराण

सत्यव्रत म्हणाला, ते ऐकून मासा समुद्राच्या मधोमध गेला आणि एका मोठ्या डोंगरासारखा वाढत वाढत त्याने सर्व महासागर व्याप्त केला व म्हणाला - "सत्यव्रता! पाहिलेस? तू म्हणालास ते अमोघ ठरले, पाहातो आहेस ना! आणखी काम चालूच आहे. असा आणखी वाढत वाढत काय होतो, नकळे!"

तेव्हां सत्यव्रत हात जोडून नमस्कार करीत म्हणाला - "मत्स्यरूपांत असलेल्या हे नारायणा! मी रक्षण कर म्हणताच आलास आणि माझ्या रक्षणार्थ मत्स्यावतार धारण केलास. तुझी अगाध लीला कळण्याइतका मी मोठा आहे कां रे?" अशाच तऱ्हेने अनेक प्रकारे नारायणाचा स्तुतिपाठ केला.

तेव्हां मत्स्यावतार धारण केलेला विष्णु म्हणाला - "अरे राजा! सात दिवसांत कल्पांत होणार आहे. व सर्व जग जलमय होईल. ज्ञान, औषधी वनस्पती व बीजें नष्ट होता कामा नयेत. पुढे येणाऱ्या कल्पांतात या सर्वांचे रक्षण झाले पाहिजे. तुझ्यासाठी एक मोठी नौका, अंधकारात जसा दिवा असावा, तशी येत आहे. तीत सप्तर्षी असतील ती ज्योती त्यांचीच समज!"

"औषधी वनस्पती, बियाणाच्या राशी, वगैरे तू आपल्याबरोबर नौकेत भर! माझ्या नाकावरच्या शिंगाने मी तुम्ही ज्या नावेत असाल ती नाव बुडू नये व तिचे रक्षण व्हावे, यासाठी सर्व प्रयत्न करीन. म्हणून मी असा अवतार धारण केला आहे. ब्रह्मदेव जागा होईपर्यंत नाव ध्रुव ताऱ्याच्या दिशेने तरंगत जात राहील. येणाऱ्या कल्पांत तू वैवस्वत या नांवे मनू होशील!" असा नारायणाने आदेश दिला.

सत्यव्रताने विष्णूला गुडघे टेकून नम्रपणे नमस्कार केला.



मत्स्यावतार आपल्या चारही कल्ल्यांनी पोहत आणि शेपटी पाण्यावर आपटीत वेगाने लाटांना कापीत खोल निघून गेला.

ब्रह्मदेव गाढ झोपेत होता. सर्वत्र अंधकार पसरला व जग काळोखांत बुडाले.

हयग्रीव नांवाचा सोमकासुर तलातल पाताळ लोकांतून, समुद्राच्या पातळीवर येऊन, वट-वाघळासारखा, ब्रह्मदेवाचे निवासस्थान जो सत्यलोक तेथे उडत गेला.

ब्रह्मदेव झोपेतच जांभया देत असतां चारही मुखांतून अनुक्रमे पांढरा शुभ्र, लाल, पिवळा व निळा, या रंगाच्या प्रकाश रूपानी चारही वेद बाहेर येऊन बाजूला पडले. हयग्रीवाने ते वेद चोरले आणि समुद्राच्या तळाला खडकांत नेऊन लपवून ठेवले.

हयग्रीवासुर देवांचा व विष्णूचा घोर शत्रू होता. वेद नसतील तर ब्रह्मदेवाला सृष्टी करतां येणार नाही. कल्पकल्पांत, कांही चांगले, कांही उन्नत, असे करावे, हे विष्णूचे कार्य; परंतु ते नष्ट करणे हाच हयग्रीवासुराचा मुख्य धंदा होता.

प्रलयकालात समुद्रांत पृथ्वी बुडली. समोर दृष्टी ठेवून जात असलेल्या सत्यव्रताला अंधःकारात दूर लहानशा नक्षत्रासारखी दिसून मोठी होत गेलेली व जवळ येत असलेली एक ज्योती दिसली. तीच सप्तर्षींच्या कांतीने लकाकत दिसणारी नाव होती. अनेक औषधी वनस्पती, नाना प्रकारची बियाणी त्या नावेत घालून सत्यव्रत नारायणाचे स्तोत्रगान करीत त्या नावेत बसला व पुढे जाऊ लागला. मत्स्यावताराच्या नाकावर एक उभे शिंग होते. नक्षत्रासारखे ते शिंग चमकत होते. त्या शिंगाच्या टोकाला गुंडाळी करून धरून एक मोठा नाग एकाद्या दोरखंडासारखा बांधलेला होता व नावेला धरून आपली फडा पसरुन, प्रलय काळातील तुफानाला फाडून टाकीत, जणूं कांही दिशेला गिळीत होता. मत्स्यावतार आपल्या कल्ल्यांनी समुद्राला कापीत ती नाव सुरक्षितपणे घेऊन चालला होता. ध्रुवनक्षत्राला गंतव्यस्थान मानून नाव एखाद्या फुलासारखी तरंगत पुढे जात होती.

समुद्राच्या तळाला लपवून ठेवलेल्या वेदांवर पाहारा ठेवीत सोमकासुर समुद्रातच घिरट्या घालीत होता. चारही वेद लहान बालकरूप धारण करून लहान अर्भकासारखे मोठ्याने रडत होते. मत्स्यावतार धारण केलेला विष्णु वेदांचा शोध काढीत हिंडत होता.

एका विशाल माशाला पाहून सोमकासुर घाबरला होता. तरी बळेच धैर्य दाखवून आपली



काटेरी दगडी गदा घेऊन त्या माशाला तोंड द्यायला आला.

तेव्हां विष्णू कंबरेपर्यंत माशाच्या रूपांतच राहून वरील भाग चतुर्भुज रूपे प्रगट झाला. त्या मत्स्य मूर्तीचे व सोमकासुराचे घनघोर युद्ध झाले.

सोमकासुराने समुद्राच्या तळाला पळ काढण्याच्या विचार केला. विष्णुने आपले सुदर्शन चक्र टाकून सोमकासुराचा वध केला. त्याचे सर्वांग तुकडे तुकडे होऊन पडले. विष्णूने लहान शिशुरूपात असलेले वेद उचलून घेतले व दोघांदोघांना दोन्ही खांद्यावर उचलून घेतले व तो पाण्याबाहेर आला. ती मुलें विष्णूच्या छातीवरचे श्रीवत्स चिह्न, व गळ्यांतील हारातला कौस्तुभमणी, आपल्या चिमुकल्या हातांनी धरून खेळूं लागली व मोठमोठ्याने ओरडून बालक्रीडा करूं लागली. ती चारही मुले अनुक्रमें पांढरी शुभ्र, लाल, पीत व नील कांतीची होती. विष्णूच्या उरलेल्या दोन्ही हातांत शंख, चक्र, शोभायमान होती. विष्णूला मत्स्यावतार रूपांत पाहून ऋषी व सत्यव्रत आनंदातिरेकाने देहभान विसरून दोन्ही हात जोडून स्तोत्रपाठ करू लागले. प्रलय काळातला समुद्र शांत झाला. नौका आपल्या गम्यस्थानी येऊन पोंचली.

ब्रह्मदेवाची रात्र संपत आली व दिवस उजाडूं लागला. त्याची झोपेची वेळ संपत आली. प्रकाश स्रोत विस्तीर्ण आकाशांत पसरूं लागले. नवीन कल्पारंभाची चिन्हें दिसूं लागली. सरस्वती प्रथम जागी झाली. तिने वीणेच्या तारा जुळविल्या व भूपाली रागिणीचे स्वर ती छेडूं लागली. ब्रह्मदेव जागा झाला व त्याला चारही डोक्यांत कांही तरी



गडबड, कसली तरी उणीव असल्याचा भास झाला. त्याने जास्त खोल विचार करून पाहिला तर त्याला त्यांत वेद नसल्याचे आढळले. वेद नाहीसे झालेले कळल्याबरोबर ब्रह्मदेव सर्वस्व घालवून बसल्यासारखा चिंतामग्न झाला. तेव्हां विष्णूने मत्स्यावतारात प्रगट होऊन त्याला चारही वेद आणून दिले.

विष्णूला मत्स्यरूपांत पाहून ब्रम्हदेव डोळ्यांचे पारणे फिटल्यासारखा आनंदित झाला व हात जोडून विष्णूची स्तुती करू लागला. तो म्हणाला, - "हे नारायणा! तुझ्या या मत्स्यावताराचे कोणी ध्यान केल्यास त्याला कल्पांतातून सुटका मिळाल्यासारखा ब्रह्मानंद होईल व त्यांचा अज्ञानांधकार दूर होईल."

ज्यासाठी विष्णूने मत्स्यावतार धारण केला होता ते कार्य पूर्ण झाले. विष्णू अंतर्धान पावला आणि वैकुंठलोकास निघाला.



ब्रह्मदेवाने वेद ग्रहण केले आणि सृष्टी सुरु केली. नवीन कल्पांत वैवस्वत नामें जन्मलेला सूर्यपुत्र सत्यव्रत, याने नवीन मनू प्रारंभ केला व तो वैवस्वत मनू या नांवाने तो प्रसिद्ध झाला.

सप्तर्षी आकाशांत स्वस्थानी पोचले आणि उत्तर ध्रुवाला सृष्टीक्रमाप्रमाणे प्रदक्षिणा घालू लागले.

असे सूत महर्षींनी सांगितले तेव्हां मुनी म्हणाले - "सूत मुनिवर्मा! आम्हांला ध्रुव चरित्र ऐकण्याची इच्छा आहे!"

सूत महर्षी ध्रुवाची कथा सांगू लागले: "या विश्वांत सर्वोच्च स्थान कोणते असेल तर ते ध्रुवमंडल होय. तेच स्थान विश्वस्वरूप जो विष्णू त्याचे शीर्ष स्थान.

ते अति उन्नत असे पद ध्रुवाने प्राप्त केले होते. ध्रुव हा उत्तानपाद राजाचा मुलगा होता. ध्रुवाच्या आईचे नाव सुनीती होते. ती उत्तानपाद राजाची थोरली राणी. राजाच्या दुसऱ्या राणीचे नाव सुरुची होते. सुरुची ही राजाची लाडकी राणी होती.

एकदां उत्तानपाद राजा सुरुचीसह बोलत बसला असतां सुरुचीचा मुलगा उत्तम राजाच्या मांडीवर बसला होता. राजा त्याच्याशी लाडिकपणें बोलत होता. त्याच वेळी ध्रुव तेथे आला व तोही राजाच्या मांडीवर बसण्याच्या हेतूने जवळ येऊन राजाकडे पाहू लागला. सुरुची तेथेच होती. राजा तिच्याकडे पाहून थोडासा भ्याला व ध्रुवाला न पाहिल्याचे सोंग करून गप्प राहिला.

धाकट्या भावाला बापाने मांडीवर घेतले, तसे तो आपल्यालाही घेईल अशी आशा धरून बसलेल्या ध्रुवाच्या डोळ्यांत निराश झाल्यामुळे पाणी आले. त्याच्या गालावर अश्रुबिंदू मोत्यांसारखे झळकू लागले. ते पाहून सुरुची खदखदां हसली व म्हणाली - "त्या अभागिनीच्या पोटी जन्मलास ना रे! तू किती तपश्चर्या केलीस तरी तुला माझ्या मुलाच्या बरोबरीने बापाच्या मांडीवर बसायला मिळायचे नाही! माझ्या पोटी जन्माला यायला हवे, समजले? तू नारायणाचा स्तोत्रपाठ करतोस ना! तू तपश्चर्या करून नारायण तुला ते भाग्य देतो कां, ते विचारून पहा!" या शब्दांत तिने ध्रुवाची हेटाळणी केली.

त्याला फार दुःख झाले व भयंकर रागही आला. कोरड्याने सावत्र आईला बडवून काढावे असे त्याला वाटले. तलवार घेऊन उभी चिरून काढायचा विचार त्याच्या मनांत आला. तेवढ्यांत सुरुची म्हणाली - "बाळा, तू



नारायणावर विश्वास ठेव आणि तपश्चर्या कर, जा!" तो सुरुचीचा उपदेश आहे असे ध्रुवाला वाटले. इतका थोर उपदेश ऐकून देखील न समजणारा उत्तम, दुर्दैवी, भोळाच असला पाहिजे, असेही ध्रुवाला वाटले. उत्तानपाद राजा किं-कर्तव्यमूढ होऊन आकाशाकडे पाहू लागला.

सुरुचीच्या तोंडी तो गुरुपदेश मिळाला असे समजून ध्रुवाने सुरुचीला गुरूभक्तीने नमस्कार केला व तो तेथून निघून गेला. ध्रुवाने काय केले त्याचा सुरुचीला कांहीच बोध झाला नाही. ती थक्क होऊन म्हणाली - "मुलगा शहाणा दिसतो, चार शिव्या दिल्या तरी नमस्कार करून गेला. नमस्कार करणार नाही तर काय करणार? माझ्या समोर उलट बोलण्याची त्याची किंवा त्याच्या आईची तरी छाती होईल का?" असा विचार करून मनांतल्या मनांत ती खूष झाली. मुलाच्या डोळ्यांना पाणी आलेले पाहून, व दासीच्या तोंडी घडलेले वृत्त ऐकून, सुनीतीला अपार दुःख झाले. तरी स्वतःला सावरुन ती म्हणाली - "होयरे, बाळा! दासीहून क्षुद्र असलेल्या माझ्या पोटी तू कशाला रे जन्मलास? तुझ्या सावत्र आईने सांगितले ते खरे आहे; तुला त्या नारायणाशिवाय दुसरा आधार नाही."

ते ऐकून ध्रुव धैर्याने उठला व म्हणाला - "आई, मी तपश्चर्या करायला जातो."

"काय, तू तपश्चर्या करणार? सुरुचीच्या पोटी जन्म मिळावा म्हणून तपश्चर्या कर!" म्हणाली.

"आई, थांब, पुन्हां ते शब्द उच्चारूं नकोस! मी तुझा मुलगा आहे. आणखी कोणाच्या पोटी जन्माला येण्याची मला गरजच नाही. तसा विचार



करणे म्हणजे आत्महत्येसारखे पापकर्म होय. जगाच्या तोंडून ध्रुवाची आई किती भाग्यशालिनी होती असे युगानुयुगे म्हणविण्यालायक मी नारायणाचे स्मरण करून तपश्चर्या करतो!" असे सांगून ध्रुव आईचा निरोप घेऊन तेथून निघाला. त्याला वाटेत नारद महर्षी भेटले. म्हणाले - "अरे ध्रुवकुमार कां? खेळायला निघालास वाटतं?"

"मुनीवर्य, मी तपश्चर्या करायला जातो आहे." ध्रुव उत्तरला.

"तपश्चर्या म्हणजे एक खेळच आहे, म्हणावयाचे! घरी जाऊन चांगला खेळ!" नारदमुनी म्हणाले.

"खेळ नव्हे, खरोखरच तपश्चर्या करायला निघालो आहे, मुनिवर्य!" ध्रुव म्हणाला.

"अस्सं! तर मग कळलं! परंतु तपश्चर्या कशासाठी रे ध्रुवा? माझ्या बरोबर चल. तुझा बाप तुला मांडीवर कां घेत नाही, मी पाहतो!" नारद म्हणाला.

"मला कोणाच्या कृपेची गरज नाही, स्वामी! सर्वात थोर असतो नारायण, त्याचा अनुग्रह मला हवा आहे! म्हणून तपश्चर्या करण्यासाठी जंगलात जात आहे!" ध्रुव म्हणाला.

"तपश्चर्या म्हणजे गप्पा नव्हेत बाळा! जंगलांत वाघसिंह वगैरे क्रूर हिंस्र पशू असतात. ऊन, पाऊस व वारा, सर्व सहन करावे लागतात. तू माझे ऐक व घरीं परत चल!" नारदाने अनेक प्रकारे ध्रुवाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. नारद म्हणाला ते ऐकून ध्रुव म्हणाला - "मी क्षत्रिय आहे! पराभव मला कधी सहन होणार नाही. त्यापेक्षां मरण पत्करले. मला भित्रीभागूबाई करण्यासाठी आलात का मुनींद्रा?"

"बाबा ध्रुवा! तुझ्या मनाची किती तयारी आहे, हे पाहण्यासाठी सर्व म्हटले. माझीसुद्धां एकेकाळी एखाद्या अनाथ असहाय्य मुलासारखी स्थिती झाली होती. मला अनेक प्रकारे अपमान सहन करावा लागला होता. मला कित्येक संकटांना तोंड द्यावे लागले होते. तरी जंगलात जाऊन मी तपश्चर्या केली होती! तू मधुवनात जा व तेथे "ओम् नमो नारायण" असा जप करीत, तपश्चर्या कर. मी तुला आशीर्वाद देतो. तुझा निश्चय कृतार्थ होवो!" असे नारद म्हणाला." अशा तऱ्हेने सूत महर्षींनी कथा सांगितल्यावर सर्व मुनी म्हणाले - "मुनिवर्य! नारदाला संकटांना कां तोंड द्यावे लागले? नारदाचा वृत्तांत ऐकण्याची फार इच्छा आहे!"







विविध संस्कृतींमधल्या गोष्टी

# हिंवाळ्यांतल्या एका रात्रीचा हल्ला

**चिनी लोकांनी नवे वर्ष साजरे करायला कशी सुरवात केली ते तुम्हाला माहीत आहे कां? पुढील गोष्ट वाचा म्हणजे तुम्हाला त्याची माहिती कळेल.**

हजारों वर्षांपूर्वी चीनमधें एक सुंदर आणि शांत नगर होते. तिथले नागरिक कष्टाळू होते. रोजचे काम संपले कीं ते संध्याकाळीं एकत्र जमत आणि गप्पागोष्टी करीत असत.

उन्हाळ्याच्या दिवसांत लहान, मोठे, तरुण, म्हातारे, सारेजण सूर्यास्त होईपर्यंत घराबाहेरच राहात होते. खेळण्या-बागडण्याची व सुखसंवादाची ही रोजचीच वेळ होती. लहान मुलें शेतांत, मैदानावर धावत, पळत, उड्या मारीत, गंमत करीत. अगदी लहान मुलें आजोबांच्या मांडीवर बसून बालगीते म्हणत असत.

हिंवाळ्यांत मात्र कडाक्याची थंडी पडत असे. बहुतेक सर्वजण घरांत शेगडीजवळ बसून राहात. थंडी सहन करता यावी म्हणून लोक कडकडीत चहा किंवा कडक मद्य घेत असत.

एके दिवशी फारच तीव्र थंडी पडली होती आणि एक भयानक घटना घडली. त्या नगरांतल्या एकमेव धर्मशाळेंत दिवसभर गर्दी होती, तिथें हा प्रसंग घडला.

"वा, वा! असा गरमागरम चहा पीत बसलं कीं या कडाक्याच्या थंडीतदेखील किती छान वाटतं, नाही? नाहीतर मला पुढें प्रवास करणंदेखील सोसलं नसतं." एक व्यापारी म्हणाला.

"हो तर, खरंच आहे. बाहेर बर्फ पडत होता. मी मोठ्या मुश्किलीने या धर्मशाळेपर्यंत कसाबसा पोंचलो." दुसऱ्याने आपला अनुभव सांगितला.

एका शिक्षकाने मधेंच तोंड उघडले, "शाळेतून मी परत येत होतो, तेव्हां माझा पाय बर्फांत अडकला. बाहेर काढायचा प्रयत्न केला तर मी आणखीनच आंत घसरायला लागलो. जवळच एक ओंडका पडलेला दिसला. त्याच्या आधाराने मी वांचलो नि बाहेर येऊं शकलो."

अशा प्रकारे तिथल्या उबदार वातावरणांत प्रत्येकजण आपापले अनुभव इतरांना सांगत होता. अचानक एक मोठा आवाज आला. कसला आवाज आहे हे कळण्यापूर्वीच एक विशाल राक्षसी जनावर आंत घुसले आणि लोकांनी त्याला नीट बघण्यापूर्वीच त्याने सर्वांचा



चेंदामेंदा केला व त्यांना मारुन टाकले.

तिथें फक्त एक लहान मुलगा त्या राक्षसाला बघून बेशुद्ध झाला, आणि खुर्चीवरुन खाली पडला, व मेजाखाली अडकला. तिथें त्या राक्षसाची नजर गेली नाही म्हणून तो वांचला.

या घटनेमुळे साऱ्या नगरांत एकच खळबळ माजली. आपापल्या कुटुंबियांचे प्राण त्या राक्षसाने घेतले म्हणून लोक संतापून गेले. या राक्षसी जनावराचे नांव त्यांनी 'नियन' असे ठेवले. त्याला पकडण्यासाठीं त्यांनी एक शोधपथक बनवले. त्यांनी त्या राक्षसाचा सगळीकडे शोध घेतला, पण तो कुठेच दिसला नाही. संबंध हिंवाळ्यांत लोक घरांतच लपून बसले होते. संध्याकाळीं रस्ते निर्मनुष्य होत असत. प्रत्येक घराची दारे खिडक्या अगदी भक्कमपणें बंद केली जात होती. वसंत ऋतू आला नि त्या नगरांत जरा चैतन्य आले.

शेतांत हिरवाई दिसायला लागली. वसंताच्या शीतल वाऱ्याबरोबर झाडांच्यावर लहान रंगीत पुष्पकळ्या डोलायला लागल्या. पशुपक्षी, फुलपांखरे, हळूंहळूं सगळीकडे दिसायला लागली.

लोक आता घराबाहेर पडायला लागले. शेतांत आता बियाणें पेरण्याचा काळ होता. त्या कामाच्या नादांत लोक राक्षसाची गोष्ट विसरले, आणि रोजच्या दिनचर्येंत गुंतले.

जेव्हां पुढला हिंवाळा आला आणि हिमपात आणि झोंबणारे बर्फगार वारे सुरुं झाले, तेव्हां लोक पुन्हां त्या धर्मशाळेंत गप्पागोष्टींसाठी एकत्र जमले. परंतु काय दुर्दैव! ते संकट पुन्हां त्या नगरावर आलं. राक्षसाने गेल्या वर्षाप्रमाणे यावर्षीही त्या धर्मशाळेंतल्या सगळ्या लोकांना मारुन टाकले. यंदाही एक माणूस त्यांतून वांचला. त्यानेही त्या मुलासारखेच राक्षसाबद्दल सांगितले.

आता मात्र सारे नगर संतापाने पेटून उठले. ''आपण कांहीतरी केले पाहिजे. आपण दरवर्षी राक्षसाला आपली माणसें मारुं देणार आहोत कां?'' नगराच्या प्रधानाने म्हटलं. त्याविषयी सल्ला मागावा म्हणून ते जादुगाराकडे गेले. जादुगाराने म्हटलं, ''दोन्ही वर्षे हिंवाळा संपत आला तेव्हांच त्या 'नियन' ने हल्ला केला. पुढल्या वर्षी त्याच्याशी सामना देण्यास तयार राहा.''

''त्याच्याशी सामना कसा द्यायचा?'' एका तरुणाने विचारलं. ''लाल रंगापासून दुष्ट शक्ती दूर पळतात. लाल झेंडा पाहिला कीं सगळे प्राणीही



चेकाळतात. खूप मोठा आवाज झाला कीं आपला विश्वास उडतो. फटाक्यांना तर सगळेजण घाबरतात. तेव्हां काय काय तयारी करायला हवी ते तुम्हाला आता समजलं आहेच.'' त्या वृद्ध जादुगाराने म्हटलं.

जेव्हां पुढल्या वर्षी थंडी सुरुं झाली, तेव्हां नगरवासी 'नियन'शी सामना करायला सज्ज झाले होते.

लौकरच तो दिवस उजाडला. गेली दोन वर्षे त्याच दिवशी राक्षस त्यानगरींत आला होता. स्त्रिया व मुलेंबाळें घरांत होती. पुरुषमंडळी घराबाहेर होती. कांहीजणांच्या हातांत तलवारी, फटाके व मशाली देखील होत्या. कांही लोकांच्या हातांत मोठे मोठे ढोल व काठ्या होत्या कांही-जणांनी लाल झेंडे आणि घंटा घेतल्या होत्या.

अचानक डोळे दिपवणारा उजेड दिसला. त्याच्यापाठोपाठ अंगावर कांटा आणणारी भयानक गर्जना ऐकूं आली. नियन येऊन पोंचला होता. डोळ्यांतून आगीचे लोळ बाहेर पडत आहेत, जबड्यांतून रक्त ओघळते आहे अशा भयानक स्वरुपाचा राक्षस जणूं आकाशांतून खाली टपकला! त्याची हाताचे पंजे मोठे होते आणि वेडीवांकडी नखें होती. त्याच्या पाठीवर दोन भलेमोठे पंख होते. तलवारी घेतलेल्या कांही लोकांच्या दिशेने तो झेपावला.

परंतु त्याने कांही करण्यापूर्वीच शेंकडो लोकांनी त्याला चारी बाजूंनी घेरले. ते ढोल बडवूं लागले व जोरजोराने घंटानाद करुं लागले. मोठ्या मोठ्या लाल झेंड्याची निशाणें हवेंत फडकायला लागली. लोकांनी फटाके पेटवले आणि नियनकडे फेंकले. आता मात्र नियन घाबरला.

तो भिऊन ओरडायला लागला त्या मोठ्या लाल निशाणांनी त्याला दिसेनासे झाले. ढोल, घंटा, फटाके यांच्या आवाजाने त्याचे शरीर तुळे पडायला लागले. तो पळून गेला.

लोकांच्यात आनंदाची लाट पसरली. ''नियन पळून गेला. आता इथें पुन्हां येण्याचं धाडस तो करणार नाही. ही एका नव्या युगाची सुरवात आहे. म्हणून आपण आज उत्सव साजरा करुं या.'' प्रधानाने घोषणा केली.

ते चिनी लोकांचं पहिलं वर्ष होतं. भीतीपासून मुक्ती मिळवणारा हा दिवस त्यांनी मोठ्या उत्साहाने साजरा केला. एकमेकांच्या घरीं जाऊन त्यांनी आनंद व्यक्त केला, भेटवस्तू दिल्या, करमणुकीसाठी नाटकें केली, आणि स्वादिष्ट भोजन करुन हा दिवस मजेंत घालवला.





# बिनव्याजी कर्ज

**लक्ष्मी**शिवरामपुर हे एक छोटेंसे गांव आहे, पण एक प्रसिद्ध पुण्यक्षेत्र आहे. गांवाच्या सुरवातीला लक्ष्मीदेवीचे मंदिर आहे. गांवाच्या मध्यभागी शिवाचे मंदिर आहे आणि गांवाच्या वेशीवर रामाचे मंदिर आहे. म्हणून तिथें वर्षभर जत्रा भरत, उत्सव सुरुं असत.

गांवाच्या चारी बाजूला सुंदर डोंगर, धबधबे, वनराई होती. त्यामुळें या ठिकाणीं अनेक प्रवासीदेखील येत असत.

त्या गांवात शरद राहात होता. त्याचे कापडाचे दुकान होते. पण त्याचे स्वतःच्या मालकीचे घर अद्याप नव्हते. त्याची त्याला नेहमी चिंता असे. इतर अनेक छोट्या व्यापाऱ्यांची मोठीमोठी घरें होती. पण शरदला मात्र साधे कौलारु घर बांधता आले नव्हते.

एक दिवस शरदची पत्नी पार्वती त्याला म्हणाली, "शंकराच्या मंदिरातल्या पुजाऱ्याच्या बायकोने मला दोनतीन वेळा सांगितलंय कीं गांवाबाहेर घरांसाठी जमिनीचे तुकडे विकायला आहेत. आपणही एक लहानशी जागा घेतली तर बरे होईल कीं!"

आपल्या मनांतलीच इच्छा पत्नीच्या मुखांतून बाहेर पडलेली पाहून शरद बेहद्द खूष झाला. आजपर्यंत त्याने जे पैसे बांचवले होते, आणि सासरहून लग्नांत त्याला एक किंमती आंगठी मिळाली होती, ती विकून त्याने पैसे जमा केले आणि जमिनीचा एक छोटा तुकडा त्याने खरेदी केला.

"आता जागा तर घेतलीच आहे आपण, तर मग भाड्याच्या घरांत कशाला राहायचं? लहानसं घरकुल जर बांधायला घेतलं नाही, तर आपलंच नुकसान होईल कीं!" पार्वती रोज कांहीतरी विषय काढून घर बांधण्याचा तगादा त्याच्या पाठीमागे लावीत होती.

शरदलाही तिचे म्हणणें पटले. त्याने तिचे दागिने विकले, मित्रांकडून कर्ज काढले आणि घराचे बांधकाम सुरुं केले. सुरवातीला तिने विचार केला होता कीं एक पडवी आणि दोनतीन खोल्या बांधल्या कीं पुरेसें होईल. शरदला तिची ही कल्पनादेखील पसंत पडली.

चमन शाह

बांधकाम पूर्ण व्हायची वेळ आणि तेव्हां पैशाची चणचण जाणवायला लागली. त्याला दहा हजार रुपयांची निकड भासली. कुठून नि कसे पैसे आणता येतील या विचारांत तो गुंगला होता, तेव्हां पार्वतीने सल्ला दिला, "हे पाहा, हरीकृष्णपुरांत माझे नातेवाईक दशरथ राहातात. ते माझे दूरचे भाऊ लागतात. त्यांनी जमीनदाराच्या कचेरींत चांगली नोकरी केली, भरपूर पैसे सांठवले आणि सावकारी धंदा वाढवला. मी स्वतःच त्यांच्याकडे जाईन आणि कर्ज मागीन. मला ते 'नाही' म्हणणार नाहीत. हळूंहळूं त्यांचं कर्ज आपण फेडूं. उद्यां सकाळींच आपण दोघेजण त्यांना भेटायला जाऊं या."

सकाळीं उठून पतीपत्नी निघाले आणि दुपार होईपर्यंत दशरथच्या घरीं पोंचले. आगतस्वागताच्या गप्पा झाल्यानंतर दशरथने पार्वतीला विचारले, "काय ग पार्वती? तू घर बांधायला काढलं होतंस ना? ते काम पुरं झालं की नाही? त्याबाबतीत तूच मला सांगितलं असतंस तर मला फार आनंद वाटला असता!"

"दादा, रागावूं नका असे! सर्वांना सांगून बोलवावं अशी फार इच्छा आहे खरी, पण तो आनंद आमच्या नशिबांत दिसत नाही." पार्वती कानकोंडी होऊन म्हणाली.

"काय झालं? असं कां ग बाई म्हणतेस?" दशरथने अधीरपणे विचारलं.

"घराचं काम पूर्ण व्हायला अजून निदान दहा हजार रुपयांची जरुरी आहे. त्याच्याबद्दल बोलायलाच आम्ही इथें आलो आहोत. तुम्ही जर दहा हजार रुपये कर्जाऊ दिलेत तर आम्ही शक्य तितक्या लवकर फेडून टाकू. एवढी मदत करणें फक्त तुम्हालाच शक्य आहे." पार्वती म्हणाली.



"अग, मी तुझा मोठा भाऊ ना? मला एवढी मदतसुद्धां करता येणार नाही कां? चल, अगोदर जेवून घेऊं या." दशरथने त्यांना दिलासा देत म्हटले.

जेवण झाल्यानंतर दशरथने दहा हजार रुपयांची रक्कम शरदच्या हातांत दिली व म्हटले, "तुम्हाला जशी सवड होईल तेव्हां हे पैसे परत करा बरं! मला त्याची मुळीच घाई नाही."

शरदने पैसे पिशवींत नीट ठेवत म्हटले, "त्याच्या व्याजाबद्दल सांगितलंत तर..." पण त्याचे शब्द पूर्ण होण्यापूर्वीच दशरथ उद्गारला, "हे काय बोलता आहात तुम्ही? तुमच्याकडून मी थोडंच व्याज घेणार आहे? पार्वती माझी बहीण आहे - दूरची असली तरी! ही रक्कम केवळ हातउसनी आहे हो!"

"तुमचे फार उपकार आहेत आमच्यावर" असं



म्हणून दोघे नवराबायको तिथून आनंदाने परत घरी गेले. ती दोघे गेल्यानंतर दशरथची पत्नी त्याला टोमणा मारीत म्हणाली, ''मला मान्य आहे कीं ते तुमचे नातेवाईक आहेत; पण म्हणून तुम्ही त्यांना बिनव्याजी कर्ज द्यायला हवं असं नव्हे! आपल्यालाही मुलेंबाळें आहेत. त्यांच्या पालनपोषणाची जबाबदारी आपल्यावर आहे. तुमची ही जबाबदारी तुम्हाला कळत नाही कां?''

त्यावर दशरथने कांहीच उत्तर दिले नाही. तो अगदी गप्प बसला. दोन महिन्यांत शरदचे घर पुरे झाले. गृहप्रवेशाच्या वेळीं दशरथ, पत्नी व मुलांना घेऊन आला. शरद व पार्वतीने मोठ्या प्रेमाने त्यांचे स्वागत केले. तिथें ते दोन दिवस आनंदात राहिले.

तिसऱ्या दिवशी संध्याकाळच्या सुमाराला दशरथ घराबाहेर बाजेवर बसला होता, ''आपण घर सोडल्याला तीन दिवस होऊन गेले; उद्यां आपण निघूं या!''

''पुढच्या आठवड्यांत इथें शिवरात्रीचा उत्सव आहे. मोठ्या थाटांत साजरा करतात म्हणे! आपण इथें आणखी एक आठवडा राहूं या. तो उत्सव बघून जाऊं.'' पत्नीने सुचवलं ''आणखी आठ दिवस इथें राहायचं? आपल्यामुळें त्यांना तितके दिवस त्रास होणार नाही कां?'' दशरथने विचारलं.

''त्यांत कसला आला आहे त्रास? तुम्ही हात उसने म्हणून दहा हजार रुपये दिलेच होतेत कीं! त्याचं व्याज किती झालं असतं, त्याचा कधी हिशेब केलात कां? ती रक्कम पाहिली तर त्यामानाने आपल्यासाठी जो खर्च होईल तो कांही फारसा जास्त असणार नाही.'' दशरथची पत्नी कुत्सितपणें म्हणाली.

''मोठ्याने बोलूं नकोस. कुणीतरी ऐकलं तर? शरद मेहनती आहेत, प्रामाणिक आहेत. आपली रक्कम ते नक्कीच परत करतील.'' दशरथने खालच्या स्वरांत म्हटलं.

''आजच्या काळांत व्याजाशिवाय कर्ज कुणीतरी देतं कां? एकही पैसा व्याजापोटी न घेता तुम्ही दहा हजार रुपये सरळ देऊन टाकलेत. मला तर सारखी काळजी वाटते कीं ते पैसे केव्हां परत येतील म्हणून! नाहीतर तुम्ही, त्याबद्दल विचारदेखील करीत नाही!'' पत्नीने शुष्क स्वरांत म्हटले.

त्याच वेळी पार्वती नेमकी पडवींत येत होती. तिने हें संभाषण स्पष्ट ऐकले. पण त्यांना दिसणार नाही अशा बेताने ती मुकाट्याने घरांत परत गेली.

त्या रात्रीं जेवण झाल्यानंतर हात धुताधुता दशरथने पार्वतीला सांगितलं, ''उद्यां आम्ही जायला निघूं.''



''अहो, आठवडाभरांतच इथे शिवरात्रीचा उत्सव साजरा होणार आहे. तेव्हां तुम्ही सगळेजण इथेंच राहा आणि उत्सव पाहून नंतर सावकाश जा कीं!'' पार्वतीने म्हटलं.

''नाही ग बाई, फार काम पडलंय तिकडे! आम्हाला गेलं पाहिजे.'' दशरथ म्हणाला. ''अहो, इतकं तुम्हाला काम असेल तर तुम्ही पुढें जा, दादा! वहिनी आणि मुलें इथें राहूं देत. उत्सव संपल्यानंतर ती येतील.'' पार्वती म्हणाली.

''नको, नको, तुम्हाला त्यांचा त्रास होईल.'' दशरथने समर्थन केले.

''छे, छे, त्यांत कसला आलाय त्रास दादा? हे घर आम्हाला पुरं बांधता आलं, ते केवळ तुमच्या मदतीमुळें. हल्लींच्या काळांत व्याज न घेता कर्ज कुणीतरी देईल कां? तुम्ही व्याजाचा एक पैसादेखील घेतला नाहीत आणि एवढी मोठी रक्कम आम्हाला उसनी दिलीत. त्याच्या व्याजाचा जर हिशेब केला तर किती वर होईल. ती रक्कम तुम्हाला किरकोळ वाटते हे मला माहीत आहे. तुमच्या खर्चाच्या मानाने ती रक्कम अगदीच नगण्य आहे, तेव्हां तुम्हाला त्याचं विशेष कांही वाटत नाही.'' पार्वती म्हणाली.

दशरथ व त्याच्या पत्नीने चमकून एकमेकांकडे बघितले. दशरथचा चेहरा पडला होता ते तिला पाहवेना. त्याच्या पत्नीने तोंड फिरवले.

''दादा, आमच्या अडचणीच्या काळांत तुमची मदत नसती तर हे घर आम्हाला बांधता आले नसते. आज तुम्ही व्याज घ्यायला नाही म्हणता आहात, आणि आम्हीही त्याचा आग्रह धरूं शकत नाही. म्हणून आम्ही गप्प बसलो आहोत. पण माझ्यावर विश्वास ठेवा; सहा महिन्यांच्या आंत व्याजासकट मुद्दलाची रक्कम आम्ही देऊन टाकूं. तोपर्यंत मात्र जरा वाट बघायला हवी.'' पार्वतीने म्हटलं.

''ठीक आहे, तुम्हाला द्यायचे असतील तेव्हां परत द्या. इथें कुणाला घाई आहे?'' असं म्हणत दशरथने पुन्हां आपल्या पत्नीकडे रोखून बघितले. शरमून जाऊन तिने मान खाली घातली होती.

वातावरण एकदम गंभीर वाटायला लागलेले पार्वतीच्या लक्षांत आले. तिने अगदी प्रेमळ स्वरांत म्हटले, ''दादा, मुलें नि वहिनी उत्सव संपेपर्यंत इथेंच राहातील हं. तुम्हीही उत्सवाच्या दिवशी इथें या, आणि दुसऱ्या दिवशी सर्वांना घेऊन परत जा.''





# पाण्याचा प्रभाव

एका गांवात मंगल नांवाचा एक पट्टीचा पोहणारा होता. त्याची पोहण्याची कला बघून त्या गांवच्या जमीनदाराने खूष होऊन त्याला एका कांशाची सुरेख मूर्ती बक्षीस दिली. ती मूर्ती बिलायतेहून आणलेली होती आणि खूपच किंमती होती.

एकदा राजधानींत होणारा वसंतोत्सव पाहायला मंगलने जायचं ठरवलं. पण इतकी महाग मूर्ती घरांत ठेवून जाणे ठीक नाही-असे त्याला वाटले. म्हणून त्याने आपण परत येईपर्यंत शेठ मूळचंद यांच्याजवळ ती मूर्ती ठेवावी असे ठरवले. ती मूर्ती सुरक्षितपणे ठेवण्यास त्याने शेठजींना विनंती केली.

इतकी सुंदर मूर्ती गरीबाच्या घरापेक्षां आपल्या घरांत जास्त शोभून दिसेल असे शेटजींना वाटले. ते म्हणाले, "अरे मंगल, ही मूर्ती मला विकत देतोस कां?"

"शेठजी! ही मी विकणार नाही कारण ही माझ्या कलेला मिळालेली शाबासकी आहे." मंगलने उत्तर दिले.

मूळचंदांच्या मनांत आले, "अरे वा! ह्याची एवढी मिजास?" आणि त्यांनी ही मूर्ती मंगलला परत द्यायची नाही असे ठरवले. त्यांनी तसलीच हुबेहूब दिसणारी एक मातीची मूर्ती बनवून घेतली. आणि तिच्यावर पितळेचा मुलामा दिला. मंगल परत आल्यानंतर ती मातीची मूर्ती त्यांनी त्याला दिली.

मूर्ती ठेवताना कांशाचा आवाज नेहमीसारखा आला नाही, तेव्हां शेटजींनी आपल्याला फसवलंय हे मंगलच्या लक्षांत आलं. त्याने मूर्ती घांसून पाहिली तेव्हां मातीचे कण दिसले.

तो तडक मूळचंदाच्या घरी जाऊन त्यांना म्हणाला, "शेठजी! तुम्ही माझी खरी कांशाची मूर्ती लपवली आहेत आणि मला ही मातीची मूर्ती दिलीत. कृपा करुन माझी मूर्ती परत द्या."

"मंगल! तू जी मूर्ती मला दिलीस तीच मी तुला परत दिली आहे. बहुधा माझ्या विहिरीच्या पाण्याने ती धुतली म्हणून त्या कांशाची माती झाली असावी. हा तर पाण्याचा प्रभाव आहे. त्याला आपण काय करणार?" मूळचंदाने समर्थन केले.

बिचारा मंगल निराश होऊन घरी परत गेला. पण या शेटजीला आपण धडा शिकवायचाच असा त्याने निश्चय केला.

एक दिवस मूळचंदाच्या बायकोच्या हातून दोर तुटला आणि पितळेची कळशी विहिरीत पडली. साऱ्या गांवात पिण्याच्या पाण्यासाठी ती एकच विहीर होती.

विहीर खूपच खोल होती. त्यांत उतरुन ती कळशी बाहेर काढणें हे फक्त मंगलच करुं शकला असता. शेटजींनी मंगलला विहिरींतून कळशी काढण्यासाठी विचारले.

"शेठजी! त्यांत काय मोठंसं? उद्यां सकाळपर्यंत तुमची कळशी विहिरीतून काढून मी देईन." मंगल म्हणाला.

त्या रात्रीं निजानीज झाल्यानंतर मंगल एक मातीचा घडा घेऊन विहिरीवर गेला. मध्यरात्री तो विहीरीत उतरला, त्याने पितळेची कळशी काढली, त्याची दोरी सोडून मातीच्या घड्याला बांधली आणि विहीरींत सोडली. पितळेची कळशी त्याने एका गुप्त जागी लपवली. नंतर तो घरी जाऊन झोपला.

दुसऱ्या दिवशी शेठजींच्याबरोबर मंगल विहीरीवर गेला. त्याने विहीरींत बुडी मारली आणि हातांत एक मातीचा घडा घेऊन तो वर आला. तो घडा बघून शेठजींचे तोंड उतरले, घाबरलेल्या आवाजांत त्यांनी म्हटलं, "अरे मंगल, हा घडा आमचा नाही, दुसऱ्या कुणाचातरी असेल. तू पुन्हां एकदा बुडी मारुन जरा बघ बरं!"

मंगलने पुन्हां बुडी मारली. थोडा वेळ पाण्यांत तो राहिला, आणि नंतर वर येऊन म्हणाला, "शेठजी! हा घडा सोडून इतर कांहीही तळाला सांपडलं नाही. बहुतेक हा पाण्याचा प्रभाव असावा. त्यामुळें तुमची पितळी कळशी होती तिचा मातीचा घडा झाला असेल." एवढं बोलून मंगल आपल्या घरीं निघून गेला.

त्यानंतर शेठजींनी दोन चार माणसांना बोलावून विहिरीचा उपसा केला. सगळे पाणी काढले पण त्यांची कळशी कांही मिळाली नाही.

शेठजी मनोमन समजले. ते गुपचूप मंगलच्या घरीं रात्रीं गेले आणि त्यांनी त्याची कांशाची मूर्ती परत दिली. त्यांची पितळी कळशी लपवलेल्या जागी होती, ती काढून मंगलने त्यांच्या हातांत दिली.



- २५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट -

Statement about Ownership of
CHANDAMAMA (Marathi)
Rule 8 (Form VI), Newspaper
(Central) Rules, 1956

1. Place of Publication
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
2. Periodicity of Publication
   MONTHLY
   1st of each calendar month
3. Printer's Name
   B. VISWANATHA REDDI
   Nationality
   INDIAN
   Address
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
4. Publisher's Name
   B. VISWANATHA REDDI
   Nationality
   INDIAN
   Address
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
5. Editor's Name
   B. VISWANATHA REDDI
   (Viswam)
   Nationality
   INDIAN
   Address
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097
6. Name and Address of individuals who own the paper
   Chandamama India Ltd.
   Board of Directors:
   1. P. Sudhir Rao
   2. Vinod Sethi
   3. B. Viswanatha Reddi
   82 Defence Officers Colony
   Ekkatuthangal, Chennai-600 097

*I, B. Viswanatha Reddi, do hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.*

(Sd.) B. VISWANATHA REDDI
1st March 2004 — *Publisher*






# अस्वल्या मांत्रिक

## 4

*(थवथव्याच्या पाठीमागून येणाऱ्या अस्वल्या मांत्रिकाने कालीवर्माच्या धाडसाचे कौतुक केले. त्यावेळेला राजा जितकेतूचा मंत्री तिथे पोहोचला. मांत्रिकाने त्याला घाबरवलं आणि मारेकरी वधिकाच्या रेड्यावर त्याला बसवून राजधानीच्या दिशेने जाण्याची सर्वांना आज्ञा केली. ते न आवडून कालीवर्माने मांत्रिकाविरुद्ध तलवार उपसली. त्यानंतर...)*

कालीवर्माचे बोलणे ऐकून मांत्रिक क्षणभर स्तब्ध झाला. जीवगुप्त मंत्र्याखेरीज बाकी सर्वजण घोड्यावर होते. रेड्याला हांकलत जीवगुप्त कालीवर्माजवळ जाऊं लागला. पण अस्वल्या मांत्रिकाने त्याला कठोर स्वरांत विचारले, "अहो मंत्रीमहाशय, सांगा, आता तुमची कोणती योजना आहे? तुम्ही कालीवर्माला माझ्याविरुद्ध चिथावता आहात कां?"

हा प्रश्न ऐकून जीवगुप्त चपापला. नंतर जरा सांवरून घेत, शांत स्वरांत तो म्हणाला, "महाराज, आपली चुकीची समजूत होते आहे. या तरुणाला मी सांगणार होतो कीं आपल्यासारख्या महा-मांत्रिकाच्या आज्ञेचे पालन करणे हे नेहमीच हितावह असते."

हे ऐकून मांत्रिक हंसून म्हणाला, "ज्याच्या विषयी तुम्ही बोलता आहात, तोच तुम्हाला सगळ्यांना आज्ञा देणार आहे. सावध राहा!"

आणि तलवार उपसून भेदक नजरेने पाहाणाऱ्या



कालीवर्माला तो म्हणाला, ''कालीवर्मा, अशी घाई करुं नकोस. तुला अजून पुरेसा अनुभव नाही. या परिस्थितींत आपण दोघे जर भिन्न मार्गांनी जाऊं लागलो तर काय होईल, त्याची कल्पना तुला आहे कां?''

''त्याचा विचार मी कशाला करुं? तुम्ही पुन्हां धबधब्याच्या मागच्या गुहेंत निघून जाल, आणि मी माझ्या गांवी परत जाऊन शेती करायला लागेन आणि अगदी आनंदाने राहीन.'' कालीवर्माने उत्तर दिले.

''अरेच्या! तू जितका हिंमतवान आहेस, तितकाच भोळाही आहेस रे!''

असं म्हणून अस्वल्या मांत्रिकाने जीवगुप्ताला विचारले, ''अहो, मंत्री महाशय, खरंखरं सांगून टाक कीं कालीवर्माला पकडण्यासाठी किती सैनिक पाठवावेत म्हणून राजाला सांगणार आहात? तुमच्या मनांत काय चाललंय ते मी ओळखतो. जर तुम्ही खोटं सांगितलंत तर या झाडासारखंच तुमचंही भस्म मी करुन टाकीन.'' असं म्हणत मांत्रिकाने आपला मंत्रदंड वर उचलला.

जीवगुप्ताने थरथर कांपतच उत्तर दिले, ''आपण माझे विचार जाणताच. मी महाराज जितकेतूंचं अन्न खातो, म्हणून त्यांचे हित जपण्यासाठी कालीवर्माचा बध करावा असा सल्ला मला द्यायलाच हवा; नाही कां? एका मंत्र्याच्या दृष्टीने हे माझे कर्तव्यच आहे.''

त्यावर अस्वल्या मांत्रिकाने आपला दंड जमिनीवर जोराने आपटला नि म्हटले, ''कालीवर्मा, तू ऐकतो आहेस ना? आता चंद्रशिला नगरीत तुला राहाणे सुरक्षित नाही.''

हे ऐकल्यानंतर कालीवर्माला खऱ्या वस्तुस्थितीची कल्पना आली. ''मोठे सैन्य असणाऱ्या जितकेतू राजाशी एकट्याने किंवा मूठभर साथीदारांच्या मदतीने सामना देणे अशक्य आहे. आता आपल्यासमोर केवळ दोनच मार्ग आहेत - जितकेतूच्या गादीवर बसणे आणि ते जर जमलं नाही तर हा देश सोडून सरळ पळून जाणे...!''

असा विचार करीत कालीवर्माने तलवार म्यान केली व त्याने मांत्रिकाला म्हटले, ''गुरुः आपले म्हणणे खरे आहे. माझं हित अनहित माझ्यापेक्षां मला सांभाळून माझं पालन पोषण करणाऱ्या बलभद्र या सेवकास आणि आपल्यालाच माहीत आहे. आता सांगा, मला कोणती आज्ञा आहे?''

कालीवर्माच्या खांद्याला आपल्या मंत्रदंडाने स्पर्श करीत अस्वल्या मांत्रिक म्हणाला, ''कालीवर्मा, तुझ्या भाग्यदेवतेनेच मला गुरु



म्हणून स्वीकारण्याची प्रेरणा तुला दिली आहे. शाबास! मी तुला आज्ञा नव्हे, सल्ला देतो आहे. आता आपण राजधानीकडे जातो आहोत. राजा जितकेतूचा अहंकार किती आहे, ते तरी बघूं या!''

नंतर तो मंत्र्याला म्हणाला, ''अहो मंत्रीमहाशय, आता मी तुमच्या रेड्यावर बसणार आहे. तुम्ही रेड्याच्या नाकांतली वेसण हातांत धरा नि आम्हाला मार्ग दाखवा.''

जीवगुप्त निमूटपणे रेड्यावरुन खाली उतरला आणि त्याने वेसण हातांत पकडली.

अस्वल्या मांत्रिकाने आपला मंत्रदंड उचलून त्या रेड्याच्या डोक्यावर टेकवला व म्हटले, ''अरे माझ्या किंकरा! क्षुद्र मानवाच्या हातांत पडल्यामुळें आपली जन्मजात अद्भुत शक्ती हरवून जाईल, अशी तू चिंता करतो आहेस कां? तसं कांहीही नाही. ऐक! जमिनीवरुन एकदोन गज उंचीवर एक उडी मार आणि हवेंत थोडा वेळ उडत उडत नगराच्या दिशेने जरा चल पाहूं!''

दुसऱ्याच क्षणीं त्या रेड्याच्या नाकपुड्या फुरफुरल्या; आणि नाकांतून धुरासारखा श्वास जोराने बाहेर पडला. डोके वर करुन तो मोठ्याने हंबरला आणि झेप घेऊन हवेंत उडायला लागला, व नगराच्या दिशेने जाऊं लागला. साहजिकच जीवगुप्ताच्या हातांतून वेसणीची दोरी सुटली आणि जीवगुप्त धडपडत त्या रेड्याच्या मागून पळत सुटला.

थोड्या अंतरावर जाऊन अस्वल्या मांत्रिकाने रेडा जमिनीवर आणला. मंत्र्याने धावत येऊन पुन्हां रेड्याची वेसण हातांत घेतली. पाठीमागून



येणाऱ्यांकडे पाहात मांत्रिक म्हणाला, ''बघता आहात ना? महामंत्र्याची काय दशा झालीय ते? जितकेतू राजालाही मी अशीच शिक्षा करणार आहे.''

हे दृश्य पाहून कालीवर्मा मांत्रिकाजवळ जाऊन त्याला म्हणाला, ''मी आपल्याला माझा गुरु मानतो. परंतु माझ्या इच्छेविरुद्ध असणारी प्रत्येक आज्ञा मी पाळीनच, असं मात्र समजू नका. दुष्ट जितकेतूला तुम्ही खरोखरच अशी शिक्षा देणार आहात कां?''

''एकदा गुरुने शिष्य पत्करला, कीं आपल्या शिष्याचे हित असेल अशाच आज्ञा गुरु नेहमी देतात. आता हे सांग, कीं तुला जितकेतूच्या गादीवर बसायचे आहे कां?'' कालीवर्माच्या चेहऱ्यावरचे भाव निरखत अस्वल्या मांत्रिकाने विचारले.

''मला, त्याचं मुळीच आकर्षण नाही. मला



इतकंच हवंय कीं राजाने निरपराधी लोकांना शिरच्छेदाची शिक्षा देणे बंद करावे.''

''कालीवर्मा, मी प्रयत्न करुन बघतो. जे लोक जन्मजात वारसाहक्काने गादीवर बसतात, त्यांच्या मनोधारणेंत कधी चटकन बदल होत नाही. काय हो मंत्रीबुवा? मी बोलतोय ते बरोबर आहे ना?'' अस्वल्या मांत्रिकाने विचारले.

''महामांत्रिक! आपण अगदी ठीक बोलतात!'' जीवगुप्ताने मांत्रिकाच्या बोलण्याला दुजोरा दिला.

त्यानंतर नगराच्या दिशेने कांही अंतरापर्यंत ते सर्वजण गेले. दोन घोडेस्वार वेगांत त्यांच्यासमोर आले आणि ह्यांना थांबवून त्यांनी विचारले, ''रेशमी वस्त्रें आणि सुवर्णकुंडलें धारण केलेल्या ज्येष्ठींना रेड्यावर बसलेल्या संन्याशाच्यापुढे कां चालवत आहात? काळ्या वस्त्रांत एखादे भूत दिसावे तशा माणसाला घोड्यावर बसवले आहे वाटतं? तुम्ही सारे आहात तरी कोण?''

कालीवर्मा त्याला प्रत्युत्तर करणार, त्यापूर्वीच अस्वल्या मांत्रिक मोठ्याने हंसला आणि म्हणाला, ''तुम्ही जितकेतू राजाचे सैनिक नाहीत, म्हणून तुम्ही आम्हाला ओळखलेलं नाहीत. खरं म्हणजे आम्ही कोण आहोत हे आम्हीच विसरुन गेलो आहोत. ते आठवून बघण्यासाठीच तर आम्ही दूरवर दिसणाऱ्या त्या नगराकडे निघालो आहोत.''

''चेष्टा टिंगल राहू दे बाजूला! आम्ही उदयगिरिचा राजा दुर्मुख यांचे सैनिक आहोत. आता आम्ही शिरसवनाकडे जाऊन परत जातो आहोत. तिथें आम्हाला कालीवर्मा कुठेही दिसला नाही. त्याचे प्रेतही दिसले नाही. राजा जितकेतूने आम्हाला दिलेल्या वचनाचा भंग केला आहे. म्हणून आमचे महाराज आता सैन्यासह येऊन या राज्यावर आक्रमण करणार आहेत.'' दुर्मुख राजाच्या सैनिकांनी सांगितले.

''ह्या साऱ्या गोष्टी तुम्ही आम्हाला कशासाठी सांगता आहात? तुम्ही आपला रस्ता सुधारा पाहूं!'' मांत्रिकाने रागावून म्हटले.

तितक्यांत दुर्मुखच्या घोडदळापैकीं एका स्वाराने वधिकाच्याकडे आश्चर्याने बघितले व तो मोठ्याने टवाळखोर स्वरांत हंसत म्हणाला, ''अरे भाऊ! तुला तर मी मुळीच ओळखलेले नाही. तू शिरसवनांत राहाणारा वधिक आहेस ना?''

दांतओठ खात व परशू उचावून वधिक जोराने म्हणाला, ''अरे घमेंडखोरा! मी कोण आहे हे ठाऊक असूनदेखील तू माझी टिंगल करतो



आहेस? घोड्यावर मागे असलेले प्रेत दिसतंय ना तुला? त्याचं डोकं कसं उलट्या बाजूला आहे? तुझीही तीच गत होईल, समजलं?''

हे उत्तर ऐकून कालीवर्मालाही स्फुरण चढले. आपला घोडा वधिकाजवळ नेऊन त्याने आपल्या तलवारीने वधिकाच्या खांद्यावर थोपटल्यासारखे करुन म्हटले, ''वधिका! तू जशास तसे उत्तर दिलेस! दुर्मुखाचे हे सैनिक हाती सांपडलेच आहेत; त्यांचीही डोकीं उडवणार आहेस कां?''

''ही सारी अस्वल्या मांत्रिकाची कृपा आहे. त्यांनी आज्ञा केली तर हे काम करायला मला फारच आवडेल.''

गेले दोन तीन आठवडे माझ्या परशूलाही रक्ताची धार चाखायला मिळालेली नाही.'' वधिकाने उत्तर दिले.

तोंच दुर्मुखच्या घोडेस्वारांपैकी एकाने आपल्या घोड्याला थोपटत म्हटले, ''हे कुणीतरी नरभक्षक दिसताहेत. माणसाचा वध करुन त्याचे प्रेत उलट्या दिशेला बांधून ते नगरांत घेऊन चाललेले आहेत.''

अस्वल्या मांत्रिकाने त्या घोडेस्वारांकडे बघत कालीवर्माला ओरडून म्हटले, ''कालीवर्मा! यांच्या गप्पागोष्टी आपण किती वेळ ऐकत बसणार आहोत?''

कालीवर्माने क्षणार्धातच आपली तलवार उपसली आणि म्हटले, ''अरे दुर्मुखाच्या सेवकांनो! तुम्ही निमूटपणे वाटेला लागता कीं तुमचा शिरच्छेद व्हावा असं तुम्हाला वाटतं?''

त्यावर जीवगुप्ताबरोबर आलेल्या दोघा स्वारांनी आपल्या तलवारी सर्रकन उपसल्या व



दुर्मुखाच्या घोडेस्वारांच्या दिशेने जात ते म्हणाले, ''महाराज, हे काम आमच्यावर सोंपवा. हे उर्मट लोक कांहीतरी भकताहेत!'' आणि त्यांच्यावर चाल करुन गेले.

दुर्मुखाचे स्वारही स्वत:चे रक्षण करण्यासाठी माघार घेत तलवारी उपसत म्हणाले, ''समोरच्या आमराईत आमच्या दुर्मुख महाराजांनी तळ ठोकला आहे. ते तुमचीच सगळ्यांची डोकीं उडवतील.''

त्यावर जीवगुप्ताच्या दोघा सैनिकांनी त्यांचा पाठलाग करुन त्यांना दूर पिटाळून लावले व ते दोघे परत आले.

तेवढ्यांत जीवगुप्ताचा एक सेवक ओरडला, ''महामंत्रीजी! यावेळी शत्रूचे दहा घोडेस्वार इकडे दौडत येत आहेत.''

तोपर्यंत खरोखरच दहा घोडेस्वार त्यांच्या-जवळ येऊन पोंचले. पण त्यांनी तलवारी परजून हल्ला केला नाही. ते थोड्या अंतरावर थांबले.

त्यांच्यापैकीं एकाने एक लांबलचक खलिता भसाड्या आवाजांत वाचून दाखवला. "महाराजांची ही आज्ञा आहे कीं इथें जितके लोक उपस्थित आहेत, त्या सर्वांनी लगेच आमराईतल्या तळावर थांबलेल्या आमच्या दुर्मुख महाराजांच्यासमोर जावे."

ही आज्ञा ऐकून सगळे चकित झाले. अस्वल्या मांत्रिकाने जीवगुप्त मंत्र्याला आपले वाहन, म्हणजे तो रेडा, दुर्मुखाच्या स्वारांच्यानजिक नेण्यास सांगितले, व तो त्या स्वारांना म्हणाला, "दुर्मुखसारख्या महाराजांच्या आज्ञेचं पालन आम्ही करणार नाही असं कसं होईल? तुम्ही सर्वजण आमराईकडे चला."

कालीवर्माने आश्चर्याने विचारले, "गुरुजी! आपण हे काय करता आहात?"

"कालीवर्मा, शांत हो पाहूं! तू स्वतः बघशीलच कीं!" मांत्रिकाने म्हटले.

त्यावर दुर्मुखाचे घोडेस्वार त्यांना सरळ आमराईतल्या राजाच्या तळावर घेऊन गेले. दुर्मुख राजा एका उंच आसनावर बसला होता. त्याच्या आसनाच्या दोन्ही बाजूला दोन शस्त्रधारी सैनिक, आणि थोड्या अंतरावर मंत्री व सल्लागार उभे होते. अस्वल्या मांत्रिक आणि त्याच्याबरोबरच्या लोकांना पाहून दुर्मुखाने रागीट आवाजांत विचारले, "अरे दुष्टांनो! तुम्हाला सगळ्यांना मी ओळखून आहे. या वधिक मारेकऱ्याबरोबर मी तुमचीही डोकी उडवणार आहे. सगळ्यांत शेवटी कालीवर्माचा शिरच्छेद केला जाईल."

दुर्मुखाच्या तोंडचे हे शब्द ऐकून अस्वल्या मांत्रिक ओरडत उठला, "हेऽऽ आदि अस्वल!" आणि रेड्यावरुन उतरुन थरथर कांपत असलेल्या वधिकाला म्हणाला, "अरे वधिका! तुझे डोके हा दुर्मुख उडवणार आहे कीं तू त्याचे मस्तक उडवणार आहे, त्याचा निर्णय ह्याक्षणींच व्हायला हवा." असं म्हणून मंत्रदंडाच्या मुठीवर असलेल्या अस्वलाच्या रत्नजडित मस्तकाचा स्पर्श त्याने वधिकाच्या पाठीवर केला.

लागलीच वधिकाचे रुपांतर एका काळ्या अस्वलांत झाले आणि वधिकाचा परशू हातांत घेतलेले ते अस्वल घोड्यावरुन उडी मारुन उतरले आणि भयानक गर्जना करीत दुर्मुख राजाच्या दिशेने झेपावले. *(क्रमशः)*







वेताळ कथा

# अगम्यचे महाकाव्य

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. नेहमीसारखा तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला.

तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन, तुला समजावून सांगून मी दमलो आहे. एक श्रेष्ठ राजा असल्यामुळें प्रजेचे हित हेच तुझे ध्येय असायला हवे. ते विसरुन तू इकडेतिकडे उगीचच भटकतो आहेस. नालायक माणसांसाठी तू इतके श्रम कां घेतो आहेस? विचार कर, नाहीतर तुझी गत गिरीपुरच्या युवराजाप्रमाणे होईल. त्या युवराजाची व अगम्याची कथा मी तुला



सांगतो.'' आणि वेताळ राजाला कथा सांगायला लागला.

अगम्य नंदनपुरांत राहात होता. लोकांनी त्याला मोठे म्हणावे अशी त्याची तीव्र इच्छा होती. पूर्वी तो गरीब होता.

खूप मेहनत करुन त्याने भरपूर पैसे मिळवले. कायद्याप्रमाणे कर भरला. आता तो खूप श्रीमंत नसला तरी सुखवस्तू होता. घरदार, कपडालत्ता व मुलांना चांगल्या सुखसोयी मिळण्याची त्याने व्यवस्था केली होती.

आता त्याला खूप कष्ट करण्याची आवश्कता नव्हती. रिकामा वेळ मिळत होता. आपण किती कष्ट करुन संसार सुखाचा केला, त्याचे वर्णन तो लोकांना सांगत बसे. लोकांनी त्याचे कौतुक करावे ही खरी त्याची इच्छा होती. ऐकणारे ऐकत व गप्प बसत.

कांहीजण म्हणत, ''आपल्या देशांत कष्टकरी भरमसाट आहेत.''

त्या दरम्यान पुरंदर नांवाचा एक विद्वान पंडित त्या गांवात आला. त्याने तीन दिवस रामायणाचे आख्यान लावले. गांवकऱ्यांनी त्याच्या पांडित्याची मुक्त कंठाने प्रशंसा केली. रोज त्याला कुणी ना कुणी जेवायला निमंत्रण देत होते.

एक दिवस अगम्यने त्याला जेवायला बोलावले. स्वादिष्ट जेवण झाल्यानंतर अगम्य पुरंदरला म्हणाला, ''महोदय, श्रीरामांनी नाना प्रकारचे कष्ट, संकटे सहन केली. पित्याने दिलेल्या वचनानुसार ते अरण्यांत गेले. पत्नीसाठी त्यांनी रावणाचा वध केला. राज्य सांभाळले, आणि श्रीरामचंद्र भगवान मानले गेले. त्यांच्याप्रमाणेच अनेक लोकांनीदेखील आपापल्या कुटुंबाची सेवा केली. त्याला उर्जितावस्था आणली. पण त्यांचे नांव कुणी घेत कां नाहीत?''

पुरंदरने उत्तर दिले, ''तुझा प्रश्न महत्वाचा आहे. जगांत कुठेही, कोणत्याही कुटुंबात, रोजचे रामायण चाललेले असते. मोठ्यांचा अहंकार, सवतींचा मत्सर, स्वार्थी प्रलोभनांत अडकणे, असे हे साधे विषय आहेत. पण त्यांच्यामुळेच माणसे, राक्षस, व प्राणी, यांची सांगड घातली जाते व आकर्षक कथानके तयार होतात. श्रीराम तर अवतारपुरुष आहेत.

आता तू ज्या लोकांविषयी म्हणतो आहेस, त्यांची कथा जर वाल्मिकींनी लिहीली असती तर



त्यांच्यापैकी प्रत्येकाला श्रीरामाचे महत्व प्राप्त झाले असते. रामासारख्या मानवाची काव्यरुपामधे लिहीलेली ही कथा एकमेव आहे. म्हणून रामाला सर्वांत जास्त प्रसिद्धी मिळत गेली.''

पुरंदरच्या बोलण्याने अगम्य फारच प्रभावित झाला. आपणही श्रीरामासारखेच कर्तव्यनिष्ठ व श्रेष्ठ आहोत असा त्याचा ठाम ग्रह झाला. तो पुढे म्हणाला, ''महोदय, मी आपल्याला माझीच कहाणी सांगतो. त्याच्यावर आपण रामायणासारखे एखादे महाकाव्य लिहावे. म्हणजे माझीही प्रसिद्धी होईल नि तुमचीही होईल.''

पुरंदर लागलीच म्हणाला, ''काव्यरचनेची गोष्ट सोडा. अगोदर तुमच्या आयुष्याचे ठळक पैलू ऐकायला मी फारच उत्सुक आहे.'' आणि अगम्यने सांगितलेली जीवन कहाणी त्याने लक्षपूर्वक ऐकली. संपूर्ण कथा ऐकल्यानंतर पुरंदरच्या लक्षांत आले की अगम्य भोळा आहे, थोडा खुळा व मूर्खही आहे. पण खरे सांगून अगम्यचे मन दुखवावे असे त्याला वाटेना. म्हणून पुरंदरने त्याला सांगितले.

''हे बघ, आपली गाथा काव्यरुपांत तूच रचलीस तर जास्त चांगले! म्हणजे तू श्रीरामापेक्षांही श्रेष्ठ ठरशील. कारण श्रीरामांनी कांही रामकथा लिहीली नव्हती.''

अगम्यला ही सूचना आवडली. ''जर अशिक्षित वाल्मिकी महाकाव्याची रचना करुं शकतो, तर मी शिक्षित आहे, तेव्हां मलाही ते जमेल की!'' त्याने विचार केला व आपली



जीवनकथा लिहीली. त्याने दोनतीन वेळा ती वाचली. आपल्या रचनाकौशल्यावर त्यालाच आश्चर्य वाटले. ते काव्य प्रथम त्याने आपल्या पत्नीला ऐकवले.

अगम्यच्या पत्नीने ते काव्य संपूर्ण ऐकून म्हटले, ''मला कशाला ऐकायला लावलंत? मला माहित नाही असं कांहीतरी त्यांत आहे कां?''

''रामायणांत देखील कांहीही नवं नाही, तरीसुद्धां तू ते वारंवार ऐकत बसतेस कीं नाही?'' अगम्यने तिला विचारलं.

''रामाची गाथा ऐकावीशी वाटते. ज्यांना ती ठाऊक नसेल, त्यांनाच ऐकवा ही तुमची गाथा!'' अगम्यच्या पत्नीने शुष्क, कोरड्या स्वरांत म्हटले.

शेवटी त्याने आपल्या सर्व नातवंडांना जवळ बोलावून त्यांना म्हटले, ''लव-कुशांनी रामायणाचा



प्रचार केला. तुम्हीही माझे काव्य गाऊन त्याचा प्रचार करा. म्हणजे आपल्या आजोबांचे ऋण तुम्ही फेडाल.''

सर्व मुलांनी 'नाही' अशा अर्थी आपली मान डोलाबत म्हटले, ''आम्हाला तुमची गोष्ट आवडली नाही! तुम्ही म्हणाल तर आम्ही रामायण गाऊन ते लोकांना ऐकवायला तयार आहोत.''

अगम्यचे काव्य गायला वा ऐकायला कुणीही तयार होईना. परंतु त्याची भाग्यरेषा चमकली. एक दिवस कांही कामानिमित्ताने तो जवळच्याच एका गांवी जायला निघाला.

जाताजाता त्याला वाटेतच एक तरुण बेशुद्ध पडलेला दिसला. रस्त्यावरुन जाणाऱ्या एका बैलगाडीला बोलावून त्याने त्या तरुणाला उचलून गाडींत घातले आणि त्याला तो नंदनपुरांत घेऊन गेला.

वैद्याने त्या तरुणाला नीट तपासले व म्हटले, ''या मुलाने कुठल्यातरी झाडाचे विषारी फळ खाल्ले आहे. मी त्याला त्यासाठी औषध देतो आहे. ते तुम्ही त्याला ओळीने चार दिवस द्यायला हवं आणि त्याची चांगली देखभाल करायला हवी.'' हे सांगून वैद्याने औषध दिले.

चार दिवसानंतर जेव्हां तो तरुण शुद्धीवर आला. व त्याला सर्व हकीकत समजली, तेव्हां तो अगम्यला म्हणाला, ''जर आपण माझी काळजी घेतली नसतीत तर मी मेलोच असतो. हे आपले ऋण मी कसे काय फेडूं शकेन?''

''तुला खरंच माझं ऋण फेडायचं असेल तर तू माझं काव्य ऐक आणि त्याची स्तुती कर.'' अगम्यने सांगितले. त्या कृतज्ञ तरुणाने ते सबंध काव्य श्रद्धेने ऐकले. अधूनमधून कंटाळवाणे झाले, तरी त्याने ते दाखवले नाही.

अगम्यने प्रदीर्घ श्वास घेऊन म्हटले, ''आज माझी पहिली इच्छा पुरी झाली. आता दुसरी इच्छा केव्हां पुरी होईल ते कांही सांगता येत नाही.''

त्या तरुणाने उत्सुकतेने अगम्यला विचारलं, ''आपली एक इच्छा मी पुरी करूं शकलो. तेव्हां आता दुसरीही पूर्ण करीन. अगदी निःसंकोचपणें सांगा; तुमची दुसरी इच्छा कोणती आहे?''

''ती पूर्ण करणे तुला जमणार नाही. फक्त या देशाचा राजाच माझी दुसरी इच्छा पूर्ण करूं शकेल.'' अगम्यने निराशेने उद्गार काढले.

''मी या देशाच्या राजा कांही नाही, पण



युवराज आहे. महाराज माझे बोलणें टाळणार नाहीत.'' असे युवराजाने अगम्यला सांगून त्याला प्रोत्साहन दिले.

जेव्हां तो तरुण हा राज्याचा युवराज आहे असे अगम्यला समजले.

तेव्हां त्याला फार आनंद झाला. तो म्हणाला, ''अशा प्रकारे आपली भेट होणे हे माझे भाग्य आहे. रामायणाचा जितका प्रसार झाला आहे, तसाच प्रसार माझ्या काव्याचा व्हावा अशी माझी दुसरी इच्छा आहे.''

युवराजाचा चेहरा पडला. कुठे तो श्रीराम, नि कुठे अगम्य! युवराज विचारांत पडला. थोड्या वेळानंतर विचार करुन त्याने अगम्यला म्हटलं, ''आजपर्यंत तुम्ही आपलं काव्य किती लोकांना ऐकवलं आहेत?''

''जवळजवळ बारा लोकांना मी माझे काव्य ऐकवले असेल.'' अगम्यने म्हटलं.

''ठीक आहे. आपल्या देशांत दहाबारा लाख लोक आहेत. आत्तापर्यंत ज्या बारा लोकांनी तुमचे काव्य ऐकले आहे, त्यांना सोडून बाकीच्या लोकांनी ते ऐकावं आणि त्याची प्रशंसा करावी, याची व्यवस्था मी करीन व त्याचा प्रसार करीन. पण, तुम्ही मला एक वचन दिले पाहिजे. वाल्मिकीने आपल्या जीवनांत एकच काव्य रचलं. तेही एकदाच! तुम्हीदेखील मान्य करायचे कीं वाल्मिकीप्रमाणें दुसरी काव्यरचना करायची नाही.''

अगम्यने याला आपली संमती दिली.



युवराजाने अगम्यला आपल्याबरोबर राजधानीला नेले व महाराजांची त्याचा परिचय करुन दिला. युवराज महाराजांशी बोलताना म्हणाला, ''यांचं नांव अगम्य आहे. ह्यांनी माझे प्राण वांचवले आहेत. यांनी एक महाकाव्य रचलं आहे. ते वाल्मिकीरामायणाच्या तोडीचे आहे. यांना आपल्या दरबारांत मानाचे स्थान द्यायला हवं. ह्यांच्या काव्याची प्रसिद्धी साऱ्या देशांत व्हायला हवी. हीच माझी इच्छा आहे.''

महाराजांनी युवराजांचा प्रस्ताव स्वीकारला, आणि अगम्यला एक मानाची जागा दिली. त्यानंतर अगम्यच्या काव्याबद्दल देशभर प्रचाराचा भडिमार सुरुं झाला. पण कुणालाही ते काव्य मिळूं शकले नाही. कारण त्याची एकच प्रत होती आणि ती युवराजांच्याजवळ होती. जे कोणी काव्य बघण्यासाठी आले, त्यांना युवराज

सांगत होते, "दुर्दैवाने ती एकुलती एक प्रत आगींत जळाली. पुन्हां लिहून काढण्याचे अगम्याने नाकारले आहे. त्या महाकाव्याच्या आता फक्त आठवणीच शिल्लक आहेत."

अशा प्रकारे एक महाकाव्य नष्ट झाले याचे कवी व पंडितांना फार वाईट वाटले. महाराजांना मात्र यांत कांहीतरी काळेबेरे आहे अशी शंका आली, आणि त्यांनी युवराजाला खोदून विचारले. युवराजाने वडिलांना खरी गोष्ट सांगितली.

"अगम्य यास आपल्या काव्याची वारेमाप प्रसिद्धी व्हावी व आपले नांव महाकवी म्हणून व्हावे अशी दुर्दम्य इच्छा होती. ती पूर्ण झाली. जोपर्यंत ते काव्य कुणी वाचलेले नाही, तोपर्यंत त्याला मान मिळत राहील. म्हणून मी ते जाळून टाकले. अगम्य दुसरे काव्य रचणार नाही याबद्दल मी अगोदरच जागरुक होतो. तसं मी त्यांच्याकडून वचन घेतलंय. आणि त्यांना दिलेला शब्द पाळला."

"मला तुझ्या प्रामाणिकपणाबद्दल कांहीतरी त्रुटी वाटते." महाराजांनी नाराजीने म्हटलं.

ही गोष्ट सांगून वेताळाने विचारलं, "राजन, युवराज दिलेला शब्द पाळण्यांत यशस्वी झाला खरा, पण असल्या काव्याची स्तुती करणं त्याला शोभतं कां? त्यांत त्याचा खोटेपणा दिसत नाही कां? माझ्या शंकांचे उत्तर माहीत असूनही जर तू दिले नाहीस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील."

विक्रमार्क म्हणाला, "अगम्यचे काव्य फक्त बाराजणांनी ऐकले होते. आणि कुणीही त्याची प्रशंसा केली नाही. म्हणून युवराजाने त्या काव्याचे कौतुक करुन आपली इमानदारी सिद्ध केली. आपल्या प्राणदात्याला संतुष्ट करण्यासाठी त्याची खोटी प्रशंसा केली तरी तो खोटेपणा नाही. त्यामुळें कुणाचेही नुकसान होत नाही. त्यांत युवराजाचा काडीमात्र स्वार्थ नव्हता. म्हणून त्याचा निर्णय अगदी योग्य आहे."

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(श्रीनिवास यांच्या रचनेवर आधारित)*






# सारे पवित्र

भारतीय नागरिक अनेक पशु व पक्षांशी परमेश्वराचा संबंध भाविकतेने जोडतात. गणेशाचे वाहन उंदीर आहे, तर गणेशाचा पिता शिवभगवानाचे वाहन बैल आहे. हनुमानाची रामभक्ती प्रसिद्ध आहे.

त्याने राम, लक्ष्मण व सीता यांची सेवा केली होती आणि त्याचे तोंड वानरासारखे आहे, म्हणून माकडांना मारीत नाहीत, किंवा जखमीही करीत नाहीत. त्यांना फक्त पळवून लावतात.

भगवान शिवाचा दुसरा पुत्र कार्तिकेय, याचे वाहन मोर आहे. कार्तिकेयाच्या देवळांत त्यांची निगराणी केली जाते. दक्षिणेंत कार्तिकेयाला सुब्रम्हण्यम्, वेलायुध किंवा दंडपाणी अशीही लोकप्रिय नांवे आहेत.

भगवान विष्णु तर शेषशायी अनंतावर पहुडले आहेत म्हणून सापांनाही इथें मान दिला जातो. विष्णूचे वाहन गरुड आहे.

गोपाळकृष्णाची सांगड गोकुळांतल्या गायींबरोबर घातली जाते. साऱ्या भारतांत, गाईची पूजा विशिष्ट दिवशी केली जाते. आपण जेव्हां पशुपक्षांना मान देतो, तेव्हां आपण खरं तर निसर्गाचाच मान राखत असतो.



भारतीय दंतकथा - २३

# अज्ञानाचे बंधन

"काय म्हणालास? त्या खेड्याचे नांव वदनपुर आहे कां? त्यावरुन आठवलं, आपल्या सुमेरचं पुढे काय झालं?" पद्मानंद गुरुजींनी आश्रमाकडे परत जाताजाता विचारले. आश्रम अजून दहा कोसावर तरी होता. दोन शिष्यांसह गुरुजी तीर्थयात्रा करुन परत येत होते.

सुमेरने त्यांच्या आश्रमांत योगविद्येचे शिक्षण घेतले होते. तो एक चांगला तरुण मुलगा होता. विद्यार्थ्याला आवश्यक असणारे सारे सद्‌गुण त्याच्यांत एकवटले होते. एक दिवस त्याचे वडील अत्यवस्थ असल्याचा निरोप आला, म्हणून तो वडिलांना भेटायला आपल्या घरी परतला. "महिनाभराने परत येईन" असे त्याने गुरुजींना सांगितले.

ह्या गोष्टीला दहा वर्षे होऊन गेली होती. सुमेरच्या गांवाजवळून गुरुजी चालले होते. तेव्हां साहजिकच त्याला भेटून त्याची विचारपूस करावी असे गुरुजींना वाटले.

त्यांच्या शिष्याने एका वाटसरुला विचारले, "या गांवातला सुमेर नांवाचा एक तरुण पूर्वी आश्रमांत राहात होता. त्याच्याविषयी तुम्हाला कांही माहिती आहे कां?"

"म्हणजे सुमेरशेठ कां? ते तर पद्मानंद गुरुजींचे शिष्य होते. आश्रमांतून ते आपल्या आजारी वडिलांना भेटायला आले. पण मृत्यूपूर्वी वडिलांनी त्यांचे लग्न लावून दिले आणि आपला सावकारीचा धंदा व इतर व्यवसाय त्यांच्या स्वाधीन केला. गुरुजींच्या आशिर्वादाने त्यांचा व्यवसाय फारच





वाढला आहे. ते पहा त्यांचे घर - या भागांतले ते सर्वांत मोठे घर आहे, बरं कां!" त्या खेडूताने एका प्रशस्त, डौलदार महालाकडे बोट दाखवून म्हटले.

गुरुजी व शिष्यांनी त्या घराच्या भोवताली असलेल्या उद्यानांत प्रवेश केला व ते वाड्याकडे जाऊं लागले. सुमेरने त्यांना आपल्या महालाच्या गच्चीवरुन पाहिले. तो धावतच खाली आला आणि गुरुजींसमोर त्याने लोटांगण घातले. "आता संध्याकाळ होत आलीय. माझ्या या झोपडीत आज आपण विश्रांति घ्यावी. आपण इथे कांही दिवस राहावे किंवा उद्यां सकाळीं उठून नंतर प्रस्थान ठेवावे."

गुरुजींनी त्या रात्रीं तिथें मुक्काम करायचे मान्य केले. सुमेरने त्यांना मेजवानी देऊन उत्तम आदरातिथ्य केले. तो गुरुजींबरोबर एकटाच होता, तेव्हां त्याला रडूं कोसळले. "गुरुजी! मी या बंधनात अडकून पडलो आहे हो! माझी दोन्ही मुलें मोठी झाली कीं मी सारा कारभार त्यांच्यावर सोंपवीन आणि आश्रमांत येऊन निवृत्ती पत्करीन. उरलेल्या दिवसांत मी आपली सेवा करीन."

त्यावर गुरुजींनी उत्तर दिले, "जरी मी त्यावेळीं नसलो तरी मी माझ्या उत्तराधिकाऱ्याला, जो तुझाच गुरुबंधू असेल - तुझी काळजी घेण्यास अवश्य सांगीन. तू योगविद्येचे शिक्षण घेतलेले आहेसच, तेव्हां जीवनाचा हा आध्यात्मिक मार्ग तू सर्वस्वी सोडूं नकोस."

आणखी दहा वर्षे उलटली. पुन्हां एकदा गुरुजी वदनपुरांतून प्रवास करीत होते. त्यांनी आपल्या शिष्याच्या महालांत प्रवेश केला. पुन्हां एकदा सुमेरने त्यांच्या पायाशी लोळण घेतली, त्याने अश्रू ढाळले आणि रडत सांगितले कीं त्याला आता एक



गोजिरवाणे नातवंड होते व आजोबांवर त्याची फार माया होती. "हे नातवंड शाळेंत जायला लागले कीं मी या संसारतापांतून सुटका करुन तुमच्याकडे येईन." सुमेरने त्यांना शब्द दिला.

"फार छान!" गुरुजी उत्तरले.

वर्षभरातच गुरुजी वारले. पण सुमेरला विसरुं नये अशी सूचना त्यांनी आश्रमांत दिली होती. सुमेरच्यांत वेगळीच चमक होती; पण भौतिक सुखाच्या जाळ्यांत तो चांगलाच अडकलेला होता. त्यांतून त्याची सुटका व्हायला हवी.

आणखी कांही वर्षे अशीच गेली. एके दिवशी नवीन गुरु गंगानंद यांना सुमेरची काय अवस्था आहे ते पाहाण्याची उत्सुकता लागली. सुमेर आपल्या हातांतून गेला आहे असे समजूं नये, असे गुरु ज्ञानानंदांनी सांगितलेले त्यांच्या पक्के लक्षांत होते. गंगानंद वदनपूरला गेले. तिथे सुमेर निधन पावल्याचे त्यांना कळले. परंतु सुमेरच्या मुलांनी

गंगानंदांचे मनःपूर्वक स्वागत केले आणि त्या रात्रीं मुक्काम करावा अशी त्यांना विनंती केली.

गंगानंदांनी त्या वाड्यांत पाऊल ठेवल्यापासून त्या घरांतला कुत्रा त्यांचे पाय चाटीत होता, आणि प्रेमाने शेपटी हालवीत त्यांच्याजवळच फिरत होता. त्यांच्या झोंपण्याच्या खोलीतून त्या कुत्र्याला जबरदस्तीने बाहेर काढावे लागले. गंगानंदांना याचे अतिशय आश्चर्य वाटले. त्यांनी ध्यान लावले आणि त्या कुत्र्याच्या आत्म्याशी संवाद साधण्याचा प्रयत्न केला. जे कळले ते खरोखरीच विस्मयकारक होते. सुमेरशेठचा आत्मा त्या कुत्र्यांत विसावला होता, त्या घराची राखण करीत होता. त्यामुळें त्याची मुलेबाळें, नातवंडे यांचे संरक्षण होत होते.

सुमेरच्या आत्म्याला गंगानंदांनी संदेश पोंचवला कीं या कुत्र्याच्या जिण्यांतून सुटका व्हावी म्हणून त्याने प्रार्थना करायला हवी. सकाळीं उठून गंगानंद निघून गेले.

पांच वर्षांनंतर गंगानंदांनी पुन्हां सुमेरच्या घराला भेट दिली. तो कुत्रा एव्हाना मेला होता. पण सुमेरच्या आत्म्याचे काय झाले होते? तो त्या भावनांच्या जंजाळांत इतका गुरफटलेला होता कीं त्याला मुक्त होणे अशक्य होते. त्या रात्रीं जेव्हां त्यांनी ध्यान लावले तेव्हां गंगानंदांना समजले कीं तो आत्मा आता एका नागाच्या शरीरांत राहिला आहे. त्या कुटुंबाचे जडजवाहीर ज्या मोठ्या पेटींत ठेवलेले होते त्या पेटींत तो नाग दडून बसलेला होता.

यावेळीं मात्र गंगानंदांनी कठोर निर्णय घ्यायचे ठरवले. सकाळ झाली तेव्हां त्यांनी सुमेरच्या मुलांना सांगितले कीं त्यांच्या मोठ्या लांकडी पेटींत एक नाग लपून बसला आहे. साहजिकच, त्यांनी एका साप पकडणाऱ्याला बोलावले आणि ती पेटी उघडली. पेटींत धूप टाकून धूर केला गेला. त्या धुराने तो नाग बेशुद्ध झाला व त्याला त्या कातकऱ्याने सहज पकडून बाहेर काढले. एक नोकर त्याच्यावर काठीने तडाखा हाणणार, तितक्यांत गंगानंद मधें पडले. त्यांनी तो नाग मारायला मनाई केली. त्यांनी तो नाग एका मडक्यांत घातला व आश्रमांत नेला. तिथें त्यांनी त्या अर्धमेल्या नागावर धार्मिक संस्कार केले व सुमेरच्या आत्म्याची त्या शरीरांतून सुटका केली. त्या आत्म्याला मुक्ती व शांती, दोन्ही लाभली.

हे सर्व केल्यानंतर गंगानंदांनी सुटकेचा निश्वास सोडला. "आम्ही सहपाठी होतो त्याकाळांत सुमेर किती बुद्धिमान विद्यार्थी होता! पण त्याचा किती हा अधःपात झाला! अरेरे, अज्ञानाचा पगडा किती आडमुठा असूं शकतो! हे केवळ अज्ञानाचे बंधन आहे!"



## खास बातम्या




### हजार कॅमेऱ्यांतून टिपलेला क्षण

त्रिवेंद्रम या केरळच्या राजधानीत ऑगस्टमधे अखिल भारतीय छायाचित्रकार संघाचे संमेलन जागतिक छायाचित्रण दिन साजरा करण्यासाठी भरले होते. त्यावेळीं मंत्रीगण, खासदार व श्रेष्ठींच्या उपस्थितींत या छायाचित्रकारांच्या न्याय्य मागण्या अधिकृतपणे मंजूर झाल्या. हा ऐतिहासिक क्षण किमान हजारभर तरी भारतीय छायाचित्रकारांनी कॅमेऱ्याने टिपला. हा एक जागतिक विक्रम ठरला आहे; व त्यांची संघटना या क्षणाची नोंद गिनेस बुकांत व्हावी म्हणून प्रयत्नशील आहे.

### शिक्षणसंस्थेला मदत



सुमारे तीस वर्षांपूर्वी कानपूरच्या आय्. आय्.टी. मधून डॉ. प्रभु गोयल यांनी पदवी मिळवली होती. नुकतेच ते या संस्थेला भेट द्यायला गेले, तेव्हां त्यांनी संस्थेच्या संशोधन व विकास विभागाला एक लाख डॉलर्सचे अनुदान दिले.

या मधल्या काळांत ते अमेरिकेला गेले, त्यांनी तिथें प्रबंध लिहून डॉक्टरेट मिळवली, व कॅलिफोर्नियांतल्या एका सुरक्षा कंपनीचे प्रमुखपद भूषवले. तिथें त्यांनी एका समस्येवर उपाय शोधला आणि तो उपाय सोन्याची खाण ठरला.

भारतांतही असे संशोधन व्हावे असे डॉ. गोयल यांना वाटले. त्याचा सर्वोत्तम मार्ग म्हणजे

# फसवा हेर

ते १९१७ साल होते. पहिले महायुद्ध सुरुं होते. ब्रिटिश गुप्तहेर संघटनेचा प्रमुख मोठ्या काळजीत पडलेला होता. पूर्वेला ब्रिटिश सेना जिथें लढत होत्या, त्या भागांत शत्रूच्या अनेक हेरांचा सुळसुळाट झालेला होता. या दहशतीची कशा प्रकारे सामना द्यावा याचे उत्तम शिक्षण आपल्या सैनिकांना कसे देता येईल, याचा बराच विचार तो करीत होता.



त्या संघटनेच्या प्रमुखाचे नांव होते मॅनरिंग. त्याला बातमी मिळाली कीं फ्रिट्झ हा जर्मन गुप्तहेर सतत ब्रिटिश सैन्याच्या पाठलागावर होता. वेषांतर करुन अतिमहत्वाची माहिती मिळवण्याचा त्याचा प्रयत्न होता. पण फ्रिट्झ किंवा त्याचे धागेदोरे, यांचा पुरावा कांही केल्या त्यांना सांपडत नव्हता. ती अफवा होती कां?

तरीदेखील मॅनरिंगने ही माहिती वरिष्ठांना कळवली. त्यांनी सैनिकांना सावध केले. त्या जर्मन हेराचा तपास करण्याची हुकूम जारी करण्यांत आला.

एक दिवस युद्धकैद्यांच्या छावणीला भेट देण्यास मॅनरिंगला सांगण्यात आले. त्याबद्दलची बातमी अगोदरच त्या तळावर ठाऊक होती. कारण, जेव्हां तो तिथें पोंचला तेव्हां एक विशिष्ट ग्रीक बंदी तुर्की सैन्यांतून पळून आलेला होता. त्याने मॅनरिंगला भेटण्याची इच्छा प्रदर्शित केली. ते जेव्हां भेटले तेव्हां त्याची माहिती ऐकून मॅनरिंग चक्रावला. ''सर, तुम्ही कुणाला शोधता आहात ते मला माहिती आहे. मीही कांही दिवस एका



फ्रिट्झसाठी काम करीत होतो.'' काय? तू काय बोलतो आहेस?'' गोंधळलेल्या मॅनरिंगने विचारले. ''चेष्टा करतो आहेस कां?''

''नाही, नाही, मुळीच नाही'' ग्रीक बंद्याने म्हटले.'' जर तुम्ही माझी सुटका करुन दिलीत तर मी त्याला पकडून आणायला मदत करुं शकेन.''

बराच विचार केल्यानंतर मॅनरिंगने हा प्रस्ताव मान्य केला. पण आपला निर्णय देण्यापूर्वी हा इसम खराच ग्रीक आहे याची खात्री मॅनरिंगने त्याला ग्रीक वकिलातीकडे नेऊन करुन घेतली.

त्या ग्रीकाने कांही अटी घातल्या. फ्रिट्झ बरोबर मतभेद झाल्यामुळे त्यांचे मार्ग वेगळे झाले होते. पण जर आता त्याला कांही गुप्त लष्करी माहिती मिळाली तर ती देण्यासाठी तो फ्रिट्झकडे परत जाऊं शकला असता.

त्यामुळें फ्रिट्झचा त्याच्यावर विश्वास बसला असता. फ्रिट्झला खुणेच्या ठिकाणीं तुर्की सीमेपासून भेटायला येण्यास तो प्रवृत्त करुं शकला असता. त्यावेळी फ्रिट्झला अटक करणे सहज शक्य होते. आपला हेतू साध्य करण्यासाठी त्या ग्रीक हेराने कांही फुटकळ, निरुपद्रवी, गुप्त माहिती पुरवली. त्यानंतर त्याची त्या छावणीतून सुटका झाली व तो तिथून चटकन निसटला.

एक आठवडा उलटला. दिलेल्या शब्दाला जागून, तो ग्रीक पुन्हां अवतीर्ण झाला आणि एका विशिष्ट दिवशी ब्रिटिश सैनिकांच्या तळावर फ्रिट्झ येईल असे त्याने सांगितले. मॅनरिंग व फ्रिट्झ यांच्या गुप्त भेटीसाठी त्या ग्रीक हेराने एक उत्तम जागा निवडली होती. दूर अंतरावर, नदीच्या कोरड्या पात्रांत, लांबून कुणाला दिसणार नाही, अशी मोक्याची जागा होती ती!



''हा गूढ फ्रिट्झ अखेरीस माझ्या जाळ्यांत सांपडणार!'' असा आशावादी विचार त्या जागी घोड्यावर बसून जात असताना मॅनरिंगच्या मनांत घोळत होता. तो त्या जागी पोंचला तर तो ग्रीक हेर आपल्या घोड्याशेजारीच तिथें उभा होता.

त्याने दिलेला शब्द पाळला होता. त्याने माहिती दिली कीं फ्रिट्झ व त्याचा शिपाई ब्रिटिश तळावर अगोदर पोंचले होते. व लौकरच ते त्या ठिकाणी येणार होते. इतर किरकोळ गप्पा झाल्या. त्यावरुन फ्रिट्झशी त्या ग्रीकाने पुन्हां संधान बांधले होते याचा भक्कम कागदोपत्रींचा पुरावा त्याने दाखवला.

"तुम्ही सशस्त्र आहात कां, सर?" ग्रीकाने अचानक विचारले.

"होय तर!" ब्रिटिश अधिकारी उत्तरला.

"मग, फ्रिट्झला पाहिल्याबरोबर त्याच्यावर गोळी झाडा." ग्रीकाने दिला.

संध्याकाळ होत आली तेव्हां घोड्यावरून येणाऱ्या व्यक्तीची धूसर आकृति दिसायला लागली. "ब्रिटिश सैनिकाच्या गणवेषांतला तो फ्रिट्झचा शिपाई आहे. फ्रिट्झ आता पाठोपाठ येईलच." ग्रीक कुजबुजला.



तो शिपाई घोड्यावरुनच ग्रीकाजवळ गेला आणि त्याने कांही कागदपत्रे त्याला दिली. त्याने जर्मन भाषेंत सांगितले कीं ब्रिटिश सैनिकांनी पाठलाग केल्यामुळे फ्रिट्झला पुन्हां तुर्की तळावर जाणें भाग पडले. ग्रीक हेराच्या चेहऱ्यावर आश्चर्य व निराशा या दोन्हींचे मिश्रण होते. तरीसुद्धां, फ्रिट्झ कांही दिवसांतच पुन्हां एकदा ब्रिटिश सैन्याच्या हद्दींत येईल अशी ग्रीकाने हमी दिली. त्याने दुसरी भेट घडवून आणण्याचे आश्वासन दिले.

तो शिपाई ग्रीक हेराशी बोलताना ऐकल्यावर मॅनरिंगला कांहीतरी खटकले. ते दोघेही सफाईदारपणें जर्मन भाषेंत बोलत होते. ग्रीकमधे कां बोलत नव्हते?

ग्रीक हेराची सूचना मान्य करण्याखेरीज आता दुसरा पर्याय नव्हता. कारण त्या चतुर हेराला पकडायची इच्छा प्रबळ होतीच.

"आता या घटकेला ह्या शिपायाला मी शत्रूच्या गोटांत परत जाऊं देणार नाही. कारण जे तिघाजणांना माहीत असतं ते गुपित राहात नाही. त्याला अटक केलीच पाहिजे." मॅनरिंगने कठोरपणे सांगितलं.

ग्रीक हेराला हा मुद्दा पटला. तो शिपाई घोड्याचा लगाम हातांत धरुन थोड्या अंतरावरच उभा होता. ग्रीक हेराने मॅनरिंगला त्या घळीच्या पलीकडे पाहून रस्ता मोकळा आहे ना ते पाहाण्यास सुचवले.

"म्हणजे आपण याला पकडूं." तो म्हणाला.

मॅनरिंगने त्याच्या खिशांतल्या पिस्तुलावर हात ठेवला, आपला घोडा कांही अंतराबर नेला आणि तो चपळाईने घोड्यावर बसला. त्याक्षणीं



दोन मोठे ठणाण् आवाज झाले, व त्याच्याजवळून गोळ्या गेल्या. मागे वळून पाहिले तर तो शिपाई व तो ग्रीक, दोघेही मॅनरिंगवर गोळीबार करत होते. मॅनरिंगचा घोडा भेदरला आणि एकीकडे त्यानेही पिस्तुलाचा वापर केला. त्या शिपायाला गोळ्या लागल्या होत्या. ग्रीक हेर घोड्यावरून तडक निघून गेला आणि दिसेनासा झाला. त्याच्यामागून त्या शिपायाचा घोडाही स्वाराशिवाय परत गेला.

मॅनरिंग घोड्यावरुन खाली उतरला व त्या मृतवत जखमी शिपायाजवळ गेला. तो मरणोन्मुख शिपाई म्हणजे एक स्त्री होती. ते पाहून मॅनरिंग थक्क झाला. ब्रिटिश गणवेषांत वावरणारी ती एक जर्मन महिला होती. थोड्याच वेळांत ती मरण पावली.

तो अधिकारी घराकडे परतला तोपर्यंत सूर्यास्त होऊन गेलेला होता. मॅनरिंगने अजाणतेपणी एका स्त्रीला मारले होते याची त्याला शरम वाटत होती. ग्रीकाने त्याला चकवले होते. ती स्त्री व ग्रीक या दोघांनी मॅनरिंगलाच ठार मारायचे ठरवले होते.

तेव्हां तो तरी दुसरे काय करणार? "त्या बाईऐवजी त्या ग्रीकाला मी मारायला हवं होतं!" त्याच्या मनांत आलं.

तो ग्रीक कोण होता? ती जर्मन महिला कोण होती? तो फ्रिट्झ कुठे होता? हे रहस्य फार दिवस टिकले नाही.

महायुद्ध संपल्यानंतर मॅनरिंगला एक पत्र आले. ते वाचल्यानंतर त्याला धक्काच बसला. ती सर्व एक विलक्षण कथा ठरली. तो फसवा हेर फ्रिट्झ हा खोटाही नव्हता किंवा काल्पनिक व्यक्तीही नव्हती. त्या जागतिक महायुद्धांतल्या जर्मन गुप्तहेरांपैकी तो सर्वांत कुशल व कार्यक्षम हेर होता हे पुढे माहीत झाले.

तो ग्रीक म्हणजे खुद्द फ्रिट्झच होता. दुर्दैवाने शिपायाच्या वेषांतली स्त्री त्याची पत्नी होती. कित्येक वर्षानंतर ब्रिटिशांच्या ताब्यांत असलेल्या भागांत एक कॉफीगृह होते. फ्रिट्झ नि मॅनरिंग तिथें अकस्मात समोरासमोर आले. दोघांनी एकमेकांना ओळखले. कदाचित त्यांनी स्मितहास्य केले असेल, पण ते चकार शब्दही एकमेकांशी बोलले नाहीत.



# निढळाच्या घामाची कमाई



ही एका कर्मठ ब्राम्हणाची कहाणी आहे. तो फक्त राजाने कष्टाने मिळवलेल्या पैशांतूनच दान स्वीकारीत असे. खजिन्यांतल्या धनाला तो शिवतही नसे.

तिथला राजा उदार मनाचा होता. कुणाही याचकाला तो विन्मुख पाठवत नसे. सर्व लायक व्यक्तींना तो उपहार, देणग्या देऊन त्यांचा सन्मान करीत असे. गोरगरीबांच्या झोळीत धान्य, कपडालत्ता घालायला तो कधीही विसरत नसे.

त्या दिवशी नवीन वर्षाचा पहिला दिवस होता. सर्वत्र हा दिवस आनंदाने साजरा होत होता. प्रजाजन राजवाड्यासमोर रांगालावीत व उपहार स्वीकारीत होते.

सर्वजण तृप्त होऊन गेले. सारेजण गेल्यानंतर राजाला एक ब्राम्हण दिसला. तो शांतपणे बाजूला उभा होता. अजूनदेखील बऱ्याच वस्तूंचे वाटप व्हायचे होते.

राजाने त्याला विचारले, ''पंडितजी, मला सांगा, मी आपल्याला काय देऊं? कपडे? धान्य? कीं मोत्यांची माळ?''

''त्यांपैकीं कांहीही मला नको, महाराज!'' ब्राम्हणाने उत्तर दिले. ''आपण घाम गाळून कष्ट करुन कांहीतरी मिळवलेले आहे कां? ती गोष्ट मला हवी आहे. फक्त कष्टाच्या कमाईचे फळ!''

राजा खरोखरीच गोंधळून गेला. तो ब्राम्हण कांही उद्धट नव्हता. पण त्याच्या बोलण्यांत तथ्य होते. त्याने आजूबाजूला नजर टाकली. त्या वस्तूंपैकी एकही वस्तू राजाने कष्ट करुन मिळवलेली नव्हती.

प्रजेने जो कर दिला तो त्याने खजिन्यांत भरलेला होता. त्या धनाचा विनियोग राजा करीत होता. ''पंडितजी, मी कष्ट करुन यांतले कांहीच मिळवलेले नाही. ह्यापैकी जे हवे ते आपण अवश्य घ्यावे. आपली विद्वत्ता आणि ज्ञानसंपदा याबद्दल मला खूप आदर व अभिमान आहे. आपल्याला इतर कांही हवे असले तरी ते संकोच न करता सांगावे. ते आपल्याला अवश्य मिळेल.''

ब्राम्हणाने लागलीच उत्तर दिले, "नाही महाराज. मी त्या कोणत्याही वस्तूचा स्वीकार करणार नाही. जे योग्य व खऱ्या कमाईचे फळ आहे तेच मी स्वीकारतो."

अशा आनंदाच्या प्रसंगी कुणीही रिकाम्या हाताने राजवाड्यांतून जावे, हे राजाला योग्य वाटेना. त्यांत राजाच्या प्रतिष्ठेला धक्का बसत होता. या ब्राम्हणाला संतुष्ट केले पाहिजे असे त्याने ठरवले. पण त्यासाठी थोडा वेळही हवाच कीं!

"ठीक आहे पंडितजी, आपण उद्यां यावं. मी कष्ट करुन जे कांही मिळवीत ते आपल्याला देईन."



ब्राम्हणाने लवून प्रणाम केला. समाधानाचे हास्य त्याच्या चेहऱ्यावर दिसत होते. तो घरी परतला आणि राजाही आपल्या महालांत गेला. राजाने कपडे बदलले व साधे, जुनकट, ढगळ कपडे घालून तो महालांतून बाहेर पडला. पायी चालत राजा काम शोधायला लागला. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं त्याला कुठेही काम मिळाले नाही.

हिंडतहिंडत राजा समुद्रकिनाऱ्यावर गेला. तिथे कांही मासे मारणारे कोळी आपली जाळी समुद्रांत टाकण्याची तयारी करीत होते. राजाला काम हवे होते. म्हणून त्याने एका कोळ्याला अजीजीने विचारले.

कोळ्याला या गरीबाची दया आली. त्याने विचारले, "मोठा मासा पकडलास तर एक तांब्याचा पैसा देईन आणि लहान मासा पकडलास तर एक कवडी देईन. चालेल?"

राजाला ही अट मान्य करण्याखेरीज गत्यंतर नव्हते. त्याने जाळे हातांत धरले, समुद्रांत थोडे अंतर गेल्यानंतर त्याने जाळे फेंकले. तो बराच वेळ थांबला आणि नंतर त्याने जाळे खेंचले. सुदैवाने त्यांत एक मोठा मासा आणि एक लहान मासा अडकला होता.

राजाला मासेमारीचा कांहीच अनुभव नव्हता. सारी रात्र जरी तो तिथें बसला असता तरी फारसे जास्त मिळेलच अशी कांही आशा नव्हती. म्हणून राजा परत किनाऱ्यावर आला व त्या कोळ्याकडे गेला. कोळी त्याची वाट पहात होता.



त्याने हंसतच एक तांब्याचा पैसा व एक कवडी राजाला दिली. त्याचे आभार मानून राजा वाड्यावर परतला. पहारेकरी रात्रभर पहारा करुन आळसावले होते. राजा त्यांच्या नकळत वाड्यांत शिरला. नंतर दुपारीं जेव्हां दरबार भरला, तेव्हां तो ब्राम्हण वाट पहात असलेला राजाला दिसला.

"पंडितजी, मी रात्रभर काम केले आणि एक तांब्याचा पैसा आणि एक कवडी कष्ट करुन मिळवली आहे; ती आपण घ्यावी. त्याशिवाय माझ्या खजिन्यांतून आणखी कांही हवे असले तरी आपण ते घ्यावे. अनमान करुं नये." राजाने अत्यंत नम्रपणे म्हटले.

"नाही महाराज. मी आपल्या खजिन्यांतल्या वस्तूंपैकी कांहीही घेणार नाही. कारण तो जनतेचा पैसा आहे. पण आपल्या निढळाच्या घामाची जी कमाई आहे ती मात्र मी घेईन. मला तो पैसा व कवडी आपण द्यावी." ब्राम्हणाने म्हटले.

राजाने आपल्या अंगरख्यातून ती नाणीं काढली व ब्राम्हणाला दिली. ब्राम्हणाने राजाचे आभार मानले व म्हटले, "ही नाणी आपली खरी कमाई आहे आणि म्हणून मला ती फार मूल्यवान वाटते."

ब्राम्हणाच्या चेहऱ्यावर आनंद फुलला होता. ब्राम्हण घरी परत गेला.

राजवाड्यांत जाऊन राजाकडून आपला पती काय आणणार याबद्दल त्याची पत्नी उत्सुकतेने



वाट पहात होती. कांही किंमती उपहार व भरपूर धन घेऊन नवरा घरी येईल अशी तिला आशा होती." काय आणलं आहेत हो?" ब्राम्हण हंसतमुखाने येत होता, त्याला तिने विचारले.

"कांहीतरी फारच किंमती असलेली, या राज्यांत आजपर्यंत राजाकडून कुणालाही न मिळालेली, अशी अमूल्य वस्तू घेऊन आलोय मी!" ब्राम्हणाने सांगितले.

"दाखवा कीं लवकर!" पत्नीने उत्सुकतेने विचारले.

ब्राम्हणाने आपल्या शालीच्या घडींत, गुंडाळलेला एक तांब्याचा पैसा व एक कवडी हळुवारपणे काढली व पत्नीच्या हातावर ठेवली. "ही महाराजांच्या निढळाच्या घामाची कमाई

आहे. त्यांच्या खजिन्यांतल्या किंवा अंगावरच्या जवाहिरापेक्षां जास्त मूल्यवान व वैशिष्ट्यपूर्ण आहे. बाकीची धनदौलत त्यांना लोकांकडून भेट मिळालेली आहे. हा यांतला मूळ फरक आहे बरं!''

''बाई ग! एक पैसा नि कवडीच कां फक्त आणलीत तुम्ही? आणि याची अमोल किंमत म्हणताय कां? बाई, बाई, अहो, झालंय तरी काय तुम्हाला?'' तिने रागाने ती दोन्ही नाणी अंगणात भिरकावली. त्यांचं घर छोटं होतं तरी आवार मोठं होतं.

ब्राम्हण दमून परत आला होता आणि त्या-क्षणीं तरी बायकोबरोबर वाद घालायची त्याची इच्छा नव्हती. शांतपणे तो आपल्या नित्य-कर्मांकडे वळला. त्याची बायकोही घरकामांत गुंतली. दोघांनाही त्या तांब्याच्या पैशाची व कवडीची आठवण राहिली नाही, आणि दोघेही झोंपी गेले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं ते उठतात तो काय? आवारांत जिथें तो पैसा पडला होता तिथें सोन्याच्या नाण्यांचे झाड उभे होते आणि फळें लगडल्यासारखी त्या झाडावर सोन्याची नाणी लटकत होती.

जिथें कवडी पडली होती तिथें चांदीच्या कवड्यांचे झाड होते. त्याच्या फांद्यांवर जिकडेतिकडे चांदीच्या कवड्याच दिसत होत्या.

दोघांनाही खूप आनंद झाला व ती नाणी व कवड्या गोळा दोघे करुं लागली. ब्राम्हणाने ती एका सोनाराकडे नेऊन विकली.

''तरी तुला मी सांगत होतो कीं आजपर्यंत राजाकडून इतके बहुमोल बक्षीस कुणालाही मिळालेले नव्हते.''

पत्नी शरमून गेली होती. ''माझं खरंच फार चुकलं हो. ती नाणी रागाने भिरकावून दिली होती मी!'' ती ओशाळवाणी होऊन म्हणत होती.

त्यानंतर तो ब्राम्हण व त्याची बायको सधन आणि सुखवस्तू झाली. त्यांना कसलीही कमतरता भासली नाही. ती दोघेही सुखासमाधानाने राहूं लागली.







# घाई

विष्णु हा शांताचा एकुलता एक मुलगा होता. त्याच्या वडिलांच्या निधनानंतर त्यांचा व्यापार तो अतिशय जबाबदारीने व कुशलतेने सांभाळत होता. तो साहजिकच शांताचा फार लाडका होता.

एक दिवस त्याला जेवण वाढताना ती म्हणाली, ''या दसऱ्याच्यावेळीं तुझ्या वडिलांचे जिवलग मित्र रामराव आपल्या मुलीला घेऊन इथें येणार आहेत.''

''रामराव? हे कोण रामराव? मी तर त्यांचे नांव कधी ऐकल्याचे आठवत नाही.'' विष्णूने आश्चर्याने विचारले.

होकारार्थी मान डोलावीत शांता म्हणाली, ''अरे, तुझ्या जन्मापूर्वी आम्ही दोघे एकाच वाड्यांत रहात होतो. आमची वेगळी बिऱ्हाडे असली तरी अगदी एका कुटुंबासारखाच आमचा घरोबा होता. दोघांची अगदी घनिष्ट मैत्री होती. पण कांही वर्षांनंतर रामराव व्यापारासाठी दूर प्रांतांत गेले. तिकडे काम वाढल्यामुळें त्यांना कधी इकडे यायला जमले नाही. आता त्यांना आपल्याला भेटायची फार इच्छा आहे. इथें येण्याचे आणखी एक कारणही आहे. त्यांच्या मुलीसाठी ते चांगले स्थळ शोधत आहेत. म्हणून त्यांनी आपल्या मुलीला घेऊन इथें येणार असल्याचे कळवले आहे.''

कांही क्षण विचार करुन ती पुढे म्हणाली, ''तू चांगला व्यापारी बनला आहेस हे त्यांना कळलं असेल. म्हणून कदाचित तुझ्याकडेच ते चांगला योग्य मुलगा म्हणून बघत असावेत. हे देखील एक कारण असूं शकेल.''

आईचे बोलणे ऐकून विष्णू आश्चर्य चकित होऊन म्हणाला, ''मग काय झालं? येऊं

ललिता जयस्वाल



देत कीं!''

''अरे, ते येणार आहेत म्हणून मला आनंदच वाटतोय. पण त्यांची बायको फार खाष्ट नि कंजूष आहे असं ऐकलंय. त्यांची मुलगी आईसारखीच असली तर? शेजारची रुक्मिणी म्हणत होती कीं सीतारामाच्या मुलीसाठी, जलजासाठी, तुझे नांव तिने सुचवले आहे. म्हणून जर रामरावांनी तुला याबाबतीत कांही विचारले तर त्यांना माझ्याशी बोलायला सांग. मला विचारल्याशिवाय कांही तू एकटा निर्णय घेऊं नकोस.''

रामराव लेकीला घेऊन आले. शांता व विष्णूने त्यांचे प्रेमाने आगत स्वागत केले. पद्माचा प्रसन्न स्वभाव व सौंदर्य शांताला आवडले.

विष्णू जेव्हां रात्री घरी आला, तेव्हां ती त्याला म्हणाली, ''हे बघ, ही मुलगी किती चांगली, सुस्वभावी आहे. अशी मला सून हवी! दोनतीन दिवसांत जर रामरावांनी कांहीच विषय काढला नाही, तर मीच त्यांना विचारीन.''

''अग, आई, त्यांचं काय मत आहे ते अगोदर कळल्याशिवाय घाई करुं नकोस हां!'' विष्णूने जरा सावध पवित्रा घेतला.

दोन दिवस गेल्यानंतर विष्णू एकटाच बसला होता. तिथें येऊन शांता त्याला म्हणाली, ''पद्मा मला फारच आवडली आहे. घरांतल्या कामाची तिला आवड दिसतेय. पण रामराव लग्नाचा विषय माझ्याजवळ कां काढीत नाहीत ते कांही मला कळत नाही. आज मीच त्यांच्याशी बोलते. तुला काय वाटतं?''

विष्णूने जरा चिडून म्हटले, ''ते लोक आठवडाभर इथें राहाणार आहेत ना? जरा धीर धर कीं! तू जर अशी घाई केलीस तर आपलीच किंमत त्यांच्या दृष्टीने कमी होईल.''

शांता मुकाट्याने तिथून निघून गेली. विष्णूही तिथून जाऊं लागला, तितक्यांत 'विष्णू' म्हणून गोड आवाजांत हांक आली. त्याने वळून पाहिले तर पद्मा त्याच्याकडेच येत होती.

''आत्ता तुमची आई व तुम्ही जे बोलत होतात ते मी ऐकले आहे.'' ती त्याला म्हणाली.

विष्णू चांचरत म्हणाला, ''आईची प्रत्येक



बाबतीत घाई असते. म्हणून ...'' आणि तो गप्प बसला.

पद्माने किंचित हंसून म्हटले, ''आईच्या मनांतले विचार मी ओळखले आहेत. त्यांना भिती वाटते कीं येणारी सून कशी असेल. त्यांच्याशी पटवून घेईल कीं नाही! म्हणून त्यांना शांत स्वभावाची मुलगी हवी असणार, आणि त्यांत कांही गैर नाही किंवा घाईही नाही. कारण तुम्ही एकुलते एक आहात.''

विष्णूने 'होय' म्हणून मान डोलावली. पद्मा पुढें म्हणाली, ''माणसाची मनोवृत्ती एकदा समजली की त्याची आवडनिवड कळते. नाहीतर फुटलेल्या आरशांत दिसतात, तशी वेडीवाकडी चित्रें दिसायला लागतात. माझे वडील चांगले व्यापारी आहेत, निर्व्यसनी आहेत. पण माझी आई जरा अबोल नि एककली आहे. म्हणून लोक तिला भांडखोर नि कंजूष म्हणतात. आपल्या परिचयांतले लोक तिच्याबद्दल काय बोलतात ते माझ्या वडिलांना ठाऊक आहे. म्हणून हा लग्नाचा विषय तुमच्या आईच्याजवळ काढायला त्यांना जरा संकोच वाटतो आहे. जर आईनीच विषय काढला तर माझ्या वडिलांना फार बरे वाटेल.''

असं बोलताना तिचे डोळे भरुन आले, आणि तिने खालीं मान घातली.

विष्णूने एक पाऊल पुढे टाकले नि तिचा हात हातांत घेऊन तो म्हणाला, ''घाई आईला नाही, मला झाली होती. मागचापुढचा कांही एक विचार न करता मनांत येईल ते मी स्पष्ट बोललो. मला माफ कर. पण आता मात्र घाई करायलाच हवी.''

''कशाची घाई?'' पद्माने आश्चर्याने विचारले.

''आपले लग्न ठरवायची घाई! ज्या मुलीने माझ्या आईला नि मला जिंकले आहे, तिचे लग्न ठरवायची घाई नको कां करायला?'' विष्णूने हंसून विचारले.

पद्मा हंसली आणि लाजून तिथून आंत निघून गेली.





# सुवर्णपात्र

**पां**चव्या कल्पात बोधिसत्वांनी सेरिवा नावाच्या देशात भांडी विकणारा तांबोळी म्हणून अवतार धारण केला. ते जुनी भांडी विकत घेऊन त्यांच्या-ऐवजी नवी भांडी देत. या धंद्यात बोधिसत्व उचित तेवढेच लक्ष घेत.

त्याच देशात भांड्याचा व्यापार करणारा आणखी एक व्यापारी होता. तो फार लोभी होता. तो व बोधिसत्व परस्परांच्या सल्ल्याने कोठे जायचे ते ठरवून व्यापार करीत.

एकदां दोघे मिळून तेलिवाहा नावाची नदी पार करून आंध्रपुर नांवाच्या गांवी पोचले. एकाच्या धंद्याच्या आड दुसरा येऊ नये या हेतूने दोघांनी त्या गांवातले निरनिराळे भाग वांटून घेतले, आणि दोघे आपापल्या वांट्याच्या भागात व्यापाराला निघाले.

त्या आंध्रपुर गावात एका वाण्याचे घर होते. त्या वाण्याचे कुटुंब एका काळी चांगले श्रीमंत होते, परंतु पुढे त्यांना गरीबी आली. त्या कुटुंबातले दोघे भाऊ आणि संपत्ती गेल्यावर उरले काय ते दारिद्र्य, एक म्हातारी आई, आणि तिची लहान मुलगी. दोघी घरोघरी काम करून आपला उदरनिर्वाह चालवीत होत्या.

त्यांच्या घरात बरीचशी जुनी भांडी होती. त्यात एक सोन्याचे भांडे होते, चांगली स्थिती असताना ते वापरात नव्हते. त्यामुळे वापरात नव्हते म्हणून थोडे फिक्के पडले होते. ते सोन्याचे आहे हे दोघींनाही माहीत नव्हते.

लोभी व्यापारी "भांडी घ्या भांडी, पातेल्या, तपेल्या! जुन्या द्या व नव्या घ्या!" असे ओरडत त्या बायका रहात त्या घरासमोर आला.

तो आवाज ऐकून मुलगी म्हातारीला म्हणाली, - "आई, मला काही तरी घे की ग!"

"कांही तरी देऊन तुला कांही घ्यायचं झालं तरी आपल्याजवळ द्यायला आहेच काय?" आई म्हणाली.

"आपल्याकडे एक भांडं आहे कीं ग, कधी आपण ते वापरतसुद्धा नाही! ते देऊन घे की माझ्यासाठी काही तरी!" मुलगी म्हणाली.

म्हातारीने त्या लोभी व्यापाऱ्याला बोलावून आत बसायला सांगितले व ते भांडं दाखवून म्हणाली - "बाबा रे, हे घेऊन याच्याबद्दल तुझ्या या बहिणीला काहीतरी दे की!"

लोभी व्यापाऱ्याने ते भांडं हातात घेतल्याबरोबर त्याला वाटले की ते सोन्याचे असावे. त्याने ते हातातल्या हातात दोन तीनदा फिरवून पाहिले. उपडे केले, उताणे केले, काठीने वाजवून पाहिले व सोन्याचे असल्याची खात्री करून घेतल्यावर ते स्वस्तात उडविण्याचे ठरवून म्हणाला - "याबद्दल काय येणार आजी? याची किंमत आहेच कमी!" आणि भांडे टाकून उठला आणि निघून गेला.

दोघां व्यापाऱ्यांनी आपसात ठरवले होते कीं, एकजण ज्या गल्लीतून फिरून गेला असेल त्या गल्लीत त्यानंतर दुसरा गेला तरी हरकत नाही. कांही वेळाने बोधिसत्व "भांडी घ्या भांडी" म्हणत त्या बायका रहात त्या गल्लीत त्यांच्या घरासमोर आले.

तो आवाज ऐकून मुलगी आईला म्हणाली - "आई, घे की ग काही तरी!"

"या भांड्याशिवाय आपल्याजवळ आहे तरी काय मुली? हे भांडे काही कामाचे नाही म्हणून तो तांबोळी फेकून नव्हता का गेला? मग काय देऊ अन् काय घेऊ?" आई म्हणाली.

"तो तांबोळी चांगला नव्हता आई, लबाड होता. हा तांबोळी पहा, आवाजावरून किती चांगला वाटतो आहे!" मुलगी म्हणाली.

आईने बोधिसत्वांना घरांत बोलावून बसायला सांगितले आणि त्यांना ते भांडे दाखविले.

बोधिसत्वांनी ते भांडं पाहिलं व ते सोन्याचेच असल्याची खात्री करून घेऊन म्हणाले - "आई, हे एका लाखाचं तरी असेल की हो ! याच्या बद्दल देण्यालायक माझ्याजवळ मालच नाही !"



''बाबा रे, थोड्यावेळापूर्वी एक तांबोळी येऊन हे कवडीमोलाचे आहे असे सांगून भांडे फेकून देऊन गेला होता. असेल हे सोन्याचंच तू म्हणतोस तसे! तू हे घे आणि तुला वाटेल ते त्याबद्दल दे!'' म्हातारी म्हणाली.

बोधिसत्वांनी त्यांच्याजवळ पांचशे रुपये होते ते आणि पांचशे रुपये मिळतील एवढी त्यांच्या जवळ भांडी होती ती त्या दोघींना दिली व म्हणाले - ''आई, परत प्रवासापुरते आठ रुपये, ही पिशवी आणि तराजू शिवाय माझ्या जवळ जो माल आहे तो सर्व तुम्हाला देतो, घ्या!'' असे सांगून व सर्व माल देऊन बोधिसत्वांनी सोन्याचे भांडे घेतले आणि निघून गेले.

त्यांनी ठेवून घेतलेले आठ रुपये नदी पार जायला तरीवाल्याला द्यायला लागले.

नंतर लोभी लबाड व्यापारी आपण केलेली युक्ती फळाला येते का पाहण्यासाठी पुन्हां त्या बायका रहात त्या घरासमोर येऊन मोठ्या आविर्भावाने म्हणाला - ''बरं तर टाका इकडे ते भांडे आणि घ्या त्याबद्दल एकादे भांडे!''

म्हातारी संतापून लबाड व्यापाऱ्याला म्हणाली - ''काय रे बाबा! लाख रुपयाच्या भांड्याला कवडी मोलाचे म्हणून टाकून गेला होतास की! दुसरा एक धर्मात्मा तांबोळी आला होता तो एक हजार रुपये देऊन भांडं घेऊन गेला.''

ते ऐकत्तांच त्या लबाड व्यापाऱ्याला भ्रम झाल्यासारखे झाले.

''लाख रुपयाचं भांडे त्याने उडवलं का? माझं केवढे नुकसान झालं?'' असे म्हणत, कपाळ बडवीत रडत आणि वेड लागल्यासारखा जवळचा सर्व माल व पैसा त्या बाईजवळ टाकून देऊन आणि अंगावरचे उपरणे घसरुन खाली पडत होते तिकडे ही लक्ष न देता फक्त तराजू हातात घेऊन नदीकाठी धावत गेला. बोधिसत्व तरीत बसून प्रवाहाच्या मध्यभागी पोचलेले दिसले.

त्या लोभी व्यापाऱ्याने तरीवाल्याला तर परत आणायला हाका मारल्या. ''परत कशाला न्यायची रे'' बोधिसत्व तरीवाल्याला म्हणाले. बोधिसत्व नदीपार उतरलेले लबाड व्यापाऱ्याने पाहिले मात्र, त्याला आवेश चढला आणि तो छाती बडवू लागला. त्याच्या तोंडातून रक्त येऊ लागलं. बोधिसत्वांच्या द्वेषाने त्याची छाती फुटली व तो तेथेच गार झाला.

बोधिसत्वांनी दानधर्म करीत पुढले आयुष्य घालविले.







# विष्णुपुराण

सूतमुनी नारदाच्या तपश्चर्येची कथा सांगू लागले: पूर्वी नारद एका दासीच्या पोटी जन्मला. ती दासी एका भागवत्तोमाच्या घरी काम करीत असे. त्या भागवत्तोमाच्या घरी नेहमी थोर ऋषी व मुनी येत आणि त्यांचे तो चांगले आतिथ्य करी. नारद फार लहान होता, तरी त्या बाल्यावस्थेतही तो त्यांना पाणी प्यायला आणून देई. अशाच प्रकारे त्यांची लहानमोठी कामे करून त्यांची सेवाचाकरी करी. त्या वेळी ज्ञानी मुनी आपसांत थोर ज्ञानाच्या व विष्णूच्या मायेच्या गोष्टी बोलत. नारद त्या आनंदाने ध्यानपूर्वक ऐकत असे. पाणी म्हणजे 'नीर', ते देणारा म्हणून मुनी त्याला 'नारद' म्हणून हांक मारीत. नारदाच्या बालवयांतच त्याची आई साप चावल्याने मरण पावली.

त्या बालकाला त्याचा बाप कोण, काय, कांही माहीत नव्हते. बरोबरची मुलें नारदाला 'दासीपुत्र', म्हणून त्याचा अपमान करीत.

पुढे कांही दिवसांनी त्याचा मालक भागवतोत्तम ब्राह्मणसुद्धां निर्वतला. नारद निराश्रित होऊन, भुकेने जीव कासावीस झाल्यासारखा दारोदारी फिरू लागला. त्याला 'चोर' म्हणून लोक हांकलू लागले. खट्याळ मुलें दगडधोंडे मारून रडवीत आणि त्यांतच त्यांना गंमत वाटे.

''मी कशाला जन्मलो? मी असं काय पाप केलं की मला इतक्या अन्यायाने हे लोक मारहाण करतात? कृमीकीटक व जनावरे सुद्धा रानावनांत स्वच्छंदपणे हिंडतात, फिरतात!'' असा विचार करीत नारदाने गांव सोडून जंगलाची वाट धरली. त्याला मुनी आपसात बोलत, त्या गोष्टींची आठवण झाली.



"मी तपश्चर्या कां करू नये? कुलीन कुटुंबात मी जन्मलो पाहिजे!" असे ठरवून नारदाने तपश्चर्या सुरु केली.

"अनाथांचा नाथ? या त्रिलोकाचा जो पिता तोच माझे सर्वस्व! त्याने मला कसंही ठेवावे, मला ते मान्य!" असे मनाशी ठरवून नारदाने तपश्चर्या केली. नारदाचे तप फळाला आले. त्याच्यावर तेजोमय प्रकाशाचा झोत पडला.

स्वतः विष्णूच प्रसन्न होऊन ज्योतिरूपे प्रगट झाला होता, तो म्हणाला - "वत्सा, नारदा! तू माझ्यात लीन होत आहेस. तू ब्रह्मदेवाचा मानसपुत्र म्हणून जन्मला येशील. तुझ्यांत माझा अंश असेल. तू चिरंजीवी होशील. त्रिकालाबाधित त्रिलोकांत तू भ्रमण करीत महान कीर्ती संपादन करशील." असे विष्णूने वरदान दिले.

नारद विष्णूचा अंश म्हणून व ब्रह्मदेवाचा मानसपुत्र देवर्षि म्हणून जन्मला व त्रिलोकाच्या आदरास पात्र झाला. विष्णूच्या अनेक लीलावतारांत नारदाचा अवतार हा एक अवतार गणला गेला.

अशा थोर देवर्षी नारदाचा उपदेश ग्रहण करून ध्रुव झपाझप चालू लागल्यावर एकदम समोर "दादा! थांब, अरण्यांत जाऊं नकोस!" असे म्हणत उत्तम रडत धावत आडवा येऊन उभा राहिला व हात धरून म्हणाला - "दादा, तू असा अरण्यांत निघून गेलास तर मी एकट्याने कोणाबरोबर हरिभजन करावयाचे? खेळायला तरी मला तुझ्यासारखा भाऊ कोठे लाभणार? माझी आई तुला फारच बोलली, पण तुझा माझ्यावर राग कां?" असे म्हणून तो ओक्साबोक्शी रडू लागला.

ध्रुवाने उत्तमला मिठी मारली व म्हणाला - "माझ्या लाडक्या उत्तमा, मला जन्म दिल्याबद्दल माझ्या आईलासुद्धां थोरपण यायला नको का?"

"तर मग मीसुद्धां तुझ्याबरोबर अरण्यांत येतो. तू तपश्चर्या करशील तेव्हां तुला मी फळे, फुले, वगैरे आणून देईन." उत्तम म्हणाला.

ध्रुव म्हणाला - "तसं केलंस तर तुझी आई तुझ्यासाठी रडेल की रे! मी तुझा दादा ना! मग तू माझं ऐकलं पाहिजेस!"

ते ऐकून उत्तम तसाच रडत उभा राहिला. जागचा हालला नाही. त्याच वेळी सुरुची धावत आली व त्याला तिने मिठी मारली. परंतु उत्तम तिला झिडकारीत म्हणाला - "आई, तू मला शिवू नकोस! तुझ्यामुळेच माझा दादा निघून जातो आहे!"

सुरुचीची मान लाजेने खाली झाली व ती म्हणाली - "होय बाबा! मीच पापिणी आहे, सर्व गोंधळ माझ्यामुळेच झाला!" असे ती म्हणत असता उत्तानपादराजा स्वतः आला व ध्रुवाला मिठी मारीत म्हणाला - "ध्रुवा बाळा! थांब! हे सर्व माझ्या मंदबुद्धीमुळे घडले. माझे सिंहासन हे तुझेच आहे. ये, बाळ!" तोपर्यंत ध्रुव पुष्कळच दूर निघून आला होता.

त्यानंतर नारद सुनीतीला म्हणाला - "माते, तू खरोखरीच रत्नगर्भा आहेस! तू आपल्या मुलाची काळजी मुळीच करू नकोस! स्वतः नारायण त्याच्या रक्षणाला समर्थ आहे!" असे सांगून नारद उत्तानपाद राजाला म्हणाला - "ही आपण सर्वांनी आनंद मानावयाची ही वेळ आहे. तुझे वडील, ध्रुवचे आजोबा स्वयंभू मनू होते त्यांच्या वंशाला ध्रुव मोठी कीर्ती संपादन करून देईल. यांत कोणी कोणाला दोष देण्याचे कारण नाही. ही सर्व त्या नारायणाची इच्छा व संकल्प आहे!" असे सांगून नारदाने सर्वांचे सांत्वन केले.

ध्रुव मधुवनात "ओम् नमो नारायणाय" मंत्राचा जप करीत तपःश्चर्या करीत असतां यमुना नदीची मंदधारा त्याबरोबर ताल देत होती, आणि क्रूर रानटी जनावरे त्याच्या चारी बाजूला आप्त मित्रांसारखी हिंडत होती. त्याच्या घोर तपःश्चर्येमुळे त्रिलोक हादरून गेला.

कोणी कोठेही तपश्चर्या करूं लागला की



इंद्राला वाटे की आपले आसन बळकावण्याचा तो प्रयत्न आहे. म्हणून इंद्राने ध्रुवाच्या तपश्चर्येत विघ्ने आणायचा प्रयत्न सुरू केला. वज्रप्रहार करून त्याने पाऊस, वीज व गारांचा वर्षाव केला. परंतु ध्रुव जागचा हलला नाही. इंद्राने दगडांचा वर्षाव सुरु केला, तेव्हां विष्णूचे सुदर्शन चक्र ध्रुवाचे रक्षण करण्यासाठी त्याच्या डोक्यावर फिरत राहिले व सर्व दगड दूर जाऊन पडले.

तेव्हां नारद इंद्राला म्हणाला - "ध्रुवाला तू सामान्य बालक समजत आहेस कां? तू त्याच्या केसालाही धक्का लावू शकणार नाहीस! विनाकारण तू भिऊं नकोस! इंद्रपद म्हणजे त्याला काडी किंमतीचेही वाटत नाही, समजले का?"

ध्रुवाच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन विष्णूने त्याला दर्शन दिले. ध्रुवाने विष्णूच्या पायांना मिठीच मारली आणि त्याच्या प्रसन्न वदनाकडे



एकाग्र होऊन आनंदाश्रू ढाळीत तो पहात राहिला. त्याच्या कंठातून शब्द उमटेना. त्याच्या मनात म्हणायचे होते - ''देवा, तोंड भरून तुझी स्तुती करावी वाटते, पण मी अबोध बालक आहे, काय बोलावे तेच कळत नाही!''

विष्णूने आपला शंख ध्रुवाच्या गालाला लावला मात्र, लगेच वेदवेदांतातले सारभूत थोर स्तोत्र सामगानासारखे ध्रुवाच्या तोंडावाटे प्रगट झाले.

विष्णूने मंदहास्य करीत विचारले - ''बाळा, ध्रुवा! माग, तुला काय हवं ते!''

ध्रुव म्हणाला - ''हे परमपुरुषा! भ्रमर जसा कमळाला चिकटून रहातो तसे माझे मन तुझ्या मधुर मंदहास्यवदनाच्या कमळावर नित्य खिळून राहील, एवढेच मला हवे आहे, याशिवाय काही नको !''

''तथास्तु! तू आपल्या राज्यात परत जा व धर्म व न्यायाने राज्य कर. त्यानंतर तू माझे स्वस्वरूप असलेल्या विश्वाच्या शिरोभागी असलेल्या ध्रुवपदाला पोहोचशील! कल्पकल्पांतांपर्यंत तू त्या पदावर स्थिर राहशील!'' असे वरदान देऊन विष्णू अंतर्धान पावला.

विष्णूने ध्रुवावर अनुग्रह करण्यासाठी जो अवतार धारण केला त्याला 'ध्रुव नारायणावतार' हे नाव प्राप्त झाले. ध्रुव माहिष्मती नगरीला परत आला. उत्तानपाद राजाने ध्रुवाचा राज्याभिषेक करून दिला आणि तो स्वतः वानप्रस्थाश्रमात तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला.

उत्तमाचा विवाह झाला नव्हता. तो राजधर्माला अनुसरून प्रजेला हिंस्र पशूपासून कांही त्रास होऊ नये यासाठी शिकारीस जाऊ लागला. हिमालय पर्वताच्या अरण्यांत दुष्ट यक्ष रहात, त्यांनी त्याच्याशी वैर धरून त्याला ठार केले.

पुत्रशोक अनावर झाल्याने सुरुची तिकडे गेली आणि पेटलेल्या वणव्यांत सांपडून जळून गेली.

ध्रुवाने यक्ष जातीचे निर्मूलन करण्यासाठी त्यांची राजधानी अलकापुरीवर स्वारी केली. क्षुद्र मायावी यक्षांनी मायाजालाचा प्रयोग करून पाहिला. ध्रुवाने नारायणास्त्राचा प्रयोग करून यक्षांचे मायाजाल छिन्नभिन्न करून नष्ट केले.

कुबेर ध्रुवासमोर हात जोडून शरण मागायला आला आणि त्याला अलोट संपत्ती व मूल्यवान भेटी देऊन त्याला त्याने खूष केले.

ध्रुवाला पुत्रसंततीचा लाभ झाला. त्याने एक आदर्श राजा म्हणून चिरकाल राज्य केले आणि स्वायंभू मनूच्या वंशाला कीर्तिलाभ करून दिला.



शेवटी आपल्या थोरल्या मुलाचा राज्याभिषेक करून देऊन बद्रिकाश्रमी प्रस्थान केले. तेथे विष्णूचे ध्यान धरून तपश्चर्या करीत त्याने स्वर्ण देह संपादन केला.

श्री विष्णूच्या आज्ञेने विष्णुदूत विमान घेऊन आले. त्यांना विष्णूसारखेच चार हात होते.

ध्रुव त्यांना म्हणाला - ''माझ्या आईला प्राप्त नाही, ते पद कितीही उच्च असले तरी त्याची मला गरज नाही!'' विष्णूदूतांनी प्रथम एका विमानांतून वर जात असलेल्या सुनीतीला दाखविले. तेव्हां ध्रुव विमानात बसला आणि अनुक्रमे ग्रहमंडळ, नक्षत्र मंडल आणि सप्तर्षी पार करून ध्रुवपदापर्यंत प्राप्त झाला. ध्रुवपदाला विष्णु पद किंवा ध्रुवक्षिती असेही म्हणतात. विष्णूचे निवासस्थान जे वैकुंठ तेथेच आहे. ध्रुवक्षितीतच गोलोक आहे. गोलोकात विष्णू द्विभुज रूपांत कृष्ण म्हणून, व प्रकृती ही राधा म्हणून राहून वेणुगान करीत आनंदाने विहार करतात. गोलोकाच्या वर घोर अंधःकार पसरलेला असतो. त्या वैकुंठलोकात वास करतो. ध्रुव नित्य निर्निमिष अंधःकारापलीकडे विष्णूकडे एकटक पहात असतां, त्याची ज्योति नित्य प्रकाशित होत असते. खुंटाला बांधलेल्या गाईसारखे सप्तर्षिमंडल ध्रुवाच्या चारी बाजूला प्रदक्षिणा करते. त्याच्या-खाली त्यावेळी सर्व ग्रह मंडल व नक्षत्रमंडल चक्राकार फिरत असतात.

गोलोकाच्या खाली ब्रह्मदेव राहतो. तो सत्य-लोक, पुढे जनलोक, महर्लोक, स्वर्लोक, भुवलोक, भूलोक, असे ऊर्ध्वलोकांत सातलोक आहेत आणि



भूलोकाच्या खाली अधोलोकांतील अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल व पाताळ असे सात लोक मिळून चवदा लोकांच्यावर विश्व-शिखराच्या अग्रस्थानी राहून ध्रुव अचलावस्थेत राहून, सर्व विश्वाला प्रकाशित करतो.

दीक्षा असावी, परंतु लहानथोर हा भेद न मानता कितीही मोठे ध्येय गांठणे अशक्य असू नये. त्याचे उदाहरण म्हणजे पांच वर्षे वयाच्या ध्रुवाने तपश्चर्या करून जे साध्य केले ते होय!" या शब्दांत सूत महर्षी ध्रुवचरित्र संपूर्ण करून पुढे सांगू लागले.

"मत्स्य म्हणजे मासा. हा एक केवळ जलचर प्राणी आहे, तर कूर्म म्हणजे कासव, हे पाण्यांतही व जमिनीवरही वास करणाऱ्या प्राण्यांपैकी एक आहे. पाण्यांतून प्राणी जमिनीवर आला. म्हणजे जलचर अवस्थेतून भूचर अवस्थेत त्याने प्रवेश केला.

विष्णूने असाच कांसव होऊन कूर्मावतार धारण केला! "असे सांगून सूत महर्षींनी कूर्मावताराची गाथा सुरू केली.

"देव व दानव म्हणजे सुरासुरांनी क्षीरसागराचे मंथन सुरू केले. त्यांना या समुद्रमंथनाने अमृतप्राप्ती होईल असा विश्वास होता.

"अमृतप्राप्ती झाली तर ती सर्व आपल्याच प्राप्त होईल!" असे भुजबलावर आणि संख्याबळावर अवलंबून राहणाऱ्या राक्षसांना वाटत होते.

"राक्षसांना अमृतप्राप्ती झाली व अमृतत्व लाभले तरी आपला बिघाड असा काय होणार? आपला सर्व भार त्या विष्णूवर तर आहे!" असे देवांना वाटत होते.

क्षीरसागरांत मंदार पर्वताला रवीसारखा उभा करून, वासुकी नागाला त्या रवीला बांधून समुद्र-मंथन करावयाचे ठरले, परंतु मंदार पर्वताला आणून त्याला क्षीरसमुद्रात आणून उभा करणे कोणाला शक्य नव्हते. म्हणून विष्णूने अनुग्रह करून ते काम केले आणि गिरिधारी ही कीर्ती संपादन केली.

राक्षसांनी वासुकीला त्याच्या तोंडाकडून धरतो, असा हट्ट धरला. 'ते मान्य करा', असा सल्ला विष्णूने देवांना दिला आणि सर्व देवांना पुढे धरायला सांगून शेपटाचे टोंक स्वतः विष्णूने धरले. नंतर क्षीरसागराचे मंथन सुरू झाले.







विविध संस्कृतींमधल्या गोष्टी

# जेव्हां पऱ्या बाजार करायला आल्या...

**मि**लफर्ड-हेवन हे वेल्सच्या वालुकामय किनाऱ्यावर वसलेले एक लहानसे शहर होते. तिथले लोक अगदी शांत, साधे जीवन व्यतीत करत होते. पण कांही दिवसानंतर कांही विचित्र व चमत्कारिक घटना घडायला लागल्या.

दुकानांतून सामान अकस्मात नाहीसे होऊं लागले आणि ज्यांचे सामान नाहीसे होत होते, त्यांच्यासमोर कांही सोन्याच्या मोहरा येऊन पडायला लागल्या.

एके दिवशी एक दुकानदार, ग्रिफीथ, आपल्या शेवटच्या गिऱ्हाईकाला निरोप देऊन कपाळावरचा घाम पुसत, आणि जरा दम टाकीत स्वस्थ बसला होता, तोच त्याच्या डोळ्यांसमोरच असलेला एक मोठा भोपळा अचानक अदृश्य झाला, जागेवरून नाहीसा झाला. ते पाहून तो गडबडला आणि लागलीच तिथें कांही नाणी येऊन पडली. ते पाहून तो हैराण

झाला. चकित मुद्रेने त्याने ती नाणी उचलली. त्या नाण्यांजवळच एक सोन्याची लहानशी काठी होती. त्याने ती उचलली आणि नाण्यांबरोबरच तीही खिशांत घातली.

पण हे सगळं काय आहे? हे विचित्र प्राणी कोण आहेत? कांही क्षणांपूर्वी तर ते कांही इथें नव्हते. ग्रिफिथचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. त्याच्या डोळ्यांसमोर मोहक, रंगीबेरंगी पोशाखांत असलेले छोटेछोटे प्राणी तुरुतुरु इकडेतिकडे हिंडत होते.

ते बाजारांत खरेदी करायला आलेले दिसत होते. ग्रिफिथने आपले डोळे चोळले, आणि आपण स्वप्नांत तर नाही ना हे पाहाण्यासाठी त्याने स्वतःला एक सणसणीत चिमटा काढून पाहिला.

त्याला लवकरच समजलं की फक्त त्यानेच या अद्भुत प्राण्यांना पाहिलंय. ''बहुतेक हे त्या काठीमुळें झालं असावं. मी ती उचलून ठेवली म्हणून आता मला या पऱ्यांना पाहाता येतंय.''

त्याने पाहिलं कीं ते छोटे प्राणी दुकानांतल्या



निरनिराळ्या भाज्या व फळें उचलून घेत होते आणि त्याच्या बदली त्याजागेवर सुवर्णाची नाणी ठेवून पुढें जात होते.

आता त्याच्या लक्षांत आलं. ''म्हणजे आपल्या गांवात वस्तू नाहीशा होतात आणि नाणीं प्रकट होतात, ती ह्यांच्यामुळें!'' तो एका चलाख व्यापारी होता. पऱ्यांना पसंत असणाऱ्या वस्तूंची त्याने एक यादी बनवली.

दुसऱ्या दिवशी त्याने त्या सगळ्या वस्तू आणून दुकानांत ठेवल्या आणि तो त्यांची वाट बघत बसला. जेव्हां बाजारांतली गर्दी संपली, तेव्हां पऱ्या तिथे आल्या.

त्या सरळ त्याच्याच दुकानावर आल्या आणि मनांत भरलेल्या वस्तू उचलायला लागल्या. जेव्हां त्या गेल्या तेव्हां त्याच्याजवळ सोन्याची ढीगभर नाणी जमली. पऱ्यांना त्याचे दुकान आवडले, आणि त्या वरचेवर तिथे येऊं लागल्या. लौकरच तो श्रीमंत झाला.

एके दिवशी तो समुद्रकिनाऱ्यावर फिरायला गेला होता. तेव्हां दूर अंतरावर त्याला एक बेट दिसले. पऱ्या उडत उडत त्या दिशेकडे जाताना त्याने पाहिल्या. ''त्या तिथेंच राहात असतील.'' त्याच्या मनांत आले.'' मला ते बेट दिसतंय, कारण या काठीची ती कृपा आहे!''

पऱ्यांच्याबरोबर आपला व्यापार वाढवण्याची योजना त्याने आंखली. त्यामुळे तो जास्तच धनवंत झाला असता. ''त्या बेटावरच माल घेऊन मला गेलं पाहिजे. म्हणजे मला तिथें आणखी बरीच गिऱ्हाईकें मिळतील. कारण सगळ्यांना कांही दररोज माझ्या शहरांतल्या बाजारांत येणे शक्य नाही. मग मी आणखीनच धनवान होईन.''

दुसऱ्याच दिवशी त्याने एक नाव घेतली. त्यांत



निवडक माल भरून तो त्या बेटाकडे निघाला. तिथे पोंचल्यानंतर त्याने आपली नाव किनाऱ्यावर ओढत आणली, व माल उतरवला. कांही पऱ्यांनी त्याला पाहिले. आपल्या या गुप्त बेटावर त्याला पाहून त्या चकित झाल्या. धावतच त्या आपल्या मित्रमैत्रिणींना सांगायला गेल्या.

बहुतेक पऱ्या या आगंतुकाला बघायला उत्सुकतेने पळत आल्या.

त्या सगळ्यांना पाहून ग्रिफिथ भलताच खूष झाला. ''या या, माझ्या स्नेह्यांनो! तुमच्या सगळ्यांसाठी मी कितीतरी गोष्टी घेऊन आलो आहे. म्हणजे रोज तुम्हाला आमच्या शहरांत यायचा त्रास नको!''

तोपर्यंत पऱ्यांचा प्रमुख तिथे पोहोचला. त्याने ग्रिफिथचे बोलणें ऐकले होते. त्याने त्या पऱ्यांना म्हटले, ''घाबरं नका तुम्ही. हा माणूस आता हावरट झाला आहे. त्याची हांव त्याला नक्कीच एक दिवस खड्ड्यांत घालील. पण आपल्याला त्याचा हेतू समजला आहे, असं कांही तुम्ही त्याला जाणवूं देऊं नका. जे कांही तुम्हाला खरेदी करायचं असेल ते करा. आणि त्याला रोज इथे यायचे निमंत्रण द्या. हळूं हळूं आपल्याला सारा उलगडा होईल.''

पऱ्यांनी खरेदी करायला सुरवात केली. पसंत पडलेल्या वस्तू घेतल्या, ''उद्यादेखील या हं, याच वेळी, याच ठिकाणी!'' एका चमकदार डोळ्यांच्या सुंदर परीने लाडिकपणे म्हटले. ती त्याच्या धाडसी वृत्तीवर खूष झाली होती.

ग्रिफिथ परत गेल्यानंतर पऱ्यांच्या प्रमुखाने त्यांना बोलावले. ''जेव्हां तो पुन्हां येईल तेव्हां त्याला विचारुन घ्या कीं या बेटाचा पत्ता त्याला कसा काय लागला? कारण आपले बेट मानवी दृष्टीला दिसत नाही कधी! जर हे रहस्य इतर




माणसांना समजले आणि त्यांची वर्दळ इथें सुरुं झाली, तर आपली शांतता नाहीशी होईल.''

दुसऱ्या दिवशी जेव्हां आपला माल घेऊन ग्रिफिथ तिथे आला, तेव्हां पऱ्यांनो त्याचे प्रेमाने स्वागत केले. त्यांच्या अगत्यशील कौतुकामुळें तो अगदी भारावून गेला आणि त्यांच्या जाळ्यांत अलगद फसला.

''आज तुमची भाजी अगदी ताजी आहे !'' एका छोट्या, देखण्या परीने ग्रिफिथच्या बघत आपली लांबसडक बोटे नाचवीत म्हटले.

''धन्यवाद, छकुले,'' ग्रिफिथने मनापासून आभार मानले.

त्यावर तिने विचारले, ''पण तुम्हाला आमचा ठावाठिकाणा कसा काय सांपडला? मला वाटलं होतं कीं आम्ही मनुष्यजातीला कधी दिसूं शकत नाही.''

''त्याचं काय झालं, कीं एक दिवस तुमच्यापैकी कुणीतरी आपली सोनेरी काठी माझ्या दुकानांत

विसरून गेले. तेव्हांपासून मला तुम्ही सगळीजण दिसूं शकता.'' तो म्हणाला.

''मला ती काठी पाहता येईल कां हो?'' त्या सुकुमारीने विचारले.

ग्रिफिथ तिला नाही थोडाच म्हणणार होता? त्याने चटकन आपल्या खिशांतून ती बारीक काठी बाहेर काढली. परीने हातांत घेऊन ती उलटसुलट करून बघितली. ''अगबाई, ही तर त्या डेझीची आहे. कांही दिवसांपूर्वीच ही हरवली होती आणि त्यानंतर कांही सांपडली नव्हती.'' ती म्हणाली.

तिने आपल्या मैत्रिणींना ही गोष्ट सांगितली. त्या सर्वांनी ती छडी पुन्हां मिळवण्यासाठी एक योजना तयार केली.

जेव्हां पुढच्या वेळेला ग्रिफिथ त्या बेटावर आला, तेव्हां ती सुंदर तरुण परी त्याच्याजवळ गेली. तिने त्याला ते संबंध बेट हिंडवून आणायचा प्रस्ताव मांडला. ते बेट रत्नांनी व जडजवाहिरांने भरलेले होते. घरांघरांतूनदेखील हिरे, माणके व पाचूंनी सजावट केलेली होती. ग्रिफिथच्या डोळ्यांतून लोभ स्पष्ट दिसायला लागला. ती सारी अफाट संपत्ती आता आपल्याला हस्तगत करता येईल अशी स्वप्नें त्याच्या नजरेसमोर तरळूं लागली.

''तुम्हाला इथून पाहिजे तितकी संपत्ती घेऊन जाऊं शकता. पण त्याच्या बदली तुम्ही कांहीतरी द्यायला हवं हां!'' त्या सुंदर परीने मोहक स्वरांत त्याला सांगितलं.

''काय हवंय?'' भाळलेल्या ग्रिफिथने लगेच प्रश्न केला.

''कांही विशेष फारसं नाही'' तिने अगदी हळूं व शांतपणे म्हटलं, ''काल तुम्ही मला जी लहानशी काठी दाखवलीत ना, ती हवीय मला!''

ग्रिफिथ तयार झाला. त्या परीने त्याला एक जागा दाखवली. तिथें निरनिराळ्या रंगांच्या व आकाराच्या रत्नांचे ढीग पडलेले होते. त्याला जेवढे जवाहीर नेता येणे शक्य होते, तेवढे घेऊन त्याने नावेवर ते लादले. तिला त्याने ती काठी दिली आणि तिचा निरोप घेऊन तो घरी परतला.

बिचारा ग्रिफिथ! तो नावेवर जसा चढून बसला आणि नाव त्याने पाण्यांत हाकारली, तसे त्याच्या नावेतले ढीग हळूंहळूं कमी होऊं लागले.

ते पाहून तो आश्चर्यचकित झाला, व नंतर चिडला आणि त्याने चारी दिशांना नजर फिरवली. एखादी परी जरी दृष्टीस पडली असती, तरी तिला त्याने विचारले असते कीं हे असं कां होतंय! पण आता तर ते पऱ्यांचे बेटच अदृश्य झाले होते. ग्रिफिथला समजलं कीं त्या काठीशिवाय त्याला आता त्या पऱ्या दिसूं शकणार नाहीत.

तो घरी परतला. पण त्यानंतर मिलफर्ड-हेवनमधे पुन्हां कधीही त्या पऱ्या आल्या नाहीत.









# सत्यवानाचा चमत्कार

भाग्यपुरींत सत्यवान नांवाचा एक महापंडित राहात होता. त्याचे बोलणे फारच आकर्षक असे. त्याच्या या गुणाची लोक नेहमी भरपूर प्रशंसा करीत. तो अनेक शास्त्रविद्यांमधे पारंगत होता, पण तरीसुद्धां अगदी विनम्र होता. खरं सांगायचं तर प्रत्येक बाबतीतच तो इतरांपेक्षां श्रेष्ठ होता. नागरिकांचा त्याच्यावर आदरमिश्रित लोभ होता.

कीर्तिकामी नांवाचा एक विद्वान नुकताच त्या गांवात राहायला आला होता. आपल्याला प्रत्येक विद्येंत रस आहे असा त्याला गर्व होता. आपली स्तुती ऐकायला त्याला फार आवडत असे. त्यासाठी तो भरपूर खर्च करायलाही तयार होता.

शहरांत त्याचे कौतुक करायला कुणाला वेळ नव्हता, म्हणून तो लहान गांवात राहायला आला होता. तिथे त्याने मोठे घर बांधले व शंभर एकर सुपीक जमीन विकत घेतली.

कीर्तिकामीच्या स्वभावांतल्या या दोषाची माहिती कांही स्वार्थी लोकांना समजली. ते त्याच्या आसपास घुटमळायला लागले. संधि मिळाली कीं तोंड फाटेपर्यंत त्याची स्तुती करायला त्यांनी सुरवात केली. आणि त्याच्या पैशावर ते चैन करुं लागले.

कीर्तिकामीलाही हे भाग्यपुरी गांव आवडले. तो इथें आनंदात राहिला.

त्याची पत्नी सुवर्णा ही शहरांतच जन्मली व वाढली होती. तिला कांही हे गांव फारसे रुचले नाही. कौतुकसुमने ऐकण्यासाठी चार उपट-सुंभांच्या नादाने आपला पती पाण्यासारखा पैसा खर्च करतो आहे, हे तिला मुळीच आवडत नव्हते. तिला याची चिंता लागून राहिली. म्हणून शहरांत राहाणारा आपला भाऊ शुभाकर ह्याला तिने गांवात बोलावून घेतले.

शुभाकरने त्या गांवात आल्यावर एकूण परिस्थितीचा नीट अंदाज घेतला. आपले थोरले मेव्हणे आणि आपल्यांत कसलाही गैरसमज होऊं नये अशी त्याची इच्छा होती. म्हणून त्यांच्याशी बोलताना हळूहळू विषयाला हात घालावा असे त्याने ठरवले. त्यांना समजावण्यासाठी त्याने ठरवलं कीं त्यांची स्तुती करुनच त्यांना आपण जिंकायचे!

एक दिवस शुभाकर कीर्तिकामीला म्हणाला, "कोणत्याही देशांत बघितलं तरी गांवे ही त्या देशाच्या मणक्याची हाडें असल्यासारखी असतात. गांवी येऊन स्थायिक व्हायचा तुमचा निर्णय अगदी स्तुत्य आहे. मला तुमचं फार कौतुक वाटतं बघा! पण आपण शेतीच्या कामापेक्षां व्यापारांत जास्त यशस्वी व सावध आहात. तेव्हां शहरांत जर परत गेलात तर चांगला व्यापार उद्योग करुन लाखों रुपये कमवण्याची ताकद तुमच्यांत आहे. मला खरंच तसं वाटतं. नव्हे, माझी विनंती आहे तुम्हाला. वाटल्यास तुमच्यासाठी मी इथें भाग्य-पुरींत राहीन आणि तुमची शेती सांभाळीन."

कीर्तीकामीने त्याचे हे बोलणें सरळसरळ उडवून लावले. तो शुभाकरला म्हणाला, "इथें मला चांगली लोकप्रियता मिळते आहे. शहरांत पैसा रगड मिळेल, पण इथल्यासारखा मानसन्मान, आदर नाही मिळत. मला हेच गांव आवडायला लागलं आहे."

आपले मेव्हणे असं उत्तर देणार हे शुभाकरला अगोदर ठाऊक होतंच. म्हणून त्यांचे उत्तर ऐकले तरी निराश न होता त्याने शांत स्वरांत म्हटलं, "भावोजी, गांवातले लोक पैशाला तितकंसं महत्व देत नाहीत. ते प्रतिभेला जास्त महत्व देतात. पैसे नसले तरी निःस्वार्थी भावनेने ते कवि, पंडित व कलाकारांचा सन्मान करतात व त्यांच्याविषयीं आपुलकी राखतात. तशी आपुलकी, आदर, या गांवात सत्यवानाला आहे. त्याला गांवात खूपच



मान आहे हे दिसून येतं. तुमची स्तुती उगाळणारे तुमचे मित्र स्वार्थी आहेत. तुमच्या पैशांवर चैन करायला टपलेले आहेत." असं सांगून त्याने खरी गोष्ट मेव्हण्याच्या कानावर घातली.

पण ते ऐकून कीर्तिकामीचा संताप जास्तच उफाळून आला. त्याचा अभिमान डिवचला गेला. तोपर्यंत त्याच्या मनांत सत्यवानाबद्दल आदराची भावना होती. आपल्या मेव्हण्याच्या बोलण्यावरुन कीर्तिकामीला समजले कीं लोकप्रियतेच्या बाबतीत सत्यवान हाच त्याचा स्पर्धक आहे. आता कीर्तिकामी ईरेस पेटला आणि म्हणाला, "पैसा हाच परमेश्वर आहे. त्याने कोणतेही काम शक्य होते. त्या सत्यवानाच्या तोंडून मी वदवीन कीं या जगांत माझ्यासारखा दुसरा कुणीही नाही! आता मी काय करतो ते तू बघतच राहाशील!"

भाग्यश्री पोडुवाल



दुसऱ्या दिवशी त्याने सत्यवानाला निरोप धाडला, ''मी आपला सत्कार करुन आपल्याला कांही धन देणार आहे.'' सत्यवानाने उलट विचारलं, ''सत्कार? कशासाठी?''

सत्यवान असा प्रतिप्रश्न करेल अशी कार्तिकामीला कल्पना नव्हती. तो बुचकळ्यांत पडला, ''सत्कार करुन घ्यायला नकार देणारा हा कसा माणूस आहे? तो अहंकारी तरी असेल नाहीतर महामूर्ख! गांवकरी अकारण त्याला इतका मान देतात आणि स्वतःची किंमत कमी करतात. मी हे सत्य स्पष्टपणें सांगीन आणि त्यामुळें माझी प्रतिष्ठा वाढेल.'' त्याने शुभाकरला सांगितले.

त्या दिवशी कीर्तिकामी सत्यवानाच्या घरी गेला. सत्यवानाने त्याचे प्रेमाने स्वागत केले आणि येण्याचे कारण विचारले.

''प्रतिभेला गौरवमुकुट चढवायचा असेल तरी प्रतिभा असली पाहिजेच असे नाही. आपला सत्कार करायची माझी तीव्र इच्छा आहे. आपण त्याला नकार देऊं नये.'' असं म्हणून कीर्तिकामीने आपण येण्याचे कारण सांगितले.

''आपला हेतू स्तुत्य आहे. पण माझ्यांत जी कांही प्रतिभा आहे, ती केवळ पंडिती थाटाची आहे. त्यासाठी जर माझा सत्कार केला गेला तर मला समाधान वाटले. माझ्या विद्वत्तेमधला कोणता विषय आपल्याला भावला?'' सत्यवानाने विचारले.

या प्रश्नाने कीर्तिकामीला धक्का बसला, पण तसं न दाखवता त्याने म्हटलं, ''महाशय, तुमचा इतका आग्रहच असेल तर माझा मोठेपणा तुम्हीच लोकांना सांगावा. कारण ही आपली जुनीच परंपरा आहे. सत्कार, सन्मान करणाऱ्यांची स्तुती करताना कवि, पंडितांची प्रतिभा कधीही थकत नाही.''

''तसं असेलही. श्रेष्ठतेमधे मी कांही आपल्या योग्यतेचा नाही. पण कोणत्या बाबतींत मी आपली स्तुती करुं?'' सत्यवानने विचारले.

''अहो, स्तुती करायची म्हटलं तर त्यांत एवढी डोकेफोड कशासाठी करायची? शहरांत मी एक यशस्वी व्यापारी होतो. माझे ते उत्पन्न सोडून मी इथें गांवात राहायला आलो आहे. हेच माझे मोठेपण हेच; माझे महत्व आहे कीं!'' कीर्तिकामीने सांगितलं.

''माझं मत आहे कीं प्रशंसा मिळवण्यासाठी जे गांवात येतात, त्यांच्यापासून गांवाला कांहीच लाभ होत नाही. एकमेकांची स्तुतिस्तोत्रे नुसतीच गात बसणे हा विचार अगदी चुकीचा आहे.''



असं सत्यवानाने परखडपणें सांगितले व कीर्तिकामीला निरोप दिला.

कीर्तिकामी संतापाने काळानिळा झाला. त्या दिवसापासून त्याने सत्यवानाविरुद्ध प्रचार करण्यास सुरुवात केली. पैशाच्या लोभाने कांही गांवकऱ्यांनी सत्यवानाला अहंमन्य ठरवले. कारण त्याने कीर्तिकामीचा असा अपमान केला होता ना! कांही लोकांनी त्यावर विश्वास ठेवला, तर कांही जणांनी त्यावर विश्वास ठेवला नाही. या प्रचारावर सत्यवानाने साफ दुर्लक्ष केले.

एक आठवड्यानंतर सत्यवान जेव्हां तळ्यांत आंघोळीला गेला होता, तेव्हां त्याचा पाय घसरला आणि तो पायऱ्यांवरुन गडगडत खाली पडला. जवळजवळ दहाबारा दिवस त्याला घरीं खाटेवर पडून राहावे लागले.

या संधीचा फायदा घेऊन कीर्तिकामी म्हणायला लागला, ''मी जे कांही करतो, ते चांगले कार्य असते. म्हणून माझ्यावर भगवंताची कृपा आहे. जो माझ्याशी वाईट वागतो, त्याला भगवंत शिक्षा देतो.'' असं म्हणून त्याने आपल्या स्तुति-पाठकांमार्फत आपला प्रचार जास्त जोरदार केला.

याचे मात्र सत्यवानाला वाईट वाटले. तो ग्रामाधिकाऱ्याला भेटून म्हणाला, ''कीर्तिकामीने माझ्याविरुद्ध प्रचार केला, मला अहंकारी ठरवले, पण मी तिकडे अजिबात लक्ष दिले नाही. कारण ज्याला त्याला आपले मत बनवण्याचा संपूर्ण अधिकार असतो. पण मी पडलो, हा एक अपघात होता. त्याच्याद्वारे परमेश्वराने मला शिक्षा दिली, हे ऐकून मला बरे वाटले नाही. माझं यांत काय चुकलं होतं हे तुम्हीच मला सांगा व न्याय द्या.''



ग्रामाधिकाऱ्याने या तक्रारीचा पाठपुरावा करायला सुरवात केली. त्यासाठी गांवातल्या देवीच्या देवळांत सभा भरवली गेली. गांवकऱ्यांचा ठाम विश्वास होता कीं ग्रामदेवता पुजाऱ्याच्या तोंडून कोण खरा नि कोण खोटा याचा निवाडा देते. या कारणाने सत्यवानाने कीर्तिकामीचा अपमान केला आहे असं ठामपणे सांगायला एकहीजण पुढें आला नाही.

आपली बाजू मांडताना कीर्तिकामीने म्हटलं, "माझ्याबरोबर ज्यांनी वाईट व्यवहार आजपर्यंत केले, त्या सर्वांचे नेहमी नुकसानच झाले. माझी पक्की खात्री आहे कीं सत्यवान पाय घसरुन पडले, त्याचंही कारण बहुतेक तसंच कांहीतरी असलं पाहिजे." असं सांगून त्याने आपले म्हणणे पटवायचा प्रयत्न केला.

त्याचा पोकळ प्रस्ताव ऐकून तो खोटीच तक्रार करीत आहे हे ग्रामाधिकाऱ्याला लगेच समजलं. त्याने कीर्तिकामीला म्हटलं, "तुमच्या बोलण्यांत कितपत तथ्य आहे, हे पडताळून पाहाण्यासाठी आपल्यांला ग्रामदेवतेला कौल लावला पाहिजे."

तेव्हां सत्यवानाने त्यांना म्हटले, "कीर्तिकामी ह्यांच्या बोलण्यांत तथ्य आहे व खरेपणाही आहे यावर माझा विश्वास आहे. त्यांची मी स्तुतिसुमने गावी म्हणून त्यांनी माझ्यावर दबाव आणला होता, आणि तसं करायचं मी साफ नाकारलं होतं. ही माझीच चूक झाली असावी, म्हणूनच देवाने मला अशी शिक्षा दिली असेल. त्याच्यासाठी देवीचा कौल कशासाठी मागायला हवा?"

त्याचे शब्द ऐकून ग्रामाधिकारी व इतर सारे लोक हंसू लागले. कीर्तिकामी अपमानाच्या भाराने शरमिंदा झाला. तरी त्याच्या मेव्हण्याने त्याला सूचना दिलेली होती कीं प्रतिभावंतांशी टक्कर घेऊं नका म्हणून! पण कीर्तिकामीने जाणूनबुजून ही चूक केली होती. त्याचा आता त्याला पश्चात्ताप झाला. त्याने शेतीचे काम शुभाकरवर सोंपवले आणि तो शहरांत राहायला निघून गेला.

त्यानंतर त्या गांवात कीर्तिकामी कधीही आला नाही. तरीही भाग्यपुरीचे रहिवासी जेव्हां सत्यवानाच्या चांगुलपणाचे किस्से सांगत बसतात, त्या गोष्टींत कीर्तिकामीने कायमचे स्थान पटकावलेले आहे.







# अस्वल्या मांत्रिक

## 5

*(राजा जितकेतुला शिक्षा देण्यासाठी अस्वल्या मांत्रिक कालीवर्मा आणि इतर लोकांना बरोबर नेऊन नगराच्या दिशेने जात होता, तेव्हां दुर्मुखराजाच्या सैनिकांनी त्याला थांबवले. मांत्रिकाने दुर्मुखच्याजवळ जाऊन वधिकाला आपल्या मंत्रदंडाचा स्पर्श केला. त्यावर अस्वलाची आकृती असलेला परशू हवेंत फिरवत तो दुर्मुखाच्याकडे झेंपावला. त्यानंतर...)*

वधिक जेव्हां अचानक अस्वलाच्या रुपांत बदलला आणि चमकणारा परशू हातांत घेऊन दुर्मुखराजावर तो चालून गेला, तेव्हां क्षणभर दुर्मुखदेखील चक्रावला. राजाचे रक्षण करायला त्यावेळीं त्याचे अंगरक्षक पुढे आले. वधिकाने त्यांना लाथ मारुन खाली पाडले, आणि वेगाने तो दुर्मुखाच्या आसनाकडे चालून गेला.

तेव्हां दुर्मुख मोठ्याने ओरडून म्हणाला, "ऐका! आपले सैनिक कुठे आहेत? अंगरक्षक कुठे आहेत? या अस्वलाला रोखून त्याला तलवारीने पाणी पाजा." ही आज्ञा देऊन दुर्मुख आपल्या आसनावरुन उतरला. थोडे अंतर धावत जाऊन, उडी मारुन आपल्या घोड्यावर तो स्वार झाला. त्याच्याबरोबर एका अंगरक्षकाने पळतपळत जाऊन दुसऱ्या एका घोड्यावर उडी मारुन तोही बसला.

अंगरक्षकाने दुर्मुखला म्हटलं, "महाराज, आत्ता यावेळेला आपण इथून पळून जाणेच सर्व प्रकारें योग्य ठरेल. आपले सैनिक नदीच्या कांठावरच्या शेतांत आराम करीत आहेत. त्यांना



ही माहिती मिळून ते इथें येऊन पोंचण्यापूर्वीच हा मांत्रिक आपल्या अस्वलाकडून आपल्या सगळ्यांना मारुन टाकील.''

अंगरक्षक हे सांगत होता, तेव्हां राजा दुर्मुखने त्याच्यामागून येणाऱ्या अस्वल्या वधिकाला पाहून घोड्याला ललकारले. अस्वलाला पाहून घोडा घाबरला आणि जोराने पळत सुटला.

दुर्मुख राजा आणि त्याचे अंगरक्षकदेखील घोड्यावर बसून पळून जाताना पाहून कालीवर्मा हताश झाला व अस्वल्या मांत्रिकाला म्हणाला, ''गुरु! इथें आसपास असलेल्या दुष्ट राज्यकर्त्यांपैकीं एक आपल्या हातांत सांपडलाय आणि दुसरा वांचला नि निसटून गेला. मला नाही वाटत कीं त्याचा पाठलाग करुन आपला अस्वल्या वधिक त्याला पकडूं शकेल म्हणून!''

अस्वल्या मांत्रिकाने दुर्मुखच्या घोड्यामागून पळत जाणाऱ्या अस्वल्या वधिकाकडे एकवार नजर टाकली, व तो म्हणाला, ''कालीवर्मा! जर दुर्मुख आपल्या वधिकाच्या परशूची शिकार झाला नाही, तरच आपण दोघे याचा निवाडा करुं!'' नंतर दुर्मुखचे मंत्री व सल्लागार तिथें होते, त्यांच्याकडे अस्वल्या मांत्रिकाने आपल्या लालभडक डोळ्यांनी बघितले आणि त्याने विचारले, ''अरे, आता हे सांगा कीं तुम्ही सारे चंद्रशिला नगरीवर हल्ला करायला निघाला होतात ना? पण तुमची सेना कुठे आहे?''

दुर्मुखच्या सल्लागारांपैकी एकाने या प्रश्नाचे उत्तर घोगऱ्या स्वरांत दिलं.'' आपण तर महा-मांत्रिक आहात. आजपर्यंत आमच्या सेनेचा पत्ता आपल्याला समजला असेलच. तरीदेखील तुम्ही विचारता आहात म्हणून सांगतो. आमचे सैनिक नदीकांठावरच्या शेतांत शत्रूचा संहार करण्यासाठी आपापली शस्त्रें पाजळत आहेत.''

हे उत्तर ऐकून अस्वल्या मांत्रिक मोठ्याने हंसत सुटला. आणि त्याने आश्चर्याने बरोबरच्या मंत्री जीवगुप्ताला विचारलं, ''अहो, चंद्रशिला नगराचे मंत्रीबुवा, दुर्मुखच्या सल्लागारांचे बोलणे ऐकलेत कां?''

''महाराज! सगळीं बोलणीं ऐकली. हे सगळं दृश्य पाहिल्यावर मला वेड लागेल असं वाटायला लागलंय.'' जीवगुप्ताने उत्तर दिले.

''अरे, असं आहे कां? कालीवर्माला आणि मलादेखील हा प्रदेश सोडून हिमालयाच्या शिखरां-पलीकडे जायचे आहे; पण त्यापूर्वी आणखी कांही लोकांची घमेंड आम्हाला जिरवायची आहे आणि त्यांनाही वेड लागेल असं करायचं आहे. काय महामंत्री, ठीक आहे ना?'' अस्वल्या मांत्रिकाने आपला मंत्रदंड जमिनीवर आपटत म्हटले.

''ही सारी आपलीच कृपा आहे.'' जीवगुप्त



मंत्र्याने नम्रपणे वांकून उत्तर दिले. तेव्हां कालीवर्माने आमराईकडे बघत अस्वल्या मांत्रिकाला म्हटले, ''गुरु! बरेच सैनिक भाले, तलवारी घेऊन आपल्याकडेच येत आहेत बघा.'' आपली तलवार म्यानांतून सर्रकन उपसली आणि त्याने बरोबरच्या जितकेतू राजाच्या सैनिकांना सावध राहण्याचा इशारा केला.

दुर्मुख राजाचे सल्लागार आत्तापर्यंत घाबरलेले दिसत होते. भलूक मांत्रिकाने त्यांना म्हटले, ''अरे ऐका, तुमच्यापैकी एकजण पुढे जाऊन त्यांच्या सेनाप्रमुखाला समजावून सांगा कीं तुमच्या राजाची इथें काय दशा झालेली आहे ते! जर मूर्खासारखा त्याने माझ्यावर किंवा माझ्या अनुयायांवर तर हल्ला करायचा प्रयत्न केला, तुम्हा लोकांचे वाघांत आणि त्यांचे हरणाच्या रुपांत मी जादूने रुपांतर करीन आणि त्यांना तुमचे भक्ष्य बनवून टाकीन.''

''महामांत्रिक याच्यासाठी अगदी योग्य आहेत. ऐका, बंधूंनो, तुमच्या डोळ्यांदेखतच यांनी आपल्या वधिकाचे भयंकर अस्वलामधें रुपांतर केलंय ते पाहिलंत ना?'' जीवगुप्ताने त्या सल्लागारांना समजावले.

दुर्मुखराजाचे मंत्री आणि सल्लागार यांनी एकमेकांकडे पाहिले. त्यांच्यापैकी एकजण तिथून हलला आणि आपल्या दिशेने पुढे येणाऱ्या सैनिकांच्या प्रमुखाला समजावीत म्हणाला, ''आमचे महाराज परत येईपर्यंत या भयंकर मांत्रिकाच्या आज्ञांचे पालन करणे हे आपल्या सर्वांच्या हिताचे आहे.''

हे बोलणे ऐकून सेनाप्रमुख संतापला आणि आपल्या दलांतल्या पन्नास सैनिकांना उद्देशून



म्हणाला, ''तुम्ही सगळ्यांनी हे बोलणे ऐकले आहेतच. पण मी याला फक्त एक जादूच समजतो. आपण सगळे मिळून या मांत्रिकावर आणि त्याच्या अनुयायांवर एकाच वेळीं हल्ला करुन त्यांचा वध करुं शकणार नाही कां?''

''पण यांत जर मांत्रिकाने आपल्याला जादूने हरीण नि वाघ बनवलं तर? तर आपली काय अवस्था होईल? त्याचादेखील विचार आपण केलाच पाहिजे.'' सैनिकांपैकी एका शंकासुराने विचार मांडला.

''सेनाप्रमुख महाराज! आम्ही दुर्मुखराजाचे अन्न खातोय, म्हणून त्यांच्या संकटाच्यावेळीं आम्ही आमचे प्राणदेखील त्यांच्यावरुन ओवाळून टाकायला तयार आहोत. पण आमचे महाराज अजून जिवंत आहेत कीं नाहीत याची खात्री काय? जर त्या भयंकर अस्वलाने आपल्या परशूने आत्तापर्यंत महाराजांचा शिरच्छेद केला



"असला तर आमची हिंमत आणि राजनिष्ठा ही सारी वांयाच जाणार कीं!" आणखी एका सैनिकाने पुढे होऊन म्हटले.

हे शब्द ऐकून सेनाप्रमुखाच्या मनांत लोभी विचार तरळूं लागला. त्याने चहूंकडे दृष्टीक्षेप टाकला व त्याच्या मनांत विचार आला, "जर आमच्या राजाचा वध झाला असला, तर मी स्वतःच सिंहासनावर बसायचा प्रयत्न कां करुं नये?" आणि त्याने सैनिकांना म्हटले, "अशा वेळीं आपण चंद्रशिला नगरावर चालून जायचा विचार बदलावा आणि उदयगिरीला परत जावे हे योग्य ठेल."

मांत्रिकाने कालीवर्माला डोळ्यांनी खूण करुन सांगितले, "कालीवर्मा, मी तुला दुर्मुख राजाच्या सेनेचा प्रमुख म्हणून नेमतो आहे. एकदा त्याला विचारुन तरी बघ. त्यांचा हा सेनाप्रमुख त्याची तलवार तुझ्या हातांत देतोय कां?"

त्यानंतर कालीवर्मा सेनाप्रमुखाच्या अगदी जवळ जाऊन उंच आवाजांत म्हणाला, "तुम्ही माझ्या गुरुचे शब्द ऐकले आहेत ना? तेव्हां तुम्हीच आपला निर्णय घ्या आणि मला सांगा, तुम्ही आपली तलवार माझ्या हातांत द्याल, कीं जमिनींत खुपसाल?"

सेनाप्रमुखाने कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाच्या दिशेला बघितले. तलवार घेतलेला त्याचा हात कांपत होता. सेनाप्रमुखाने धीम्या आवाजांत म्हटलं, "जर मी माझी तलवार आपल्या हातांत दिली तर त्याचा अर्थ असा होतो, कीं मी दुर्मुखराजांच्या विरुद्ध राजद्रोह करतो आहे. आपल्यासारख्या बुद्धिमान श्रेष्ठींनी आम्हाला राजाशी द्रोह करायची आज्ञा देणे हे योग्य आहे कां?"

"हा तर बुद्धिमानाला विचारण्याचा प्रश्न आहे. पण तुमचा राजा तर एका अस्वलाला भिऊन तुम्हाला सर्वांना संकटात लोटून पळून जातो, हे त्या राजाला शोभतं तरी कां?" असं म्हणून अस्वल्या मांत्रिकाने सेनाप्रमुखाच्या बाजूला असलेल्या सैनिकाचा हात पकडून त्याला मागे वळवले. त्याच्या पाठीवर आपला मंत्रदंड टिकवून तो पुढे म्हणाला, "हे बघ, मी इथें एक मलमाचा लेप लावतो. त्यामुळें तू आणि तुझे अनुयायी यांना नीट दिसेल कीं तुमच्या राजाची काय दुरावस्था आहे ती!"

दुसऱ्याच क्षणीं सैनिकाच्या पाठीवरचा सारा भाग काळवंडला आणि चमकूं लागला. त्यांत एका अरण्यांत राजा दुर्मुख घोड्यावर बसलेला आणि त्याचा अंगरक्षक हे स्पष्ट दिसत होते. त्यांचा पाठलाग करीत अस्वल्या वधिक पळत होता. एका



झाडीच्या मागून एक हत्ती आपली सोंड हालवीत बाहेर आला आणि ती राजा दुर्मुखच्या घोड्यावर सोंडेचा प्रहार करणार तितक्यांत दुर्मुख जोरांत ओरडला आणि त्याने आपला घोडा वळवला. अंगरक्षकासह तो दुसऱ्या दिशेला वळला म्हणून हत्तीच्या तडाख्यांतून वांचला.

पण आता दुर्मुखचा पाठलाग करणाऱ्या अस्वल्या वधिकाला समोरुन येतांना हत्तीने पाहिले व त्याला सोंडेने वर उचलण्यासाठी सोंड खाली वळवली. अस्वल्या भलताच चवताळला आणि त्याने हत्तीच्या सोंडेवर आपल्या परशूने वार केला.

सोंडेचा अर्धा भाग अर्धवट लोंबकाळूं लागला. हत्तीने मोठ्याने चीत्कार केला व तो मागे जाऊं लागला. तेव्हां अस्वल्या वधिकाने त्याच्या मानेवर उडी घेतली. हत्तीच्या गंडस्थळावर परशूच्या मुठीने प्रहार करीत वधिकाने गर्जना केली, "तो दुष्ट दुर्मुख कुठे आहे? त्याचं मस्तकच उडवलं पाहिजे."

या वेळांत दुर्मुखराजा अरण्यांतल्या झाडींत शिरला व दूरवर दौडत गेला होता. त्याला भीती वाटत होती कीं अस्वल्या वधिकाच्या जोडीला आता तो हत्तीही त्याचा पाठलाग करत असावा. त्याच्या अंगरक्षकाने दुर्मुखला सूचना देत सांगितलं, "महाराज! मला वाटतं कीं आपण रस्ता चुकलो आहोत आणि आपल्या राज्याची सीमा ओलांडून आपण भलतीकडेच जातो आहोत."

त्यावर दुर्मुखने रागावून त्याला फटकारलं, "अरे मूर्खा! आपल्या प्राणापेक्षां राज्याची सीमा जास्त महत्वाची आहे कां?" हे बोलून त्याने घोड्याला चाबकाचा फटका मारला.



तिकडे अस्वल्या मांत्रिक त्या सैनिकाच्या पाठीवर आपल्या मंत्रदंडाने वार करीत बोलला, "मी सैनिकाच्या पाठीवर जे मलम लावलं होतं, ते ह्याने बिघडवलं. हरकत नाही. तुम्ही लोकांनी आपल्या राजाला पळताना स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहे. आता ह्याला कांही उत्तर आहे कां?" मांत्रिकाने सेनाप्रमुखाला व त्याच्या सैनिकांना विचारले. मांत्रिकाच्या शक्तीची चुणुक पाहिलेल्या दुर्मुखच्या सैनिकांनी एकदम आवाज उठवला, "आपणच सांगा, आता आम्ही काय करायचं?"

"तोपर्यंत तुम्ही माझ्याबरोबर चंद्रशिला नगराला चला. तिथल्या राजा जितकेतुची विचारपूस करायची आहे. तेव्हां आता ऐका! या क्षणापासून आता तुमचा नेता कालीवर्मा आहे." अस्वल्या मांत्रिकाने आज्ञा दिली.

त्यानंतर सर्वजण चंद्रशिला नगरीकडे जाऊं लागले. त्याच वेळेला तिकडे अरण्यांत पळून जात

असताना दुर्मुखराजा व त्याच्या अंगरक्षकाला वृक्षांच्या फांद्यांमधे लपून बसलेल्या दरोडेखोरांच्या टोळीचा प्रमुख नागमल्ल याने बघितले. नागमल्लाने आपल्या लोकांना सांगितले, ''अरे बघा, पुढच्या घोड्यावर बसलेल्या माणसाचा पोशाख पाहून असं वाटतंय कीं हा कुणा धनिक परिवारांतला असावा. त्याच्या मागून जाणारा माणूस त्याचा सैनिक किंवा सेवक असावा. जर आपण त्या दोघांना जिवंत पकडलं तर त्यांच्या सुटकेसाठी त्यांच्या नातलगांकडून एक मोठी रक्कम वसूल करता येईल.''

त्यावेळीं नागमल्लचा एक सहाय्यक आपल्या हातांतली दोरी इकडेतिकडे फिरवीत म्हणाला, ''मालक! त्यांना समोर जाऊन जिवंत पकडणें इतकं सहज जमणार नाही. ते तलवारीने आपल्याशी लढतील. त्यापेक्षां ह्या दोरीचा फांस त्यांच्यावर टाकून त्यांच्यापैकी एकाला त्यांत अडकवले, तर ते मात्र जमून जाईल.''

''अरे, तू तर अगदी समजूतदार सल्ला दिलास कीं रे! ते बघ, ते इकडेच येत आहेत. आपल्या मुलुखाच्या सीमेच्या आंत ते आले कीं सर्वांत प्रथम तू त्या पुढच्या घोड्यावरच्या माणसाच्या कमरेत तुझा फांस अडकव नि त्याला खेंचून घे. त्या दुसऱ्याला आम्ही दोघे बघून घेऊं.'' नागमल्लने सांगितलं.

दुर्मुखराजा आणि त्याचा अंगरक्षक या दोघांनाही त्या दाट अरण्यांत अस्वल्या मांत्रिकाखेरीज आणखी कांही धोका असूं शकेल हा विचारही त्यांच्या मनाला शिवला नाही. त्यांच्या मनाला एकच चिंता होती. ती म्हणजे अस्वल्या वधिकापासून दूर पळून जाणे!

जेव्हां दुर्मुख त्या झाडाजवळ पोंचला तेव्हां नागमल्लच्या सहाय्यकाने आपल्या हातांतल्या दोरीच्या फांस दुर्मुखकडे फेंकला. जेव्हां तो फांस राजाच्या कमरेभोवती पडला, तेव्हां त्या सहाय्यकाने तो फांस वर खेंचला. घोडा वेगाने पुढे गेला. आणि दुर्मुख किंचाळून त्या दोरीमुळे लोंबकाळत राहिला. त्याच वेळीं नागमल्ल व त्याचा दुसरा साथीदारदेखील तलवार परजत आणि ओरडत फांदीवरुन जोराने उडी मारुन दुर्मुखराजाच्या अंगरक्षकाच्या घोड्यासमोरच उतरले.

*(क्रमशः)*







वेताळ कथा

# शिल्प योद्धा

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ आला, आणि झाडावरुन प्रेत खाली उतरवून त्याने खांद्यावर घेतले. नेहमीप्रमाणें तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेताच्या आंतल्या वेताळाने म्हटले, ''राजन्, तू एक महान राजा आहेस हे तू विसरलास काय? तुझे कर्तव्य नीट पार पाडण्याचे सोडून तू उगीचच या स्मशानांत इतके कष्ट निष्कारण झेलतो आहेस. तुझे हे लक्ष्य पुरे करण्यासाठी तू किती त्रास सहन करतो आहेस ते पाहून मला फार आश्चर्य वाटतंय. पण तुझे उद्दिष्ट सफल झाले तर अविचारीपणाने तू हाती आलेले



यश हातांतून निसटून जाऊं देशील. बऱ्याच वर्षांपूर्वी मयूर नांवाच्या एका श्रेष्ठ शिल्पी होता. त्यानेही अशीच चूक केली होती. त्याची कहाणी माझ्याकडून ऐक आणि सावध हो.'' आणि वेताळाने पुढील कहाणी सांगितली.

''बऱ्याच वर्षांपूर्वींची गोष्ट आहे ही. कनक-गिरीच्या साम्राज्यांत अनेक मांडलिक राजे होते. त्यांच्यापैकी एक शोणपुरी राज्य होते. वीरवर्धन तिथला राजा होता. तो चेन्नकेशवस्वामीचा परमभक्त होता.

एकदा तो शिकारीसाठी निघाला आणि राज्याच्या सीमेवरच्या अरण्यांत शिरला. तिथल्या नैसर्गिक सृष्टीसौंदर्यावर तो फारच खूष झाला. हिरव्याकंच दाट रानामधे उंच डोंगर आणि त्यांतून खळाळत वाहणारी सुवर्णा नदी पाहून तो मंत्रमुग्ध झाला.

दुपारपर्यंत शिकार करुन विश्रांति घेण्यासाठी राजा एका वृक्षाखाली पहुडला आणि हळूंहळूं त्याला गाढ झोंप लागली. झोपेंत त्याला स्वप्न पडले. स्वप्नांत त्याला राजवंशाचे कुलदैवत चेन्नकेशव स्वामी, याने दर्शन दिले. देवाने स्वप्नांत राजाला सांगितले,

''पर्वतावर माझं एक मंदिर होतं. ते काळाच्या उदरांत विलीन झालं. पर्वताच्या पश्चिमेला एक पिंपळाचा वृक्ष आहे. तिथें खोदलंस कीं तुला एक मूर्ती सांपडेल. तू तिथें एक मंदिर बांध आणि तिथे त्या मूर्तीची स्थापना कर. त्यांतच तुझे आणि तुझ्या राज्याचे कल्याण आहे. मंदिर निर्माण करण्याचे काम तू नगराजवळच्या गांवात मयूर नावाच्या शिल्पीवर सोंपव.''

देवाने स्वप्नांत राजाला आदेश दिला.

वीरवर्धनला जाग आली तेव्हां त्याला स्वप्न आठवले. तो खूष झाला. नगरांत परत आल्यावर त्याने मयूरला बोलावून सर्व हकीकत सांगितली व त्याला मंदिराचे काम करण्याची आज्ञा दिली.

त्यानुसार मयूर त्या ठिकाणीं गेला आणि मंदिराच्या निर्मितीचे काम त्याने सुरुं केले. ती मूर्ती पिंपळाच्या झाडाजवळच सांपडली. परंतु अपेक्षेच्यापेक्षां कामाचा खर्च बराच वाढला. राज्याचा खजिना रिकामा झाला. सम्राटाला वार्षिक कर देणेही राजाला जमले नाही.





वृद्ध सम्राटाचा अचानक मृत्यू झाला आणि त्याचा मुलगा धीरसेन सम्राट बनला. तो अत्यंत लोभी होता. सर्व मांडलिक राजांकडून तो जास्तीत जास्त कर वसूल करीत होता. वीरवर्धन राजावर त्याने कर भरण्यासाठीं तगादा लावला. वीरवर्धनने धीरसेनला आपली कर देण्याची स्थिती नाही, असे सांगितले.

ते ऐकून धीरसेनला संताप आला आणि त्याने शोणपुरीवर आक्रमण करण्यासाठी आपले सैन्य धाडले. शोणपुरीच्या सीमेवर सैन्य पोंचले आणि डोंगराच्या पायथ्याशी थांबले. डोंगरावर नवीन बांधलेले मंदिर दिसत होते. ते पाहून सैन्याचा क्रूर सेनाप्रमुख म्हणाला, ''याचं मूळ कारण आहे हे मंदिर. तुम्ही जा आणि हे मंदिर पाडून टाका.''

सैनिक डोंगरावर गेले आणि राजगोपुरांतून ते मंदिरात गेले. खूप कलाकुसरीने नटलेल्या द्वारपालांच्या मूर्ती सैनिकांनी पाहिल्या आणि ते अचंबित झाले. त्यांनी त्या मूर्तींचा विध्वंस करण्यापूर्वी एक चमत्कार घडला. द्वारपालांच्या मूर्तींच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहूं लागल्या.

सैनिक भयभीत झाले. ते डोंगरावरुन उतरुन खाली आले. सेनापतीकडून ही बातमी सम्राटाला कळली. कांहीतरी अपशकून घडेल असे त्याला वाटले आणि त्याने सैनिकांना परत बोलावले.

हे वृत्त कळताच शोणपुरीची जनता फारच आनंदित झाली. राजाने शिल्पी मयूराला बोलावले आणि राजा त्याला रागावून म्हणाला,

''तू कोणत्या प्रकारचा शिल्पकार आहेस रे? तू अश्रू ढाळणाऱ्या मूर्ती केल्यास, त्यापेक्षां शत्रूशी तलवारीने लढतील असल्या मूर्ती तयार करायला पाहिजे होत्यास. लढाईत त्यांचा उपयोग तरी झाला असता. निदान आमच्यावर अशी दयनीय वेळ आली नसती.''

मयूर गप्प बसला. दुसऱ्याच दिवशी त्या डोंगराच्या पायथ्याशी त्याने दहा हजार खांबांचा एक मोठा मंडप निर्माण करण्याचे काम सुरुं केले. प्रत्येक स्तंभावर घोड्यावर बसलेला एक सशस्त्र युद्धाला सज्ज, असा सैनिक असलेली शिल्पे खोदली गेली. त्या मंडपाच्या निर्मितीसाठी त्याने राजाकडून मिळालेली पारितोषिकाची रक्कमही खर्च केली. जेव्हां पैशाची गरज भासली, तेव्हां त्याने देणगीदारांकडून पैसे घेतले. दहा हजार



कोरीव खांब असलेला मंडप अशा रीतीने पूर्ण झाला.

नंतर शिल्पी मयूर राजाला जाऊन भेटला आणि म्हणाला, ''महाराज, याच्यापुढे आपण कुणाचे दास होऊन राहाणार नाही. आपले राज्य स्वतंत्र राहील.''

राजाने शोणपुरी हे स्वतंत्र राज्य असल्याची घोषणा केली. सम्राटाला जेव्हां हे समजलं, तेव्हां त्याने ताबडतोब खूप मोठे सैन्य शोणपुरीवर हल्ला करण्यासाठी पाठवले.

शिल्पी मयूर वेताच्या काठीसारखी वस्तू हातांत घेऊन दहा हजार खांबांच्या मंडपाजवळ आला. खांबावर कोरलेल्या एका योद्ध्याला त्याने त्या काठीने स्पर्श करुन म्हटले,

''हे वीरा, चल नीघ, तुझी तलवार तळपूं दे, शत्रूवर तुटून पड, आणि आपल्या राजाला विजयश्री मिळवून दे.''

झालं, त्या खांबावरचे सारे सशस्त्र वीर योद्धे सजीव झाले आणि एकापाठोपाठ एक असे शत्रूसैन्याला सामोरे गेले. त्यांच्या सैन्यांत ते मिसळले आणि एकच रणधुमाळी माजली. शत्रूचा टिकाव लागला नाही आणि वीरवर्धन राजा जिंकला.

वीरवर्धनचा आनंद गगनांत मावेना. शिल्पी मयूरचा जाहीर सन्मान करण्यासाठी त्याने सभा बोलावली, परंतु मयूर मात्र तिथून नाहीस झाला. त्याचा खूप शोध केला, पण त्याचा ठावाठिकाणा कुणालाच सांपडला नाही.

ही गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले, ''राजन, मयूरचे विचित्र वर्तन पाहून मला तर



वाटतं कीं तो एक मूर्ख तरी असावा, नाहीतर अहंकारी असावा. आपल्या करामतीने, बुद्धिने त्याने राजाला विजय मिळवून दिला आणि स्वत: मात्र निघून गेला. त्याला जर राजाचे वागणें योग्य वाटले नव्हते तर तो मंडप बांधण्यांत त्याने आपले सर्वस्व कां ओतले? इतके कष्ट कां केले? माझ्या या प्रश्नांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू मौन पाळलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील.''

त्याला उत्तर देताना राजा म्हणाला,

''मयूर शिल्पी मूर्ख किंवा अहंकारी नव्हता. उलट तो फार बुद्धीमान होता. त्याने अश्रू ढाळणारे द्वारपाल निर्माण केले. पण ते त्याने जाणूनबुजून बनवले नव्हते.

त्याची कला, नैपुण्य व त्याची समर्पित भावना पाहून सरस्वतीमाता त्याच्यावर प्रसन्न झाली व तिने त्याला हे वरदान दिले होते. मयूरला याची कल्पना होती.

राजाने त्याच्या कलेची प्रशंसा केली नाही, किंवा त्याचे अभिनंदन केले नाही. त्याच्या कलेचा उपयोग स्वत:च्या स्वार्थासाठी करायची राजाला इच्छा होती. कोणत्याही कलावंताला आपल्या कलेची प्रशंसा व्हावी असं मनोमन वाटत असतं. ती शाबासकी मयूरला मिळाली नाही. त्याचे त्याला फार वाईट वाटले. पण त्याने आपले दु:ख दाखवले नाही व राज्याच्या कल्याणासाठी तन मन धन अर्पण केले. राजाला विजय मिळवून दिला.

प्रजेला स्वातंत्र्य दिले. राजाने आणखी कांही अद्भुत गोष्टींची इच्छा प्रदर्शित करण्यापूर्वीच मयूर तिथून निघून गेला. राजाच्या सत्काराच्या लोभांत तो अडकला नाही आणि काम पूर्ण झाल्याबरोबर कुणालाही न सांगता चालता झाला.''

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(सुचित्राच्या रचनेवर आधारित)*



भारतीय दंतकथा - २४

# भुताची कामगिरी

आश्रमांत राहाणारे योगी आलोकनंद यांनी आपण देहत्याग करणार असल्याचे जाहीर केले. त्यांचे वय शंभरापेक्षां जास्त होते आणि आश्रमांतल्या विद्यार्थ्यांची व्यवस्था व शिक्षणक्रम याची जबाबदारी त्यांनी धीरानंद, या आपल्या एका शिष्यावर सोंपवली होती.

धीरानंद गुरुजींच्याजवळ जेव्हां एकटाच होता, तेव्हां गुरुजींनी त्याला सांगितले, "आश्रमांतल्या सर्व पवित्र वस्तूंची हयगय करं नकोस. त्या पेटीमधे एका कोपऱ्यांत एक विचित्र आकाराचा दगड तुला सांपडेल. तू जेव्हां शांतीपाठाचे मंत्र म्हणशील, तेव्हां तो दगड नदींत टाकून दे."

"आपली हरकत नसेल तर त्या दगडांत असं काय विशेष आहे, ते सांगाल कां?" धीरानंदाने औत्सुक्यापोटी विचारले. "तो दगड मला एका मांत्रिक मित्राने दिलेला होता. त्यांत एक भूत दडलेलं आहे. तो दगड जर कुणी जमिनीवर आपटला, तर ते भूत बाहेर येईल आणि काम मागेल. त्या भुताला कांही उपयुक्त काम करता येत नाही. त्याला फक्त बारीकसारीक चमत्कार, व सिद्धीचे प्रयोग दाखवून आसपासच्या लोकांना चकित करता येतं. वेडेवांकडे आवाज काढणें, हवेत वस्तू तरंगत ठेवणे, असल्या गोष्टी ते भूत करीत राहातं. पण मुख्य अडचण ही आहे कीं जर ते भूत एकदा बाहेर आलं, तर ते गप्प बसणार नाही. आपल्या मालकाला "काम द्या" म्हणून ते सारखं सतावत राहील. जर तो दगड नदींत फेकून दिला तरच ते शांत राहील." गुरुने स्पष्टीकरण दिले. पुढे त्यांनी सांगितलं, "आणि एकदा जर कां ते







दगडांतून बाहेर आलं तर ते पुन्हां दगडाच्या आंत तर जाणार नाहीच, पण आपल्या मालकाचा पिच्छाही सोडणार नाही. पांच वर्षे उलटल्यानंतर ते आपोआप नाहीसं होईल."

या प्रसंगानंतर गुरुजींची प्रकृति झपाट्याने खालावली. त्यांच्या सेवाशुश्रूषेंत सारे शिष्य गुंतले. त्यांचा देहान्त झाल्यानंतर दुसऱ्या दिवशी धीरानंदाला त्या दगडाबद्दल आठवण झाली. त्याने ती पेटी उघडली व दगड शोधला. पण तो दगड तिथें सांपडला नाही. त्यांनी गुरुजींच्या झोंपडींतल्या सगळ्या पेट्या उघडून पाहिल्या. पण दगड कांही मिळाला नाही.

दोन दिवस गेल्यानंतर रात्रींच्या अंधारात धीरानंदाच्या दरवाज्यावर कुणीतरी थाप मारली. जागा होऊन त्याने दरवाजा उघडला. गुरुजींचा आणखी एक शिष्य चंद्रन हा बाहेर उभा होता. तो अरण्याजवळच्या खेडेगांवात राहात होता आणि तिथून तो आश्रमांत येत असे.

"काय रे झालंय? तू असा त्रासलेला कां दिसतो आहेस?" धीरानंदाने विचारलं.

"अरे मित्रा, मी तर अगदी रडकुंडीला आलो आहे." चंद्रनने उत्तर दिले. नंतर त्याने कबुली दिली कीं गुरुजी व धीरानंदाचे त्या विचित्र दगडाबद्दलचे बोलणे त्याने दाराआडून ऐकले होते.

"तो दगड चोरुन नेण्याचा मोह मला आवरला नाही, ही माझी चूक झाली. मला वाटलं, कीं नाहीतरी तू तो दगड नदींत फेकूनच देणार होतास, आणि तुला त्याचा उपयोगही नव्हता. मी तो जमिनीवर आपटला आणि खरंच ते भूत डोळ्यांसमोर उभं राहिलं. माझ्याखेरीज इतर कुणाला ते दिसत नव्हतं. त्या भुताने काम मागितलं. मी गांवाच्या चौकांत गेलो. तिथे बरीच मंडळी होती. मी त्यांना एक चमत्कार दाखवीन असं सांगितलं. मी त्या भुताला एका झुडुपाला आग लावून द्यायला सांगितलं. त्याने ती आज्ञा पाळली आणि झुडुप आगीच्या ज्वाळांत लपेटलं. मग मी ती विझवायला सांगितली आणि ती आग विझली. गांवकरी चकित झाले खरे, पण त्यांना कांही त्यांत आनंद वाटला नाही. मी घरी परत येतोय तो भूत "दुसरं काम द्या" म्हणून पाठीमागे आलं. मी त्याला अंगणातल्या झाडांना पाणी घालायला सांगितलं. त्याने सगळी झाडें उपटली आणि त्यांना पाणी घातले. मी थकच झालो आणि त्याला रागावलो. पण माझ्या रागाचा त्याच्यावर काडीमात्र परिणाम झाला नाही किंवा त्याने जे चुकीचं काम केलं, त्याबद्दल त्याला खतंही वाटली नाही. तो फक्त माझ्याकडे सारखी अशी कामे मागत होता, कीं त्यांच्यामुळे कांहीतरी निरुपयोगी चमत्कार घडत राहावेत.

मी त्याला सोन्याची आंगठी आणायला सांगितले. दुसऱ्याच क्षणाला माझ्या हातांत एक आंगठी येऊन पडली, पण त्याच वेळीं माझ्या बहिणीची आंगठी हरवली! त्याच्या अर्थ, भुतानेच तिच्या बोटांतली आंगठी काढून घेतली होती."

"तू त्याला तुझे शेत नांगरायला कां सांगत नाहीस?" धीरानंदाने सुचवले.

"त्याने जशी माझी झाडें उपटली, तसं कांहीतरी तो नुकसानच करील अशी मला भीती वाटते. त्याला कांहीतरी जादू, चमत्कार करण्यांत गुंतवणें एवढेच शक्य आहे. ते मी पांच वर्षेपर्यंत कसे काय करीत बसूं? कोण बघत बसेल ते? आणि माझी स्वतःची कामे बाजूला राहातील कीं! दोन दिवसांत मला वेड लागायची पाळी आलीय बघ! ते भूत फक्त मध्यरात्री एक घटकाभर विश्रांति घेतं, त्या काळांत त्याची शक्ती पुन्हां जागृत होत राहाते. आत्ता तेच ते करते आहे. म्हणून मी इथें आलो आहे. काय करूं ते चटकन मला सांग!" चंद्रन अगदी रडायच्या बेताला आला होता.

धीरानंदाने क्षणभर विचार केला आणि त्याने चंद्रनला कांहीतरी सांगितले. त्याचे बोलणे संपले नाही तेवढ्यांत ते भूत खिडकींतून डोकावले आणि त्याने चंद्रनकडे काम मागितले.

"तुझ्यासाठी काम तयार आहे बघ." चंद्रन हंसतमुखाने बाहेर आवारांत जात म्हणाला. त्याने मागील दारी झोंपलेल्या कुत्र्याजवळ जाऊन भुताला म्हटले, "हे बघ, भुता, माझ्या या कुत्र्याची शेपूट बघ तरी कशी वांकडी झालीय ती! तू जरा ती सरळ कर. पण त्याला त्रास होणार नाही अशा बेताने; अगदी हळुवारपणें ती सरळ करायला हवी. ते काम संपलं कीं मला येऊन सांग." चंद्रनने सूचना दिली.

"हे तर काय मी चुटकीसरशी करून टाकीन. त्यांत काय मोठंसं?" भुताने आढ्यतेखोरपणें म्हटलं. ते कुत्र्याजवळ बसले आणि त्याची शेपटी त्याने कुरवाळत सरळ धरली. पण त्या भुताने शेपटी हातांतून सोडली रे सोडली कीं ती पुन्हां आपली पूर्ववत वांकडी होई. भूत पुन्हां पुन्हां शेपटी सरळ करायचा प्रयत्न करीत होते. पण शेपूट कांही सरळ होईना. थोड्या वेळाने कुत्रा तिथून उठला आणि पुढील दारी आला. भूतही त्याच्यापाठोपाठ गेले व पुन्हां शेपूट सरळ करूं लागले. हा प्रकार चालूंच राहिला.

चंद्रन तिथून निघून गेला. त्यानंतर वर्षं उलटले, परंतु ते भूत पुन्हां त्याच्यासमोर आले नाही. चंद्रनला ठाऊक होतं कीं आणखी चार वर्षें गेली कीं भुताचा त्रास संपेल व त्याला मुक्ती मिळेल. पण त्याच्या कुत्र्याची शेपटी मात्र वांकडीच राहिली. पहिल्यासारखी!

त्यानंतर तो धीरानंदाकडे भेटायला गेला. "आता तुला कळलं ना कीं आपले गुरुजी म्हणत कीं एखाद्याचा स्वभाव कुत्र्याच्या शेपटीसारखा असतो. कितीही प्रयत्न करा, ते शेपूट कांही सरळ होत नाही. वांकडे ते वांकडेच राहाते."

दोघेही हंसले. चंद्रनने तो दगड चोरल्याबद्दल पुन्हां एकदा क्षमा मागितली.







# वधस्तंभ मदतीला आला



जिम व बिल बकली हे दोघे शेजारच्या गांवाहून घरी परत येत होते. अचानक झुडपांच्या मागें लपून बसलेले दोघेजण पुढे आले आणि त्यांनी ह्यांच्यावर हल्ला केला. बिलच्या छातीतून आरपार गोळी गेली, तो घोड्यावरून खाली पडला, व मरण पावला. जिम मात्र सुखरूप निसटला. त्या दोघा भावांना कुणीतरी धमक्या देत होतं, तरीही हे दोघे निशस्त्र होते, म्हणून दुर्दैवाने ते प्रतिकार करूं शकले नाहीत.

ही गोष्ट अमेरिकेतल्या मिसिसिपी, कोलंबिया, मधल्या मॅरियन परगण्यांत घडली.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस एक गुंडांची गुप्त टोळी, बरचेवर त्या प्रांतातल्या गरीब मळेवाल्यांना व बागवानांना दरडावून त्रास देत असे.

त्या टोळीला "पांढऱ्या टोप्या" असे नांव होते. त्यांचा एक नवा बळी होता एक निग्रो मजूर. एका विधवेच्या शेतावरचे काम त्याने नुकतेच सोडलेले होते आणि तो ह्या बकली बंधूंकडे नव्या नोकरीवर रुजूं झाला होता, कारण इथें पगार जास्ती होता. त्याला त्रास देणाऱ्या मंडळींची त्याने नांवे सांगितली. जिम व बिलने न्यायालयांत तक्रार करायचे ठरवले व पोलिस आणि न्यायालयांत फिर्याद दाखल केली. त्या गुंड टोळीवाल्यांनी बिल व जिमला जिवानिशी मारण्याची धमकी दिली होती. तरीही त्यांनी अधिकाऱ्यांसमोर तक्रार दाखल केली. त्याचे दुर्दैवी फलित म्हणजे एका भावाला जीव गमवावा लागला. आपल्या भावाचा खुनी ओळखून काढण्यास जिमला सांगितले.



त्याने त्या खुन्याचे नांव विल पर्विस आहे असे सांगितले. विल हा एका जुन्या व सभ्य कुटुंबातला होता. गांवाजवळच असलेल्या पर्विस गांवाहून हे कुटुंब आलेले होते.

संशयिताला ताबडतोब अटक झाली. मामला न्यायालयांत गेला. विलच्या तिघा शेजाऱ्यांची व दोघा नातेवाईकांची साक्ष घेतली गेली. त्या सर्वांनी शपथपूर्वक सांगितले कीं खून झाला त्यावेळी आरोपी आपल्या घरांतच होता. त्याची बंदूकदेखील कित्येक दिवसांत वापरलेली नव्हती. पण न्यायाधीशांचा विश्वास बसत नव्हता. विल पर्विसला फांशीची शिक्षा झाली. त्याने उच्च न्यायालयांत याचना केली, पण त्याचा अर्ज फेटाळण्यांत आला.

त्याला ओळखणारे सरेजण बुचकळ्यांत पडले. त्याने हा गुन्हा केला असेल यावर त्यांचा विश्वासच बसत नव्हता. तिथल्या चर्चमधल्या पाद्रीने विलची तुरुंगात जाऊन भेट घेतली. त्यालाही वाटत होतं कीं हा माणूस निरपराधी आहे. फांशी होण्याच्या आदल्या रात्रीं, पाद्री पुन्हां जाऊन भेटला.

विलला साखळदंडांनी बांधलेले होते, पण तो अतिशय शांत व धीरगंभीर होता. त्याने पाद्र्याला सांगितले, ''माझ्या आत्म्याच्या नशिबाची मला काळजी नाही.''

दुसरा दिवस उजाडला. ७ फेब्रुवारी १८९४. हजारों पुरुष, स्त्रिया आणि मुलेही गांवाच्या मुख्य चौकांत जमली. गांवाचा शेरीफ आणि त्याचे सहाय्यक फांशीची सारी नीट तयारी आहे कीं नाही त्याची वारंवार खात्री करीत होते. एकवीस वर्षांचा तरुण शेतकरी, विल पर्विस याला वधस्तंभाच्या मंचावर सावकाशीने नेण्यांत आले. त्याला अटक करणाऱ्या शेरीफला तो खुनीच वाटत होता. शेरीफने त्याला विचारले, ''विल! तुला अखेरीस कांही सांगायचे आहे कां?''

विलने संथ, शांत स्वरांत उत्तर दिले, ''मी खून केलेला नाही. पण मला वांचवू शकणारे कुणी ना कुणी पुरुष कुठेतरी इथें जरुर आहेत.''

बिचारा विल! कुणीही पुढे आले नाहीत. त्याचे हात मागे नेऊन बांधले गेले. पाय एकत्र बांधले. त्याच्या मानेभोवती दोरीचा गळफांस अडकवला गेला. सारा जनसमुदाय श्वास रोधून स्तब्ध उभा होता. शेरीफ म्हणाला, ''विल पर्विस, परमेश्वर तुला मदत करो!'' आणि त्याने खटका दाबला.

कांही क्षण सगळेजण घाबरलेले होते. त्यांचा आपापल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. त्यांच्या नजरेसमोर, त्या उघड्या जागेत वर दांडीवर तो रिकामा गळफांस सकाळच्या वाऱ्याबरोबर हलत डुलत होता. मग बिल पर्विस कुठे होता? त्या वधस्तंभाखाली जमिनीवर तो बेशुद्ध पडलेला होता. पण त्याचा श्वास चालू होता. ती काळी टोपी त्याच्या डोक्यावर तशीच होती, आणि त्याचे हातपाय घट्ट बांधलेले होते. हे कसं शक्य होतं? त्या फांसातून तो खाली कसा काय पडला? सर्वांनाच ही रहस्यमय गोष्ट गोंधळून टाकणारी होती.

शेरीफचे अधिकारी आरोपीला पुन्हां दुसऱ्या वेळेला फांशी देण्यासाठी ओढून उचलायला लागले. पण तिथें पाद्रीबाबाने हरकत घेतली कीं नियतीने विलला वांचवले होते. आता त्याला पुन्हां फांसावर कशासाठी लटकावयाचे? जमावाने पाद्रीच्या म्हणण्याला दुजोरा दिला. ते आरडाओरडा करुन 'हा चमत्कार झाला' म्हणून आनंदाने गाऊं व नाचूं लागले. शेरीफ गोंधळला आणि लोकांचा वाढत्या प्रमाणावरचा उत्साह पाहून त्याने विलला पुन्हां तुरुंगात धाडले.

परंतु तिथला राज्यपाल मात्र नाखूष झाला. विल पर्विस दोषी ठरला होता. त्याला मरेपर्यंत फांशीची शिक्षा झाली होती. पण जर तो जगला, तर त्याला पुन्हां फांशी दिलं पाहिजे, हा त्याचा साधा हिशेब होता. विलच्या वकिलांनी राज्याच्या सर्वोच्च न्यायालयाकडे अजीजीने याचिका दाखल केली होती. पण तीही फेटाळली गेली.

१२ डिसेंबर १८९५ या दिवशी विल पर्विसला पुन्हां फांशी देण्याचे ठरले; म्हणजे त्या चमत्कारामुळें तो वधस्तंभावरुन वांचला त्यानंतर सुमारे दोन वर्षांनंतर हा दिवस आला. आरोपी ह्या निकालावर शांतचित्त होता. ज्या शक्तीने त्याला पहिल्या वेळी वांचवले होते, तीच शक्ती पुन्हां त्याचे रक्षण करील असा त्याला विश्वास होता.

त्या दरम्यान कोणताही नवा पुरावा सांपडला नव्हता या हतभागी माणसावर शेवटची कृपाळू दृष्टी करावी म्हणून सरकारने त्याची रवानगी कोलंबियामधल्या तुरुंगातून त्याच्या मूळ गांवातल्या, पर्विसमधल्या छोट्या, मोडकळीस आलेल्या तुरुंगात केली. त्यामुळें त्याच्या आयुष्यांतले शेवटचे कांही आठवडे तो त्याच्या निकटवर्तीयांच्या जवळच राहू शकला असता.



मध्यरात्र झाली होती. एकदोन दिवसच राहिले होते; अशा वेळेला त्या गांवातला जमाव तुरुंगावर चालून झाला, पहारेकऱ्यांना बाजूला सारुन त्या लोकांनी विल पर्विसला सोडवले. राज्यपाल भलताच संतापला. विल पर्विसला पकडून देऊन त्याला मुक्त करणाऱ्या लोकांची नांवे सांगणारास त्याने मोठी बक्षिसे जाहीर केली. ती बक्षिसे घेण्यासाठी कुणीही गांवकरी पुढे आले नाहीत. त्या सर्वांना विलची सुटका कुणी केली ते माहीत होतं. शिवाय विल पर्विस आपल्या कुटुंबाबरोबर डोंगरापलीकडच्या जंगलात राहात होता हेही सर्वांना ठाऊक होतं.

तेवढ्यांत त्या राज्यपालाची अधिकाराची मुदत संपली. त्याच्यानंतर येणाऱ्या राज्यपालाने, आपल्या निवडणुकीच्या प्रचारांत, विल पर्विसची शिक्षा कमी करण्याचा शब्द दिला होता, विल आपण होऊन सरकारच्या स्वाधीन झाला. राज्यपालाने शब्द पाळला आणि विलची फांशीची शिक्षा रद्द करुन त्याला साधी जन्मठेपेची शिक्षा सुनावली.

दोन वर्षे उलटल्यानंतर, हजारो नागरिकांतर्फे एक विनंती अर्ज देण्यांत आला. त्या सह्यांत ज्या न्यायाधीशाने विल पर्विसला मृत्यूदंडाची शिक्षा दिली होती, त्या न्यायाधीशानेदेखील सही केली होती. अखेरीस, आरोपीला माफी मिळाली आणि त्याला मुक्त केले गेले. विल परत आपल्या शेतावर काम करुं लागला. लौकरच त्याने चर्चच्या उपदेशकाच्या देखण्या मुलीशी लग्न केले, आणि त्यांच्या आनंदी संसारात त्यांना अकरा मुले झाली.

पण बिल बकलीचा खून कुणी केला हे मात्र गूढच राहिले. अशीच कांही वर्षे उलटली आणि एके दिवशी एक जुना मळेकरी ज्यो बिअर्ड मरणासन्न होता, त्याने दुःखी अंतःकरणाने कबुली दिली कीं व्हाईटकॅप्स (पांढरी टोपी) गटाच्या दुसऱ्या एका सभासदाबरोबर त्याने बकलीचा खून केला होता. ही सनसनाटी बातमी त्या भागांत पसरली. सरकारने आपली चूक मान्य केली व नुकसान भरपाईदाखल विल पर्विसला पांच हजार डॉलर्स दिले. जिम बर्कलीने विल पर्विसचे नांव चुकून घेतले होते कां? कीं तो समजुतीचा घोटाळा होता?

विल पर्विस मृत्यूच्या दाढेतून परत आला हा निव्वळ योगायोग होता कां? कीं तो व त्याचे हितचिंतक यांची अढळ श्रद्धा आणि मनःपूर्वक प्रार्थना यांचे फळ म्हणून तो चमत्कार घडला?





# खास बातम्या




## शाळेच्या दप्तरांना निरोप

एका लोकप्रिय टीव्ही जिंगलमधे तीन छोट्या मुलांच्या पाठीवर दप्तरे घेऊन शाळेंत जाताना दिसतात. त्यांच्या दप्तरावर LKG, UKG, व ५KG अशी लेबले आहेत - शेवटच्या लेबलाचा अर्थ म्हणजे त्या दप्तराचे वजन! मुलांनी शाळेंत जाताना रोज पुस्तकांचे इतके ओझे न्यायला हवे कां? ह्या विषयावर आपल्या लोकसभेंत देखील गंभीर चर्चा झालेली आहे.

केंद्रीय विद्यालय संघटन, या सरकारी समूहातर्फे साऱ्या देशभर केंद्रीय विद्यालयें चालवली जातात. त्यांनी ह्या बाबतीत पुढाकार घेतला आहे. मुलांच्या पाठीवरचे पुस्तकांचे ओझे कमी करण्याचा प्रयत्न त्यांनी सुरुं केला आहे. यापुढें पहिली व दुसरी इयत्तेमधल्या विद्यार्थ्यांनी शाळेंत जाताना पुस्तके न्यायची नाहीत असा त्यांनी निर्णय घेतला आहे.

मुलांची पाठ्यपुस्तके व वर्गपाठाच्या वह्या शाळेंतच ठेवायची, व संध्याकाळीं घरी जाताना किंवा शनिवार-रविवारी घरी न्यायची नाहीत अशी ही योजना आहे.

त्यासाठी मुलांना गृहपाठ दिला जाणार नाही. त्यांचा फावला वेळ ते आपल्या इच्छेनुसार कसाही घालवूं शकतील - खेळ, वाचन, बागकाम, छंद किंवा टीव्ही पाहाणे! अनेक महिन्यांचा शास्त्रोक्त अभ्यास व संशोधन केल्यानंतरच हा निर्णय घेण्यांत आलेला आहे.

या नव्या योजनेनुसार हळूहळू इतर वरचे वर्गदेखील ही पद्धत सुरुं करतील असा या संघटनेचा मानस आहे.



# भरलेले ताट

कमलपुरांत राहाणाऱ्या विद्यानाथला कोणतीही विद्या चटकन आत्मसांत होत असे. इतरांप्रमाणें खूप मेहनत त्याला करावी लागत नव्हती. प्रथम त्याने वेदांचा अभ्यास केला. त्यानंतर संगीत, वैद्यकी व ज्योतिष विद्यांचा अभ्यास तो करीत होता. त्यापैकी कोणत्याही एका विद्येचा खास अभ्यास करुन त्यांत त्याने प्राविण्य मिळवले नाही. म्हणून लोक त्याचे अर्धेकच्चे ज्ञान आहे, असं म्हणून त्याची टिंगल करत व आपसांत त्याला कुत्सितपणें हंसत असत. पण विद्यानाथला मात्र वाटायचं कीं ते लोक मत्सरापोटी त्याची टवाळी करताहेत; आणि म्हणून तो त्यांना फारशी किंमत देत नसे. कधीकधी त्याला वाटायचं कीं ज्या गावांत त्याच्या पांडित्याबद्दल लोकांना आदर वाटत नाही, असल्या गांवढळ गांवात राहायचं तरी कशासाठी?

आपल्या मुलाची ही विचारसरणी पाहून त्याच्या आईवडिलांना त्याची फार काळजी वाटत होती. त्याचे भावी आयुष्य कसे असेल याचा विचार त्यांचे मन कुरतडत होता. त्यावेळीं विद्यानाथची मावशी एका मुलीचे स्थळ आपल्या या हुशार भाच्यासाठी घेऊन आली. विद्यानाथच्या आईने उदासवाण्या चेहऱ्याने आपल्या मुलाचे वागणें आणि विचार याबद्दल बहिणीला खरी परिस्थिती सांगितली. त्यावर मावशी म्हणाली, "अग, एकदा लग्न झालं ना, कीं सारं कांही ठीक होईल. मी जी मुलगी सुचवते आहे ना, ती फार हुशार आणि सुस्वभावी आहे. दिसायलाही चांगली आहे. विद्यानाथला अगदी योग्य ठरेल आणि त्याला नीट मार्गदर्शन ती करील बघ!"

आईवडिलांनी विद्यानाथचे मन वळवले आणि प्रियंवदाशी त्याचे लग्न झाले. सासरी आल्यानंतर थोड्याच दिवसांत प्रियंवदाने आपल्या पतीला हरप्रकारे सांगून पाहाण्याचा प्रयत्न केला. तिचा पती अत्यंत बुद्धिमान आहे हे तिच्या लक्षांत आलं होतं, पण त्याच्या मनांत फाजील आत्मविश्वास असल्यामुळें कोणत्याही एका विषयांत त्याची बुद्धि स्थिर राहात नव्हती.

विनय रस्तोगी

एके दिवशी प्रियंवदा तळ्यावर पाणी आणायला निघाली होती. विद्यानाथने तिच्याबरोबर यावे असे तिने सुचवले. विद्यानाथची इच्छा नव्हती, पण नाराजीने तो तिच्याबरोबर निघाला. वाटेत कांटेरी झाडेझुडुपे होती, तिथें एका झाडाजवळ एक मुलगा जमिनीवर पडलेला त्यांना दिसला. तो वेदनेने तडफडत होता आणि त्याच्या तोंडातून फेंस येत होता. प्रियंवदा चटकन म्हणाली, "ह्याला साप चावलेला दिसतोय!"

लागलीच विद्यानाथने त्या झुडुपांमधलीच कांही औषधी पाने तोडून आणली, त्यांचा रस हातावर पानें चोळून काढला, आणि त्या मुलाच्या तोंडात घातला. आणखी कांही पानांचा रस काढून साप चावलेल्या जागेवरदेखील त्याने लावला. त्या मुलाच्या वेदना हळूंहळूं कमी होत थांबल्या. पंधरावीस मिनिटानंतर तो उठून बसला व नंतर उभा राहिला. हे पाहून प्रियंवदाला विद्यानाथच्या वैद्यकीच्या ज्ञानाबद्दल विश्वास वाटायला लागला.

या घटनेनंतर एक आठवडा गेला. त्या गांवात एका गायकाची गाण्याची मैफल झाली. विद्यानाथ प्रियंवदासह त्या कार्यक्रमाला गेला. पण संपूर्ण कार्यक्रम ऐकण्यापूर्वीच विद्यानाथने प्रियंवदाला आपले असमाधान व नाराजी व्यक्त करीत म्हटले, "हा गायक अजून तयार झालेला नाही, अर्धाकच्चा आहे. ना ताल, ना लय, छे!" असं म्हणून तो घरी जायला निघाला.

प्रियंवदालाही नाईलाजाने त्याच्याबरोबर उठणे भाग पडले. रस्त्यावर कुणी नव्हते. ती विद्यानाथला म्हणाली, "तुम्ही एखाद्या रागाची आलापी मला जरा गुणगुणून दाखवा कीं!"



विद्यानाथने यमन रागातले एक गीत तिला हळू आवाजांत गाऊन् दाखवले. त्याचा आवाज फारच छान होता. त्याचे गायन तिला आवडले. तिने विचारले, "या संगीतविद्येचाच तुम्ही आणखी अभ्यास कां करीत नाही? तुम्ही एक चांगले गायक व्हाल कीं!"

"अग, चांगला गायक व्हायला काय काय हवं असतं ते सांगशील कां?" विद्यानाथने उलट प्रश्न केला.

"कुणा श्रेष्ठ संगीतकाराचे शिष्यत्व पत्करा." प्रियंवदाने सांगितलं.

"माझ्यापेक्षां श्रेष्ठ संगीतज्ञ जवळपास कुणी असला तरच त्याबद्दल विचार करायचा, नाहीतर कशाला?" असं बोलून विद्यानाथ भराभरा पुढे जाऊं लागला.

पतीचे हे उत्तर ऐकून प्रियंवदा मनांत समजली कीं तो चांगलाच अहंकारी आहे.

दुसऱ्या दिवशी प्रियंवदाच्या माहेराहून एक नोकर आला. तिच्या आईने त्याच्याबरोबर कांही फराळाचे पदार्थ पाठवले होते, ते द्यायला तो आला होता. परत येताना प्रियंवदाकडून एक खुशालीचे पत्र घेऊन यायला त्याला सांगितलेले होते.

प्रियंवदाने त्या नोकराला जेवायला वाढले आणि त्याला दुसऱ्या दिवशी सकाळीं उठून गांवी परत जाण्यास सांगितले. घरांतले कामधाम आटोपून रात्रीं जागून तिने एक सविस्तर पत्र लिहिले आणि नंतर तिला झोंप लागली.

विद्यानाथने उत्सकुतेने ते पत्र वाचले. तिने लिहीले होते, "इथें सर्व कांही क्षेमकुशल आहे. माझे पतिदेव भरलेल्या ताटाप्रमाणे आहेत. रुचकर पदार्थांनी ताट भरलेले असते, पण त्याची रुची ते पदार्थ खाणाऱ्यांना कळते. ती चव व त्याचा आनंद त्या ताटाला माहीत नसतो.

त्यांचा स्वभाव तसाच आहे. ते चांगले निष्णात वैद्य आहेत, संगीतज्ञ आहेत, आणखी ज्योतिष-शास्त्राचीदेखील त्यांना चांगली माहिती आहे. पण हे सगळे गुण एकमेकांना अडसर बनून राहिले आहेत. त्यामुळें तुमचे जांवईबापू कोणत्याही विद्येचा सार्थ व समर्थ उपयोग करीत नाहीत.

मी एका विद्वानाची पत्नी आहे असं मला मोठ्या अभिमानाने सांगता आलं पाहिजे असा मला तुम्ही आशिर्वाद द्यावा."

विद्यानाथने ते पत्र पुन्हां नीट वाचले. त्याला आपल्या स्वभावांतले वैगुण्य लक्षांत आले. त्याच्या पत्नीने आजपर्यंत चकार शब्दानेही त्याला दुखवले नव्हते. पण तिच्या मनांतले दुःख त्याला कळले. त्याला वैद्यकी व्यवसायाबद्दल आवड व आदर होता. म्हणून त्याने त्याच्यावर लक्ष केंद्रित करुन दुसऱ्यांची सेवा करण्याचे ठरवले.

त्याला रात्रीं नीट झोंप लागली नाही. सकाळीं तो पत्नीला म्हणाला, "प्रियंवदा, तू माझे डोळे उघडलेस. त्या दिवशी माझ्या औषधामुळें आपण त्या मुलाचे प्राण वांचवू शकलो. मी आता याचे पुढचे शिक्षण घेण्यासाठी वर्षभर गुरुगृही जाईन. तोपर्यंत तुला इथें एकटे राहावे लागेल."

विद्यानाथच्या स्वभावांतले हे परिवर्तन पाहून त्याच्या आईवडिलांना व पत्नीला फार आनंद झाला. वर्षभर जास्त अभ्यास करुन विद्यानाथ एक चांगला वैद्य बनूनच घरी परत झाला.



## वाचकांसाठी कथास्पर्धा

### सर्वोत्तम प्रवेशिकेला रु.२५०/-चे पारितोषिक

*खालील गोष्ट वाचा:*



दोन प्रवासी रस्त्यांत भांडत होते. त्यांची हाणामारी सुरुं होण्यापूर्वीं रस्त्यांतल्या इतर मंडळींनी त्यांना न्यायालयांत नेले. "या गृहस्थाला माझी हिऱ्याची आंगठी बघायची होती. मी ती त्याला पाहायला दिली तर आता हा म्हणतो कीं ही त्याचीच आहे आणि तो ती परत देत नाही." पहिल्याने तक्रार केली.

दुसरा इसम न्यायाधीशांना म्हणाला, "साहेब, ही आंगठी माझीच आहे आणि मीच ती याला पाहायला दिलेली होती."

न्यायाधीशांनी ती आंगठी बोटांत धरली आणि म्हटले, "अरे बापरे! महाराजांची हरवलेली आंगठी अखेरीस इथेच सांपडली आहे. ज्या कुणी ही आंगठी चोरली होती त्याचा शिरच्छेद होणारच. बोला आता! कुणी चोरली होती ही आंगठी?"

दोघा प्रवाशांनी काय उत्तर दिले असेल ते सांगाल कां? न्यायाधीशांनी खरी गोष्ट कशी शोधून काढली असेल?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा आणि आमच्याकडे एका पाकीटांत घालून पाठवा. त्यावर 'वाचा आणि सुचवा' असे लिहा. खालील कुपन त्यासोबत जोडले पाहिजे.

**शेवटची तारीख : ३० एप्रिल २००४**

नांव ............................................. वय ..................

जन्मतारीख ........................ शाळेचे नांव ........................

घरचा पत्ता .............................................................

.............................................................

............................................. पिनकोड ..................

पालकांची सही　　　　　　　　　　　　　　स्पर्धकाची सही



# खडकाखालचा झरा

फार पूर्वी काशी येथे ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका व्यापारी कुटुंबात अवतार धारण केला. वयांत आल्यावर त्यांनी मोठा व्यापार सुरू केला. पांचशे बैल गाड्यांत माल भरून घेऊन ते देशभर व्यापार करू लागले.

एकदा ते आपल्या गाड्यांचा तांडा घेऊन व्यापाऱ्याला निघाले असता वाळवंटाच्या प्रदेशात पोंचले. तो वाळवंटाचा प्रदेश साठ योजन लांबीचा होता. तेथील वाळू फार बारीक होती, इतकी की मुठीत वाळू घेतली तर बोटांच्या बेचक्यांतून ती गळून जाई. रांत्रीच्या वेळेला त्या प्रदेशांत हवा थंडगार असे. परंतु सूर्योदयाच्या वेळेपासून वाळू तापूं लागली की इतकी तापे, कीं भट्टीतून चालल्यासारखे वाटे. म्हणून दिवसा वाळवंटातून प्रवास करणे अशक्य होते. सर्व प्रवासी वाळवंटात प्रवास करावयाचा झाला की रात्रीच प्रवास करीत. त्याचप्रमाणे त्यांना लागणारी रसद, पाणी व लाकूडफाटा बरोबर घेऊन जात. दर्यावर्दी लोकांप्रमाणे त्यांना रात्री दिसणाऱ्या नक्षत्रांवरुन दिशा कळत. उजाडूं लागले की त्यांचा प्रवास थांबे. ते आपल्या गाड्या वर्तुळाकार थांबवीत आणि मधल्या भागात मांडव किंवा शामियाना उभा करून त्याच्या खाली दिवसभर रहात. सायंकाळ व्हायच्या आंत जेवणे वगैरे आटोपून पुन्हां उजाडेपर्यंत पुढचा प्रवास करीत.

बोधिसत्व या रीतीने प्रवास करीत जवळ जवळ सर्व वाळवंट पार करून गेले. फक्त एक योजनच वाळवंट पार करायचे उरले होते. त्या रात्री तेवढा टप्पा पार करून जाता येईल असा विचार करून त्यांनी संध्याकाळी निघण्यापूर्वी आपल्या नोकरांना सांगून लाकूडफाटा, पाणी वगैरे फेकून देवविले. हेतू अर्थातच ओझे कमी होईल एवढाच होता.

सर्वात पुढे जी गाडी चाले त्या गाडीत वाटाड्या होता. तो रात्रभर जागा राही आणि नक्षत्र वगैरे पाहून वाट दाखवीत पुढे चाले. त्याच्या पाठीमागून सर्व गाड्या डोळे मिटून जात.

परंतु त्या दिवशी रात्री वाटाड्याला आळसटल्यासारखे झाले, आणि केव्हां डोळा लागला हे त्याला कळलेच नाही. बैल त्यांना सोयीचे वाटले त्या बाजूला वळत चालत होते.

अरुणोदयाची वेळ झाली तेव्हां वाटाड्याची अचानक झोप मोडली. त्याने नक्षत्रांकडे पाहिले. गाड्या ज्या दिशेला जायला हव्या होत्या त्याच्या ठीक विरुद्ध दिशेला चालत असल्याचे त्याच्या लक्षांत आले आणि ओरडला - "गाड्या उलट्या दिशेने परत जाऊ द्या."

गाड्या फिरल्या, परंतु चूक झाली ती झालीच. कारण उजाडले तेव्हां गाड्या काल सकाळी ज्या जागी येऊन पोचल्या होत्या त्याच जागी पोचलेल्या होत्या. त्यांच्याजवळ पाणी नव्हते, कारण त्यांनी स्वतःच ते ओतून टाकले होते आणि लाकूडफाटाही नव्हता. तो कोणीतरी नाहीसा केला होता.

गाड्या पुन्हां वर्तळाकार उभ्या करण्यात आल्या. सर्व लोक निराश होऊन गाड्याखाली पथारी पसरून आडवे झाले.

अशा प्रसंगी इतरांबरोबर आपण ही धीर सोडला तर सर्वनाश होईल, हे ओळखून बोधिसत्वांनी त्या थंड वेळेचा फायदा घ्यायचे ठरविले व जवळपास कोठे पाणी मिळते कां ते पाहण्यासाठी ते खूप हिंडले सुदैवाने एका जागी हिरवळ दिसली, तिथे थांबले. येथे नक्कीच पाणी



असले पाहिजे. त्या शिवाय हिरवळ कोठून येणार? असा विचार करून त्यांनी पहार फावडी वगैरे मागवून एकाकडून वाळूचा ढिगारा खणून काढला.

पन्नास साठ हात खणून झाल्यावर पहार 'खण्ण' दिशी वाजली. सर्वांनी निराशेचा सुस्कारा सोडला. परंतु बोधिसत्वांना खडकाखाली पाणी असलेच पाहिजे असे खात्रीलायक वाटले. ते स्वतः खड्ड्यांत उतरले आणि दगडाला कान लावून बसले. खडकाखालून पाणी वहात असल्याचा अंधुक आवाज ऐकू आला. ते खड्ड्यातून बाहेर आले व म्हणाले - "हे पहा, आपण हातपाय गाळून बसलो तर सर्वांनाच मरावे लागेल. एकाला बोलावून म्हणाले - "बाबा रे, तू मनाचा दृढनिश्चय करून हा खडक फोड. त्याच्या खाली पाणी आहे. ते पाणी मिळाले म्हणजे आपण सर्व वाचू." बोधिसत्व जितक्या आत्मविश्वासाने बोलले, तितके खरे कोणालाच वाटले नाही. तरी ते म्हणाले, म्हणून तो तरुण गडी खड्ड्यांत उतरला व पहार आणि हातोड्याने खडक फोडूं लागला.

शेवटी खडक फुटलाच. त्याच्या खाली दबून राहिलेले पाणी उसळून वर आले व ताडभर उंच उडू लागले.

सर्वांना पुनर्जन्म झाल्यासारखे वाटले. सर्वांनी पोटभर पाणी पिऊन घेतले आणि आंघोळी केल्या. नंतर जुनाट खटारे मोडून तोडून त्यांचा उपयोग जळाऊ लाकूड म्हणून केला. सैंपाक झाल्यावर जेवून घेतले. बैलांना पाणी पाजले व दाणा दिला. संध्याकाळ होईपर्यंत विश्रांती घेऊन रात्र होताच पुढचा प्रवास सुरू केला. ज्या जागी पाणी लागले होते तेथे खुणेसाठी एक झेंडा उभारून ठेवला व उजाडण्यापूर्वी वाळवंट पार करून गेले.

त्यांनी बरोबर आणलेल्या मालाला तिप्पट किंमत मिळाली. खर्च वजा जाता भरपूर फायदा झाला.

बोधिसत्व आपल्या गांवी परतले. त्यांना व्यापारात जो फायदा होई, तो दानधर्म करण्यात ते खर्च करून टाकीत. त्यांनी सर्व आयुष्य सुखांत, आनंदात घालविले.







# विष्णु पुराण

क्षीरसागराचे मंथन झाले तेव्हां राक्षस देवांची थट्टा करीत आपले भुजबळ दर्शवीत वासुकीची दोरी करून त्याच्या तोंडाकडून धरून ओढू लागले. देवांनी सुद्धां, "आम्ही कांही तुमच्याहून कमी नाही" असे सुचवीत शेपटीची बाजू धरून ओढायला सुरवात केली. पण तो ताण सहन न झाल्यामुळे वासुकी आपल्या अनेक तोंडांतून फेसाळ विष ओकूं लागला.

हलाहल विषाच्या ज्वाळा पसरू लागल्या. कित्येक राक्षस तो ताप सहन न झाल्याने तडफडून भस्म झाले. हलाहल वणव्यासारखे पसरूं लागले व त्रिलोक भस्म होणार की काय, अशी शंका वाटूं लागली. त्याच वेळी रवीसारखा वापरलेला मांदार पर्वत समुद्रांत बुडूं लागला. देव व दानव "हरहर महादेव!" म्हणून शंकराची प्रार्थना करू लागले.

विष्णूने मोठ्या कासवाचे रूप घेऊन कूर्मावतार धारण केला आणि मंदार पर्वताच्या बुडाखाली जाऊन बसला. आपल्या पायांनी त्याने मंदारपर्वताला समतोल उभा करून वर काढला. नंतर तो मधून मधून देवांच्या बाजूने हात लावून ओढी. अशा कासव रूपाने विष्णू प्रगट झाला व समुद्र मंथन उत्तम तऱ्हेने होऊ लागले. आणि क्षीरसागर मंथनातून लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, चंद्र, कल्पवृक्ष, कामधेनू, ऐरावत हत्ती, उच्चश्रवा, अश्वसुरा नांवाचे मद्य आणि अशीच रत्ने उद्भवली.

शंकराचा कंठ विषाने तप्त झाला होता, तो त्याने चंद्राला आपल्या शिखेत ठेवून त्याच्या हिमकिरणांनी शांत केला.

लक्ष्मीने श्रीवत्स कौस्तुभादि मणी ओवून त्यांची वैजयंती माला विष्णूला घालून त्याला



वरले. अशातऱ्हेने विष्णू लक्ष्मीकांत झाला.

सुरा मद्य पिऊन देव 'सुर' झाले.

सर्वांत शेवटी अमृत निघाले. विष्णू आयुर्वेदाचा मूळ पुरुष म्हणून धन्वन्तरी अवतार धारण करून अमृतकलश घेऊन प्रकट झाला. अनेक औषधी वनस्पती घेऊन तो पद्मासनावर बसून समुद्रांतून अवतरला.

अमृत प्राप्तीसाठी क्षीरसागर मंथन केले, तर सर्वप्रथम हलाहल विष उद्भवले. नंतर अनेक रत्ने निघाली ती निरनिराळ्या देवांनी घेतली. शेवटी अमृतप्राप्ती झाली. अनेक कष्ट सहन करून शेवटी सिद्धी प्राप्त झाली की आपण त्याला समुद्रमंथन केले, असे म्हणू लागलो.

धन्वन्तरीच्या हातातील अमृत कलश हिसकावून नेऊन राक्षस "ते सर्व आमचेच!" असे म्हणू लागले. देव त्यांच्याशी भांडू लागले. देवादानवांच्या भांडणाला उग्र रूप येऊ लागले. त्यावेळी थयथय नाचत जगन्मोहिनी तिथे आली. तिला पाहून राक्षस तिच्यावर भाळले.

मोहिनी त्यांना म्हणाली - "तुम्ही ते अमृत इकडे माझ्या हातांत द्या कसे! मी ते वाटते!"

जगन्मोहिनी आपल्याशी बोलली, एवढ्यावरच फुलून जाऊन राक्षसांनी तिला अमृतकलश दिला.

राक्षस एका बाजूला रांगेने बसले. दोघांच्या मध्ये जगन्मोहिनी नृत्य करीत पावले टाकीत अमृत वाटीत असल्याचे सोंग करू लागली.

होते आहे तरी काय, हे निश्चेष्ट होऊन देव पहात राहिले. राक्षस मोहिनीचे लावण्य व नृत्य तन्मय होऊन पाहू लागले.

देवांना सुद्धां जगन्मोहिनी ही कोण आहे, हे प्रथम कळले नाही. तरी ती राक्षसांना अमृत न पाजतां, देवांना येऊन पाजूं लागली तेव्हां विश्वमोहिनी रूपांत हा विष्णूच तर नाही अवतरला, अशी शंका त्यांच्या मनांत आली, तरी ती न दर्शवितां ते गुपचुप अमृतप्राशन करू लागले.

जगन्मोहिनीचे नृत्य म्हणजे विष्णूचीच लीला आहे, हे देवांना चांगले कळले होते आणि ते अमृत प्राशन करून अमरत्व प्राप्त करीत होते; परंतु राक्षस मात्र जगन्मोहिनीच्या रूपावर स्वतःला विसरून अमृताचा आस्वादही घेऊं शकले नाहीत.

तरी राहू नावाच्या एका हुशार राक्षसाला मोहिनीची लबाडी कळली. तो समुद्रातील सुप्रसिद्ध राक्षसीण सिंहिका हिचा मुलगा होता. तो फार मायावी होता.

जी लबाडी चालू होती ती सांगूनही



समजण्याच्या स्थितीत इतर राक्षस नाहीत हे ओळखून राहू देवांचे रूप घेऊन देवांच्या पंक्तीत जाऊन बसला, आणि त्याने अमृत प्राशन केले. सूर्यचंद्रांनी त्याला ओळखले व मंदार पर्वताच्या वरच्या टोकाला बसलेल्या बहुरूपी विष्णूला ते सांगितले. विष्णूने राहूवर आपले सुदर्शन चक्र सोडले.

राहू सुदर्शनचक्रापासून स्वतःचे रक्षण करण्याच्या हेतूने ग्रहमंडळात पळाला. सुदर्शन चक्राने त्याचा पाठलाग करून त्याचा शिरच्छेद केला. म्हणून त्याचे डोके व धड यांचे दोन नवीन ग्रह होऊन राहु व केतू नामे ग्रह मंडळात फिरू लागले. अमृताचा प्रभाव दोन्हींवर असल्याकारणाने ते दोन्ही जिवंत राहिले व म्हणून नऊ ग्रह झाले.

सूर्य चंद्रांनी चहाडी केली म्हणून राहू व केतूचा त्यांच्यावर राग होता व ते मधूनमधून अमावास्येला सूर्याला, आणि पौर्णिमेला चंद्राला, गिळूं लागले. अशा तऱ्हेने सूर्यग्रहणे व चंद्रग्रहणे होऊं लागली.

सर्व अमृत देवांना देऊन जगन्मोहिनी अंतर्धान पावली. सर्व राक्षसांना त्यांच्या मूर्खपणाची तेव्हां कोठे जाणीव झाली. तेव्हांपासून ते विष्णूचे व देवांचे हाडवैरी झाले.

अमृतमंथनाच्या संदर्भात विष्णूने कूर्मावतार, धन्वन्तरीचा अवतार आणि जगन्मोहिनीचा अवतार, असे तीन अवतार धारण केले.

धन्वन्तरी अमृताबरोबर अनेक औषधी वनस्पती, आणि औषधी वेद म्हणजे आयुर्वेद घेऊन आला. म्हणून तो वैद्य शास्त्राचे अधिदैवत व वैद्यांचा कुळदैवत म्हणून पुजला जाऊ लागला.



जगन्मोहिनी ही विश्वमोहिनी नाम एक आदर्श सुंदरी म्हणून प्रसिद्ध झाली.

नारद जगन्मोहिनी अवताराची कीर्ती जगन्मोहिनी रागात वीणेवर गात कैलास लोकी गेला. पार्वतीने ती कीर्ती ऐकली. "मूर्ख राक्षसांना फसवूं शकणारी, एवढ्यावरून ती खरोखरीच जगन्मोहिनी म्हणविण्यालायक झाली का?" अशी शंका पार्वतीने व्यक्त केली.

"होय माते, कितीही हुशार असला तरी त्याचे चित्त आकर्षित करण्याची शक्ती असलेली ती खरोखरच विश्वमोहिनी होती!" असे सांगून नारद निघून गेला.

पार्वतीने त्या गोष्टीचा उल्लेख शंकरासमोर केला. शंकराने फक्त स्मित केले व कांही बोलला नाही. नंतर पार्वतीसह नंदीवर बसून वैकुंठ लोकी गेला व विष्णूला म्हणाला - "तू आपल्या



जगन्मोहिनी अवताराचे पुन्हां एकदां दर्शन घडवशील म्हणून आलो आहो!''

''कांही कारणास्तव रूप घ्यावेच लागते, नाही का? परंतु तुझ्यासारख्या समोर ते रूप घेण्यात काय अर्थ? ते नको!'' असे म्हणून निमिषार्धात विष्णू अंतर्धान पावला.

इतक्यात थोड्याच अंतरावर फुलांचा चेंडू करून त्याच्याशी खेळत असलेली जगन्मोहिनी प्रगट झाली. शंकर देहभान विसरून तिच्या पाठोपाठ निघाला. जगन्मोहिनी तेथून निसटली व आकाशांत उडू लागली. शंकरही दोन्ही हात पंखासारखे हलवीत तिच्या पाठोपाठ उडत निघाला. तेव्हां पार्वती थक्क होऊन पहात जागच्या जागी उभी राहिली.

ती शिव मोहिनी लीला ब्रह्मदेवादी देव मोठ्या उत्साहाने पाहू लागले. नंदीसुद्धा थक्क झाला. नारद आपल्या वीणेवर शिवरंजनी राग वाजवू लागला.

पुढे मोहिनी व पाठीमागून शिव सर्व विश्वभर पळत फिरू लागल्यासारखे दिसले. पार्वती कैलासाला निघून गेली.

जगन्मोहिनीच्या तेजोमंडळांत शिरून जणू कांही ओढून नेल्यासारखा शंकर विश्वभर फिरला व शेवटी कैलासाला पोंचला, तेव्हां 'माझ्या अंगाला स्पर्शही करू नका' असे नकारात्मक हात हलविणाऱ्या मोहिनीजवळ येऊन तिच्या कंबरेला विळखा घालून शंकराने गुडघे टेकले.

''पाहिलंस का माते, तुझ्या यजमानांची लीला!'' शंकर आणखी काय करतो हे भयभीत नजरेने पहात जगन्मोहिनी पार्वतीजवळ येऊन उभी राहिली.

त्या पाठोपाठ विश्वमोहिनी रूप जाऊन त्या जागी विष्णूचा साक्षात्कार झाला.

''दादा! तू विश्वमोहन जगन्मोहिनी रूपांत केशवस्वामी आहेस! हे सर्व तुम्हां दोघां शिवकेशवांचे लीला नाटकच नाही का?'' अशा शब्दांत पार्वतीने विष्णूला विचारले.

''होय माते, तेवढेच हो!'' असे म्हणत नारद महतीवीणा वाजवीत तेथे आला आणि जगन्मोहिनी व शिवरंजनी रागांत हरिहर स्तोत्र गात गात तेथून परत फिरला.

शंकर विष्णूला म्हणाला - ''अमृताला सुद्धां विसरून तुझ्या जगन्मोहिनी रूपावर भाळलेल्या राक्षसांचे मला कौतुक करावेसे वाटते. रस पिपासा हेच असुरांचे वैभव आणि संपत्ती!''

विष्णु स्मित करून पार्वतीला म्हणाला - ''ताई! आणखी कांही काळानंतर शिवरंजनी



म्हणून आमची गंगा स्वर्गातून भूमीवर उतरेल, तेव्हां सुद्धां हा शंकर असाच स्वतःचं देहभान विसरून जाऊन तुला एक सवत घेऊन येईल की काय, असे वाटू लागलं आहे!'' असे म्हणत विष्णू अंतर्धान पावला आणि वैकुण्ठ लोकी निघून गेला.

त्यानंतर कांही काळ लोटल्यावर विष्णूने कर्दम प्रजापती व देवहुतीच्या पोटी पुत्र म्हणून जन्म घेऊन कपिलावतार धारण केला. तो बालपणापासूनच थोर ज्ञानप्राप्ती करून घेऊन घोर तपश्चर्या करून कपिल महामुनी म्हणून प्रसिद्ध झाला.

कपिलाने आई देवहुती हिला तत्वबोध केला. तो सांख्ययोग म्हणून प्रसिद्ध झाला. कपिलमुनी पाताळ लोकात एका गुहेत बसून अखंड तपश्चर्या करीत असतां पृथ्वीवर सगर चक्रवर्तीने शंभरावा अश्वमेध यज्ञ आरंभिला. इंद्राने अश्वमेध यज्ञाचा घोडा चोरला, आणि कपिल मुनी तपश्चर्या करीत होते, त्या गुहेत नेऊन लपवून ठेऊन दिला.

सगराचे एक हजार पुत्र त्या घोड्याचा शोध काढीत, पाताळात खोल गुहा खणीत, कपिल मुनी तपश्चर्या करीत होते, तेथे गेले व तेथे त्यांना घोडा दिसला. कपिलानेच घोडा चोरून आणून ठेवला असला पाहिजे असें समजून कपिल मुनींवर ओरडले. कपिल मुनींचा तपोभंग झाला व त्यांनी डोळें उघडून त्यांच्याकडे पाहिले मात्र, सर्वच्या सर्व सगर पुत्र भस्म झाले आणि भस्माची एक मोठी रास जमली.

त्या भस्माच्या राशीवर विष्णुपादांतून



जन्मलेली, स्वर्गांत मंदाकिनी नामें प्रसिद्ध पावलेली, गंगानदी पृथ्वीवर आणून पितरांचा पुनरुद्धार करण्याचे ठरवून सगराचा नातू भगीरथ तपश्चर्या करू लागला. त्याच्या घोर तपश्चर्येवर प्रसन्न होऊन गंगा नदी प्रकट झाली. परंतु गंगाचा ओघ सहन करण्याची शक्ती पृथ्वीत नसल्यामुळे भगीरथाने तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केले.

गंगावतरण प्रसंगी शंकराने गंगेला पाहिले व तो देहभान विसरला, आणि गंगेला आपल्या जटेत त्याने जखडून बांधून टाकले. नंतर भगीरथाने विनविल्यावरुन शंकराने जटांची गाठ थोडी सैल केली आणि गंगेची बारीक धार सोडली. गंगेने भगीरथाच्या पाठोपाठ जाऊन त्याच्या पितरांच्या भस्म राशीवर ती वाहू लागली व पितरांचा उद्धार केला.

शंकर गंगाधर नामें प्रसिद्ध झाला. अशा तऱ्हेने गंगाही पार्वतीची सवत झाली.

सनकनंदादि नामें प्रसिद्ध मुनी म्हणजे सनक, सुनंद, सनत्सुजात, सनत्कुमार असे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र होते. ते नेहमी बाल स्वरूपांतच असतात. ते नेहमी विष्णुभक्तीत निमग्न राहून विष्णूचे स्तोत्र गात सर्व लोकांत निर्विघ्न हिंडत असतात.

एकदां विष्णूच्या दर्शनार्थ ते वैकुंठलोकी गेले. सर्व द्वारें पार करून विष्णूच्या गर्भगाराच्या द्वारावर पोंचले.

तेथे विष्णू सारखेच रूप धारण करून शंख, चक्र, गदा व पद्म धारण केलेले अभयमुद्रेत दोन द्वारपालक जय व विजय उभे होते. ते सनक-सुनंदांना म्हणाले - "दर्शनाची ही वेळ नाही!" आणि त्यांना त्यांनी अडविले.

सनकसुनंद म्हणाले - "आम्हाला विष्णुदर्शनाला समय-असमय असे कांहीच नसते." "असे सांगुन जय विजय म्हणाले त्याकडे दुर्लक्ष करून गर्भगारात जाऊं लागले तेव्हां द्वारपालकांनी आपापली गदा उगारून त्यांना अडविले.

सनकादि मुनी म्हणाले - "तुम्ही विष्णूचे द्वारपालक होण्यालायक नाही. तुम्ही राक्षस होऊन जन्म घ्या!" त्यांनी या शब्दात शाप दिला.

द्वारांत कांही तरी गोंगाट चालू असलेला ऐकून लक्ष्मीसह विष्णू स्वतः दार उघडून तेथे आला.







# कठीण प्रश्न - योग्य उत्तर

चित्रानंद स्वामी हे अत्यंत श्रेष्ठ विद्वान होते. गांवापासून दूर अशा एका सरोवराच्या कांठी त्यांनी एका सुंदर उद्यानांत विद्यापीठाची स्थापना केली होती व तिथें चांगले शिक्षण मिळण्याची सुविधा दिली जात होती.

ते पंधरा वर्षांचे असतानाच त्यांनी घर सोडले होते. विद्यार्जनासाठी ते अनेक प्रांतांत गेले, आणि तिथल्या श्रेष्ठ पंडितांकडून त्यांनी शिक्षण घेतले.

जेव्हां ते पन्नास वर्षांचे झाले तेव्हां ते नवद्वीपाहून परत आले आणि त्यांनी या विद्यापीठाची स्थापना केली. तिथें सर्वसामान्य विद्यार्थ्यांना प्रवेश मिळणें ही फारच कठीण गोष्ट होती.

पण जे कुणी इथे पांच वर्षांचा शिक्षणक्रम पूर्ण करीत, त्यांना कोणत्याही कचेरींत सहजगत्या नोकरी मिळत असे. त्या कारणामुळे दूरदूरच्या प्रांतातून विद्यार्थी तिथे येत आणि या विद्यापीठांत शिक्षण घेण्याची संधी मिळाली म्हणून स्वतःला भाग्यवान समजत.

इथें प्रवेश मिळण्यापूर्वी विद्यार्थ्यांना बौद्धिक क्षमता आणि व्यवहारिक ज्ञान यांच्या परीक्षा द्याव्या लागत. त्यांत उत्तीर्ण झालेल्यांना विद्यापीठांत प्रवेश मिळे.

एका संध्याकाळीं, अठरा वर्षांचा एक तरुण मुलगा, चित्रानंद गुरुजींना भेटायला आला. त्यांचे चरण स्पर्श करुन त्याने वंदन केले व त्यांना म्हटले, "गुरुदेव, आपल्या विद्यापीठाची प्रसिद्धी व कीर्ती ऐकून मी फार दूरच्या प्रदेशांतून इथें आलो आहे. आपल्या या मान्यवर संस्थेमधें, आपल्यासारख्या गुरुजींच्या मार्गदर्शनाखाली अध्ययन करण्याची माझी महत्वाकांक्षा आहे. आपल्या विद्यापीठांत प्रवेश देण्याची माझ्यावर कृपा करावी ही माझी मनःपूर्वक विनंती आहे."

जितेन आर्य

चित्रानंद स्वामींनी दोनतीन क्षण त्याच्याकडे निरखून पाहिले. त्या तरुणाच्या चेहऱ्यावर विलक्षण तेज विलसत होतं. तो सात्विक व नम्र वाटत होता. त्याच्या व्यक्तिमत्वांत गांभीर्य व कुतूहलपूर्ण भाव स्पष्ट दिसत होता.

हात जोडून उभा असलेल्या त्या तरुणाला ते म्हणाले, "विद्यापीठांत प्रवेश देण्यापूर्वी मी प्रत्येकाची कसून परीक्षा घेतो. ही एक साधारणपणें छोटीशीच परीक्षा असते. माझ्या प्रश्नांचे योग्य उत्तर दिलेस तर तुला विद्यापीठांत जरुर प्रवेश मिळेल."

"ठीक आहे, मी उत्तर द्यायला तयार आहे. आपण विचारावं गुरुदेव," त्या युवकाने आत्मविश्वासाने म्हटले.

"तुला दहा सामान्य प्रश्न विचारुं की एकच कठीण प्रश्न विचारुं?" हंसतहंसत गुरुदेवांनी विचारलं.

"क्षमा करावी, गुरुदेव. परंतु दहा प्रश्न विचारण्यांत आपण आपला मूल्यवान वेळ वांया घालवूं नये. म्हणून आपण एकच कठीण प्रश्न विचारावा." त्या तरुणाने म्हटले.

"तर मग माझ्या प्रश्नाचं तावडतोब उत्तर दे पाहूं! आधी बी कीं आधी झाड?" चित्रानंदस्वामींनी विचारलं.

"झाडच गुरुदेव" तरुणाने उत्तर दिलं.

त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन त्या तरुणाकडे पाहात गुरुदेवांनी विचारलं, "तू उत्तर दिलंस ते बरोबर आहे असं समज. पण झाडच प्रथम येतं हे तू कसं म्हणतोस?"

तरुणाने उत्तर दिलं, "क्षमा असावी गुरुदेव. आपण म्हणाला होतात कीं आपण मला एकच प्रश्न विचारणार आहात. म्हणून मी नम्रपूर्वक सांगतो की या दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर मी द्यायलाच हवं असं नाही."

त्याच्या या उत्तरावर चित्रानंदस्वामींना प्रथम आश्चर्य अवश्य वाटलं, पण नंतर त्या तरुणाची कुशाग्र बुद्धी आणि हजरजबाबीपणा पाहून ते फारच खूष झाले.

त्या दिवशीच त्यांनी त्या तरुणाला विद्यापीठांत प्रवेश दिला.







# सापाची भेट



कोण्या एका काळीं, एका गांवात गिझेला ही एक गरीब मुलगी एका शेतकऱ्याच्या घरी काम करीत होती. ती अनाथ होती आणि आपले पोट भरण्यासाठी तिला काम करणें आवश्यकच होते. तो शेतकरी तिला पगार देत नसे आणि तिच्याकडून भरपूर कष्टाची कामे करुन घेत असे. परंतु, किमान तिला तीन वेळां पोटभर खायला, आणि राहायला जागा व कपडे तो नीटपणे देत होता. गिझेलाला जे कांही मिळत होतं, त्याबद्दल शेतकऱ्याविषयी तिच्या मनांत कृतज्ञताच होती.

एका दिवशी सकाळीं शेतकऱ्याच्या बायकोने तिला बोलावून म्हटले, "गिझेला, गिझेला, अग, जरा गाईची धार काढून आण बरं!" त्यांच्या घरापासून गोठा जरा दूर अंतरावर होता. पाऊस पडत होता. गोठ्यांत पोहोचेपर्यंत गिझेला चिंब भिजली. तरीसुद्धां गारठ्यामुळें कांकडत ती तशीच गायींचे दूध काढूं लागली. तिची बादली दुधाने भरली तशी मागून 'फुस्स्' असा आवाज ऐकूं आला. तिने मागे वळून पाहिले तर एक भला मोठा सर्प तिच्याकडेच येताना तिला दिसला. त्या सांपाच्या मस्तकावर एक सोन्याचा मुकुट होता. गिझेलाच्या तोंडातून किंकाळी बाहेर पडली असती, पण तिची नजर सापाच्या डोळ्यांकडे जेव्हां पडली, तेव्हां ती थबकली. तिला त्याचे डोळे पाहून असं वाटलं कीं सापाला तहान लागली असावी. तिच्या मनांत त्याच्याविषयीं दया उत्पन्न झाली. तिने बादली जरा वांकवली आणि सापाने त्यांतले दूध प्यायले. संतुष्ट होऊन त्याने गिझेलाकडे कृतज्ञतेने ओथंबलेल्या डोळ्यांनी बघितले आणि तो सरसर जात दिसेनासा झाला.

सापाने बादलीमधलं सगळं दूध प्यायलं होतं, आणि बादलींत तळाशी अगदीच थोडंसं दूध उरलं होतं. आता शेतकरीणबाई तिला रागावेल आणि बहुतेक तिला सकाळची न्याहारी देणार नाही, अशी गिझेलाला भीती वाटली. घाबरतच ती घरांत गेली. 'गिझेला, अग गिझेला, गाईची धार काढलीस कां?" स्वयंपाक करताना शेतकऱ्याच्या पत्नीने आंतूनच विचारलं.

"हो" गिझेलाने मंद आवाजांत उत्तर दिलं.



"बादली इकडे घेऊन ये आणि कढईत दूध ओतून ठेव." शेतरीणबाईनि सांगितलं.

गिझेलाने बादलींत उरलेलं दूध ओतलं आणि काय हो? चमत्कारच झाला! बादलींतून दुधाची धार सुरुं झाली. एक कढई भरली, दुसरी भरली, तिसरीही पुरेपूर भरुन गेली.

"पोरगी हुशार आहे हं!" आणि तिच्याकडे बघून शेतकरीबाई प्रथमच प्रेमळपणे हंसली नि म्हणाली, "आता रोज सकाळीं गाईची धार काढण्यासाठी तुलाच पाठवीन मी!"

"नाही, नाही, नको हो! मला किनई दुसरं कोणतंही काम सांगा. मला गोठ्यांत नका हो पाठवूं." सापाच्या आठवणीने घाबरलेली गिझेला दबत्या स्वरांत म्हणाली.

"आजपासून तूच.दूध काढायचंस, सकाळीं पण आणि संध्याकाळींदेखील! कोणतीही सबब सांगू नकोस मला!" शेतकऱ्याच्या पत्नीने दटावले.

गिझेला दररोज दूध काढायला जाऊं लागली आणि डोक्यावर सोनेरी मुकुट असलेला तो साप रोज दूध प्यायला येऊं लागला. तो बादलीमधलं सगळं दूध पिऊन टाकीत असे; आणि घरांत गेल्यावर दररोज बादलीतलं दूध भरलेलं असायचं. शेतकरणीला अपेक्षेपेक्षां बरंच जास्त दूध मिळत होतं म्हणून ती खूष होती. गिझेलाने धारा काढल्या कीं त्याच गायी जास्त दूध कसं देतात याचं तिला आश्चर्य जरूर वाटत होतं. पण सुदैवाने तिने याचा शहानिशा करायचा प्रयत्न केला नाही. त्यामुळें त्या सापाबद्दल कुणालाच कांही माहीत झालं नाही.

हळूंहळूं गिझेलाची आणि सापाची मैत्री झाली. कारण त्याच्यामुळें तिचं जीवन सुसह्य झालं होतं. सापाला जर आपल्याबरोबर बोलता आलं तर? पण जरी तो बोलूं शकत नव्हता, तरी त्याचे डोळे बघितले कीं गिझेलाला त्यांत विश्वास आणि कृतज्ञता यांची झलक दिसत होती.

असे दिवस जात होते. आता गिझेला एक सुरेख तरुणी झाली होती. अनेक शेतकरी तरुणांना तिच्याशी विवाह करण्याची इच्छा होती. शेतकरीणबाई व तिचा नवरा यांच्या लक्षांत आलं कीं गिझेला आता कांही फार दिवस त्यांच्यापाशी राहाणार नाही. ती दोघे तिच्याशी जास्त प्रेमाने वागूं लागली.

गिझेला रोजचे दूध काढण्याचे व इतर घरांतली कामे करीत होती. कोणत्या तरुणाशी तिचे लग्न होईल ते कांही ठरत नव्हते. शेवटी, गिझेलाला असा एक तरुण भेटला कीं जो इतरांपेक्षां वेगळा व जास्त चांगला होता. तिने आनंदाने त्याची मागणी स्वीकारली. तिच्या



लग्नाच्या दिवशी शेतकरी जोडप्याने एक प्रीतीभोजन समारंभ करायचे ठरवले.

गिझेलाचा दूध काढण्याचा आज शेवटचा दिवस! ती गोठ्यांत गेली, व रोजच्याप्रमाणे साप दूध पिण्यासाठी आला.

"अरे मित्रा, तुला ठाऊक आहे कां की तुला दूध प्यायला देण्याचा आज माझा शेवटचा दिवस आहे? कारण उद्या माझा विवाह होणार आहे. त्यानंतर मी माझ्या पतीच्या घरी राहायला जाईन. मग तू मला भेटणार नाहीस. माझ्या पतीच्या घरी गाय नाही, तेव्हां मी कांही तुला यापुढे दूध देऊं शकणार नाही." गिझेलाने उदासवाण्या स्वरांत म्हटलं.

सापाने तिच्याकडे सहानुभूतीच्या नजरेने पाहिलं. "प्रिय मित्रा, मला तुझी नेहमीच आठवण येत राहील! तू किती रे चांगला आहेस! मी ज्या तरुणशी लग्न करणार आहे, तो गरीब आहे. पण तो दयाळू आणि चांगल्या स्वभावाचा आहे. गरीबी असली तरी सुद्धां मी त्याच्याबरोबर सुखासमाधानाने संसार करीन."

सापाने तिच्याकडे पुन्हां एकवार प्रेमळ दृष्टी



टाकली, आणि तो सरपटत निघून गेला.

गिझेलाच्या लग्नाचा समारंभ छानच झाला. गांवातला प्रत्येकजण लग्नाला हजर राहिला होता. एकाएकी सगळेजण स्तब्ध झाले. सारेजण उभे राहिले, पण काय झालंय ते कांही कळेना. प्रथम सर्वांनी एक फुसत्कार ऐकला, व नंतर सोनेरी मुकुट धारण केलेला एक साप सरसरत तिथे आला. तो साप तिथे बसलेल्या नववधूच्याजवळ गेला आणि तिच्या खांद्यावर चढून तो आपले मस्तक डोलवायला लागला. त्याच्या डोक्यावरचा मुकुट तिच्या मांडीवर पडेपर्यंत तो मस्तक हलवत होता. तो मुकुट पडल्यानंतर तो सरपटत बाहेर गेला आणि अंधारात दिसेनासा झाला. सर्व लोक आश्चर्याने थक्क झाले होते. कुणाच्या तोंडून शब्द फुटेना. पण आपला मित्र लग्नसमारंभाला आलाय हे पाहून गिझेलाचे डोळे आनंदाने पाणावले. तिला अश्रू आवरेनात. तो चिमुकला मुकुट तिने आपल्या बटव्यांत नीट ठेवला. समारंभानिमित्त मेजवानी व आनंदोत्सव पहाटेपर्यंत चाललेला होता.

दुसऱ्या दिवशी गिझेलाने आपला बटवा खोलला. तर त्यांत सोन्याची नाणी भरलेली होती. तो बटवा तिने रिकामा करण्यासाठी उलटा केला, तर त्यांत आणखी नाणी भरली गेली. त्या दिवसापासून तिचा बटवा कधी रिकामा राहिला नाही. तिने कितीही नाणी काढली तरी बटवा आपला पुन्हां भरलेलाच! त्यानंतर त्या प्रदेशांत गिझेला व तिचा पती हे सर्वात श्रीमंत जोडपे झाले. ती दोघेही प्रेमळ व उदार होती, म्हणून ती सर्वांची आवडती झाली. त्यांच्या संपत्तीतून ते सर्वांना मदत करीत होते, विशेषतः ज्यांनी तिचा संसार थाटायला मदत केली त्या शेतकरी जोडप्याला त्यांनी नेहमीच प्रेमाने व आदराने वागवले.



# अमर फळ

फार फार पूर्वी एक मुनी संसारातून विरक्त होऊन अरण्यांत जाऊन तपश्चर्या करायला लागला. एक दिवस देव प्रसन्न झाला आणि त्याने प्रकट होऊन मुनीच्या हातांत एक फळ दिले व म्हटले, "मी तुझ्या तपश्चर्येवर प्रसन्न झालो आहे. हे अमरफळ तू आपल्या हातांत घे आणि जे मनांत येईल त्याची इच्छा कर, ते तुला लागलीच मिळेल." असं म्हणून देव अंतर्धान पावला.

वास्तविक त्यावेळेला मुनीच्या मनांत कोणतीही इच्छा नव्हती. देवाने बहुतेक आपली परीक्षा घेण्यासाठी हे फळ आपल्याला दिले असावे असे त्याला वाटले. या फळाच्या माध्यमाने जनतेचे कल्याण साधता येईल असा विचार करुन तो राजाकडे गेला. मुनीला पाहून राजाला आनंद झाला. त्याने मुनीवर्याचे आदराने स्वागत केले व येण्याचे कारण विचारले.

"राजन्, हे एक अमरफळ आहे. याची किंमत देऊन जो हे विकत घेईल, त्याची एक इच्छा पूर्ण होईल. त्यानंतर हे फळ दुसऱ्याला कमी किंमतीला विकलं पाहिजे. इच्छापूर्ती झाल्यानंतर एक आठवड्यापेक्षां जास्त दिवस हे फळ त्या व्यक्तीने स्वतःजवळ ठेवायचे नाही. तसे ठेवणे धोक्याचे ठरेल. हे फळ मी प्रथम आपल्याला देतो आहे. यासाठी आपण याची काय किंमत मला द्याल?" मुनीने सांगितले.

राजाच्या मनांत लागलीच एका इच्छेची पूर्णता व्हावी असे विचार आले. शेजारच्या राज्या बरोबर बरीच वर्षे त्यांचा संघर्ष चालू होता. त्यांत बराच खर्चही होत होता. या अमर फळाच्या कृपेने शेजारच्या राजावर विजय मिळवावा अशी इच्छा प्रकट करुन त्याच्यासाठी एक लाख सुवर्ण-मुद्रा देऊन ते फळ खरेदी करायचे असा त्याने निश्चय केला.

मुनीने ते फळ त्याला देऊन पुन्हां बजावले, "राजन्, इच्छापूर्ती झाल्यानंतर एका आठवड्याच्या आंत हे फळ कमी किंमतीला ज्याला विकशील, त्यालाही ही गोष्ट व सूचना सांगायला हवी."

एवढे सांगून, एक लाख मोहरा घेऊन मुनी गेला आणि त्या मोहरा त्याने गोरगरिबांना वाटून टाकल्या. पुन्हां अरण्यांत जाऊन त्याने नव्या तपश्चर्येला सुरवात केली.

- २५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट -




अमरफळाच्या शक्तीने राजाची इच्छापूर्ती झाली. जेव्हां युद्ध पुन्हां सुरुं झालं, तेव्हां शेजारच्या राजाचा दारुण पराभव झाला, आणि त्याचे राज्य ह्या राज्यांत विलीन झाले.

विजय मिळाल्याबरोबर राजाने भर दरबारांत ते अमरफळ सर्वांच्यासमोर ठेवलं, त्याची कहाणी सविस्तर सांगितली आणि पुढे म्हटले, "ज्याला हे फळ विकत घेण्याची इच्छा असेल त्याला हे विकायला मी तयार आहे." एका जुनाट रोगाने आजारी असलेल्या एका रुग्णाने ते फळ नव्वद हजार मोहरा देऊन खरेदी केले आणि आपल्या रोगाचे निवारण केले.

लगेच ते अमर फळ दुसऱ्याच्या हातांत गेले. अशा प्रकारे त्याच्या प्रभावामुळें कित्येक लोकांच्या अडचणी दूर झाल्या. कांहीजण चांगले व्यापारी झाले, कांही विद्वान बनले, कांहीजण व्याधीमुक्त झाले. त्यांच्या इच्छा पूर्ण झाल्या आणि त्याबरोबर त्या अमरफळाचा प्रभावही वाढत गेला.

असे बरेच दिवस गेले. पुष्यार्क नांवाच्या एका गृहस्थाला धनुर्वात झाला. त्यापूर्वी एकदा ते अमर फळ विकत घेऊन आपल्या पत्नीला मृत्यूच्या दाढेंतून वांचवले होते. त्याने त्या फळाची चौकशी केली, तेव्हां त्याला कळले कीं दोन पैसे देऊन जर त्याचे दुखणे बरे झाले तर ते फळ त्याला दुसऱ्याला एका पैशाला विकावे लागले असते.

त्यानंतर मात्र त्या माणसाला ते फळ विकणें अशक्य झाले असते व तो संकटात सांपडला असता. असा विचार करुन पुष्यार्कने ते फळ खरेदी केले नाही व त्याने वैद्याच्या औषधावरच भरंवसा ठेवला.

परंतु त्याच्या पत्नीने, मालिनीने, आपल्या पतीच्या नकळत नोकराजवळ दोन पैसे दिले आणि ते अमरफळ मागवून घेतले. पतीची व्याधी दूर व्हावी अशी तिने इच्छा प्रकट केली.

पुष्यार्कचा आजार लौकरच ठीक झाला. त्याला वाटले कीं वैद्यराजांच्या औषधाचाच हा गुण असावा.

आता ते फळ मालिनीला एक पैशाला विकावे लागले असते. पण ते कुणाला विकायचे? जो कुणी ते खरेदी करेल, त्याची काय अवस्था होईल?

म्हणून ते फळ विकायचेच नाही आणि जे कांही संकट सोसावे लागेल ते स्वत: सोसण्याचे तिने ठरवले. पण ते कसले संकट असेल, या भीतीने मालिनीची प्रकृति बिघडली.

एक दिवस तिच्या नोकराने विचारले, ''आई साहेब, आपली प्रकृति ठीक नाही कां?''

''आता मी जास्त दिवस जगणार नाही रे!'' असं म्हणताना तिला रडूं कोसळले. तिने त्याला त्या अमरफळाची सारी कथा सांगितली.

''पण आईसाहेब, असं कां?'' नोकराने विचारले.

''अरे, हे फळ मी कुणाला विकणार? जो कुणी हे विकत घेईल, तो या संकटाच्या जाळ्यांत अडकेल. जाणूनबुजून मी दुसऱ्या माणसाला मरणाच्या दारांत उभा करूं? त्यापेक्षां मीच मेले तरी चालेल.'' मालिनीने म्हटले.

नोकराने हंसून उत्तर दिले, ''कुणालाही मरायची वेळ येणार नाही. हे फळ एका पैशाला मीच विकत घेईन बघा!''

''अरे वेड्या! तुझी इच्छा पूर्ण झाली कीं ते फळ तू कुणाला नि कसं विकणार?'' मालिनीने विचारलं.

''पण मी कांही इच्छा केली तरच त्यानंतर फळ विकावं लागेल ना? तुम्ही खरंच विचारलंत तर मला कोणतीही इच्छा नाही. इच्छा पूर्ण करण्याची ज्याची मनीषा असेल, त्याला हे फळ नंतर विकण्याचा धोका पत्करावा लागेल. ज्याला ती इच्छाच नाही, त्याला कसला आलाय धोका? मी हे फळ पेटींत बंद करुन लपवून ठेवीन.''

असं सांगून त्याने मालिनीच्या हातांत एक पैसा दिला. ते अमरफळ घेऊन ते त्याने लांकडी पेटीच्या तळाशी लपवून ठेवले. त्यानंतर त्या फळाचे काय झाले, कोण जाणे! पण त्या नोकराचे मात्र कसलेच नुकसान कधीही झाले नाही.












# प्रेमनाथची थप्पड

प्रेमनाथ गरीब होता, तरीसुद्धां परतफेडीची अपेक्षा न धरता सर्वांना मदत करीत होता. तो दिवसभर काबाडकष्ट उपसीत होता, तरीदेखील जरुर पडेल त्याला मदतीचा हात द्यायला त्याने कधी मागेपुढे पाहिले नाही.

त्याचा भोळेपणा पाहून गांवचा पुजारी त्याला वरचेवर सल्ला देत होता, "हे बघ, मागितल्याखेरीज आईदेखील मुलाला कांही खायला देत नाही. तू दुसऱ्यांना मदत करतोस, त्यावेळेला त्यांच्याकडून त्याचे वेतन किंवा बक्षीस माग."

"मी त्याचे मोल मागितले तर ती मदत कशी होईल? मी कष्टाचे मोल घेतो, मदतीसाठी कांहीही घेत नाही. जे माझ्याकडून मदत घेतात, ते ती गोष्ट लक्षांत ठेवतीलच. आणि मला गरज पडेल तेव्हां मला नक्की मदत करतील." प्रेमनाथ असे उत्तर त्याला देत होता.

त्या गांवात रंगनाथ नांवाचा एक चिक्कू धनिक राहात होता. त्याला प्रेमनाथचा स्वभाव माहीत झाला. त्याच्याकडून फुकट काम करुन घेता येते, हे जेव्हां त्याला समजले, तेव्हांपासून तो प्रेमनाथकडून कांही ना कांही काम करुन घेऊं लागला.

रंगनाथची आई आजारी पडली. दर रोज वैद्यबुवांना तिच्या प्रकृतिची माहिती सांगून औषध आणावे लागत होते. हे काम रंगनाथने प्रेमनाथवर सोंपवले.

रंगनाथचा निरनिराळ्या प्रकारच्या वस्तूंचा व्यापार होता. त्या वस्तूंच्या किंमती जाणण्यासाठी त्याला आठवड्याच्या बाजारांत जावे लागत होते. हे कामदेखील तो आता प्रेमनाथला सांगू लागला. इतकेच नव्हे, तर कुणाला निरोप पोंचवायचा असला तरी त्यासाठी प्रेमनाथची मदत रंगनाथ घेत होता.

रघुनाथ मिश्रा

तेवढ्यांत प्रेमनाथच्या मुलीचे लग्न ठरले. लग्नाचा खर्च करण्याइतकी रक्कम प्रेमनाथजवळ नव्हती. त्याने चारपांच लोकांकडे मदत मागितली. पण कुणीही मदत करायला पुढे आले नाहीत. पुरोहिताने परिस्थितीचा अंदाज घेऊन प्रेमनाथला सांगितले, "तुला मदत करण्याची ताकद फक्त रंगनाथमधे आहे. नाही तरी रोज तो तुझ्याकडून कांही ना कांही काम करुन घेतोच. जा नि त्याच्याकडे मदत माग."

प्रेमनाथ त्याच दिवशी रंगनाथकडे गेला आणि म्हणाला, "नमस्कार मालक, मी कांही मदत मागण्यासाठी आलो आहे."

रंगनाथ हिशोबाच्या वह्या तपासण्यांत मग्न होता. मदत हा शब्द ऐकताच तो जरा सावध होऊन म्हणाला, "मदत? तू आहेस कोण?"

प्रेमनाथला जरा आश्चर्य वाटले. तो म्हणाला, "मालक मला ओळखत नाही? तुम्ही तर रोज मला कांहीतरी काम सांगत असता." असे म्हणून त्याने कामाचे स्वरुप सांगितले.

रंगनाथने नकार दिला. "मला कांही आठवत नाही. मी रोज अनेकांना काम सांगतो. तू म्हणतोस माझ्या आईसाठी तू औषध आणून देत होतास. चल, तिच्याकडे जाऊं, ती तुला ओळखते कां बघू?"

रंगनाथने असे म्हणून प्रेमनाथला आपल्या आईकडे नेले. आई म्हणाली, "ह्याला कुठे तरी पाहिल्यासारखें वाटते आहे. त्या दिवशी औषध आणणे हे काम मला जमणार नाही, असे म्हणाला होता. औषधाशिवाय त्या दिवशी मला खूप त्रास झाला. मी त्याला खूप शिव्याही दिल्या."



या प्रसंगाने प्रेमनाथला धक्का बसला. तो दुःखी मनाने घरी परतत असताना वाटेत त्याला पुरोहित भेटले. त्याच्या उतरलेल्या चेहऱ्याकडे पाहून त्यांनी विचारले, "काय झाले?"

प्रेमनाथने सगळीं हकिकत त्यांना सांगितली. पुरोहिताने जरा विचार केला, तो म्हणाले, "रंगनाथ समजतोय कीं तू फक्त कामच करुं शकतोस. तू भित्रा आहेस. तू अनेक वेळा त्याच्या पत्नीला पण मदत केली आहेस. तू तिच्याकडे जा. तिनेही जर तुला ओळखण्यास नकार दिला तर तुझ्यातील हिंमत तू दाखव. तू कांहीही करु शकतोस, ते तिला दाखव. कसे दाखवायचे हे तूच ठरव." असे सांगून पुरोहित निघून गेला.



पुरोहिताच्या सांगण्यावरुन त्याच्यातील हिंमत जागी झाली. तो रंगनाथच्या घरी गेला. त्यावेळीं तो अंगणात आपल्या पत्नीशी बोलत होते! प्रेमनाथ जोरांतच म्हणाला, "मालक, तुमच्या पत्नीलाही मी अनेकवेळा मदत केली आहे, विचारा त्यांना."

रंगनाथने डोळे लाल करुन प्रेमनाथकडे पाहिले व पत्नीला विचारले, "तू ह्याला ओळखतेस का? तो म्हणतो की त्याने तुला मदत केली आहे."

"पाहिल्यासारखे वाटते आहे? एकदां केळीची पानें कापण्यास त्याला सांगितले होते, तर दहा-बारा पाने कापली आणि निघून गेला. अगदी आळशी आहे." रंगनाथच्या पत्नीने उत्तर दिले.

प्रेमनाथने अगदी कडव्या स्वरांत सांगितले. "मी मेहनत करुन खातो. जेव्हां जरुर पडेल तेव्हां दुसऱ्याला त्यांनी कांही द्यावे अशी आशा न ठेवता मदत करतो. मी तुम्हाला वेळोवेळी मदत केली आहे, पण तुम्ही सर्वजण मी मदत केल्याचे विसरलात."

त्याच्या बोलण्यावर रंगनाथ जोरजोराने हसूं लागला. "श्रीमंतांना मदत करणे हे गौरवास्पद असते. म्हणून अनेकजण माझ्या मदतीसाठी धावून येतात. तुला जर वाटत असेल की आम्ही तुझी ओळख ठेवावी, तर कांही मोठे काम करुन दाखव."

"मी केलेल्या कामाचे खूप कौतुक करावे असे म्हणत नाही, पण जे काम मी केले होते त्याबद्दल विनाकारण शिव्या देतात ह्याचे दुःख वाटते." प्रेमनाथ म्हणाला, "अरे, चिमूटभर मिठाने दूध नासून जाते. तुझ्या बाबतीत तसेच झाले आहे." रंगनाथ म्हणाला.

"मालक, जे झाले ते झाले. मला माझ्या मुलीच्या लग्नासाठी कांही रुपयांची जरुरी आहे. तेव्हां मदत करा. आपले उपकार मी कधीही विसरणार नाही." प्रेमनाथ काकुळतीला येऊन म्हणाली.

रंगनाथ जरा रागानेच म्हणाला, "जरुर मदत केली असती, पण मी तुला ओळखतच नाही, मग मदत कशी करणार?"

रंगनाथच्या बोलण्याने प्रेमनाथ रागावला, व त्याने रंगनाथला जोरांत थप्पड मारली. कांही न सुचून रंगनाथ पहातच राहिला, पण तोपर्यंत प्रेमनाथ निघून गेला होता.



रंगनाथचा असा अपमान करण्याचे साहस आजपर्यंत कोणी दाखवले नव्हते. तो रागाने उठला आणि सरळ गांवप्रमुखाकडे गेला. त्याच्याकडे तक्रार करीत रंगनाथ म्हणाला, "त्या मूर्खाने मला थप्पड मारली. त्याला जर शिक्षा केली नाहीत, तर गांवात अत्याचार माजेल."

गांवप्रमुखाने ताबडतोब प्रेमनाथला बोलावणे पाठविले. त्याच्या बदली पुरोहित तेथें आला आणि म्हणाला, "प्रेमनाथ त्याच्या मुलीच्या लग्नाच्या काळजीत आहे. तशांत त्याला खूप ताप आहे. त्याला इथपर्यंत चालत येणे कठीण आहे. जे झाले ते सांगण्यासाठी त्यांनी मला पाठवले आहे."

"त्याचे म्हणणे काय आहे?" गांवप्रमुखाने विचारले.

"प्रेमनाथचे म्हणणे असे आहे कीं रंगनाथची स्मरणशक्ती अगदी कमजोर आहे. कांही लोक त्याला मदत करतात, तर कांही लोक त्याच्यावर हात चालवतात. पण वेळ पडली तर त्याला कुणी ओळखत नाहीं." पुरोहिताने प्रेमनाथची बाजू मांडली.

ते ऐकून रंगनाथ रागाने जोरजोरांत ओरडूं लागला. "त्याचे नाव प्रेमनाथ. त्याच्या मुलीचे लग्न ठरले असून तो पैशाची मदत मागायला माझ्याकडे आला होता. मी नाही म्हणताच त्याने मला जोरांत थप्पड मारली."

"प्रेमनाथने रंगनाथची आणि त्याच्या परिवाराची कांही अपेक्षा न करता आजपर्यंत मदत केली. पण त्यांनी ओळख सुद्धां दाखविली नाही. तो म्हणाला की तूं कांही तरी मोठे काम करुन दाखव. मग ते तुला ओळखतील. त्याने थप्पड मारली, ती त्यांच्या चांगलीच लक्षांत राहिली, म्हणजे मोठे काम करुन दाखविले. त्याबद्दल त्याचे कौतुक करायचे सोडून तक्रार कशाला केली?" पुरोहिताने गांवप्रमुखाला विचारले.



आता सगळी घटना गांवप्रमुखाच्या लक्षांत आली. परंतु पुरोहिताचे सर्व म्हणणे मान्य करण्यासारखी परिस्थिती नव्हती. ते म्हणाले, "तू कितीही त्याची बाजू घेतलीस तरी चूक लपत नाही. चूक ही चूकच आहे, त्याबद्दल त्याला शिक्षा मिळालीच पाहिजे."

"पाटील, प्रेमनाथने रंगनाथची सेवा केली पण त्याचे फळ त्याला मिळाले नाही. जो कामाचा

मोबदला देऊं शकतो, त्यालाच चुकीबद्दल शिक्षा करण्याचा अधिकार आहे.'' पुरोहिताने आपले स्वतःचे मत मांडले.

पुरोहिताचे हे मत ऐकताच गांवप्रमुख जरा अस्वस्थ होऊन म्हणाला, ''प्रेमनाथबद्दल मी बरेच ऐकले आहे. तो गांवातील अनेक लोकांना मदत करतो. त्याने मला ही मदत केली आहे. त्याने चूक केली त्याबद्दल शिक्षा करण्याच्याअगोदर त्याने जी मदत केली त्याबद्दल मोबदला देणे जरुरीचे आहे. त्याने ज्यांना ज्यांना मदत केली, त्यांच्याकडून मोबदला मिळवून देण्याची जबाबदारी माझी आहे. त्याने गांवातल्या सगळ्यांना इतकेच काय पण मलाही थप्पड मारली, तरी त्याला शिक्षा करण्याचा अधिकार मला नाही.''

गांवपाटीलाचे हे बोलणे ऐकून सगळ्या गांवकऱ्यांना जणूं आपल्यालाच थप्पड मारली आहे, असे वाटूं लागले. त्यांनी प्रेमनाथच्या मुलीच्या लग्नासाठी मदत करण्याचा निश्चय केला.

पाटील पुरोहिताला म्हणाला, ''मला कळत नाही, कीं हे सर्व म्हणणे प्रेमनाथचे आहे, किंवा तुमच्या मनांतले आहे; पण तो जे बोलला ते खरे आहे. प्रेमनाथ स्वतः येऊन असे नीट सांगू शकला नसता. वेळेवर येऊन आलेल्या अडचणीचे योग्य ते निवारण तुम्ही केले आहे. पुरोहिताचे हेच काम आहे.''

जमलेले लोक आपसांत मोठ्याने बोलूं लागले. रंगनाथने ते सर्व ऐकावे अशी त्यांची इच्छा होती. ते आपसांत म्हणूं लागले.'' गांवात इतके लोक रहातात, पण त्यांच्याकडे मदत न मागता प्रेमनाथ त्या कंजूष रंगनाथकडेच गेला.''

त्यांचे सर्व बोलणे ऐकून रंगनाथला आपली चूक कळली व त्याचे डोळे उघडले. तो स्वतःशीच म्हणूं लागला, ''प्रेमनाथने मला थप्पड मारली नसून माझ्या स्वार्थीपणाला थप्पड मारली आहे. त्याच्याकरिता मिळालेली शिक्षा योग्यच आहे. यापुढे जो कोणी मदत करील त्याबद्दल मोबदला देणे माझे कर्तव्य आहे. प्रेमनाथ सारख्या चांगल्या माणसाला दूर ठेवणे योग्य नाही. मी चूक सुधारुन गांवातील लोकांचे प्रेम पुन्हां मिळविण्याचा प्रयत्न करीन.''







# अस्वल्या मांत्रिक

## 6

*(चंद्रशिला नगरीवर हल्ला करायला गेलेल्या दुर्मुखराजावर अस्वल्या मांत्रिकाने अस्वल्या वधिकाला सोडले. ते पाहून दुर्मुख आपल्या एका अंगरक्षकाबरोबर घोड्यावर बसून अरण्यांत पळाला पण तिथे दरोडेखोरांच्या टोळीचा नागमल्ल नांवाचा नायक होता. त्याने झाडावरुन दोरीचा फांस दुर्मुखवर फेकला व त्याला वर खेंचले. त्यानंतर....)*

जेव्हां दोघे डाकू जोराने ओरडत झाडाच्या फांद्यांतून अचानक दुर्मुखराजाच्या घोड्यापुढे उडी मारुन खाली आले, तेव्हां दुर्मुखराजाच्या अंगरक्षकाने घोड्याचा लगाम खेंचत कांपऱ्या आवाजांत म्हटले, ''महाराज, माझ्या कमरेला तलवार जरुर लटकते आहे, पण यावेळीं मी असहाय्य आहे. माझ्याकडून आपल्याला कांहीही अपाय होणार नाही.''

दरोडेखोरांचा नायक नागमल्ल याने आपल्या डाव्या हातांत घोड्याचा लगाम पकडला होता, आणि उजव्या हातांतली तलवार अंगरक्षकाच्या गळ्याकडे नेत तो म्हणाला, ''अरे, तू जरी तलवार उपसलीस तरी आम्ही कांही घाबरणारे नाही. तो बघ, तुझ्यापुढे जाणारा घोडेस्वार कसा फांदीवर लोंबकळतोय ते! तुमच्या दोघांच्याबरोबर आणखी कुणी येत आहेत कां?''

काय उत्तर द्यावं ते बिचाऱ्या अंगरक्षकाला कांही सुचेना. कांहीजण मागोमाग येत आहेत असं जर सांगितलं तर हा धोका टळला असता कां? कीं आम्ही दोघेच आहोत असं सांगितलं



तर धोका कमी झाला असता? तेव्हां झाडाच्या फांदीवर लटकलेला दुर्मुख एकदम ओरडला, ''अरे अंगरक्षक, कुठे आहेस तू?''

त्यावर आपली तलवार परजत दरडावणीच्या सुरांत नागमल्ल ओरडला, ''तू अंगरक्षक आहेस? कसल्या तऱ्हेचा अंगरक्षक आहेस तू? तुझा राजा कोण आहे? पण त्या आधी तू घोड्यावरुन खाली उतर बघूं!''

अंगरक्षक घोड्यावरुन खाली उतरला. नागमल्ल राजाला सोडवण्यांत गुंतलेल्या डाकूला म्हणाला, ''अरे, आज आपल्या हातांत चांगले श्रीमंत लोक सांपडले आहेत, लोण्याचा मोठा गोळा समोर आलाय. त्या इसमाला सावकाश उतरव, नाहीतर त्याचं कंबरडं मोडेल.''

त्या डाकूने फांदीवर लोंबकळणाऱ्या दुर्मुखला अगदी सावकाश खाली उतरवले. दुर्मुख आपल्या कमरेतली फांसाची दोरी सोडवायचा प्रयत्न करूं लागला. ते पाहून नागमल्लच्या जवळ उभा असलेल्या आणखी एका डाकूने दुर्मुखला करड्या स्वरांत प्रश्न केला, ''कमरेतला दोरीचा हा फांस गळ्यांत अडकवून घ्यायचा आहे कीं काय?''

तोपर्यंत झाडावरुन उतरलेला डाकू व नागमल्ल तिथें जवळ येऊन पोंचले. एकवार दुर्मुखला नखशिखांत न्याहाळत नागमल्ल म्हणाला, ''तुझा किंमती पोशाख आणि नक्षीकाम केलेले तलवारीचे म्यान पाहिल्यावर तू बराच पैसेवाला असला पाहिजेस असं वाटतंय. आता कांहीही गडबड न करता तू अगोदर तुझ्याजवळचे सारे पैसे काढून समोर ठेव, आणि नंतर तुझ्या रक्षकाला घरी पाठवून आणखी दहा हजार मोहरा मागवून घे. नाहीतर तुझे शरीर समोरच्या पर्वतांतल्या गुहेत राहाणाऱ्या एखाद्या वाघाचे भक्ष्य होईल.''

हे बोलणें ऐकून दुर्मुखराजा विचार करुं लागला, ''जर स्वतःला अमुक देशाचा राजा आहे असे मी सांगितले, तर हा दरोडेखोरांचा नायक आत्ताच माझा शिरच्छेद करील आणि चंद्रशिला नगरीच्या जितकेतु राजाच्याकडे माझे मस्तक पाठवून इनाम मिळवील. जर मी कुणीतरी धनिक व्यापारी आहे असे खोटे सांगितले तर या अंगरक्षकाला घरी पाठवून दहा हजार मोहरा मागवून घेता येतील. त्याकाळांत जर माझा खोटेपणा उघड झाला तर...

तितक्यांत नागमल्लाने चिडून, दांतओंठ खात, दुर्मुखची तलवार खेंचत त्याला विचारले, ''विचार कसला करतो आहेस? इथून पळून जायची कांहीतरी योजना डोक्यांत आहे कीं काय?''

उत्तरादाखल दुर्मुखने म्हटलं, ''दहा हजार मोहरा कशा मागवायच्या, त्याचाच मी विचार



करतो आहे. माझं नांव दुर्जयगुप्त आहे, मी उदयगिरीचा राहाणारा आहे. पण आत्ता याक्षणीं माझ्याजवळ एक कवडीदेखील नाही.''

हे उत्तर ऐकून चकित झालेला नागमल्ल म्हणाला, ''असले किंमती कपडे अंगावर, सोबत एक अंगरक्षक बाळगतोस, आणि हातांत एक कवडीदेखील न ठेवता या अरण्यांतून प्रवास करतोस कां? तुझ्या या बोलण्यावर कोण विश्वास ठेवील रे?'' आणि आपल्या सहकाऱ्यांकडे वळून नागमल्ल पुढे बोलला, ''ऐका रे, याच्या कमरेचा दोर काढून त्याच्याच गळ्यांत अडकवा. तोपर्यंत याला फांशी द्यायच्यासाठी कोणती फांदी जास्त मजबूत आहे, ते मी पाहातो.''

नागमल्लचे बोलणे पुरे होण्याअगोदर दूर अंतरावरुन हत्तीचा चित्कार आणि अस्वलाचे ओरडणे ऐकूं आले. राजा दुर्मुख व त्याचा अंगरक्षक, तो आवाज ऐकून भीतीने थरथर कांपू लागले. अंगरक्षकाने चौफेर बघून म्हटले, ''महाराज, मला वाटलं होतं कीं अस्वल्या बधिक अरण्यांत मार्ग चुकला असेल. पण आपल्या खाणाखुणा पाहून तो याच बाजूला आपल्या मागोमाग येतोय!''

दरोडेखोरांचा नायक चकित झाला. आपल्या अनुयायांकडे आश्चर्याने नजर फिरवीत तो म्हणाला, ''तुम्ही ह्यांचे बोलणे ऐकलंत ना? हा तर आपले नांव दुर्जयगुप्त सांगतोय आणि हा दुसरा त्याला 'महाराज' म्हणतो आहे! सगळ्यांत विचित्र गोष्ट म्हणजे अस्वल्या वधिक... आणि त्याचा या अरण्यांत म्हणे मार्ग चुकलाय?'' असं म्हणून नागमल्लने तलवार उपसून विचारले, ''अरे,



खरं काय ते सांग, तुम्ही दोघे बावरला आहात, कीं बनावट गोष्टी बोलून आम्हाला फसवायचा प्रयत्न करत आहात?''

दुर्मुखराजा घाबरला. या प्रश्नाला काय उत्तर द्यावे याचा तो विचार करीत होता, तेव्हां हत्तीचा चित्कार आणि अस्वल्या वधिकाची गर्जना अगदी मोठ्याने ऐकूं आली. ती ऐकून नागमल्ल देखील घाबरुन गेला.

तो एका अनुयायाला म्हणाला, ''अरे ऐक, तू झाडावर चढून बघ जरा! हत्तीचे ओरडणे आणि अस्वलाच्या आवाजाबरोबर माणसांचा आवाज कसा येईल?''

एकजण झटकन जवळच्या एका झाडावर चढला आणि दुसऱ्याच क्षणीं ओरडला, ''मल्ल, तो दुर्जयगुप्त आणि त्याचा नोकर जे सांगताहेत ते अगदी खरं आहे. सोंड उंचावलेला एक हत्ती आणि त्यावर हातांत परशू घेतलेले अस्वल!



अरे बापरे, त्या परशूच्या वाराने झाडांच्या फांद्या गवताच्या काडासारख्या मोडून इकडे तिकडे पडताहेत.''

नागमल्ल विचारांत पडला, तेव्हां दुर्मुख राजाने त्याचा हात पकडून म्हटले, ''मल्ल, आपण इथून लगेच पळून गेलं पाहिजे. पैशाच्या लोभाने तू आमचे प्राण घेऊं नकोस. हवं तर तुला मी एक राज्य देखील माझ्या पैशाने विकत घेऊन देऊं शकतो.''

अंगरक्षकाने घोड्यावर स्वार होऊन पळून जायची युक्ती सांगितली. लगाम पकडीत तो नागमल्लला म्हणाला, ''नागमल्ल! यावेळीं जर तुम्ही महाराजांचे प्राण वांचवलेत तर ते तुम्हाला अर्धे राज्य बक्षीस देतील. मी घोड्यावर बसून राजधानीला जातो आणि सेना घेऊन परत येतो.''

''हे काम मी स्वतः करुं शकतो. पण या दाट अरण्यांत आता राजधानीकडे जायचा मार्ग नीट सांपडायला हवा ना!'' असं म्हणत दुर्मुखराजाने घोड्याचा लगाम पकडला.

नागमल्लने आपल्या दोन अनुयायांना डोळ्यांनी खूण केली आणि दुर्मुख व त्याच्या अंगरक्षकाकडे डोळे वटारुन बघत तो म्हणाला, ''अरे, तुम्ही दोघंही मूर्ख आहात कीं लबाडी करण्यांत हुशार आहात? इकडे तो अस्वल्या वधिक हल्ला करायला येतो आहे, आणि तुम्ही दूर अंतरावरच्या राजधानीला जाऊन सेना घेऊन येण्याचा विचार करता आहात?''

आणि पुढे आपल्या अनुयायांकडे वळून तो म्हणाला, ''हे बघा, या दोघांना दोरीने बांधा आणि त्या डोंगरातल्या गुहांकडे ओढत घेऊन जा. तो अस्वल्या वधिक इथून एकदा गेला कीं मग या दोघांबद्दल काय ते ठरवूं.''

नागमल्लाने ही आज्ञा दिली आणि तो गुहेकडे चालूं लागला. तेव्हां त्याच्या सहकाऱ्यांनी दुर्मुख व अंगरक्षकाला दोऱ्या बांधून नागमल्लच्या मागोमाग ओढत नेले.

झाडीच्या आडून अस्वल्या वधिकाने दुर्मुखला पाहिले आणि तो गरजला, ''अरे दुष्टा! बरा सांपडलास माझ्या हातांत! माझ्या परशूने मी आता तुझा बळी देणार आहे!'' असं म्हणून त्याने हत्तीच्या पाठीवरुन उडी घेतली आणि त्यांच्यामागोमाग येऊं लागला.

नागमल्ल व इतर सगळे भयभीत होऊन पळत सुटले आणि एका गुहेंत घुसले. सर्वांनी मिळून त्या गुहेच्या तोंडावर एक मोठा दगड ठेवला.

अस्वल्या वधिकने गुहेसमोर जाऊन त्या दगडावर दोनचार लाथा जोरांत मारल्या आणि



तो ओरडला, ''अरे, गुहेंत असलेल्यांनो, सगळेजण बाहेर या कीं! मला फक्त दुर्मुखचे मस्तक हवे आहे. इतरांना मी जरासादेखील धक्का लावणार नाही.''

ही ओरडाआरड ऐकून नागमल्ल आपल्या अनुयायांना म्हणाला, ''या! हे तर फारच झालं. ते अस्वलाचं भूत आता दुर्मुखचं मस्तक हवंय असं म्हणतंय, ही काय भानगड आहे?'' आणि दुर्मुखकडे वळून तो पुढे म्हणाला, ''या प्रदेशाजवळच उदयगिरी राज्यांत दुर्मुखराजा राज्य करतो आहे. अरण्य सोडून विचित्र गोष्टी पाहायला लोक नगरांत जातात, त्यापैकी मी एक नाही. आजपर्यंत मी त्या राजाला कधी पाहिलेलं नाही. तूच तो दुर्मुख राजा आहेस कीं काय?''

''मी दुर्जयगुप्त आहे. उदयगिरीचा रहिवासी आहे. कुठल्यातरी भुताने पछाडलेल्या त्या अस्वलाचे बोलणे खरे कसे मानतोस? अगोदर आपण सर्वांनी इथून कसे काय निसटता येईल त्याचा विचार करायला हवा. तुला हव्या आहेत त्या दहा हजार मोहरा मी तुला देईन ना!'' दीनवाणा चेहरा करुन राजा दुर्मुखने म्हटलं.

''नागमल्ल! महाराजांनी आजपर्यंत कधीही दिलेला शब्द मोडलेला नाही.'' अंगरक्षक म्हणाला.

''ए मूर्खा, गप्प बैस! तुझ्यावरही भूत स्वार झालंय कीं काय? या अरण्यांत आपण शिरलो आहोत, तेव्हांपासून तू मला सारखा 'महाराज, महाराज' कां म्हणतो आहेस? मी सर्वांच्या देखत तुझा शिरच्छेद करुं शकतो !'' दुर्मुखने त्याला दरडावीत म्हटले.

नागमल्ल डाकू बुचकळ्यांत पडला आणि आपल्या दोघा अनुयायांना म्हणाला, ''अरेच्या,



सुदैवाने किंवा दुर्दैवाने कां असेना, आपण उदयगिरीच्या दुर्मुखराजाला पकडलंय, राजाखेरीज इतर कुणाला सरळ शिरच्छेद करण्याचा अधिकार कुठे असतो? या दुर्जयगुप्ताने अनवधानाने आपली खरी ओळख करुन दिलीय.''

दुर्मुखराजाला आता दोन्हीकडून भीती भेडसावूं लागली. एकीकडे गुहेच्याबाहेरुन तो दगड हलवण्याचा प्रयत्न करणारा अस्वल्या वधिक आणि गुहेत या दरोडेखोरांशी गांठ! कांहीतरी खुणेचा संदेश आपल्या अंगरक्षकाला देण्यासाठीं तो मुद्दामच म्हणाला, ''अरे नागमल्ल, माझ्या-बाबतींत तुझा गोंधळ होतोय. मी खरोखरच दुर्जयगुप्त आहे. या भयानक अरण्यांत आम्ही शिरल्यापासूनच माझा हा सेवक डोके फिरल्या-सारखा वागतो आहे. कोणत्यातरी दुष्ट ग्रहाने त्याच्या शरीरामधें प्रवेश केलेला दिसतोय.''

''महाराज, मला क्षमा करावी. अगदी हेच

"झालंय बघा!" जोराने ओरडून अंगरक्षकाने सांगितलं.

त्यावर आपले डोके हालवत नागमल्ल म्हणाला, "आत्ता तू राजा अस, नाहीतर दुर्जयगुप्त अस, त्यांतून कांहीच निष्पन्न होणार नाही. हा भयंकर अस्वल्या गुहेच्या तोंडावरचा दगड हालवील आणि त्याच्या परशूने आपल्या सर्वांना मारुन टाकील."

नागमल्ल त्याच्या साथीदारांना म्हणाला - "अरे, आपण जर मरणारच असलो तर कोणत्या-तरी प्रकाराने मरणं ! म्हणून आपणच जर हा दगड हालवला आणि त्या अस्वल्या वधिकावर आपण सर्वांनी वार केले तर कसं होईल?"

आपल्या नायकाच्या प्रश्नाला दरोडेखोर उत्तर देणार होते, तेवढ्यांत अंगरक्षकाने मधेच तोंड उघडले. "नागमल्ल, त्या वधिकाला अस्वल्या मांत्रिकाने अस्वलाचे रुप जादूने दिले आहे. राक्षसाएवढी त्याची ताकद आहे. म्हणून आपण जर गुहेंतच राहिलो तर जास्त चांगले ठरेल."

त्याचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच अस्वल्या वधिकाने आपल्या दोन्ही हातांनी तो मोठा दगड जरासा हलवला आणि त्या सांपटीतून आंत डोकावत तो म्हणाला, "अरे राजा दुर्मुख, आधी बाहेर ये. तुझा शिरच्छेद करुन मी माझ्या मार्गाने पुढें चालूं लागेन."

"ओ हो, आत्ता मला समजलं. ह्या अस्वल्याला राजा दुर्मुख अर्थात दुर्जयगुप्त याचा सूड उगवायचा आहे. आपण तर वांचलो. ह्याला पकडून गुहेच्याबाहेर ढकलून द्या पाहू" नायकाने आपल्या साथीदारांना आज्ञा केली.

राजा दुर्मुखचे खांदे पकडून दोन्ही डाकू त्याला बाहेर ढकलण्याचा प्रयत्न करुं लागले होते, तेवढ्यांत दूर अंतरावरुन गडगडाटासारखा आवाज आला, "केव्हांपासून मी पाहातोय, काय हा आरडाओरडा चाललाय? शेजारच्या गुहेंत महाराक्षस उग्रदंड राहातात हे तुम्हाला ठाऊक नाही कीं काय?"

दुसऱ्याच क्षणीं अस्वल्या वधिक राक्षसाच्या दिशेकडे वळून गरजला, "अरे, तू राक्षस आहेस? तुझे नांव उग्रदंड आहे? मग अस्वल्या मांत्रिकाचा हा मंत्राने भारलेला परशू आता तुला कंठस्नान घालणार आहे !" *(क्रमशः)*







वेताळ कथा

# नागदेवता

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला, त्याने झाडावरुन प्रेत खाली काढले, आपल्या खांद्यावर घेतले आणि स्मशानाच्या दिशेने तो जाऊं लागला. प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन, तुझे विश्लेषण अगदी कौतुकास्पद आहे. जगांत बहुधा तू एकटाच इतका दृढनिश्चयी असावास. इतरांनी तुझे अनुकरण करायला हवे. पण तुझे हे श्रम व्यर्थ जातील कीं काय अशी मला भीती वाटते. आता धर्मांगदचंच उदाहरण घे. हातांत आलेले कष्टाचे फळ त्याने निसटूं दिले. तू तसा मूर्खपणा करुं नयेस असं मला वाटतं. तुला सावध करण्यासाठी मी सांगतो ती गोष्ट नीट ऐक." आणि वेताळाने धर्मांगदाची पुढील गोष्ट सांगायला सुरवात केली.



धर्मांगद आणि विश्वनाथची दीर्घकाळ दाट मैत्री होती. पण त्यांच्या मैत्रीची खरी परीक्षा भूषणमुळें झाली. भूषण लबाड होता. खोटी पत्रें लिहून दिशाभूल करण्यांत त्याचा हातखंडा होता. त्याने एका पत्रांत, धर्मांगदने आपले शेत तीन हजार मोहरांसाठी भूषणकडे गहाण ठेवले आहे असे लिहून खोटेंच करारपत्र तयार केले. आणि भूषणने धर्मांगदला निरोप धाडला कीं ताबडतोब या कर्जाची फेड करावी, नाहीतर शेताचे कागदपत्र भूषणच्या नांवावर केले जातील.

धर्मांगदने लगेच न्यायाधिकारींची भेट घेतली, आणि भूषणच्या कुटिल हेतूमधून त्याला वांचवावे अशी विनंती केली. न्यायाधिकाऱ्याने यावर बराच विचार करुन म्हटले, ''कोणत्याही गुन्ह्याची संपूर्ण चौकशी केल्याशिवाय निर्णय घेणे योग्य नाही. तू एक सद्गृहस्थ आहेस आणि भूषण धोकेबाज आहे हे मला ठाऊक आहे. पण सर्व चौकशी व शहानिशा होईपर्यंत भूषणला थांबवून धरण्यासाठी तुला एक हजार मोहरा ठेव म्हणून कचेरीत ठेवावी लागेल. आणि कुणीतरी त्यासाठी जामीन द्यावा लागेल.''

त्यावेळेला धर्मांगदकडे तेवढी रक्कम नव्हती. तरीही तो घाबरला नाही. गांवात त्याची पत होती. त्याला वाटलं, कीं कुणीही त्याला कर्ज द्यायला नकार देणार नाही. पण जेव्हां लोकांना समजलं कीं धर्मांगदचं शेत त्याच्या हातातून जायची शक्यता आहे, तेव्हां त्याला कर्ज द्यायला कुणीही पुढे आले नाहीत.

धर्मांगदला खात्री होती कीं या कठीण समयी विश्वनाथ नक्कीच त्याला मदत करेल. परंतु त्यावेळीं विश्वनाथच्या वडिलांना मोठा आजार झाला. त्याच्या बहिणीचे लग्न ठरले होते. विश्वनाथचा अंदाज होता कीं याच्यासाठी त्याला किमान पांचसहा हजार मोहरांचा खर्च येणार होता. त्याची जुळवाजुळव करण्याच्या प्रयत्नांत तो होता.

त्याच वेळेला भूषण त्याला भेटला आणि म्हणाला, ''मी तुला मदत करायला तयार आहे. पण तू ही मला मदत केली पाहिजेस.''

विश्वनाथला वाटलं कीं आता मैत्रीपेक्षां जास्त महत्वाची आहे गरज! त्याने धर्मांगदच्या बाबतीत जामीन देण्याला साफ नकार दिला. धर्मांगदला कुणीही कर्ज दिलं नाही. एक दिवस



त्याचं शेत भूषणच्या मालकीचं झालं.

धर्मांगदला आता भूषणपेक्षांही विश्वनाथचा जास्त राग आला. संतापाच्या भरांत त्याला वाटलं कीं विश्वासघात करणाऱ्या विश्वनाथला ठार मारावे. पण पुढे त्याच्या मनांत आले कीं त्याचा काय उपयोग होणार होता?

धर्मांगदलाच खुनी ठरवून फांसावर जावे लागले असते. केवळ सूड घेण्याच्या इच्छेमुळे त्याने जरी विश्वनाथला चोपले, हाणामारी केली, तरी लोक त्यालाच दोषी, दुष्ट व नीच ठरवतील.

विश्वनाथच्या नकाराचा बदला कसा घ्यावा ते कांही धर्मांगदला सुचेना. गांवाबाहेर एका गुहेत एक बैरागी राहात होता, तो सिद्धीशक्तीमधे पारंगत होता असे सर्वजण म्हणत. धर्मांगदने त्याला भेटून आपली व्यथा सांगितली.

बैराग्याने शांतपणे ऐकून धर्मांगदला म्हटले, ''स्वार्थाने प्रेरित होऊन विश्वनाथने योग्य वेळेला तुला मदत केली नाही हे अगदी खरे; तो तुझा खरा मित्र नाही. पण मग तू कसा आहेस? त्याने मदत केली नाही म्हणून तू देखील त्याला त्रास व्हावा अशी इच्छा धरतो आहेस. तूही चांगला मित्र नाहीस हे खरं ना?''

''स्वामीजी, विश्वनाथने अपकार केला आहे, मला त्याचे नुकसान करायची इच्छा नाही. मला फक्त त्याचा बदला घ्यायचा आहे. त्याच्यासाठी मला आपली मदत हवी आहे.'' धर्मांगदने म्हटलं.

''आत्ता तुझ्या मनांत सूडाची भावना प्रबळ आहे. सापाच्या विषाप्रमाणे सूडाची भावनादेखील



माणसाचे मन विषारी करते. मी विषारी प्राण्यांना मदत करत नाही. तुझ्या मनांतली ही सूडाची भावना तू सोडलीस तर आपण त्याबद्दल बोलूं.'' बैराग्याने स्पष्ट सांगितले.

''स्वामीजी, माझ्या मनांतून ही दुष्ट भावना नष्ट व्हावी, म्हणून आपणच कांहीतरी मार्ग सुचवावा. या भावनेने माझा जीव अगदी कासावीस झाला आहे.'' धर्मांगदने म्हटलं.

त्यावर बैरागी म्हणाला, ''तर मग ऐक! मी तुझे एका सर्पामधे रुप बदलू शकेन. म्हणजे तुझी सूडाची भावना विषरुपांत बदलेल आणि ते विष तुझ्या मस्तकांत शिरेल. जेव्हां तू त्या विषाच्या प्रभावातून बाहेर येशील, तेव्हां पुन्हां तू मानवरुपांत परत येशील. जोपर्यंत तू साप बनून राहाशील, तोपर्यंत तुझ्यामधें पूर्वीचे सर्व ज्ञान तसेच राहील,



पण तुझी बुद्धी मात्र सांपाची असेल. तुझी विचारपद्धती सांपासारखीच असेल. पण हो, जर तुला सर्परुपांत असताना त्या काळांत तुला मारलं, तर मात्र तुझा त्या रुपांतच मृत्यू होईल.''

मागचा पुढचा विचार न करता धर्मांगदने याला संमती दिली. बैराग्याने त्याचा साप बनवला.

सापाच्या रुपांतला धर्मांगद तिथून निघून शेताच्या दिशेला सरसरत जाऊं लागला. त्यावेळीं एक शेतकरी काठीने माती उकरत होता. ती काठी सापाच्या शेपटीला लागली.

सापाने चिडून फणा उगारला. पण तोपर्यंत शेतकरी तिथून निघून गेला होता. या सापाचा फुत्कार ऐकून शेजारच्या झाडीतून दुसरा एक साप बाहेर आला आणि धर्मांगदला म्हणाला, ''मला भीती वाटली कीं तू त्या माणसाचा पाठलाग करणार आणि संकटात पडणार. लक्षांत ठेव, माणसांनी आपल्याला पाहिलं कीं आपण संकटात सांपडतो.''

धर्मांगद सापाने त्या दुसऱ्या सापाशी थोडा वेळ गप्पा मारल्या आणि त्यांतून त्याला बरीच माहिती मिळाली.

दुसऱ्या सापाने सांगितलं कीं सापाच्या मस्तकांत जे विष असतं, ते आपले संरक्षण करण्यासाठीच साप वापरतो. मानवाकडून सापाला जो त्रास होतो त्यावेळीं, किंवा प्राण संकटात असतील तेव्हांच त्याचा उपयोग होतो. नाहीतर मानवाला साप कांहीच त्रास देत नाहीत. सापामधे सूडाची भावना नसते.

धर्मांगदला मात्र हे सत्य कळले व अगदी योग्य माहिती मिळाली. पण तोपर्यंत विश्वनाथ आपला शत्रू आहे आणि त्याला चावलं कीं तो मरेल, व त्यासाठी धर्मांगदला कोणतीही शिक्षा झाली नसती, हा विचार धर्मांगद सापाच्या मनांत घोळत होता.

हाच विचार मनांत बाळगून धर्मांगद सर्वांची नजर चुकवून विश्वनाथच्या घरी पोंचला. घरांतल्या एका खोलींत विश्वनाथचा सहा वर्षांचा मुलगा खेळणीं घेऊन खेळत होता. त्याने धर्मांगद साप पाहिला आणि घाबरुन तो जोरजोराने ''साप, साप'' असे ओरडायला लागला.

धर्मांगदच्या मनांत आले कीं या मुलाला चावले कीं विश्वनाथला पुत्रशोक होईल. पण या



निष्पाप बालकाला चावणे हेच पाप आहे. तिथून तो वेगाने सरपटत निघाला आणि देवघरांत गेला.

तितक्यांत घरातले सारेजण त्या बालका-जवळ जमले. त्याने सांगितल्यावरुन सगळेजण देवघराकडे गेले. तिथे पहातात तो काय, धर्मांगद साप आपला फणा उभारुन डोलत होता.

''नागदेवता आहे. डोळे मिटून त्याला नमस्कार करा. तो कुणालाही त्रास देणार नाही. आजपासून आपल्या साऱ्या अडचणी दूर होतील. कांही दुष्ट व्यक्तींच्यामुळे तुमचा मित्र धर्मांगद याच्यावर जी आपत्ती आली होती, तीदेखील विरळून जायला हवी. त्यासाठी नागदेवता आमची ही प्रार्थना अवश्य ऐकेल.''

विश्वनाथच्या आईने सांगितलं. तिथे जमलेल्या सर्वजणांनी डोळे बंद करुन तसं केलं.

हे बोलणं ऐकून धर्मांगद चक्रावला. त्याने खूप प्रयत्न केला, पण त्याच्या मनांत प्रतिशोधाची भावना उत्पन्न झाली नाही.

''छे छे, या विषाचा मला कांहीच फायदा झाला नाही, होणारही नाही. ते व्यर्थ आहे.'' असा विचार करुन त्याने देवघरांतल्या चौरंगाचा जोराने चावा घेतला. त्याच्या मस्तकांतले विष दांतातून बाहेर पडले. सापाचे रूप बदलले आणि क्षणांतच तो पुन्हां मानवरुपांतला धर्मांगद बनला. तिथे असलेल्या सगळ्या लोकांचे डोळे बंद होते. त्यामुळे हा चमत्कार कुणालाच दिसला नाही. त्यांनी डोळे उघडण्यापूर्वीं धर्मांगद त्यांच्यासमोर उभा होता.



विश्वनाथच्या आईने जेव्हां प्रार्थना संपवून डोळे उघडले, तेव्हां तिला देवघरांत नागदेवता दिसला नाही. तिच्या मनांत भक्तीभाव जागा झाला आणि ती श्रद्धायुक्त अंतःकरणाने पुन्हां स्तोत्रपठण करुं लागली.

विश्वनाथने थोड्या वेळानंतर डोळे उघडले, आणि शेजारी उभ्या असलेल्या धर्मांगदला पाहून तो चकित झाला.

शरमून जाऊन त्याने मान खाली केली. तेव्हां धर्मांगदने त्याला म्हटले, ''अरे मित्रा, तुझ्या अडचणीमुळे तू जे केलेस, त्यामुळें माझे शेत मी गमावले खरे, पण तेवढ्या कारणासाठी मी तुझी मैत्री गमावणार नाही.''

हे ऐकून विश्वनाथ व त्याच्या घरांतल्या सर्वांनी धर्मांगदची प्रशंसा केली. हे समजल्यानंतर गांवकरीही कौतुकाची भाषा बोलायला लागले, आणि भूषणने खजील होऊन धर्मांगदचे शेत त्याला परत दिले.

ही कहाणी सांगून वेताळाने विचारले, ''राजन्, जेव्हां विश्वनाथने मदत करायचे नाकारले, तेव्हां धर्मांगद सूड घेण्यासाठी तयार झाला होता. पण देवघरांत मात्र सापाच्या रुपांत त्याने जे केले, त्या दोन्हींचा मेळ बसत नाही. माझ्या शंकेचे उत्तर माहीत असूनही जर तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील.''

विक्रम म्हणाला, ''मानवाप्रमाणें पशुपक्षांचाही एक स्वभावधर्म असतो. सुदैवाने धर्मांगदला एक साप भेटला आणि त्याने सर्पविषाचा प्रयोग फक्त आत्मसंरक्षणासाठीच करायचा असतो, हे त्याला सांगितले. धर्मांगदला अडचण आली त्याचवेळेला विश्वनाथला कौटुंबिक अडचण होतीच. धर्मांगदला त्याची परिस्थिती समजली आणि त्याला विश्वनाथच्या आईचा चांगुलपणाही कळला. आपली चूक समजल्यामुळे धर्मांगदच्या विचारांत बदल झाला.''

राजाचा मौनभंग करण्यांत सफल झाल्यामुळे वेताळ शवासहित पुन्हां गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(सरल तेजा यांच्या रचनेवरुन)*







# भारताचा झरोका

## पेटलेले अरण्य



**ज्या** अरण्यांत पळसाची अनेक झाडें असतात ते अरण्य उन्हाळ्यांतल्या कांही महिन्यांत पेटलेलं आहे कीं काय, असं वाटतं. कारण आहे पळसाची लालशेंदरी रंगाची फुलें. रामायणांत आपण वाचतो कीं विंध्यपर्वतरांजींतून राम जेव्हां अरण्यांत चालत होता, तेव्हां त्याला पुढे आग लागली असावी असे वाटले. तो त्या जागीं पोंचला तेव्हां तिथें त्याला ही फुले दिसली व ते मोहक दृश्य पाहून श्रीराम प्रसन्न झाला. पळसाच्या फुलांना म्हणून अग्निफुलें असंही म्हणतात. मार्च महिन्याच्या अखेरीस ही फुलें फुलायला लागतात आणि धगधगणाऱ्या शेंदरी रंगामुळे वातावरणाला एक उज्वल रंग चढतो. या झाडाचा उल्लेख वेदांतदेखील आढळतो.

## सर्वांत मोठे निवासस्थान

**जो**धागड, म्हणजे आत्ताचे जोधपूर ही मेवाडच्या राज्याची राजधानी होती. १८५९ मधें राव जोधा यांनी ही स्थापन केली. त्यावेळेला सगळ्या इमारतींना निळा रंग दिला गेला होता. त्यामुळें इमारतींमधें आंतून गारवा राहात होता. साहजिकच या नगरीला नील नगरी म्हणत असत. जोधपूरमधे असलेले अनेक जुने राजवाडे व किल्ले यांनी या शहराचे ऐतिहासिक महत्व व संस्कृती जतन केलेली आहे. त्यापैकीं उमेद भवन हा राजवाडा विशेष प्रसिद्ध आहे. हे जगांतील सर्वांत मोठे खाजगी निवासस्थान आहे. सव्वीस एकरांत पसरलेल्या या राजवाड्यांत पंधरा उद्याने असून एकूण ३४७ शाही दालने आहेत.



भारतीय दंतकथा - २५

# उत्तम राजपरंपरा

सुवर्णपुरचा राजा सुबलदेव हा शूर व महत्वाकांक्षी होता. त्यांच्या शेजारच्या व्रतशिला राज्याशी त्यांचे अनेक पिढ्यांचे हाडवैर होते. व्रतशिलाचा सध्याचा राजा चांगला होता, तरीदेखील सुबलदेवाला त्याच्याविषयी खात्री नव्हती. सुबलदेवाचे सैन्य उत्तम होते म्हणून त्याने व्रतशिलावर आक्रमण करुन या शत्रूचा कायमचा कांटा काढायचा असे त्याने ठरवले.

ही त्याची कल्पना त्याच्या पत्नीला आवडली नाही. "महाराज, सध्यां दोन्ही देशांत शांतता असताना ही लढाई कशासाठी करायची? व्रतशिलाचे महाराज आजारी आहेत असे ऐकले आहे. आपले गुप्तहेर सांगत होते कीं ते कांही आपल्याला वरचढ होऊं शकणार नाहीत. जिथें मैत्रीची शक्यता आहे तिथे शत्रुत्व कशाला निर्माण करायचे आपण?" तिने विचारपूर्वक सांगितले.

मंत्र्यांनीही राणीच्या मताला दुजोरा दिला व म्हटलं, "महाराज, व्रतशिलाच्या भूतपूर्व राजांनी आपल्याशी विश्वासघात केलेला आहे हे खरं आहे. पण सध्याचे राजे सुशील व शांतताप्रिय आहेत. आपण युद्ध केलेच तर त्याचा शेवट कसा होईल ते सांगता येत नाही. व्रतशिलाचे राजे आजारी आहेत, पण प्रजेचे त्यांच्यावर प्रेम आहे. शिवाय त्यांचा मुलगा, तरुण राजपुत्र, फारच लोकप्रिय आहे. आपण जरी त्यांच्या सेनेचा पराभव केला, तरी व्रतशिलाची प्रजा पुन्हां बंड करुं शकेल आणि आपल्या राज्याची शांती जाईल."

"या राजानंतर तरुण राजपुत्र जेव्हां गादीवर येईल तेव्हां तो आपल्याला तापदायक ठरला तर? त्यापेक्षां आपली बाजू सध्यां प्रबळ आहे, तोवर





आपण त्यांच्यावर हल्ला करुन ते राज्य आपल्या राज्याला जोडून टाकूं. प्रजेने बंड केलेच तर त्याचा बीमोड करायचा, एवढंच!" सुबलदेवाने निर्णय ठरवला.

त्याच्या सैन्याने व्रतशिला राज्यावर आक्रमण केले. पण व्रतशिलाचा राजा आजारी असूनही रणांगणावर आला आणि त्याने सेनेचे नेतृत्व केले. त्यानेही सुबलदेवाच्या सैन्यावर चढाई केली. त्या चकमकींत सुबलदेव जखमी झाला. पण अखेरीस सुबलदेवाने लढाई जिंकली आणि शत्रूराजा मारला गेला. व्रतशिला राज्य सुवर्णपूरला जोडले गेले. पण या विजयाने सुबलदेवाला फार काळ आनंद मिळाला नाही. लढाईत झालेली जखम भरली नाही, व जास्त खोल चरत गेली. वर्षभराच्या आजार-पणानंतर सुबलदेव मरण पावला.



त्याला फक्त एक मुलगी होती, पण राणीने चांगल्या कुळशीलाचा मुलगा शोधून त्याला दत्तक घ्यावे असे ठरवले. त्यासाठी मंत्री व कांही सरदार राज्यांत हिंडून सुयोग्य तरुणाचा शोध घेऊं लागले.

आठवडाभर हिंडून मंत्र्याने ठरवले कीं अरण्यांत एका श्रेष्ठ मुनीवर्यांच्या आश्रमांत जी मुलें अध्ययन करीत होती, त्या मुलांची दुरुन पाहाणी करायची. त्याप्रमाणे मंत्री व त्याचे सहकारी एके दिवशी सूर्यास्ताच्या आधी गुरुकुलाजवळच्या रानांत एका खडकावर विश्रांतिसाठी बसले. जवळच आश्रमांतले विद्यार्थी खेळांत गर्क होते. त्यांच्यापैकी एक मुलगा रुबाबदार व खानदानी वृत्तीचा दिसत होता. इतर मुले त्याच्याशी प्रेमाने व आदराने वागत होती हे उघड दिसत होते. ही मुले खेळत असताना कुठूनतरी एक दगड आला, आणि ह्या रुबाबदार मुलाच्या कपाळावर लागला. भळभळा रक्त वाहूं लागले. त्याचे कांही मित्र जवळच्या झाडींत औषधी वनस्पतींचा पाला शोधायला लागले; तर दोघेतिघेजण तो दगड कुठून आला असावा, त्याचा शोध घेऊं लागले. त्यांनी रानाच्या पलीकडून एका माणसाला ओढत ओढत आणले, आणि आपल्या नेत्यासमोर उभे केले.

"ह्याला शिक्षा झालीच पाहिजे." एक म्हणाला, "नक्कीच. त्याच्या कपाळावर नेम धरुन आपणदेखील दोनचार दगड फेंकू या." दुसऱ्याने मत दिले. पण त्यांच्या नेत्याने मात्र त्या माणसाकडे शांतपणे बघितले व विचारले.

"तू तो दगड का मारलास?"

"मला खूप भूक लागली होती झाडाच्या वरच्या फांदीवर एक पिकलेला पेरु मला दिसला. तो पाडण्यासाठी मी दगड मारला." त्या माणसाने अपराधी भावनेने सांगितले.

"तुला पेरु मिळाला कां?" त्या नेत्याने विचारले.

"हो तर, मिळाला कीं! पण माफ करा, मी तो खाल्ला." तो इसम म्हणाला.

"आता तुझी भूक भागली असेल ना?" त्या मुलाने पुन्हां विचारले.

तो माणूस उत्तरादाखल चाचरत म्हणाला, "हे अरण्य पार करुन मी पलीकडच्या गांवापर्यंत निदान आता चालत जाऊं शकेन. तिथल्या देवळांत मला कांहीतरी अन्न मिळेल. जर तो पेरु मला मिळाला नसता, तर मी भुकेने कळवळून बेशुद्ध पडलो असतो."

"चल आता. आमच्या आश्रमाच्या भोजन-शाळेंत आम्ही तुला भोजन देतो. आता लौकरच अंधार पडेल, आणि रात्रीं अरण्यांतून प्रवास करणे धोक्याचे आहे. सकाळीं उठून तू प्रवासाला निघूं शकशील."

त्या मुलाने त्या इसमाचा हात धरुन त्याला आश्रमाकडे न्यायला सुरवात केली.

"हे रे काय, मित्रा? त्याने तुला दगड मारला, आणि तू त्याला मदत करतोस?" इतर मुलांपैकी कांहीजणांनी विचारले.

"अरे, माझ्या मित्रांनो, या माणसाने झाडाला दगड मारला होता, तेव्हां झाडाने काय केले? त्याला खायला फळ दिले ना? जर झाड ते करुं शकते, तर आपण तर माणसे आहोत; आपण त्याच्यापेक्षां जास्त चांगले कृत्य करायला हवे, नाही कां? मलाही झाडासारखाच दगड लागला होता. झाडाने त्याला पेरु दिला, तेव्हां मी भोजन द्यायला हवेच!" त्या मुलाने प्रेमळपणे म्हटले.

"हा तर राजघराण्याच्या परंपरेचा उत्कृष्ट नमुना आहे. अप्रतिम! कोण असावा हा असामान्य तरुण?" हा संवाद ऐकत असलेल्या मंत्र्याने आपल्या सहकाऱ्यांबरोबर कुजबुजत म्हटले.

स्तिमित झालेला मंत्री व त्यांचा परिवार त्या मुलांच्या पाठोपाठ आश्रमाकडे निघाला. आश्रमाच्या प्रमुख मुनींना त्यांनी स्वतःचा परिचय करुन दिला. तेव्हां तो तरुण मुलगा व्रतशिलाचा राजपुत्र असल्याचे त्यांना समजले.

सुवर्णपुरच्या राणीच्या सांगण्यावरुन मंत्र्याने व्रतशिलाच्या राणीची भेट घेतली. त्यानंतर त्या दोघींची भेट झाली.

सुवर्णपुरच्या राजकन्येचा विवाह व्रतशिलाच्या राजपुत्राशी झाला. दोन्ही राज्यांचा तो स्वामी झाला आणि खरोखरच, तो एक हुशार व दयाळू राज्यकर्ता झाला.







# विचित्र योगायोग



**अ**मेरिकेतल्या नेब्रास्का राज्यांत बियाट्रिस नांवाचे एक गांव आहे. चोपन्न वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे ह्या गांवात एक सुरेख, लहानसे चर्च होते. तिथें गांवातला गानवृंद नियमितपणे धार्मिक भजनांची तालीम करीत असे. सर्व गायक व वादक न चुकता वेळेवर तालमीसाठी येत; तसा त्यांचा रिवाज होता.

परंतु १ मार्च १९५० रोजी कांहीतरी अघटित घडले!

तिथला धर्मोपदेशक, वॉल्टर क्लेम्पेल हा नेहमीप्रमाणें दुपारी चर्चमधें गेला, आणि संध्याकाळच्या तालमीसाठी लागणारी सारी व्यवस्था त्याने करुन ठेवली. त्याने चर्चमधली शेकोटी भट्टी पेटवून ठेवली, कारण सर्व संगीतवृंद सं.७.१५ ला हजर असे आणि त्या दिवसांत गारठा व थंडी खूप असते. ते काम पूर्ण करुन संध्याकाळच्या जेवणासाठी तो घरी गेला.

जेवणानंतर सं.७.१० वाजले होते. आपली पत्नी व मुलगी यांच्याबरोबर तो चर्चला जायला निघणार होता, पण तसं झालं नाही. त्याच्या पत्नीचा झगा जरासा चुरगळलेला होता, आणि तसाच इस्त्री न करता तो झगा तिला घालायचा नव्हता. म्हणून त्यांना उशीर झाला आणि कांहीतरी निराळं घडलं, तेव्हां ते घरीच होते.

हार्वे आल् हा व्यवसायाने यांत्रिक. त्याची बायको बाहेरगांवी गेली होती म्हणून दोन्ही मुलांची व्यवस्था तोच बघत होता. पण त्या दिवशी मात्र संध्याकाळच्या वेळेला कुण्या मित्राबरोबर त्याचं संभाषण इतकं रंगलं कीं भानावर येऊन त्याने घड्याळांत पाहिलं तर सव्वासात वाजून गेले होते त्याला तालमीला जायला उशीर झालेला होता.

पियानो वाजवणारी मेरिलिन पॉल हिने वास्तविक





अर्धा तास अगोदर जाऊन थोडा वेळ रियाज करायचा असे ठरवले होते. पण तिचे संध्याकाळचे भोजन आटोपल्यानंतर ती जरा वेळ पहुडली आणि तिला गाढ झोंप लागली. सव्वासात वाजता तिची आई तिला उठवायला आली. पण पुन्हां तोंड धुवून तयार व्हायला बराच वेळ लागला असता. उशीर तर झालेलाच होता.

या गानवृंदाची दिग्दर्शिका मिसेस पॉल ही मेरिलिनची आई. मेरिलिन उठली नाही म्हणून आईलाही उशीर झाला हे साधे व सरळ कारण झाले! म्हणून या मायलेकी घरीच होत्या, आणि तेव्हांच तो निराळा प्रसंग घडला!

त्या संध्याकाळीं चांगलीच थंडी व गारठा होता. जॉईस ब्लॅक ही स्टेनोग्राफर त्या दिवशी जरा आळसावली होती. तिच्या चिमुकल्या घरातले उबदार वातावरण सोडून तिला घराबाहेर जावेसे वाटतच नव्हते. पण जेव्हां ती अनिच्छेने जायला तयार झाली तेव्हां एक आकस्मिक गोष्ट घडलेली होती.

लॅंडोना वॅंडग्रिफ्ट ही विद्यार्थिनी भूमितीचे एक अवघड प्रमेय सोडवण्यांत गर्क झाली होती. गानवृंदाची तालीम बरोबर सव्वासात वाजता सुरुं होते हे तिला माहीत होतं. ती नेहमी त्यावेळेपूर्वी चर्चमधे हजर असे. परंतु त्यादिवशी मात्र भूमितीच्या अभ्यासांत गढून गेल्यामुळें ती घरीच राहिली होती.

सॅंडी आणि रॉयाना एस्ट ह्या दोघी बहिणी अगदी वेळेवर तयार झाल्या होत्या. पण त्यांची गाडी सुरुंच होईना. म्हणून त्यांनी लॅंडोनाला फोन करुन तिच्याकडे लिफ्ट मागितली. पण ती तिचे भूमितीचे अडलेले प्रमेय सोडवण्यांत गुंग होती. म्हणून त्या दोघी बहिणींना थांबावे लागले. जेव्हां त्या गांवात ती विचित्र गोष्ट घडली, त्या वेळेपर्यंत त्या तिची वाट बघत थांबलेल्या होत्या.

लुसिल जोन्स आणि डॉरोथी वुड या दोघी शाळकरी वयापासून मैत्रिणी आणि आता शेजारणी होत्या. गानवृंदाच्या तालमीला त्या दोघी नेहमी बरोबर जायच्या. पण त्या दिवशी मात्र लुसिल रेडियोवर एक छान मनोवेधक कार्यक्रम ऐकत होती. तो कार्यक्रम सात ते साडेसात वाजेपर्यंत होता. गायमाच्या तालमीला नियमित व शिस्तीची म्हणून तिची आजवर ख्याति होती, ती आज डागाळली, कारण तिला तो कार्यक्रम शेवटपर्यंत ऐकायचा होता.





म्हणून डॉरोथी तिच्या मैत्रिणीसाठी थांबून राहिली. आणि बियाट्रिस गांवात, ती आश्चर्यकारक घटना घडेपर्यंत डॉरोथी थांबलेली होती.

मिसेस लिओनर्ड शूस्टर आणि त्यांची छोटी मुलगी वेळेवर तालमीसाठी पोंचल्या असत्या. पण त्याच संध्याकाळीं त्यांच्या वृद्ध आईकडे त्यांना जावे लागले. त्यांच्या आईला एका महत्वाच्या सभेला जायचे होते, आणि त्यासाठी तिला मदत करण्यासाठी या दोघी आईकडे गेल्या होत्या. पण कांहीतरी भयानक घडेपर्यंत त्या दोघी कांही चर्चपर्यंत पोंचलेल्या नव्हत्या.

हर्बर्ट कीफ हा कामगार या तालमीसाठी नेहमी सव्वासात वाजण्यापूर्वी बराच आधी येत असे. पण त्या दिवशी मात्र तो एक अर्धवट लिहिलेले पत्र पूर्ण करायला बसला. ती विचित्र गोष्ट होईपर्यंत त्याचे पत्रलेखन चालूंच होते.



मार्च महिन्याच्या त्या पहिल्या दिवशी, ज्या चर्चमधे हा गानवृंद आपली गायनाची तालीम संध्याकाळी सव्वासात वाजता नेहमीप्रमाणे सुरुं करणार होता, त्या चर्चमधें संध्याकाळीं सात वाजून पंचवीस मिनिटांनी एक प्रचंड मोठा स्फोट झाला. चिमुकल्या बियाट्रिस गांवातल्या सर्वांना तो ऐकूं आला. संध्या काळच्या तांबूस आकाशांत आगीचे लोळ लांबवर दिसत होते. भिंती ढासळल्या आणि चर्चचे जड, लांकडी छप्पर जोराने जमिनीवर कोसळले.

सुदैवाने, चर्च रिकामे होते. गानवृंदाचे सर्वच सभासद, जे नेहमी वेळेवर येत असत, ते सगळे कांही ना कांही कारणांमुळे वेळेवर आले नाहीत. साध्या कारणामुळे प्रत्येकाला निघायला उशीर झाला. रेडियोचा कार्यक्रम, चुरगळलेला झगा, अपूर्ण पत्र, भूमितीचे प्रमेय, सहज लागलेली झोंप, सुरुं न होणारी मोटारगाडी, यासारखी साधीसुधी कारणे! हे कसं शक्य होतं? कीं हा निव्वळ योगायोग होता? ही सगळी कारणे सहज होती कां? कीं कुणी अज्ञात शक्ती त्यांच्या पाठीशी होती? हे एक गूढच आहे.

पण चर्चमधें स्फोट कसा झाला? नंतर कुणीतरी खुलासा केला कीं नैसर्गिक वायूची गळती चर्चमधे गळक्या पाईपमधून झाली असावी, आणि तिथें उबेसाठी पेटवून ठेवलेल्या लांकडांच्या शेकभट्टीमुळें आग भडकली असावी.

त्या गानवृंदाचे सभासद जेव्हां या प्रसंगाविषयी नंतर विचारमंथन करुं लागले तेव्हां त्या सर्वांच्या मनांत परमेश्वराबद्दल कृतज्ञतेची भावना दाटलेली होती. कारण त्याच्याच चमत्कारामुळे त्या सर्वांचे प्राण वांचले, असा त्यांचा गाढ विश्वास होता!

तुम्हाला काय वाटतं?

# नागलोक खजुरीची झाडें कां तोडत नाहीत?

नागप्रदेशातला कुणीही कधी खजुरीचे झाड तोडत नाही. फार फार पूर्वी दिलेले वचन तो आजही श्रद्धेने पाळतो आहे. कारण त्याचं असं झालं होतं!

एकदा एका नाग तरुणाला त्याच्या खेड्यांतून पर्वतराजीपलीकडे असलेल्या प्रदेशांत जायचं होता. त्याचा रस्ता दाट अरण्यांतून जात होता. आता तो तरुण इतर नागांप्रमाणेच शूर व धाडसी होता. पण अरण्यांत रात्री अनेक प्राणी, राक्षस, भुते हिंडत असतातच कीं! हे राक्षस नेहमी पाठीमागून हल्ला करतात, कारण त्यांना धारदार शस्त्रांची, भीती वाटते, हे त्या तरुणाला माहीत होतं. पण त्याला हेही ठाऊक होतं कीं त्यांना दयामाया कांहीही नसते, आणि जर त्यांनी त्याला पकडलं तर मात्र त्यांनी त्याला नक्कीच खाऊन टाकलं असतं.



एका छोट्या राक्षसाने आपल्या काटेरी पंजांनी आणि लालभडक डोळ्यांनी त्या नागाला घाबरवून मारण्याचा प्रयत्न केला, पण तो नागयुवक चलाख होता. क्षणार्धांत तो पाठीमागे वळला, आणि त्याने आपल्या धारदार बिचव्याने त्या राक्षसाच्या चिंध्या केल्या.

पण आता तर अंधार पडूं लागला होता. मार्गात येणाऱ्या सर्व भुताखेतांशी सामना करता येईल असे या तरुणाला वाटेना. म्हणून रात्रीपुरता कुठेतरी आसरा घ्यावा असे त्याने ठरवले.

तो टेंभुरणीच्या झाडाकडे गेला. त्याचे लाकूड उत्तम असते. फुलांनी बहरलेला तो सुंदर वृक्ष त्याला छान निवारा देईल असे त्या तरुणाला वाटले.

''मला रात्रभर तुझ्या फांद्यांमधे लपायला जागा देशील कां?'' त्या तरुणाने विनंती केली.





''जर मला लौकर जागा मिळाली नाही, तर ती काळुंद्री मंडळी येतील नि मला ठार मारतील.''

''नाही'' तो डोंगरी वृक्ष आपली पाने फुले हालवीत म्हणाला. ''मला तसं करता येणार नाही. ती वाईट भुते माझी फुलें कुस्करतील आणि ही पाने तोडून टाकतील तुला शोधताना; मग माझी काय अवस्था होईल रे? नकोच; त्यापेक्षां तू दुसरीकडे जागा शोध जा.''

आता अंधार होत होता आणि तो तरुण अगदी हवालदिल झाला होता. तो सूचिपर्णी पानांच्या झाडाकडे गेला. ''तू मला कृपा करुन तुझ्या फांद्यात लपवशील कां? रात्री राक्षस नि भुते येतील आणि मला मारुन टाकतील.'' त्याने विनवले.

''मी जरुर तुला मदत केली असती, पण मला माफ कर. आम्ही सूचिपर्णी पानांची झाडें लोकांना आसरा देत नसतो. तुला दुसरीकडे जागा शोधली पाहिजे.'' झाडाने त्याची धारदार पाने हालवीत म्हटले.

जवळच एक मोठे खजुरीचे झाड होते. या तरुणाची दीनवाणी अवस्था ते मोठ्या कुतुहलाने पाहात होते.

त्या झाडाला त्याची दया आली. ते प्रेमळपणे म्हणाले, ''अरे, तू माझ्याकडे ये ना. माझ्या फांद्या जाड आहेत, आणि पसरलेल्या आहेत. अंधारातल्या त्या काळ्या भुतांपासून तुझे संरक्षण होईल. ती भुते तुला शोधायला येतीलच. कारण त्यांच्यापैकी एकाला तू ठार मारले आहेस. ती आली कीं तू स्तब्ध राहा. श्वास धरुन ठेव. अगदी स्वस्थ बैस आणि बाकीचं माझ्यावर सोड.''

हे ऐकून तो तरुण त्या जाड फांद्यांच्यामधे हळूच वर चढला आणि छानपैकी लपून बसला. आता तर अरण्यामधे खूपच दाट अंधार होता. फक्त, रातकिडे किर्र्र आवाज करत होते ते ऐकूं येत होतं. थोड्याच वेळानंतर ती छोटी छोटी भुते आली. त्यांच्या भावाला ज्या कुणी मारलंय त्याच्या शोधांत ती होती.

''कुठे आहे तो?'' प्रत्येक झाडापाशी जाऊन त्यांनी गरजतच विचारले.

''आमच्या भावाला मारण्याचे धाडस करणारा कोण माणूस आहे हा? आम्हाला सांगा तो कुठे आहे ते, म्हणजे आम्ही त्याला मारुन टाकूं.'' एक म्हणाला.

त्यावर दुसऱ्याने सांगितलं, ''अरे, आपण

त्याला सहज शोधून काढूं. या अरण्यांत तो जाईल कुठे नि लपेल कुठे? मिळाला कीं त्याचे तुकडेतुकडे करुन टाकू. त्याचा एखादा दांत किंवा केसदेखील शाबूत राहाणार नाही!''

आणि त्यांनी रागावून, किंचाळत, संतापाने वेड्यावांकड्या उड्या मारीत, आपल्या भावाचा मारेकरी शोधायला सुरवात केली. त्यांनी इतका आवाज केला कीं रातकिडे किंवा वाहाणाऱ्या वाऱ्याचा आवाजदेखील ऐकू येईनासा झाला.

''कुठे आहे तो माणूस?'' तीं भुते पुन्हां किंचाळली. ''आम्हाला खरोखरच माहीत नाही.'' झाडांनी उत्तर दिले. शेवटी ती दुष्ट भुतें त्या खजुराच्या झाडाजवळ आली. हा नागतरुण तिथेंच तर लपला होता.

''तो माणूस कुठे आहे हे तुला माहीत आहे कां?'' त्यांनी विचारलं.

खजुराच्या झाडावर तर खूप फळें लगडलेली होती. आणि त्या भारामुळे झाड वाकले आहे असे वाटावे, म्हणून झाड जरा जास्तच वाकून म्हणाले, ''मला खरंच माहीत नाही तो कुठे गेला ते. पण तो इथे मात्र नाही. तुम्ही त्याला अरण्याच्या दुसऱ्या भागांत शोधायला गेलात तर सांपडेल.''

रागाने दांतओठ खात आणि मोठमोठ्याने भेसूरपणे किंचाळत ती सारीं दुष्ट भुते तिथून निघून गेली. कारण त्यांना दुसरे कांहीही करणे शक्य नव्हते. त्यांचे ओरडणे व किंचाळणे ते सगळेजण दूर जाईपर्यंत ऐकू येत होते. नंतर मात्र शांतता पसरली.

पुन्हां रातकिडे किर्र करायला लागले. जेव्हां सगळीकडे शांतता होती व उजाडले, तेव्हां तो तरुण फांद्यांमधून खाली उतरला. त्याने खजुरीच्या झाडाला प्रेमाने मिठी मारली.

''तू माझ्यासाठी जे केलंस ते मी कधीही विसरणार नाही.'' त्याने शब्द दिला.

तो जेव्हां काम संपवून आपल्या खेड्यांत परत घरी गेला, तेव्हां त्याने काय झालं ते सविस्तर साऱ्या गांवकऱ्यांना सांगितलं. खजुराचे झाड किती दयाळू आहे ते ही त्याने आवर्जून सांगितलं.

त्या रात्रीं गांवकऱ्यांनी तो तरुण सुखरूप परत आल्याबद्दल मोठी जेवणावळ केली आणि संबंध खेड्याने त्या तरुणाने खजुराच्या झाडाला दिलेले वचन पाळायचे ठरवले.

आणि म्हणूनच, आजदेखील नागप्रदेशांतला रहिवासी खजुराचे झाड कधीही तोडत नाही. मग ते अगदी त्याच्या शेतांत असो किंवा जमिनीवर असो, ते झाड सुखरूप असते.





# खास बातम्या




## गांधीजीवर चोवीस तास लिहिलेला निबन्ध

आजवर राष्ट्रपित्यासंबंधी खूप कांही लिहिलेले आहे. गांधीजींनी स्वतः भरपूर लिखाण केलेले आहे, फक्त त्यांच्या 'हरिजन' या पत्रांतूनच नव्हे, तर इतरत्रदेखील! चेन्नईत अकरावींत शिकणाऱ्या कुमारी नंदिनीला हे सर्व लिखाण उपयोगी पडले. तिने महात्माजींवर सतत चोवीस तास निबंध लिहिण्याचे ठरवले.

त्यासाठी तिने गांधीमंडपम या ठिकाणाची निवड केली. या विक्रमी प्रयोगासाठी हे अत्यंत योग्य स्थळ व वातावरण होते. फेब्रुवारींत तिने एक दिवस सकाळीं दहा वाजता लिहायला सुरवात केली आणि तिचा हा लेखनयज्ञ दुसऱ्या दिवशी सकाळीं दहा वाजता संपवला. तिने कोणतेही छापील पुस्तक वा इतर साहित्य बरोबर आधाराला घेतले नव्हते. तिने सर्व लेखन आपल्या स्मरणशक्तीनुसार केले. हा विक्रम करण्यासाठी तिने गांधींबद्दलची किती माहिती वाचली असेल ही कल्पनाच थक्क करणारी आहे.

## अखंड जादू

तमिळनाडमधल्या त्रिचनापल्ली इथे जे. अलेक्झांडर या जादुगाराने चोवीस तास चालणारा अति महान जादूचा प्रयोग करण्यांत यश मिळवले. गिनेस बुकांत नोंद मिळावी म्हणून त्याची ही जागतिक विक्रमाची धडपड होती. गिनेसच्या प्रकाशकांनी भारतीय हौशी जादुगारांच्या संस्थेला, व आंतरराष्ट्रीय जादुगार बंधुभाव या संस्थेच्या अधिकाऱ्यांना हा अद्भुत प्रयोग पाहून खात्री करण्यास सांगितले होते. या प्रयोगाला अनेक सरकारी वरिष्ठ अधिकारी आणि प्रसारणमाध्यमांचे प्रतिनिधी उपस्थित होते.





# जीवनाचा अर्थ

लक्ष्मणचे आईवडील तो लहान असतानाच वारले. म्हणून त्यांच्या संपत्तीचा तो एकटाच वारस ठरला.

लक्ष्मणच्या आईवडिलांनी त्याचे पालनपोषण मोठ्या लाडाकोडांत केले होते. त्याला कुठलाही त्रास होऊं नये म्हणून ते खूप काळजी घेत असत. साहजिकच अडचण काय असते, आणि पैसे मिळवायला किती कष्ट झेलावे लागतात, हे त्याला मुळीच ठाऊक नव्हतं.

लक्ष्मण सुस्वभावी होता आणि दिलदारही होता. त्याचं मन इतकं सरळ होतं कीं कुणी त्याला टोमणे मारुन किंवा टोंचून जरी बोलले, तरी तो मनाला फार लावून घेत असे. आई-वडिलांच्यावर त्याचे खूप प्रेम होते म्हणून त्यांचा मृत्यू सहन करणे त्याला फारच कठीण गेले.

हळूंहळू त्याची झोंप व जेवण कमी झाले आणि त्याच्या मनांत दुसरा विचार येत नसे. मनांतल्या मनांत कुढत तो जगत होता. त्याच्या नातेवाईकांनी व मित्रांनी त्याची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला, पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. इतर मंडळी त्याला सांगत होती की मृत व्यक्तींच्या आठवणींत रमणे यांत फारसा अर्थ नसतो. जर त्यांच्या आत्म्याला खरोखरीच शांती लाभावी अशी इच्छा असेल तर आयुष्यांत पुढे जायला हवं, आणि सांसारिक आयुष्य जगायला हवं!

पण लक्ष्मणने कुणाचं ऐकलं नाही. त्या वेळी कांही स्वार्थी, मतलबी तरुण त्याच्या भोवती गोळा होऊं लागले, बिचारा भोळा लक्ष्मण त्यांच्या जाळ्यांत अडकला. आपल्या गरजा, चैनीसाठी त्याच्याकडून मोठमोठ्या रकमा ते घेऊं लागले व खर्चायला लागले.

त्यावेळीं, रामदास नांवाचा एक इसम लक्ष्मणच्या घरी आला. लक्ष्मणने त्याला नखशिखान्त न्याहाळले, "कोण तुम्ही? काय काम आहे?"

प्रमिला दीक्षित

रामदासने हंसत या प्रश्नाला उत्तर दिले, "मी तुझा दूरचा नातेवाईक आहे. नात्याने तुझा काका आहे. तुझी चौकशी करायला व हालहवाल विचारायला मी इथें आलो आहे." हे ऐकून लक्ष्मण गहिवरला आणि आपल्या आईवडिलांच्याबद्दल सांगायला लागला.

"शांत हो लक्ष्मण. तुझे दु:ख नाहीसे करण्याचा एक मार्ग मी तुला सांगेन. तू माझं ऐकशील कां?" रामदासने विचारलं.

"सांगा" लक्ष्मणने अश्रू आवरत म्हटलं.

"इथेच राहाशील तर जुन्या आठवणी तुझी पाठ सोडणार नाहीत. तू माझ्याबरोबर माझ्या गांवी चल. तिथें एक मोठे घर विकायला काढलेले आहे. तिथें तू आरामांत राहा. इथल्या झेंगटांपासून अगदी लांब!" रामदासने म्हटलं.

दुसऱ्याच दिवशी दोघेही रामनगरला जायला निघाले. लक्ष्मणने त्या घराच्या खरेदीसाठी म्हणून मोठी रक्कम बरोबर घेतली होती.

जेव्हां ते रामनगरपासून कोसभर अंतरावर होते, तेव्हां अचानक चौघे दरोडेखोर आले आणि सुरा दाखवून त्यांनी या दोघांना घाबरवले. लक्ष्मणची पैशाची थैली त्यांनी हिसकावून घेतली आणि ते पसार झाले.

लक्ष्मणला आता दुःख अनावर झालं. "काका, हे काय हो झालं?" असं म्हणून त्याने तिथेच बसकण मारली. रामदासने त्याला उठवलं आणि त्याला धीर देत तो म्हणाला, "काळजी करुं नकोस. या दरोडेखोरांना करुं पकडता येईल याचा विचार आपण करुंच!" नंतर ते दोघे लक्ष्मणच्या गांवी परत जायला निघाले.



आता त्याचे रहाते घर ही एकमेव संपत्ती त्याच्या नांवावर उरली होती. ते घर विकायचा कांही त्याचा विचार नव्हता. घर विकलं तर राहायचं कुठे ही पंचाईत पडली असती. एकुलता एक निवारा होता, तो ही नाहीसा झाला असता. आता त्याच्यापुढे एकच काम होतं - जीवन जगण्यासाठी त्याला आता पैसे मिळवायला हवेच होते.

रामदासने त्याला धीर देत सांगितले, "लक्ष्मण, मी माझ्या गांवी जातो आणि थोडी रक्कम घेऊन येतो. त्यांतून तुझ्यासाठी शेतीला योग्य अशी जमीन खरेदी करीन. तू शेतीकाम करत तुझं आयुष्य आनंदाने घालवूं शकशील. कांही दिवस मी इथें तुझ्याजवळ राहीन आणि तुला मदत करीन."



पैशाची सोय करुन रामदासने आपला शब्द पाळला. ग्रामाधिकारीची मदत घेऊन गांवाबाहेर एक शेत खरेदी केले.

लक्ष्मणबरोबर रामदासने-देखील शेतांत पीक यावे म्हणून भरपूर-मेहनत केली. स्वयंपाक करण्यांत व इतर शेतीच्या कामांत दोघेही एकामेकाला मदत करीत होते.

एक दिवस संध्याकाळच्या वेळेला दोघेही स्वयंपाकघरांत गुंतले होते. त्यावेळीं ग्रामाधिकाऱ्याची अठरा वर्षांची मुलगी गौरी तिथे आली आणि त्यांना बघून आश्चर्यचकित झाली.

ती चटकन म्हणाली, "बाप रे! हे काय? तुम्ही पुरुष मंडळी रोज स्वयंपाक करता कीं काय? कुणीतरी तसं सांगितलं म्हणून माझ्या बाबांनी मला इथे पाठवलंय. उद्यां मी आमच्या आचाऱ्याच्या बहिणीला तुमच्या घरी पाठवते म्हणजे ती स्वयंपाक करत जाईल." असं सांगून घरांत भिरीभिरी हिंडून, सारं घर पाहून ती निघून गेली.

वर्षभरांतच चांगलं पीक आलं. रामदास व लक्ष्मणने धान्याची पोतीं घरी आणली. लक्ष्मण अगदी खुशींत होता.

ते पाहून रामदासने त्याच्या पाठीवर शाबासकीची थाप मारली, व तो म्हणाला, "लक्ष्मण, तुझ्यांत हे जे परिवर्तन झालेले आहे, ते तुझ्या लक्षांत आलं असेलच. या सहा महिन्यांत तुला तुझ्या आईवडिलांची फारशी आठवण आली नाही, त्यांची आठवण काढत तू उदास झाला नाहीस. कारण, जे धन लुटलं गेलं त्याची आणि तुझ्या भविष्याचीच तुला सारखी काळजी वाटत होती."

लक्ष्मण आश्चर्याने बघत राहिला नंतर म्हणाला, "हो, हे खरं आहे काका!"

रामदासने म्हटलं, "यालाच जीवन म्हणतात. माणसाची सर्वांत मोठी गरज म्हणजे भूक भागवणे! जेव्हां त्याचं पोट भरलेलं असतं, सर्व प्रकारच्या सुविधा त्याला मिळालेल्या असतात, तेव्हां फालतू विचारांत मन रमतं, आणि निष्कारण वेळही वाया जातो. म्हणून माणसांनी नेहमी कोणत्यातरी कामांत गुंतलं पाहिजे. पैसे असले तरी जास्त कमाई करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपली परिस्थिती सुधारली पाहिजे व इतरांनादेखील मदत केली पाहिजे. म्हणजे त्या व्यक्तीला उगीचच दुःख उगाळत बसण्याची संवय होणार नाही."



"हो काका, तुम्ही अगदी बरोबर सांगितलंत!" असं म्हणून लक्ष्मणने त्यांना मनःपूर्वक वांकून नमस्कार केला.

रामदासने लक्ष्मणला सांगितलं, "ग्रामाधिकाऱ्याला तुझ्या वडिलांबद्दल फार आदर व प्रेम वाटत होतं. जसा मी तुझा दूरचा नातेवाईक आहे, तसेच तेही माझे दूरचे नातलग लागतात. ग्रामाधिकारी गंगारामने पाहिलं कीं तुझ्या आईवडिलांच्या मृत्यूमुळें तू दुःखांत बुडाला होतास. त्यांतून तू बाहेर येत नव्हतास, आणि कांही स्वार्थी आपमतलबी लोकांच्या जाळ्यांत तू अडकला होतास. ग्रामाधिकाऱ्याने मला निरोप पाठवला आणि तुझी अवस्था कळवलीन. तुझे मन ताळ्यावर यावे म्हणून त्यांनीच मला इकडे पाठवले. ज्या चोरांनी तुझी पैशाची थैली चोरली, ते खरेखुरे चोर नव्हतेच. ते ग्रामाधिकाऱ्यांनी पाठवलेले लोक होते. तुझी रक्कम त्यांच्याकडे सुरक्षित आहे. तू गंगारामची मुलगी गौरी हिला पाहिलं आहेस ना? तिने तिच्या आचाऱ्याची बहीण स्वयंपाक करायला तर पाठवलीच, पण तिच्या स्वयंपाकाची चव पाहायला, तू घरांत नसतोस तेव्हां अधूनमधून ती येऊन जाते. आणि स्वयंपाक चांगला झालाय कीं नाही त्यावर लक्ष ठेवते. तुला कांही त्रास होऊं नये असं तिला व तिच्या वडिलांना वाटतं. तुला कशी काय वाटते ही गौरी?" रामदासने त्याला विचारलं.

"चांगली आहे, देखणी आहे, तरतरीत आहे, आणि छान, मनमिळाऊ आहे." लक्ष्मणने संकोचाने जरा चांचरत सांगितलं.

रामदास त्यावर मोठ्याने हंसून म्हणाला, "गंगारामला त्याच्या मुलीबाबतीत तुझं मत हवंच होतं. आता गौरी तुला आवडलेली दिसतेय. गौरीलाही तू आवडला आहेस. तुझी संमती असेल तर गंगारामला मी ही चांगली बातमी सांगतो." लक्ष्मणला मनांतून खूपच आनंद झाला होता. जीवनांत आता खरोखर नवा आनंद व खुशी शोधून काढण्याचे दिवस आलेले आहेत, जुन्या दुःखी आठवणी कुरवाळत बसण्याची संवय आता गेली आहे, हे त्याला जाणवले.

कांही दिवसानंतर लक्ष्मण व गौरी यांचा विवाह मोठ्या थाटांत साजरा झाला. आपले काम पूर्ण झाल्यानंतर रामदास गांवी परत गेला.





# पिल्लूशेटचा शिष्य

ब्रह्मदत्त काशी राज्याच्या गादीवर असतां बोधिसत्वांनी एका वाण्याच्या घरात अवतार घेतला. 'पिलूशेट' या नांवानेच लोक त्यांना ओळखत. ते कुशाग्र बुद्धीचे होते व त्यांना शुभाशुभशकुनांचे शास्त्र चांगले अवगत होते.

एकदा पिलूशेट राजसभेत जात असतां त्यांची नजर एका मेलेल्या उंदरावर पडली, व ते म्हणाले - "कोणी हुशार मुलगा असेल, तर तो या मेलेल्या उंदरापासून व्यापाराला सुरवात करील, व शेवटी लग्नसुद्धा करील."

ते वाक्य एका तरुणाच्या कानावर पडले. तो उच्च कुळांतच जन्मला होता, परंतु फार गरीब होता. पिलूशेट म्हणाले ते सत्य होणारच, असा पूर्ण विश्वास वाटून त्याने तो मेलेला उंदीर नेऊन मांजराला आहार म्हणून एका पैशाला विकला.

त्याने त्या पैशाचा गूळ विकत घेतला आणि बरोबर एक मडके भरुन पाणी घेऊन रानांतल्या वाटेवर जाऊन बसला. रानांतून फुलें वेचून त्यांच्या माळा करुन विकणारे पुष्कळ माळी त्या वाटेने आले. त्यांना त्याने थोडा गूळ खायला देऊन प्यायला पाणी दिले. प्रत्येकाकडून त्याबद्दल ओंजळ भरून फुले मागून घेतली. नंतर ती फुलें विकून त्याने थोडे पैसे मिळविले.

दुसऱ्या दिवशी थोडा जास्त गूळ विकत घेलता व मडके भरून पाणी नेऊन पुन्हां त्याच जागी जाऊन बसला. त्या दिवशी त्याला माळ्यांनी फुलझाडेसुद्धा दिली. अशा तऱ्हेने त्याने थोड्याच दिवसात कांही रौप्य नाणी संपादन केली.

एक जोराचे वादळ सुटले. राज्याच्या उद्यानांतील झाडांच्या वाळक्या फांद्या व पाचोळा वाऱ्याबरोबर राजोद्यानात सर्वत्र पडल्या. आतां हे उद्यान झाडून स्वच्छ कसे करावयाचे या विचारात माळी असताना तो तरुण तेथे गेला व म्हणाला - "झाडाचा पाचोळा व फांद्या मला देणार असाल तर मी सर्व राजोद्यान झाडून साफ करून देतो." माळ्याचने ते मान्य केले.



तेव्हां तो तरुण मुलगा जिथें मुळें खेळत होती तिथे गेला, आणि सर्वांना थोडा थोडा गूळ खायला देऊन त्यांना राजोद्यानात बोलावून घेऊन आला. त्यांच्याकरवी त्याने वाळक्या काटक्या, पाचोळा जमवून तो राजोद्यानाबाहेर पोचता करविला.

त्याच वेळी राजाचा कुंभार त्या बाजूने जात असताना त्याला राजोद्यानासमोर काटक्या व पाचोळा दिसला. आवा पेटवायला त्याचा चांगला उपयोग होईल असा विचार करुन त्याने त्याची किंमत विचारली. त्या तरुणाने सव्वीस रौप्यनाणी सांगितली. कुंभाराने सव्वीस रुपये दिले आणि वर काही मडकी पण दिली.

अशातऱ्हेने सव्वीस रुपये मिळविल्यावर त्या तरुणाच्या मनात आणखी एक विचार आला. तो नगराच्या बाहेर एक मोठे कुरण होते तेथे पांचशे लोक गवत कापीत होते. त्यांना त्याने प्यायला पाणी पुरविले. त्यांनी त्या तरुणाला त्याला वाटेल ती मदत करायचे मान्य केले. मला गरज भासेल तेव्हां तुमची मदत घेईन असे त्या तरुणाने त्यांना सांगितले.

नंतर एके दिवशी त्याला त्याच्या ओळखीच्या व्यापाऱ्याकडून, त्या गांवी एक घोड्याचा व्यापारी पांचशे घोडे घेऊन येणार असल्याचे कळले. लगेच त्या तरुणाने गवताचे भारे विकणाऱ्यांना भेटून एकेक ओझें गवताचे आणून तो सांगेल तेथे टाकायला सांगितले आणि त्यांना बजावून सांगितले की त्याच्याजवळचे सर्व गवत विकले जाईपर्यंत त्यांनी आपले गवत विकायला काढतां कामा नये. त्यांनी ते मान्य करून पांचशे



ओझी गवत आणून त्या मुलाकडे आणून टाकले.

त्याला समजले होते त्याप्रमाणे तो घोड्यांचा व्यापारी आपल्या पांचशे घोड्यांसह आला. त्याला हवे होते तितके गवत आणखी कोठे मिळाले नाही, म्हणून त्या तरुणाकडून पांचशे ओझी गवत विकत घेऊन त्या व्यापाऱ्याने त्या तरुणाला एक हजार रुपये दिले.

आणखी कांही दिवसांनी त्या तरुणाला माहीत असलेल्या एका दर्यावर्दी व्यापाऱ्याकडून कळले की बंदरात एक मोठे गलबत येणार आहे. ते ऐकताच त्याच्या डोक्यांत एक नवीन विचार आला.

त्याप्रमाणे त्याने एक उत्तम गाडी आठ रुपये भाड्याने ठरविली व ती घेऊन तिच्यांत बसून बंदरात गेला. त्याने एक अंगठी आगाऊ रक्कम म्हणून देऊन गलबतातला सर्व माल विकत घेतला. नंतर त्याने तिघां नोकरांना नेमले व कोणी व्यापारी खरेदीला आले तर त्यांना बोलावून घेऊन यायला सांगितले.

इतक्यांत गलबत बंदरात आल्याची बातमी कळली. तेव्हां काशीचे शंभर व्यापारी माल खरेदी करायला बंदरात आले. त्यापूर्वीच कोणीतरी तरुणाने सर्व माल विकत घेतला असल्याचे त्यांना कळले. सर्व व्यापारी त्या तरुणाकडे आले.

त्या तरुणाने त्यांना गलबतातील माल विकून दोन लाख रुपये मिळविले.

नंतर तो तरुण पिलूशेटकडे गेला व त्यांना त्याने लक्ष रुपये दाखविले.

पिलूशेटने त्याला विचारले - ''मुला, तुला एवढे रुपये कसे काय मिळाले रे?''

तो तरुण म्हणाला - ''आपल्या उपदेशामुळे चार महिन्यात मी ही मिळकत मिळविली.'' असे सांगून त्या तरुणाने तो मेलेला उंदीर एका पैशाला विकल्यापासून पुढे कायकाय केले, ती सर्व कथा सांगितली.

ते सर्व ऐकून पिलूशेटने विचार केला, कीं अशा हुशार तरुणाला इतर कोणाच्या हाती लागू देतां कामा नये. त्यांनी आपल्या मुलीचे लग्न त्या तरुणाशी करुन दिले व त्यांच्या जवळची सर्व संपदा पिलूशेटने त्या मुलाच्या नावी लिहून ठेवली. पिलूशेट वारल्यावर तो तरुण 'शेट' म्हणून ओळखला जाऊ लागला.







# विष्णु पुराण

विष्णू जयविजयांना म्हणाला - ''ऋषीमुनींचा शाप अमोघ असतो. माझ्याशी मित्रभावाने राहून सात जन्मानंतर तुमचा उद्धार होईल. नाहीतर शत्रुत्वाने वागून तीन जन्मांतच माझ्या हातून तुम्हाला मुक्ती मिळेल. तुम्ही तुम्हाला काय पाहिजे ते सांगा.

जयविजयांनी परत विष्णूच्या सेवेला लवकर हजर व्हायला यावे, म्हणून तीन जन्मांतच उद्धार व्हावा अशी इच्छा प्रकट केली.

तेव्हां जयविजय दोघे शहाणे असल्याचे आळखून सनकसनंदादी मुनी विष्णूला म्हणाले - ''तुला रागद्वेष हे सारखेच वाटतात. तुझ्यापाशी शत्रुत्व ठेवणारे हे जास्त लवकर तुझ्यापाशी येतात, हे आम्हाला आताच कळले! तुझ्या द्वारपालकांवर राग दर्शवून आम्ही जी घाई केली, त्याबद्दल लाज वाटते. आम्हाला क्षमा करा.'' असे सांगून लक्ष्मीनारायणांचे अनेक प्रकारे स्तोत्र गात निघून गेले.

जयविजय हे कश्यप प्रजापतीची पत्नी दिती हिच्यापोटी हिरण्यकश्यप आणि हिरण्याक्ष या नामे जन्मले. दितीची मुलं म्हणून दैत्य म्हणजे राक्षस होऊन जन्माला आले.

दोघे भाऊ फार शूर व पराक्रमी निघाले. दोघांनी ब्रह्मदेवाचे स्मरण करुन तपश्चर्या केली आणि मोठमोठे वर प्राप्त केले आणि विष्णूचे वैरी म्हणून प्रसिद्ध झाले. हिरण्यकश्यप राक्षसांचा राजा झाला. त्याने विष्णूवर विजय मिळविण्याची प्रतिज्ञा केली.

हिरण्याक्षने विष्णूला चीड यावी यासाठी घोर कृत्ये करुन भूमीला घरंगळत नेऊन रसातल समुद्रांत ढकलले. भूमी रसातलाच्या बुडापर्यंत जाऊन बुडली. भूदेवीने विष्णूचे स्मरण करुन

५. वराहवतार व नरसिंहावतार



तिचा उद्धार करायला त्याची करुणा भाकली.

विष्णूला भूदेवीची कीव आली व त्याने दशावतारापैकी तिसरा अवतार वराहावतार धारण केला.

ब्रह्मदेव यज्ञ करीत असताना यज्ञकुंडातून शुभ्र कांती असलेली एक ठिणगी उडाली. त्या ठिणगीला मोठी होत गेल्यावर एका रानडुकराचे रूप आले. त्या डुकराला विष्णूचा अवतार मानून ब्रह्मादि देव यज्ञवराह, श्वेतवराह, आदिवराह या नांवे त्याची स्तुती करू लागले.

तो यज्ञवराह वाढत वाढत ब्रह्मांडाएवढा वाढला. त्याचे चारही पाय बळकट होते. त्याची कातडी पोलादी कवचासारखी टणक आणि त्याला वज्रासारखे लांब व बळकट सुळे होते. त्याचे डोळे लाल अग्नीसारखे होते. मानेपासून शेपटापर्यंत उभे बोचणारे सोनेरी रंगाचे केस होते. असा तो वराह हुंकारल्याबरोबर सर्व विश्व हादरले. यज्ञवराहाच्या नाकावर खड्गासारखे शिंग तळपत होते.

वराहावतार विद्युतवेगाने रसातलाकडे पळत गेला. त्या वेगामुळे सर्व दिशा दचकल्या व प्रलयकाळांतला वायू सुरू झाला.

रसातल समुद्रांत बुडी मारून जाऊन खाली बुडाला बुडून गेलेली पृथ्वी त्याने आपल्या शिंगावर उचलून घेतली.

त्याच वेळी हिरण्याक्षाने वरुणावर स्वारी करून त्याला युद्धाला आव्हान केले.

वरुण त्याला म्हणाला – "अरे वेड्या, तुला युद्ध करावयाचेच असेल तर रसातळाला जाऊन भूमीचा उद्धार करण्यासाठी गेलेल्या यज्ञवराहाशी कर!" हिरण्याक्ष लगेच फिरला आणि त्वेषाने जाऊन वराहावताराला त्याने टक्कर दिली. विराट रूपांत असलेल्या विष्णूशी हिरण्याक्ष मोठ्या शौर्याने लढला. आपली गदा विष्णूच्या गदेवर जोराने हाणून ती पाडली व मोठा पराक्रम केल्यासारखा पहात उभा राहिला. विष्णूने त्याच्या शौर्याची स्तुती केली आणि पुन्हां गदा धारण केली. दोघांचे घोर गदायुद्ध झाले. शेवटी वराहावताराने आपले शिंग हिरण्याक्षाच्या पोटांत खुपसून त्याला ठार केले.

वराहवतार धारण केलेल्या विष्णूला भूदेवीने वंदन केले. वराहमूर्तीने भूदेवीला उचलून घेऊन मांडीवर घेतले. ब्रह्मदेवादि देवांनी पुष्पवृष्टी करून जगपती विष्णूची अनेक प्रकारे स्तुती केली.

डुक्कराचे रूप घेऊन आपल्या धाकट्या भावाचा वध करणाऱ्या विष्णूवर सूड उगवण्याचे ठरवून प्रथम ब्रह्मदेवाकडून वरप्राप्ती करून



घेण्यासाठी निघून गेला. त्यावेळी त्याची राणी लीलावती ही गरोदर होती.

तिच्या गर्भातील शिशूचा वध करण्यासाठी इंद्र मायावी रुपाने तिच्याकडे जात असतां आकाशमार्गे नारद त्याला वाटेत भेटला आणि म्हणाला – "इंद्रा! तू हे काय काम करायचे डोक्यात घेतले आहेस? तू हा प्रयत्न सोड. सर्वदा आणि सर्व परिस्थितीत हिरण्यकश्यप सूड भावनेने विष्णूविषयी विचार करीत असल्याकारणाने लीलावतीच्या पोटात जो बालक आहे, त्याच्या मनांत विष्णुभक्ती निर्माण झाली आहे. विष्णूची लीला अशी अगाध आहे. लीलावतीच्या पोटी एक थोर विष्णुभक्त जन्माला येणार आहे. म्हणून तिच्या वाटेस जाऊ नकोस आणि आल्या वाटेने परत जा." असे इंद्राला सांगून नारद लीलावतीला आपल्या आश्रमांत घेऊन गेला.

आश्रमांत नारद वेदांताविषयी बोले व विष्णूची लीला वर्णन करून सांगे, तेव्हां लीलावतीच्या पोटांतील शिशू लक्ष देऊन सर्व ऐके आणि 'हो' कार ही देई! लीलावती बाळंत होऊन तिला मुलगा झाला.

हिरण्यकश्यपने घोर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न केले. आणि त्याच्याकडून एक फार मोठा वर प्राप्त केला. भूमीवर, आकाशांत, रात्री किंवा दिवसा, घरांत किंवा घराबाहेर, प्राण्याच्या हातून अगर माणसाच्या हातून, किंवा देव वगैरे स्वर्गातील निवासियांच्या हातून, जीवकोटी किंवा जडपदार्थांच्यामुळे, या सृष्टीत जे काही आहे, त्यांच्यापैकी कोणाच्याहीमुळे, आपणांस मरण येणार नाही असा अमोघ वर प्राप्त



केला. त्याने जो जो वर मागितला, ते सर्व ऐकून ब्रह्मदेव "तथास्तु!" म्हणाला.

वरप्राप्ती झाल्यानंतर, नारदाच्या तोंडून मध्यंतरी ज्या ज्या गोष्टी घडल्या, त्या ऐकून हिरण्यकश्यपू गर्वाने नारदाच्या आश्रमांत गेला. त्याने मोठ्या उत्साहाने मुलाचे बारसे करून मुलाचे नाव प्रल्हाद असे ठेवले. नंतर त्याला व त्याच्या आईला थाटामाटाने वाजत गाजत तो राजवाड्यांत घेऊन गेला.

हिरण्यकश्यपूने इंद्राचा पराभव करण्याचे ठरवून स्वर्गावर स्वारी केली आणि इंद्राचे आसन बळकाविले. सर्व दिक्पालांना त्याने जिंकले. देवांना ढोरांसारखे बडवून काढले. शचीचा अपमान करायला गेला, तेव्हां लीलावती मधे आड उभी राहिली. हिरण्यकश्यपूने गर्वांध होऊन मुनींच्या आश्रमांना आगी लावल्या. ज्यांचा ज्यांचा विष्णूवर विश्वास होता, त्यांची कत्तल



केली गेली. विष्णूचा विरोध करणे हेच त्याच्या आयुष्याचे एकमात्र ध्येय होते. विष्णूला चीड येण्यासाठी जे कांही करणे शक्य होते, ते सर्व त्याने केले. तरी विष्णू त्याच्या वाटेला गेला नाही. हिरण्यकश्यपूने वैकुंठावर स्वारी केली. परंतु तेथे त्याला विष्णू दिसला.

''मला भिऊन पळून गेला, भित्रा!'' असे म्हणत हिरण्यकश्यपू परत फिरला.

प्रल्हाद दिवसेंदिवस जसा वाढत गेला, तसतसा विष्णूच्या नामाचा जप अधिकाधिक करूं लागला. असा कुलद्रोही आपल्या वंशात कां जन्मावा? हीच चिंता हिरण्यकश्यपूला सतावू लागली.

त्याने आपले गुरू पुत्र चंडामार्कांना प्रल्हादकडे लक्ष द्यायला सांगून त्याला विद्याध्ययन करायला लावायला सांगितले.

प्रल्हादने गुरुकुलात रहात असतां हरीध्यान करीत असतांच सर्व अध्ययन संपविले. आपल्या सहपाठी मुलांना विष्णुभक्तीचा उपदेश करून त्यांना मोक्षप्राप्तीच्या मार्गाला लावले.

चंडामार्क प्रल्हादला त्याच्या वडिलांकडे घेऊन गेले. हिरण्यकश्यपूने मुलाला मांडीवर घेतले व म्हणाला - ''बाळरे, तू जे अध्ययन आजपर्यंत केलेस, ते तुला कितपत कळले हे कळावे, म्हणून तू एखादे पद म्हण पाहूं!''

प्रल्हाद म्हणाला, ''बाबा, गुरुजींनी मला जे कांही शिकविले ते मी लवकरच शिकलो. सर्व विद्यांत श्रेष्ठ विद्या म्हणजे विष्णूच्या चरणी एकचित्ताने मन लावणे होय! विष्णूचे स्मरण ज्या जन्मांत होते तोच खरा जन्म!''

हिरण्यकश्यपूने मुलाला मांडीवरुन खाली ढकलले आणि रागाने चंडमार्कांना म्हणाला - ''हेच का तुम्ही याला शिकविलेत?''

चंडामार्क दोघे थरथर कांपत म्हणाले - ''आमची चूक कांहीच नाही. आमच्यावर रागावूं नका!'' या शब्दात विनंती करून प्रल्हाद गुरुकुलात राहून काय करीत होता व तो कसा वागला, ते सविस्तर वर्णन करुन सांगितले.

हिरण्यकश्यपू मुलाला म्हणाला - ''त्या विष्णूने डुकराचे रूप घेऊन तुझ्या चुलत्याला ठार केले. तो आपल्या राक्षस जातीचा हाडवैरी आहे. तू त्या विष्णूची स्तुती गाणे हा अक्षम्य कुलद्रोहाचा अपराध आहे. तू हा विष्णु भक्तीचा नाद सोड त्याला विसर.''

''तू दानवेश्वर आहेस, मला शिक्षा करणेच तुला योग्य आहे. परंतु लोखंडाचा तुकडा



लोहचुंबलाला जसा चिकटतो, तसेच माझे मन विष्णुचरणी लीन झाले आहे. मकरंद जसा मंदारपुष्पाला चिकटल्यावर सोडीत नाही, तसेच विष्णूचे विस्मरण मला शक्य नाही. माझ्या जिवांत जीव असेपर्यंत विष्णुनामस्मरण जाणे शक्य नाही. हा जीवसुद्धां त्या विष्णूचाच आहे.''

अजून नाकसुद्धां सरळ दिसत नसलेला बालक प्रल्हाद जे म्हणाला ते ऐकून चिडून जाऊन हिरण्यकश्यप संतापून म्हणाला - ''तर मग तुझे मरण निश्चित समज! तुला आहार, जलप्राशन कांही मिळू न देतां तू उपाशी व तहानेला मर!'' असे म्हणत प्रल्हादाला त्याने अंधारकोठडीत टाकले.

पुत्रप्रेमाने लीलावतीला प्रल्हादाचे ते हाल पाहवले नाहीत. दिवसामागून दिवस जात होते.

लीलावतीचा शोक न पाहवल्यामुळे हिरण्यकश्यपने तुरुंगाचे दार उघडवले, आणि हरिभजनांत तल्लीन झालेल्या प्रल्हादाला पाहिले. इतके दिवस अन्नपाण्यावांचून राहूनही तो कसा जिवंत राहिला, असे आश्चर्यचकित होऊन पाहूं लागला. त्याला भयंकर राग आला व त्याने प्रल्हादाला हत्तीच्या पायाखाली तुडवायला सांगितले.

सिंहाला पाहून जसे भितात तसे हत्ती प्रल्हादाला पाहून भ्याले. माहूतांनी अंकुश मारून त्यांना चालवले.

म्हणून प्रल्हादावरुन ते चालून गेले तरी त्याच्या अंगाला थोडादेखील अपाय होऊ दिला नाही.

प्रल्हादावर साप सोडण्यात आले. परंतु वेटोळे



करून व फडा काढून त्यांनी जणूं कांही प्रल्हादावर छत्रच धरले.

हिरण्यकश्यपूने पर्वताच्या कड्यावरुन प्रल्हादाचा कडेलोट करविला. त्याला आगीत टाकविले, समुद्रात टाकविले. त्याला कालकूट प्यायला लावले, हे सर्व करुन प्रल्हाद सुरक्षितच असलेला पाहून हिरण्यकश्यप त्याला म्हणाला - "तू मरत नाहीस, ह्याचे गुपित काय, ते कळूं दे तरी !"

प्रल्हाद हंसत म्हणाला - "ह्यांत गुपित असे कांहीच नाही. हत्तीत, सापात, दगडा, धोंड्यांत, वस्तीत, समुद्रांत, विषांत, सर्वांत, तुमच्यांत, माझ्यात विष्णू आहे, हे सत्य तुम्हाला दिसत नाही! तुम्ही मला ठार करणे आणि मी जिवंत राहणे, ही सर्व त्या नारायणाची लीलाच आहे, बाबा!"

ते ऐकून हिरण्यकश्यपूला जास्तच राग आला. प्रल्हादाला फरफटत ओढत नेत त्याने आपली गदा हातांत घेतली. लीलावती ते दृश्य पाहून मूर्च्छितच झाली. चारी बाजूला राक्षस थक्क व भयभीत होऊन निश्चेष्ट उभे होते.

सभामंडपासमोर लोखंडाचा मोठा जयस्तंभ होता. हिरण्यकश्यपूने प्रल्हादाला तो लोहस्तंभ दाखवून विचारले - "काय रे, कुलद्रोही! तो माझा विजयस्तंभ आहे. माझ्या धाकट्या भावाला ठार करणाऱ्या त्या विष्णूशी मी युद्ध करून मी त्याला तुझ्यासमोरच ठार करतो व त्याच्यावर सूड उगवितो. त्यांत आहे का तुझा तो विष्णू?"

"ती शंका करण्याचे कारणच नाही! तो सर्वव्यापी आहे. त्या खांबातही आहे!" प्रल्हाद म्हणाला.

हिरण्यकश्यपाने तरातरा जाऊन स्तंभावर गदाप्रहार केला. प्रलयकाळातला भयंकर आवाज झाला. चतुर्दश भुवने हादरली. प्रलयकालांतले भयंकर ढग गडगडू लागले. स्तंभ दुभंगला तेव्हां विजेच्या चकचकाटापाठोपाठ दशावतारातील चवथा नरसिंहावतार प्रगट झाला.

त्याचे डोके सिंहाचे व देह माणसाचा होता. हाताला सिंहाची नखे होती व त्यापूर्वी सृष्टीत कधी दृष्टीस न पडलेले रूप घेऊन नरसिंहाने प्रलय भयंकर गर्जना केली. पांचजन्य शंखांचा ध्वनी झाला. त्याच्या चारी बाजूला सुदर्शन चक्र फिरत होते.







# राक्षसाने आपली आग हरवली



ही फार पूर्वींची गोष्ट आहे. त्यावेळेला मानवाने आगीचा प्रयोग पाहिलेला होता, पण आग पेटवायची कशी, हे कांही त्यांना माहीत नव्हते. फिजी बेटावरच्या रोटुमा पर्वताच्या खोल, अंधाऱ्या गुहेंत टुंबा नांवाचा एक राक्षस राहात होता. त्याचे भयानक दांत पेटलेल्या निखाऱ्यासारखे उष्ण होते. जेव्हां तो आपले तोंड उघडत असे, तेव्हां त्याच्या दांतातून निघालेली धग एखाद्या भट्टीतून निघणाऱ्या उष्णतेइतकी होती.

सुदैवाची गोष्ट अशी कीं तो जास्त वेळ आपल्या गुहेंत झोपून राहात असे, आणि जेव्हां तो आपल्या गुहेतून बाहेर येई तेव्हां मोठमोठ्या टांगा टाकत पर्वतावरुन खाली उतरत असे. त्या वेळीं त्याच्या भयंकर चेहऱ्यावरुन उष्ण श्वास बाहेर पडले कीं वाटेवरची सारी झुडुपें त्या धगीने कोळपून जात व त्यांची राख होई.

त्या पर्वताच्या पायथ्याशी समुद्राच्या कांठावर राहाणारे गांवकरी नेहमी प्रार्थना करीत कीं ह्या राक्षसाने नेहमी झोपून राहावे आणि गुहेच्याबाहेर कधी येऊंच नये.

त्या गांवात चार चतुर तरुण राहात होते. त्यांची नांवे होती लेकाबाय, दाकुवाका, मासीलाका आणि तुईविसी! ते मोठ्या उत्सुकतेने या दैत्याच्या लाल उष्ण श्वासाकडे बघत होते. कांहीही करून त्याच्या तोंडातून थोडीशी आग आणायला हवी, अशी त्यांची इच्छा होती.

"जर ती आग आपल्याजवळ आली तर किती चांगलं होईल. म्हणजे आपल्या बायका चांगलं भोजन शिजवूं शकतील." तुईविसी म्हणाला. "अंधाऱ्या रात्रीं आपल्याला उजेड आणि थोडी उब मिळायला हवी" दाकुवाका बोलला. "तर मग चलू या, त्याच्या तोंडातून थोडीशी तरी आग आपण चोरून आणूं या." मासीलाका व लोकाबाय म्हणाले.

लगेच या धाडसी तरुणांनी नारळीच्या वाळलेल्या झांवळ्यांची गुंडाळी केली आणि अगदी सावधपणें, कुणाला दिसणार नाही अशा बेताने ते त्या गुहेत शिरले. टुंबा तिथें गाढ झोंपलेला होता. त्याच्या प्रत्येक श्वासागणिक आगीची ज्वाळा त्याच्या तोंडातून बाहेर येई आणि त्याच्या त्या भयंकर



तोंडात ती ज्वाळा परत जात होती. गुहेत पडलेले दगडधोंडे व इतर वस्तू हळूंहळूं हाताने एका बाजूला सारीत, ते गुहेत अगदी हलक्या पावलांनी शिरले. त्यांच्या आवाजामुळें तो राक्षस उठेल अशी त्यांना भिती वाटली.

ते राक्षसाच्या अगदी जवळ गेले आणि नारळाच्या झावळ्यांची गुंडाळी त्यांनी राक्षसाच्या अगदी तोंडाजवळ धरली. त्या झापांनी लगेच पेट घेतला.

आणि आनंदाने उत्तेजित होऊन तुईबेरीने आपल्या हातांतली गुंडाळी राक्षसाच्या ओठांवर चोळली. राक्षस जागा झाला. त्याने डोळे उघडले. त्याबरोबर पेटलेली गुंडाळी घेऊन पळून जाणारे ते चौघेजण त्याला दिसले.

"माझी आग चोरण्याचं दुष्कर्म कुणी केलंय?" टुंबा गरजला. त्याच्या तोंडातून लहानमोठ्या ज्वाळा बाहेर निघत होत्या.

"या बेटावर फक्त मीच आगीचा मालक आहे." असं म्हणून त्याने डोळे चोळले आणि त्या पर्वतावरुन झपाट्याने खाली जाणाऱ्या त्या चार तरुणांचा तो पाठलाग करायला लागला. ते तरुण कसेबसे गांवाजवळच्या एका गुहेंत जाऊन पोंचले. आपल्या हातांतल्या पेटत्या झावळ्या घेऊन ते गुहेत शिरले, आणि त्यांनी गुहेच्या तोंडावर एक मोठा दगड आंतून ठेवला आणि गुहा बंद केली.

"वा! शेवटी आपण टुंबाच्या तावडींतून वांचलो आहोत. हा तोंडावरचा दगड त्याला कांही सरकवता येणे शक्य नाही." दाकुबाका म्हणाला.

लेकाबाय हा त्या सर्वांच्यात जास्त धोरणी आणि व्यवहारी होता, तो त्यावर म्हणाला, "टुंबाचा पाठलाग टळला कीं त्यानंतर आपण घरी कसे जायचे त्याचा आधी विचार करूं या."

त्यावेळी टुंबा गुहेच्याबाहेर बसून ओरडत होता आणि या चौघाजणांना बाहेर यायला आव्हान देत होता. संतापाने तो वेडापिसा झाला होता. त्याच्या कानानाकांतून धूर बाहेर येऊं लागला होता. ते चारीजण बाहेर कशाला येतील? अरण्याला आग लागली आणि त्या राक्षसाला त्याची धग जाणवायला लागली. गुहेच्या आंत लपलेल्या त्या चौघाजणांना देखील बाहेर आग लागून काय हाहाकार उडाला असेल, त्याची थोडीफार कल्पना येत होती.

आता राक्षस आणि ते तरुण, सर्वांच्याच लक्षांत आलं कीं जर आपला जीव वांचवायचा असेल तर कांहीतरी उपाय करायलाच हवा! टुंबाने कल्पना मांडली, "मित्रांनो, जर तुम्ही मला आंत येऊं दिलंत.



तर मी तुम्हाला एक छानसे गाणें ऐकवीन." राक्षस प्रेमळपणे बोलत होता.

त्या तरुणांना त्यांतला अर्थ लक्षांत आला. त्यांनी गुहेच्या तोंडावरचा दगड जरासा सरकावला आणि एक बारीकशी फट दिसायला लागली.

पण तेवढ्या फटीवर कांही टुंबाचे समाधान झाले नाही. "अरे, एवढ्याशा फटींतून मी करा काय आंत येऊं शकेन? जरा अजून थोडासा तरी दगड सरकवा ना!" त्याने अजीजीने म्हटलं. पण त्याने मनांत विचार केला होता कीं गुहेत घुसल्यावर लगेच तो आपले उष्ण श्वास सोडून त्यांची राखरांगोळी करुन टाकील.

आता लेकाबायला एक नामी उपाय सुचला. त्याने कुजबुजत आपल्या मित्रांना कांहीतरी सांगितलं. त्या चौघाजणांनी खांद्याचा जोर लावून तो भलामोठा धोंडा आणखी थोडा आणखी सरकवला. ती फट आता चांगली मोठी झाली आणि टुंबाने गुहेंत आपले डोकें घुसवले. त्याबरोबर लेकाबायने मोठ्याने म्हटले, "अरे, जरा अजून हलवा ना!" आणि त्या चौघांनी तो दगड जोरांत ढकलला, आणि गुहेचे दार बंद झाले. टुंबाला याची कल्पनाच आली नव्हती. त्या गडबडींत त्याचाही गोंधळ झाला व त्याला कांहीही करता आले नाही. त्याचे डोके चेमटून फुटले आणि दांत बाहेर निखळून पडले. त्याचे निखाऱ्यासारखे दांत आता थंडगार आणि काळे पडले.

चारी नवयुवकांनी मेलेल्या टुंबाला गुहेंत घुसवलं आणि ते गुहेतून बाहेर आले. आसपासच्या गांवातल्या लोकांना ही आनंदाची बातमी ते ओरडून सांगत होते, "आम्ही राक्षसाल मारले आहे. आता त्याचे दांत यापुढे आग ओकणार नाहीत. पण आग नष्ट झालेली नाही, ती आमच्याजवळ आहे. आता आपले जीवन सुरक्षित झाले आहे."

आता गांवकऱ्यांना टुंबाची भीती उरली नाही किंवा त्याच्या उष्ण श्वासाचीही कटकट राहिली नाही. त्यांनी सर्वांनी एकत्र येऊन आगीचा उपयोग करायला सुरवात केली. आता ते बटाटे व मासे तळून खायला शिकले.





# हिऱ्यांचा हार

हेलापुरीत राहाणाऱ्या गुप्तधनी व्यापाऱ्याकडे चौदा वर्षांचा सोमशेखर घरकाम करीत होता. त्याचा पिताही पूर्वी याच घरी कामाला होता. कांही वर्षांपूर्वी त्याचा एकाएकीं मृत्यू झाला. त्यामुळें लहान वयांतच शेखर इथें कामाला राहिला. त्याची आई त्याच्या वडिलांपूर्वीच मरण पावली होती. गुप्तधनीच्या घरामागे एका झोंपडीत तो राहात होता.

त्याला दरमहा पगार होता. शिवाय भोजन व कपडालत्ताही त्याला घरांत मिळत होता. म्हणून पगाराची रक्कम तो एका लहानशा डब्यांत सुरक्षित ठेवीत होता.

गुप्तधनीच्या घरांतल्या प्रत्येकाला जे काम हवे असे ते शेखर करुन देत होता. सर्वजण त्याच्यावर निर्भर राहात होते.

एक दिवस तो अंगणांतल्या विहिरीचे पाणी काढताना बादली ओढत होता, तेव्हां गुप्तधनीने त्याला जरा रागांत म्हटले; ''सोम, किती वेळ झालाय, तू अजून गाईची धार काढली नाहीस. मुलें दुधासाठी खोळंबली आहेत.''

तो कर्कश आवाज ऐकून शेखर नाराज झाला. पण आपली नाराजी न दाखवता तो म्हणाला, ''साहेब, माझं नांव सोमशेखर आहे. नुसतं सोम नाही. अशा प्रकारे मला हांक मारलेली मला मुळीच आवडत नाही!''

त्याचा बोलण्याची कठोर शैली बघून गुप्तधनी चकित झाला. घरांतले सगळेजण त्याला आजवर 'सोम' म्हणूनच हांक मारीत आले होते. यापूर्वी त्याने कधी याबद्दल कुरकुर केली नव्हती. आज हा सोम असा कां उलट बोलतो आहे याचा विचार गुप्तधनीच्या मनांत तरळत राहिला.'' तरीही आपला रोष त्याने प्रकट केला नाही आणि तो सोमला म्हणाला, ''याच्यापुढे मी तुला अशीच हाक मारीन - सोमशेखर प्रसादजी, गाईची धार काढायचे कष्ट घ्याल कां?''

शेखर मोठ्या उत्साहाने व आनंदाने

कैलासनाथ

गोठ्याकडे धारा काढायला गेला. थोड्या वेळाने दुधाची कासंडी घेऊन शेखर घरांत आला, तेव्हां गुप्तधनीच्या आईने त्याला सांगितले, ''अरे सोम, घरांत भाजीच नाही. तू बाजारांत जाऊन भाजी घेऊन ये.''

शेखर पुन्हां तडकला. त्याने कठोर स्वरांत म्हटलं, ''आधी पैसे नि थैली आणून द्या.''

त्याचा रुक्ष कोरडा स्वर आणि बोलणे ऐकून गुप्तधनीची आई थक्कच झाली. गुप्तधनी हे लांबून बघत होता. शेखरच्या वागण्यांत एकाएकी हा बदल झालाय, त्याच्यामागे कांहीतरी जोरदार कारण असलं पाहिजे. आणि गुप्तधनीने ते कारण शोधायचे ठरवले.

त्या रात्रीं घरांतली सर्व मंडळी झोंपी गेली, तेव्हां गुप्तधनी चोरपावलाने शेखरच्या झोपडी-जवळ गेला. आंत काय चाललंय ते पाहायला त्याने खिडकीच्या फटींतून आंत बघितले. त्यावेळीं त्या सौम्य प्रकाशांत शेखरच्या हातांत एक चमचमणारा हार दिसत होता व त्याच्याकडे तो निरखून पाहात होता.

जेव्हां सोम लांकडे आणायला शेजारच्या जंगलात गेला होता. तेव्हां कावळ्याच्या घरट्याजवळ एका फांदीवर तो हार लोंबकळत होता. कावळ्याने ती चकाकणारी वस्तू खायला म्हणून उचलली असेल आणि खायला निरुपयोगी आहे हे समजल्यावर टाकून दिली असेल. शेखरच्या वागण्यांतला बदल कां झाला ते गुप्तधनीला आत्ता समजले. हा हिऱ्यांचा हार त्याचे मूळ कारण होते.

असेच कांही दिवस गेले. त्यावर्षी गुप्त-



धनीच्या बागेंत केळ्यांचे छान पीक आले होते. त्याने खवचटपणें शेखरला म्हटले, ''सोमशेखर प्रसादजी, आपण दोघेजण जाऊन सुगंधीपुरच्या बाजारांत ही केळी विकायला जायचं कां?''

शेखरने आनंदाने होकारार्थी मान डोलावली. त्याच दिवशी संध्याकाळीं दोघेही केळ्यांचे घड विकायला बाजारांत गेले.

एका दुकानदाराला सगळे घड विकून गुप्तधनी परत जायच्या बेतांत होता, तेवढ्यांत शेखरने त्याला विचारले, ''मालक, मला जरा बाजारांत हिंडून यायचे आहे. मला पाहायचंय कीं इतर दुकानांत कोणकोणता माल भरलेला असतो ते! गुप्तधनीने म्हटलं, ''ठीक आहे, तू हिंडून ये. मी इथेंच तू येईपर्यंत थांबतो.''

तासाभरांत शेखर खाली मान घालून गुप्तधनीजवळ आला. त्याने हळू आवाजांत

म्हटले, "मालक, आता आपण निघायचं ना?"

"जशी आपली इच्छा, सोमशेखर प्रसादजी" गुप्तधनी म्हणाला.

शेखरने कळवळून म्हटले, "मी तुमचा सोम आहे हो. जन्मल्यापासून मी तुमच्याकडे आहे. इथेंच मी लहानाचा मोठा झालो. मला तुम्ही 'सोम' म्हणूनच हांक मारा!" त्याचा स्वर नम्र होता.

या तासभरांत हा फरक अचानक कसा काय झाला असेल ते कांही गुप्तधनीला उमजेना. तो सोमकडे नवलाने पाहात राहिला. ते सोमशेखरच्या लक्षांत आलं आणि त्याने पुढे म्हटलं, "मालक, मला क्षमा करा. मला आपल्याला कांहीतरी सांगायचं आहे."

"अरे सांग ना! त्यांत संकोच कशाला रे?" गुप्तधनीने म्हटलं.

"आठवड्यापूर्वी मला एक हिऱ्यांचा हार मिळाला. झालं, मला श्रीमंतीची स्वप्नें दिसायला लागली. माझ्या मनांत आलं कीं हा हार घेऊन मी एक घर विकत घेईन, शेतीवाडी विकत घेईन आणि आरामांत राहीन. माझा विचाराचा ढंगच एकदम बदलला. मी स्वतःला श्रीमंत समजायला लागलो. तो हार विकायला म्हणून आत्ताच मी सोनाराच्या दुकानांत गेलो होतो. पण त्याने तो हार नकली आहे असें सांगितले. मी त्याला ठासून सांगितले कीं तो हार नकली नाही, खरा आहे. माझा आग्रह पाहून तो सोनार चिडला आणि त्याने आपल्या नोकरांकडून मला धक्के मारुन दुकानाच्याबाहेर हांकलले." हे सांगून सोमशेखरने तो हार गुप्तधनीला दाखवला.

तो हार नीट निरखून बघितल्यानंतर गुप्तधनी म्हणाला, "हे बघ, तू कष्टाळू आहेस. मेहनत करशील तर भाग्य तुझ्या पाठीशी येईल. मग एकच हार काय, तू आणखी दागिने घेऊं शकशील. ज्यांचा हा हार हरवला असेल, त्यांना त्याचे किती वाईट वाटत असेल त्याचा जरा विचार कर. तो मिळाल्याबरोबर तू तो पोलिसांकडे द्यायला हवा होतास. मेहनतीची कमाई हीच खरी धनसंपदा आहे. जवळ धन असो वा नसो, माणसाने आपला तोल सांभाळायला हवा. आपल्या बोलण्यावा-गण्यांत निष्कारण बदल येऊं देऊं नये. त्यांतच त्याचा मोठेपणा आणि गौरव आहे. कळलं ना?"

शेखरने पुन्हां होकारार्थी मान डोलावली.







# पुरावा

वल्लभनगर हे गांव व्यापाराकरिता प्रसिद्ध होते. अनेक देशांतून व्यापारी लोक व्यापाराकरिता इथे येत होते. एकदा दक्षिणेतून एक मनुष्य वल्लभनगराला आला.त्याच्याजवळ फक्त पांचशे रुपये होते. आवश्यक वस्तू खरेदी करण्यासाठी तो गल्ल्या-गल्ल्यातून फिरत होता.

अचानक एक स्त्री समोरुन आली. तिने त्याचा हात पकडला, आणि म्हणूं लागली, "माझे रुपये चोरुन खरेदी करतोस कां?" तो मनुष्य आपल्यावरील आरोप ऐकून चकित झाला व जरा घाबरला, मग स्वतःला सांवरुन म्हणाला, "मी, तुझ्या पैशाची चोरी केली? ही अगदी अशक्य गोष्ट आहे मी तर तुला ओळखत देखील नाही."

ही गडबड ऐकून लोकांची गर्दी जमली. दोघांमध्ये खरे कोण बोलतो, खोटे कोण बोलते? ह्याचा निर्णय लोकांना घेता येईना. जमावातील एकजण म्हणाला, "अरे, इथेच काय भांडता? जवळच न्यायालय आहे, तिथे चला."

त्या स्त्रीने ह्या परदेशी माणसाचा हात तो पळून जाऊं नये म्हणून घट्ट पकडला आणि त्याला ओढतच ती न्यायालयांत घेऊन गेली. तिने न्यायाधीशाकडे तक्रार केली, व म्हणाली, "महाशय, ह्या माणसाने बाजारात माझ्याकडून जबरदस्तीने माझे पांचशे रुपये हिसकावून घेतले. ते तो आता देत नाही. आपण माझे पैसे मला देऊन योग्य तो न्याय द्या."

"ह्या गोष्टीला कोणी साक्षी आहे का?" न्यायाधीशाने विचारले. त्या स्त्रीने नकारार्थी मान हलवली. न्यायाधीशने परदेशीला विचारले, "तुला कांही सांगायचे आहे कां?"

"महाशय, घरेलू आवश्यक वस्तू खरीदण्या-साठी मी आज सकाळीच या शहरांत आलो. माझ्या इथे कोणीही मी ओळखीचे नाही. ह्या स्त्रीला तर मी ओळखतच नाही. माझ्याजवळ पांचशे रुपये होते. ते खरोखर माझेच आहेत." परदेशी माणसाने सांगितले.

- २५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट -

न्यायाधीश थोडा वेळ गप्प बसले. ती स्त्री खोटे बोलते आहे याबद्दल त्याची खात्री पटली. त्यांनी एक प्रयोग करुन पहायचा ठरविले. ते परदेशी माणसाला म्हणाले, "तुझ्यावर माझा विश्वास बसत नाही. तेव्हां तू तिचे पैसे तिला परत कर." परदेशीने कांही उपायच नाही असे समजून पांचशे रुपये काढून त्या स्त्रीला परत दिले.

ती निघून गेलेली पाहताच न्यायाधीशाने त्या माणसाला जवळ बोलावून हळूच सांगितले "तू तिच्यामागे जा आणि पैसे ओढून घे. भिऊं नकोस. मी तुला मदत करीन."

न्यायाधीशाच्या सांगण्याप्रमाणे तो माणूस तिच्यामागे गेला आणि तिच्या हातून पैसे ओढून घेण्याचा खूप प्रयत्न केला पण त्याला यश मिळाले नाही. अनेक लोक मात्र तेथे जमा झाले.

ती स्त्री परत न्यायाधीश महाराजांकडे आली आणि म्हणूं लागली "तुम्ही, मला जे पैसे दिले होते ते घेण्याचा प्रयत्न तो करीत आहे. मला मदत करा."

न्यायाधीशाने विचारले, "काय सांगते? खरं आहे का हे? कोणी प्रत्यक्ष घटना पाहिली का?"

जमलेल्या लोकांच्याकडे हात दाखवून ती म्हणाली, "ह्या सर्वांनी पाहिले आहे. माझ्याकडून तो पैसे ओढत असताना हे सर्व तिथेच होते."

न्यायाधीश म्हणाले, "तुझ्यावर विश्वास आहे. ह्या लोकांना विचारण्याची गरज नाही. मग त्याने पैसे घेतले कां?"

त्या स्त्रीने "तो त्या प्रयत्नांत असफल झाला, कारण मी त्याला तसे करुं दिले नाही" असे सांगितले.

न्यायाधीश म्हणाले "मी तोच विचार केला होता. तुझे पैसे चोरण्याची ताकद या माणसांत नाही. त्याने असा प्रयत्न केला असता तरी लोकांनी त्याला तसे करुं दिले नसते. पहिल्यावेळी त्याने पैसे चोरले, त्यावेळी तुमच्या दोघांशिवाय तिथे कोणीच नव्हते. त्यावरुन हेच सिद्ध होते कीं हे पैसे त्या परदेशी माणसाचे आहेत. ते त्याला परत दे. परत असेच करशील तर तुला शिक्षा करीन आणि तुरुंगात मध्ये पाठवीन. लक्षांत ठेव."









# भूसरची औषधाची पिशवी

आखली गांवात गोविंद नावाचा एक गवई रहात होता. गांवातील शंकराच्या मंदिरात उत्सवाच्या वेळी तो भक्तिपूर्ण गाणी म्हणत असे. त्यामुळे लोकांच्या मनांतील भक्तिभाव जागृत होत असे. त्याचे गाणे ऐकून लोक म्हणत असत, "हा किती सुंदर गाणे म्हणतो, ह्याचा आवाज किती गोड आहे. जर ह्याला राजाचा आश्रय मिळाला तर आपल्या गावाचे नांव उज्वल होईल."

परंतु गोविंद अतिशय विनम्रपणे त्यांना म्हणत असे "मी शंकराचा भक्तच राहू इच्छितो. ईश्वराची कृपा झाली तरी मला राजाश्रय आपोआप कसा मिळेल? राजाश्रय मिळण्यासाठी प्रयत्न आणि प्रतिभा असावी लागते. माझ्याजवळ नाही खूप प्रयत्न, किंवा खूप प्रतिभा पण नाही. माझ्या हृदयांतील भक्तीभाव गळ्यातून बाहेर पडतो, शंकराच्या भक्तीत मी माझे जीवन सुखाने घालवितो आहे. मी स्वतः राजाश्रय कधी मागणार नाही."

महाशिवरात्रीचे दिवस जवळ आले होते. त्यामुळे रोज कांही ना कांही कार्यक्रम होत असत. नऊ दिवस कार्यक्रम चालत. त्याच वेळी गोविंदाची ओळख भूसर नांवाच्या एका बहुरूपियाशी झाली. तो वेगवेगळी रुपे घेऊन लोकांचे मनोरंजन करीत असे.

भूसरचा पोषाख मोठा विचित्र असायचा. हातांत वाकडी काठी घेऊन, खांद्यावर कांबळे घेऊन तो फिरत असे. डोक्यावर कावळ्याच्या पिसांची टोपी घालत असे. वेगवेगळ्या गोष्टी सांगून तो लोकांना हंसवीत असे. अशा मोठमोठ्या गोष्टी सांगत असे की लोकांना त्या समजतच नसत. त्याच्या तोंडावरील हळद आणि चुना यांचे ठिपके पाहून लोक हंसत असत.

भूसर एक दिवस गोविंदाला म्हणाला, "तू फार छान गाणे म्हणतोस. तुझ्या आवाजात गोडवा आहे. त्या गोडव्यामुळे तुझे गाणे ऐकून लोक खूष होतात. माझा हा विचित्र पोषाख पाहून लोक हंसतात. परंतु ह्या विचित्र पोषाखापेक्षा माझ्या गांवाचे नांव उज्वल करणे, हेच माझे काम आहे. तू फक्त गांवातच गाणे म्हणत कां राहतोस? दुसरीकडे जाऊन आपल्या गाण्याचे प्रदर्शन कां करीत नाहीस?" उत्सवाच्या शेवटच्या दिवशी त्याने विचारले.

गोविंद म्हणाला, "मी फक्त भक्तिगीतच म्हणू शकतो. त्याशिवाय गाण्याचा दुसरा कोणताही प्रकार मला म्हणता येत नाही. मला थोडे संगीताचे ज्ञान आहे हे कबूल करतो, परंतु मी इतर संगीताच्या बाबतीत कधी प्रयत्नच केला नाही. दरबारी संगीतकाराला संगीतात निष्णात असावे लागते. त्याला सर्व प्रकारच्या संगीताचे ज्ञान पाहिजे, त्याचप्रमाणे त्याचा अभ्यासही पाहिजे. त्यामुळे चांगला संगीतकार म्हणून त्याचे नांव सगळीकडे पसरेल, त्याला यश मिळेल. तेव्हांच राजाश्रय मिळण्यास तो लायक होईल. राजाचा आश्रय मिळणे ही इतकी सोपी गोष्ट नाही. माझ्यामुळे या गांवाचे नांव प्रसिद्ध होण्यासाठी ईश्वराची कृपा किंवा चमत्कारच व्हावा लागेल."

गोविंदाच्या या बोलण्यावर भूसर हंसला आणि म्हणाला, "वनराज सिंहानेही तोंड उघडे ठेवले तरी त्यांत कोणताही प्राणी जात नाही. प्रयत्न हे करावेच लागतात. तू दुर्गातीर्थाबद्दल ऐकले आहेस कां? तेथे एक महिना उत्सव चालू असतो. ते स्थान येथून दोन मैलांवरच आहे. मी आजच तिकडे जाणार आहे. तू दोन दिवसानी तेथे येऊ शकतोस. तेथील



उत्सवात जमीनदार पण भाग घेतात. जमीनदार तुझे गाणे ऐकून खूष होतील. एका चांगल्या, गायकाच्या रुपांत तुझी व त्यांची ओळख होईल."

गोविंदालाही दुर्गातीर्थाबद्दल माहिती होती. त्याला ते आठवले. तो म्हणाला, "मी पण दुर्गातीर्थाबद्दल ऐकले आहे. त्या ठिकाणीं शिवाचे शिष्य वीरभद्र यांच्या धर्मपत्नीचे मंदिर आहे. मेलेल्या लोकांच्या आत्म्याला शांती मिळावी आणि भुताखेतांपासून रक्षण व्हावे म्हणून लोक त्या देवीची पूजा करतात. देवीला चाबूक अर्पण करतात. त्या देवीच्या हातांत नेहमी चाबूक असतो. खूप दिवसापूर्वी मी तेथे गेलो होतो पण गाणे म्हणण्याची संधी मला मिळाली नाही."

"ह्या वेळेस तुला संधी मिळेल." असे म्हणून भूसर आपल्या पेटीत चामड्याची पिशवी ठेवू

मार्कंडेय



लागला. ते पाहून गोविंदाने विचारले, "हे काय आहे?"

भूसरने अतिशय उत्साहाने चामड्याच्या पिशवीतील काही औषधे बाहेर काढली आणि म्हणाला, "हे अग्निपुंज - पोटांतील दुखणे कमी होण्यासाठी, हे लेह-औषध, ओकाऱ्या थांबविण्यासाठी, हे हृदय-विकारावर उपयोगी पडते. आपल्याला माहित नसते की कोणत्यावेळी कोणाला कोणता आजार होईल, म्हणून प्रवासांत सगळी औषधे जवळ ठेवतो." असे म्हणून त्याने औषधे चामड्याच्या पिशवींत ठेवली, पण ती पिशवी पेटीत ठेवायला तो विसरला.

त्यानंतर भूसर धर्मशाळेच्या बाहेर पडला आणि इतर कलाकारांच्या बरोबर चालू लागला.

भूसरच्या जाण्यानंतर थोड्या वेळाने गोविंदा धर्मशाळेच्या बाहेर पडला तर त्याला भूसरची औषधे असलेली चामड्याची पिशवी दिसली. ती पिशवी भूसरला द्यावी म्हणून तो गल्लीत गेला, पण भूसर कोठेही दिसला नाही. गोविंदाने विचार केला, की आपण जेव्हां दुर्गातीर्थला जाऊं, तेव्हां पिशवी भूसरला देऊन टाकू.

दुसऱ्या दिवशी तो वीरभद्रपूरला गेला, तिथे दुर्गातीर्थ होते आणि उत्सव होणार होता. तो जेव्हां तिथे पोहोचला, तेव्हां त्याला एका जागी गडबड चाललेली दिसली. तेथे जमीनदार एका उंच आसनावर ऐटींत बसले होते आणि जोरजोरांत हंसत होते. जमलेले लोकही हंसत होते. त्यांच्यामध्ये भूसर माकड बनून नाचत होता. आणि जोरांत ओरडत होता. "अरे, बापरे, पोटात खूप दुखतंय! डोळे मिटायला लागले आहेत. अग्निपुंज गोळी कुठे आहे? हृदय-विकाराची गोळी कुठे आहे? माझी चामड्यांची पिशवी कुठे आहे? आई दुर्गे, माझे रक्षण कर, माझ्यावर कृपा कर."

भूसर जेव्हां परत परत चामड्याच्या पिशवीचे नांव घेत होता, तेव्हांच गोविंदाने तो ही थट्टा करीत नाही हे ओळखले. तो खरंच पोटाच्या दुखण्याने बेजार झाला होता. गोविंद ताबडतोब त्याच्याजवळ गेला. आणि म्हणाला, "ही घे तुझी औषधाची पिशवी, मला माहित नाही तुला कोणती गोळी पाहिजे. तेव्हां तूच हवी ती गोळी काढून घे." असे म्हणून पिशवी त्याच्या स्वाधीन केली.

तेव्हां जमीनदार आणि जमलेल्या लोकांच्या लक्षांत आले की भूसर नाटक करीत नव्हता. त्याचे



पोट खरोखरच दुखत होते. भूसरने पिशवीतून औषधाची गोळी काढली आणि तोंडात टाकली. त्याने खुणेनेच पाणी मागितले. जमलेल्या लोकांतून एकाने त्याला पाणी आणून दिले. पाणी पिऊन तो जमिनीवर बसला.

खरी गोष्ट कळताच जमीनदार भूसरला म्हणाले, "तुझा हा बहुरूपी पोषाख आणि तुझ्या मनोरंजन करणाऱ्या गोष्टी खरोखर सुंदर आहेत. परंतु मला अजून समजले नाही, पोट दुखण्याचे तू नाटक करीत होतास, की खरेच तुझे पोट दुखत होते?"

भूसर ताबडतोब उठला. त्यांनी गोविंदकडे बोट दाखवून म्हटले, "महाराज, हा आरवली गावाच्या शंकर मंदिरात गाणे म्हणतो. विशेष म्हणजे उत्सवाच्या दिवसात भक्तीपूर्ण गाणी म्हणतो. उत्तम गायक आहे. ह्याचे नाव गोविंद आहे. आज हा दुर्गा मंदिरात गाणे म्हणेल. त्यावेळी तुम्ही ह्याचे गाणे ऐकावे अशी तुम्हाला विनंती आहे."

जमीनदाराने त्याचे म्हणणे मान्य केले. त्या दिवशी गोविंदाच्या भक्तीपूर्ण गाण्याने जमीनदार अगदी खूष झाले. त्याच्या गोड आवाजाचा त्यांना मोह पडला. त्यांनी लगेचच त्याला गाण्यासाठी कायमचे वर्षासन नेमले. त्याला थोडीशी जमीन बक्षीस दिली. त्याच्याबरोबर भूसरला पण पैसे दिले.

भूसरचा हात पकडून गोविंद म्हणाला, "तुझे हे उपकार मी जन्मभर विसरणार नाही.

"मी कांही उपकार केले नाहीत. वेळेवर येऊन तू माझे प्राण वाचवलेस, म्हणून मीच तुझा ऋणी आहे. मी चुकून पिशवी विसरुन आलो होतो, पण वेळेवर येऊन तू माझे प्राण वांचवलेस. जमीनदारांबरोबर तुझी भेट झाली आणि गायक म्हणून तुझी नेमणूक झाली. हे सर्व तुझ्यावर ईश्वराची कृपा असल्याचे लक्षण आहे. तुझा ईश्वरावर खूप विश्वास आहे. त्याने त्याचे फळ तुला दिले. ही सगळी सर्वेश्वराची कृपा आहे. मी मात्र निमित्त झालो." भूसर म्हणाला.

गोविंदच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रू उभे राहिले. तो मनांत विचार करीत होता की शंकराच्या कृपेने असंभव गोष्ट आज शक्य झाली.



# अपमानाचे दुःख

**भा**जीचा व्यापारी गंगाधरकडे नुकताच सत्यराज नांवाचा मुलगा कामाला लागला होता. तो काम अतिशय मेहनतीने आणि प्रामाणिकपणे करीत असे. त्यामुळे मालक त्याच्यावर खूष झाला होता.

सत्यराजला एक वाईट खोड होती. तो गिऱ्हाइकांवर लवकर नाराज होत असे. जेव्हां एखादे गिऱ्हाईक जास्त हुज्जत घालू लागले, तर तो म्हणत असे, "जा जा, तुम्हाला माल घ्यायचाच नाही ना?"

गंगाधरने त्याला खूप समजावून सांगितले कीं असे गिऱ्हाईकावर ओरडणे चांगले नाही. ही संवय सोडून दे. परन्तु सत्यराजची संवय कांही सुटली नाही. वीरभद्र नांवाची गांवातील एक प्रसिद्ध व्यक्ती होती. एक दिवस त्यांची मोलकरीण भाजी घ्यायला आली तर तिला सत्यराजने बरेच उलटे सुलटे सुनावले. म्हणून वीरभद्रला राग येऊन त्याने गंगाधरची कानउघाडणी केली. गंगाधरने नाईलाजाने सत्यराज ह्याला कामावरून काढून टाकले.

दोन दिवसानंतर गंगाधरकडे येऊन सत्यराज क्षमा मागू लागला. परन्तु गंगाधर जोराने त्याला म्हणाला, "ऐकू येत नाही कां? येथून तू निघून जा!" ते ऐकून सत्यराजाला वाईट वाटले. त्याच्या डोळ्यांत पाणी आले. तो परत जायला निघाला तेवढ्यांत गंगाधरने त्याला हांक मारली व म्हणाला, "जरा इकडे ये."

सत्यराज परत येऊन मालकाच्या समोर उभा राहिला. गंगाधर गोड आवाजात त्याला म्हणाला, "आता तरी तुला समजले कां? कोणाशीही जोराने, रागाने बोलू नये. असे बोलल्याने अपमान होतो आणि अपमानाचे दुःख खूप असते."

सत्यराजला आपल्या वागणुकीबद्दल लाज वाटली. ओरडून बोलण्याने दुसऱ्याला किती दुःख होते हे कळले. तो हात जोडून मालकांना म्हणाला, "होणारे दुःख मला समजले, मालक."

"मी तुझ्यावर विश्वास ठेवतो. तू काम करायला जरूर सुरवात कर." गंगाधर म्हणाला.







# अस्वल्या मांत्रिक

## 7

*(अरण्यांत दरोडेखोरांचा नायक नागमल्ल याने दुर्मुखराजाला कैद केले, तेव्हां दुर्मुखने आपले नांव दुर्जयगुप्त आहे असे सांगून निसटायचा प्रयत्न केला; पण त्याच्यावर विश्वास न ठेवता नागमल्ल त्याला एका गुहेंत घेऊन गेला. अस्वल्या बधिक तिथें पोंचला व त्यांना धमकी देऊं लागला. त्यावेळीं उग्रदंड नांवाचा राक्षस तिथे आला. अस्वल्या बधिकाला त्याच्यावर वार करायचा होता. त्यानंतर...)*

**अ**स्वल्या बधिक परशु वर उचलून आपल्या दिशेने येतो आहे. हे पाहून उग्रदंड राक्षस कांही क्षण चकित झाला. पण तेवढ्यांत त्याला कांहीतरी आठवले आणि तो बावचळला. पण लागलीच त्याने आपली दगडी गदा उचलली व तो गरजला, "अरे, भुकडा, अस्वल्या माणसा, थांब जरा! तुझी ही हिंमत?"

अस्वल्या बधिक हे ऐकून थबकला. आणि उग्रदंडाकडे पहात तो जोराने म्हणाला, "अरे उग्रदंडा! तुला राक्षस असल्याची फार घमेंड आहे वाटतं? माझ्यापुढे तुझा हा अहंकार चालायचा नाही. मी बघतोय कीं! तुझे हातपाय लटपट ताहेत!"

उग्रदंडाने दांत विचकले आणि जमिनीवर आपले पाय आपटून तो म्हणाला, "तुला बघून मी घाबरलोय असं कांही समजूं नकोस. पण मला तुझी घृणा येतेय, म्हणून संतापाने माझे हातपाय कांपताहेत. तुझं हे विकृत स्वरुप कसं आहे रे? अर्धा माणूस आणि अर्धा अस्वल!"

हे बोलणे ऐकून अस्वल्या बधिकाने आपला



परशु जोराने एका दगडावर चालवला व त्याने ओरडून म्हटले, "अरे दुष्ट राक्षसा! महान अस्वल्या मांत्रिकाने निर्माण केलेल्या या अस्वल्या वधिकाची तू अशी कुचेष्टा करतो आहेस! बघ आता! तुझे मस्तक तुटून खाली पडणार आहे." असं म्हणून त्याने राक्षसावर प्रहार करण्यासाठी परशू उचलला.

उग्रदंडाने झटकन उडी मारली आणि जवळच असलेल्या एका सालवृक्षानजीक जाऊन तो उभा राहिला. तो वधिकाला म्हणाला, "अस्वल्या वधिका! शांत हो बघू! तू हे जाणून घे कीं जर आपण दोघेही एकमेकांच्या हल्येच्या प्रयत्नांत जखमी झालो, तर याचा फायदा कोण उठवेल हे तुझ्या लक्षांत येतंय कां?"

हा प्रश्न ऐकल्यानंतर अस्वल्या वधिकाला एकदम आठवलं कीं अस्वल्या मांत्रिकाने उदयगिरीचा राजा दुर्मुख याचे मस्तक उडवण्यासाठी तर वधिकाला धाडले होते. हे काम पूर्ण करुन त्याला पुन्हां अस्वल्या मांत्रिकाकडे जायचे होते. अशा परिस्थितींत उग्रदंडाशी भांडण उकरण्यांत काय अर्थ होता?

हा विचार मनांत आल्याबरोबर अस्वल्या मांत्रिकाने आपल्या परशूची धार एकदा नीट निरखून बघितली, आणि म्हटले, "अरे उग्रदंडा! माझे काय काम आहे, त्याची तू मला अगदी वेळेवर आठवण करुन दिलीस. मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू आता तुझ्या वाटेने जाऊं शकतोस. या शेजारच्या गुहेंत लपलेल्या दुर्मुखराजाचा शिरच्छेद करुन मीदेखील आल्या वाटेने परत जाईन." असं म्हणून वधिक मागे वळला.

तेव्हां उग्रदंड दोन पावले पुढे येऊन म्हणाला, "अरे अस्वल्या वधिका! थोडा थांब जरा! थोड्या वेळापूर्वी तू अस्वल्या मांत्रिकाचं नांव घेतलं होतंस. मी एका अस्वल्या मांत्रिकाचं नांव पूर्वी ऐकलेलं होतं. तू म्हणतो आहेस तो हाच मांत्रिक तर नसेल ना? त्यांचं काय वय असेल बरं?"

हे शब्द ऐकून वधिकाला हंसू आवरेना. तो म्हणाला, "तुला माहीत आहे कां? सूर्य व चंद्राचे जे वय असेल ना, तेच अस्वल्या मांत्रिक गुरुचं वय आहे. समजलं? त्यांच्या डोळ्यांदेखत तर हिमालय पर्वत निर्माण झाला आणि इतका उंच झाला. ब्रम्हपुत्रा नदीचे रूप इतके विशाल होत गेलेले त्यांनी बघितलेले आहे. आता तरी लक्षांत आलं कां?"

"शाबास वधिका! तुझ्या परशूसारखीच तुझी जीभदेखील चांगलीच धारदार आहे. मी खरोखर तुझ्यावर खूष आहे. आता मला सांग, मीदेखील तुझ्याबरोबर अस्वल्यामांत्रिक गुरुंच्या



दर्शनाला आलो तर चालेल कां?" उग्रदंडाने आपली गदा दूर फेंकत विचारले.

राक्षसाचा हा पवित्रा बघून अस्वल्या वधिक स्तिमित झाला व त्याने विचारले, "अरे, तू तर गदा दूर फेंकून दिलीस. काय रे, याच्या मागे एखादे रहस्य तर नाही ना?"

"कां नाही? या क्षणापासून तर आता आपण दोघेजण मित्र झालो आहोत." उग्रदंडाने उत्तर दिले.

ते ऐकून अस्वल्या वधिक हंसतच सुटला आणि नंतर म्हणाला, "अस्वल्या मांत्रिक गुरुंच्या हातांतला हतीचे मस्तक असलेल्या मंत्रदंडाच्या स्पर्शाने माझे पूर्वीचे रूप बदलून गेले आहे. ज्या क्षणीं मी दुर्मुखराजाचे मस्तक धडावेगळे करुन त्यांच्या हातांत देईन, त्यानंतर लगेच ते मला माझे पूर्वीचे वधिकाचे रूप देतील. त्यामुळे आपल्या दोघांच्यामधें मैत्री होणे कठीण आहे. तू तुझ्या गुहेंत परत जाऊं शकतोस."

असं बोलून अस्वल्या वधिक गुहेच्या तोंडावर ठेवलेला जड दगड सरकवण्याचा प्रयत्न करायला लागला. त्याबरोबर आंत लपलेल्या राजाच्या अंगरक्षकाने थरथर कांपत दरोडेखोरांच्या नायकाला, नागमल्लाला म्हटले, "नागमल्ल, या वेळीं मात्र महाराजांच्याबरोबर आपले मरण निश्चित आहे. आता आपण काय करायचं?"

नागमल्लने दुर्मुखराजाकडे प्रश्नार्थक नजरेने पाहिलं. दुर्मुख मनाशी गुणगुणत गुहेच्या दाराकडे बघत होता. ते पाहून नागमल्ल दुर्मुखला म्हणाला, "हे बघ, तुझ्या अंगरक्षकाच्या बोलण्यावरुन आता स्पष्ट कळतं कीं तू दुर्जयगुप्त नाहीस, आणि



राजा आहेस. तो अस्वल्या वधिक तुझं मस्तक न्यायला आला आहे. आता अशा वेळेला आपलं रक्षण करायचा विचार सोडून तू गुणगुणत काय उभा आहेस?"

"मी गुणगुणत नाही. पुढे कसे जायचे त्याच्यासाठी आमच्या कुलदैवताची प्रार्थना करतो आहे." दुर्मुख गदगदलेल्या आवाजांत म्हणाला.

"म्हणजे याचा अर्थ असा होतो कीं आजपर्यंत जे कांही तू केलंस ते तुझ्या कुलदैवताच्या संमतीनेच केलंस कीं काय? चल, बाहेर चालता हो!"

असं म्हणून नागमल्लने दुर्मुखला बाजूला ढकललं. अर्धवट उघडलेल्या गुहेच्या दाराजवळ जाऊन तारसप्तकांत ओरडत नागमल्ल म्हणाला, "अरे अस्वल्या वधिका, ऐक. खरं म्हणजे या गुहेंत लपलेल्या लोकांपैकी आपलं नांव दुर्जयगुप्त



आहे असं खोटंच सांगणारा राजा दुर्मुख तुला हवा आहे ना?''

''हो हो. इतर लोकांशी माझं कांहीही वांकडं नाही. त्याला गुहेबाहेर ढकलून द्या. त्याचं मस्तक छाटून मी फक्त तेवढंच घेऊन जाईन.'' अस्वल्या वधिकाने समजावलं.

हे शब्द ऐकून राजा दुर्मुखचा चेहरा पांढराफटक पडला. आपल्या बाजूला उभा असणाऱ्या अंगरक्षकाला उद्देशून तो म्हणाला, ''अरे अंगरक्षक, तुझ्या स्वामीभक्तीची चुणूक दाखवून स्वर्गप्राप्ती मिळवण्याची ही एक चांगली संधी तुला आहे. तू पुढे हो, आणि अस्वल्या वधिकाशी सामना कर. तोपर्यंत आपले प्राण वांचवून इथून कसं पळून जायचं याचा मी कांहीतरी उपाय शोधतो.''

इकडे अस्वल्या वधिकाने बाहेर संतापाने आपले दांत विचकत ओरडून विचारले, ''अरे, तो दुष्ट दुर्मुखराजा आहे तरी कुठे? जर मी आता गुहेत शिरलो तर तुमची सगळ्यांची डोकी उडवीन.''

नागमल्ल दरोडेखोराने आपल्या दोन्ही अनुयायांना डोळ्यांनी खूण केली. ते त्याच्या मागोमाग गुहेच्या तोंडाजवळ आले. नागमल्लने जो दगड जरा हलवून आपले डोके बाहेर काढले व म्हटले, ''महाराज, मला आणि माझ्या या दोन साथीदारांना जीवदान द्या. आम्ही तर या अरण्यांतल्या भयंकर श्वापदांमधे आपले प्राण तळहातावर घेऊन राहात असतो.''

''अरे, तुम्ही चोर आहात, हे मला ठाऊक आहे. तरीही मी तुम्हाला इजा करणार नाही. तुम्ही बाहेर या.'' अस्वल्या वधिकाने म्हटलं.

त्यानंतर नागमल्ल व त्याचे साथीदार हळूंच गुहेबाहेर आले. त्यांच्या आडोशाला लपलेला राजा दुर्मुख वेगाने बाहेर आला आणि पळण्याच्या तयारींत होता.

ते पाहून अस्वल्या वधिक रागाने पाय आपटीत ओरडूं लागला - ''अरे दुर्मुख, थांब, थांब!'' आणि त्याचा पाठलाग करूं लागला. दगडी गदा हातांत घेऊन उभा असलेल्या उग्रदंड राक्षसाला बघून राजा किंचाळला आणि त्याने राक्षसाच्या पायावर लोळण घेतली.

अस्वल्या वधिक खुषींत येऊन म्हणाला, ''अरे दुष्ट दुर्मुख! बरा सांपडलास माझ्या हातांत,'' आणि तो दुर्मुखजवळ पोंचताच उग्रदंडाने हात उचलून वधिकाला थांबवले आणि विचारले, ''अरे बाबा, वधिका, तू अगोदर मला सांग, तुझे गुरु अस्वल्या मांत्रिक यांनी तुला जिवंत राजाचे



मस्तक कापून आणायला सांगितले आहे कीं मृत राजाचे मस्तक त्यांना हवे आहे?''

हा प्रश्न ऐकून अस्वल्या वधिक आश्चर्याने गोंधळून गेला. खाली जमिनीवर निचेष्ट पडलेल्या दुर्मुखला निरखून पहात त्याने विचारले, ''उग्रदंड! तुला काय वाटतं कीं हा दुर्मुख मेला आहे कां?''

''हा मेलेला नाही, बेशुद्ध पडलेला आहे. आमच्या वाडवडिलांनी सांगितलं आहे कीं जो बेशुद्ध असतो, त्याचा शिरच्छेद करणें हे महान पाप आहे. तू एक काम कर. याला असाच गुरु मांत्रिकाकडे घेऊन जा आणि तिथेच त्याचं डोकं उडव. तिथें पोचेपर्यंत तो हळूंहळू शुद्धीवर येईलच.'' उग्रदंडने समजावले.

अस्वल्या वधिकाने एक दीर्घ श्वास घेतला नि म्हणाला, ''शी शी! तू काय सांगतो आहेस? मी आणि या माझ्या शत्रूला काय खांद्यावर उचलून घेऊन जाऊं?''

उग्रदंडाने एकवार गुहेकडे बघितले. तिथें नागमल्ल आणि त्याचे दोन अनुयायी उभे होते आणि पलायन कसे करावे त्याबद्दल कुजबुजत होते. उग्रदंडाने दगडी गदा हातांत उचलून त्यांना पुकारले, ''अरे, वाटेवरच्या वाटसरूंना लुटणाऱ्या अभागी दरोडेखोरांनो, तुम्ही कसं पळून जायचं त्याचा विचार करता आहात, होय ना? खबरदार, पळायचा प्रयत्न केलात तर! तुम्हाला मी पायाखाली तुडवीन. इकडे या असे! तुमचा तो अंगरक्षक कुठे आहे?''

हे शब्द ऐकून तिघेही दरोडेखोर थरथर कांपायला लागले. नागमल्लने गुहेत डोकावून पाहिले, आणि म्हटले, ''महाराज, दुर्मुखराजाचा



अंगरक्षकदेखील बेशुद्ध पडलेला आहे. तो गुहेत जाऊन तिथें पडला आहे.''

''तो बेशुद्ध पडल्याचं नाटक करतोय. त्याला सांगा कीं उग्रदंडाने त्याला अभय दिलं आहे.'' उग्रदंडाने आज्ञा दिली.

ती ऐकून नागमल्ल जोराने ओरडायला लागला, ''अरे अंगरक्षका, उठ, शुद्धीवर ये. महाराक्षस उग्रदंडाने तुझे प्राण वांचवले असून तुला अभय दिले आहे.''

हे शब्द ऐकल्याबरोबर अंगरक्षक झटकन उठून बसला. आणि गुडघ्यांवर रांगत रांगत तो गुहेच्या बाहेर आला आणि कांपऱ्या स्वरांत विचारले, ''दुर्मुख महाराजांचा शिरच्छेद झाला कां? अस्वल्या वधिक इथून गेला वाटतं?''

दुसऱ्याच क्षणीं नागमल्लच्या अनुचरांनी त्याच्या दिशेने झेपावून अंगरक्षकाची मानगूट पकडली आणि त्याची कंबर पकडून गुहेच्या

बाहेर त्याला ओढले व बाहेर ढकलले आणि त्याला म्हटले, "तुझी बडबड बंद कर!! तो बघ तुझा राजा! बेशुद्ध होऊन उग्रदंडाच्या पायाशी पडलाय बघ!"

अंगरक्षक आपादमस्तक भीतीने थरथर कांपू लागला. उग्रदंडासमोर जाऊन तो म्हणाला, "महाराक्षस! या क्षणापासून मी आपला अंगरक्षक आहे. या अस्वल्या वधिकापासून आपण मला वांचवा."

उग्रदंडाने विकट हास्य करीत म्हटले, "आता माझ्या प्राणाचे रक्षण करण्यासाठी एक अंगरक्षक उपटलाय होय! वा रे वा! एका महाराक्षसाची काय ही अधोगती!" आणि नंतर त्याने शांतपणे म्हटले, "अरे रक्षक, समोरच्या गुहेंत तू जा आणि एखादे दगडी भांडे असेल ते घेऊन ये. त्या झाडांच्या मागच्या बाजूला एक तळे आहे, त्यांतले पाणी घेऊन ये. तोपर्यंत दुर्मुखला शुद्धीवर आणण्याचा आम्ही कांहीतरी प्रयत्न करूं!"

अंगरक्षकाने नवलाने विचारले, "ओहो, पण आमचे महाराज शुद्धीवर आले कीं अस्वल्या वधिक त्यांचा शिरच्छेद करील कीं!" हे ऐकून वधिक चिडला व डोळे वटारुन, आपला परशू उचलून त्याने अंगरक्षकाला विचारलं, "अरे मूर्खा! महाराक्षस उग्रदंडाने तुला काय आदेश दिला आहे?"

अंगरक्षक लगेच राक्षसाच्या गुहेंत धावत गेला. तिथले एक दगडी भांडे त्याने उचलले, व तळ्याच्या कांठावर जाऊन तो पाणी भरीत होता, तेवढ्यांत तिथें असलेला तुटक्या सोंडेचा तो हत्ती चित्कारला आणि अंगरक्षकाच्या दिशेने पुढे जाऊं लागला.

घाबरुन अंगरक्षकाने ते पाण्याचे भांडे तसेच तिथें ठेवले आणि किंचाळत, ओरडत तो उग्रदंडाजवळ पळतच आला आणि म्हणाला, "महाराज! अस्वल्या वधिकाचा तो तुटक्या सोंडेचा हत्ती माझा पाठलाग करीत इकडेच येतो आहे. मला वांचवा!"

"अरेच्चा! म्हणजे माझे वाहन या प्रदेशांतच आहे वाटतं!" असं बोलत वधिकाने त्या दिशेला वळून पाहिले, तर आपली सोंड वर उंचावून भयानक भुतासारखा वाटणारा तो हत्ती त्यांच्यावर चाल करून येत होता. (क्रमशः)







वेताळ कथा

# स्वार्थांत परोपकार

निश्चयाचा पक्का असलेला विक्रमादित्य परत झाडाजवळ गेला. झाडावरील प्रेत उतरवून खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाकडे चालू लागला. तेव्हां प्रेतांतील वेताळ म्हणाला, "राजा, या भयानक वातावरणांत कसलीही पर्वा न करता तू प्रयास करीत आहेस. तू कधी विचार केलास कीं तुझे सर्व प्रयत्न वांया कां जात आहेत? मी तुझ्या हट्टाची स्तुतीच करतो, पण त्याचबरोबर तुझ्या मूर्खपणाची मला दयाही येते. मला शंका येते की ध्यान देऊन तू हे काम करतोस ते आपल्या स्वार्थासाठी, की परोपकाराच्या उद्देशाने? स्वार्थ आणि परोपकार ह्यांतील अंतर जाणणे फार कठीण काम आहे. माझे म्हणणे समजण्यासाठी



उदाहरणाकरिता मी तुला पुरुषोत्तमाची गोष्ट सांगतो.'' असे म्हणून वेताळाने गोष्ट सांगायला सुरवात केली.

कोंडापूर नांवाच्या एका मोठ्या शहरात पुरुषोत्तम नांवाचा एक गृहस्थ रहात होता. त्याला दोन मुले होती. मोठ्या मुलाचे नांव शेखर होते. तो आपल्या वडिलांप्रमाणेच दुसऱ्यावर उपकार करणारा होता. त्यामुळे गांवात त्याचे खूप नांव होते. दुसऱ्याला मदत करण्यासाठी तो सदैव पुढेच असायचा. पुरुषोत्तमचा दुसरा मुलगा कमल स्वार्थी होता. तो नेहमी फक्त स्वतःचाच विचार करीत असे. मदत करायला तो कधी तयार नसे. पुरुषोत्तमने त्याला चांगला बनविण्यासाठी खूप प्रयत्न केले. परंतु कांहीही उपयोग झाला नाही. मरणापूर्वी त्यांनी कमलला जवळ बोलावले, व म्हटले, ''या गांवात चांगले लोक राहातात. तू इथे राहूं नकोस. तुला जर सुखी जीवन जगायचे असेल तर माझा सल्ला आहे की जवळच जंगलात एक पर्वत आहे. त्या पर्वतावर चढून जा. तिथे एक पाताळगुंफा आहे. त्या गुंफेत अनंत नांवाचा साधू राहतो. तू त्याला जाऊन भेट. तुझे कल्याण होईल'' हे सांगितल्यानंतर तो मरण पावला.

कमलने विचार केला की आपल्या मोठ्या भावाला, शेखराला संपूर्ण संपत्ती मिळावी म्हणून वडिलांनी आपल्याला असे सांगितले असावे. पित्याचे निधन होईपर्यंत त्याला हे माहीत नव्हते, कीं चांगुलपणा हीच त्यांची संपत्ती आहे.

शेखर कमलला म्हणाला, ''माझ्याबरोबर रहा. मी तुझी सर्व काळजी घेईन.''

कमलला आता तर कोणतीच काळजी नव्हती. कारण भावाने त्याच्या पालन-पोषणाची जबाबदारी घेतली होती. थोड्याच दिवसांत गांवातील लोक शेखरची स्तुती करु लागले, व म्हणूं लागले, ''भाऊ असावा तर असा. आपल्या धाकट्या भावाची तो किती काळजी घेतो.'' हे ऐकून कमलला राग आला. तो रागानेच भावाला म्हणाला, ''तुझ्या सांगण्यावरुन मी येथे राहिलो, परंतु त्यामुळे सगळे लोक मलाच अपराधी समजतात. माझा अपमान करतात.'' शेखर हंसत म्हणाला, ''तू कोणाला मदत करीत नाहीस. तुझी स्तुती लोकांनी करावी असे तुला वाटत असेल तर तू पण लोकांवर उपकार कर. चांगल्या मार्गाचा अवलंब कर.''



''दुसऱ्यांना मदत करुन पिताजींनी आणि तू काय साधले? ज्या चांगुलपणामुळे एकही पैसा मिळत नाही, तो चांगुलपणा कोणत्या कामाचा? आयुष्यांत खूप मोठे होण्याची माझी इच्छा आहे. त्यासाठी कांही उपाय तुला सुचत असेल तर मला सांग.'' कमल म्हणाला.

''संपत्ती जमविण्यासाठी व्यापार-धंदा चांगला करता आला पाहिजे. वेगवेगळ्या कला आल्या पाहिजेत आणि शेतीची माहिती पाहिजे. तेव्हां पैसा मिळविण्यासाठी काय करावे ह्याचा विचार तूच कर.'' शेखरने सल्ला दिला.

कमलाला खूप पैसा हवा होता, परंतु पैसे मिळविण्याचे मार्ग त्याला महित नव्हते. म्हणून वडिलांच्या सांगण्या प्रमाणे जंगलातील पर्वतावरील गुंफेत जाऊन तो अनंत-साधूला भेटला.

अनंताला खूप मोठी दाढी होती आणि भरदार मिश्या होत्या. चेहरा तेजस्वी होता. कमलने मोठ्या मुश्किलीने त्याला नमस्कार केला. ''स्वामी, मला माझ्या वडिलांनी तुम्हाला भेटायला सांगितले होते. आपले नांव अनंत आहे ना?'' कमल त्यांना म्हणाला.

अनंतने त्याचे सर्व बोलणे ऐकून घेतले. तो म्हणाला ''हो, मीच अनंत आहे. लवकरात लवकर श्रीमंत होण्यासाठी मी तुला मदत करुं शकतो. त्या करिता तुला कांही कठीण गोष्टींना तोंड द्यावे लागेल.''



नंतर अनंतने आपल्याबद्दल त्याला सर्व माहिती दिली. अनंत आणि कमलचे वडील पुरुषोत्तम एकाच गांवात जन्मले आणि वाढले होते. दुसऱ्याला मदत करणे हेच पुरुषोत्तमाचे एकमात्र काम होते. स्वार्थाचा वारा त्याला लागला नव्हता. परंतु स्वार्थ मात्र अनंतात भरपूर भरलेला होता.

एकदां दोघेजण जवळच्या गांवाकडे जात होते. वाटेत त्यांनी एका साधुला पाहिले. तो रस्त्याच्या कडेला पडला होता. त्याच्या पायाला जखम झाली होती. पुरुषोत्तम त्याला मदत करणार होता पण अनंतने नको म्हटले. पुरुषोत्तमने त्यांच्याकडे लक्ष न देता झाडाची कांही पाने तोडून आणली आणि त्याचा रस काढून जखमेवर घातला.

थोड्याच वेळांत साधु उठून बसला. पुरुषोत्त-



माच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, ''मुला, माझ्याजवळ एक अतिशय प्रभावी ताईत आहे. ज्याच्याजवळ तो असतो, त्याला जे पाहिजे ते मिळते. निराशा त्याच्या पदरी कधीच येत नाही. मी साधु आहे. मला त्या ताईताचा कांही उपयोग नाही. योग्य व्यक्तीच्या स्वाधीन करावा अशी माझी इच्छा आहे. म्हणूनच मी येथे पडण्याचे नाटक केले. हा ताईत घे आणि आयुष्य सुखी कर.'' असे म्हणून साधुने तो ताईत पुरुषोत्तमला दिला.

पुरुषोत्तम हात जोडून म्हणाला, ''स्वामी, मी साधू नाही. परंतु या ताईताचा मला काय उपयोग आहे? जास्त पैसा मिळाला की दुःख येते असे मला वाटते. म्हणून तुम्ही हे दुसऱ्या कोणाला तरी द्या.''

साधुने नकारार्थी मान हालविली आणि म्हणाले, ''ह्या क्षणापासून हा ताईत तुझा झाला. योग्य व्यक्ती पाहून तूच त्याला दे. मात्र अयोग्य व्यक्तीला दिल्यास अनर्थ होईल.''

शेजारी उभा असलेल्या अनंतला वाटत होते की ताईत आपल्याला मिळावा. तो म्हणाला, ''स्वामी अनर्थ होईल म्हणजे काय होईल? अयोग्य कोणाला म्हणायचे?''

साधु हंसून म्हणाला, ''कांही गोष्टी अश्या असतात की त्या समजण्यासाठी अनुभव यावा लागतो. मी एकदा सांगितले आहे ना की अयोग्य व्यक्तीच्या हाती ताईत गेला तर अनर्थ होईल. म्हणून दीर्घकाल ताईत आपल्याजवळ ठेवू नये.''

साधुचे बोलणे ऐकून पुरुषोत्तम अनंतला म्हणाला, ''मला वाटते हा ताईत तुला हवा आहे. मी आनंदाने देण्यास तयार आहे. कारण माझ्या मते तू अयोग्य व्यक्ती नाहीस.'' त्याने ताईत अनंतला दिला.

ताईत मिळाल्यानंतर अनंतला जे मागेल ते मिळत गेले. त्याचे प्रत्येक काम यशस्वी होत गेले. परंतु त्याला मिळणारा आनंद तो दुसऱ्याला वाटण्यास कधी तयार झाला नाही. म्हणून लोक त्याला स्वार्थी म्हणू लागले. एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर तो ताईत कोणाला तरी त्याने देऊन टाकला. परत वर्षानंतर तो त्याच्याकडे परत आला. असे चार वेळा झाल्यानंतर तो खरोखर विरक्त झाला आणि संन्यास घेऊन तो पाताळ गुंफेमध्ये येऊन राहिला.



आपला मित्र अनंताची ही परिस्थिती पाहून पुरुषोत्तमला दुःख झाले. त्याला वाटूं लागले की त्याच्या दुर्दैवाचे कारण आपण आहोत. एकदा तो पाताळ गुंफेत जाऊन त्याला भेटला आणि म्हणाले, ''ताईतामुळे तुझी अशी अवस्था होईल ह्याची कल्पना मला नव्हती. जोपर्यंत तुला मोक्ष मिळणार नाही. तोपर्यंत मलाही मोक्ष मिळणार नाही. म्हणून या ताईतापासून तुझी सुटका करण्याचा मी प्रयत्न करीन.'' त्याने वायदा केला, पण तो मरण पावल्यामुळे पुरा होऊ शकला नाही.

अनंतने त्या ताईताबद्दलची सर्व हकिकत कमलला सांगितली. म्हणाला, ''मुला, तुझ्या वडिलांना जोपर्यंत मुक्ती मिळत नाही. तोपर्यंत मलाही मुक्ती मिळणार नाही. याचाच अर्थ असा की त्यांचा आत्मा अजून भटकतो आहे. स्वतःच्या आणि माझ्या मुक्तीसाठी त्याने तुला येथे पाठविले, परंतु ताईताचे रहस्य तुझ्यापासून लपविले. माझ्या स्वार्थासाठी हा ताईत मी तुला देऊं शकत नाही, म्हणून हे रहस्य मी तुला सांगितले. कोणीही हा ताईत एका वर्षापेक्षा जास्त आपल्याजवळ ठेवूं शकत नाही. तू संकटात पडशील आणि मग परत येऊन मला ताईत देऊन जाशील.''

कमलने विनयपूर्वक सांगितले, ''माझे वडील परोपकारी होते. त्यांना मी मोठा स्वार्थी आहे हे माहित होते. त्यांना माझ्या स्वार्थीपणात परोपकार असावा असे वाटत होते. हाच त्यांचा



मोठेपणा आहे. माझ्या वडिलांच्या आत्म्याला आणि तुम्हाला मुक्ती मिळाली, तर माझ्या स्वार्थाचा उपयोग होईल व मला आनंद मिळेल. तो ताईत तुम्ही मला द्या. मी तुम्हाला वचन देतो की हा ताईत मी माझ्याजवळ ठेवीन.''

अनंतने आशीर्वादपूर्वक तो ताईत कमलला दिला. ताईत मिळाल्यावर कमलने जे काम हातांत घेतले, त्यांत त्याला यश मिळत गेले. पण कमलच्या वागण्यांत फरक पडला. जो पैसा ताईतामुळे त्याला मिळत गेला, त्या पैशाचा सदुपयोग म्हणून तो दुःखी कष्टी लोकांना मदत करुं लागला.

एक वर्ष पूर्ण झाले. त्या एका वर्षात कमलने खूप संपत्ती मिळविली. ते संक्रांतीचे दिवस होते. सकाळीच अनंत गुंफेच्या बाहेर पडून सरळ

कमलकडे गेला.'' कमल, तो ताईत परत मला दे.'' त्याने कमलला ताईत मागितला.

गळ्यांत लटकत असणारा तो ताईत कमलने अनंतच्या हातावर ठेवला. अनंतने तो उलट-सुलट करुन पाहिला. आणि कमलला म्हणाला, ''एक महत्त्वाची गोष्ट मी तुला सांगायला आलो आहे. तुझ्यामुळे तुझ्या वडिलांना मुक्ती मिळाली. मलाही मिळेल. आता तुला ह्या ताईताची कांही जरुरी नाही. दुर्दैवाने परत तो कोणाच्या हातांत पडला तर परत त्याच गोष्टींची सुरवात होईल'' असे म्हणून अनंतने तो ताईत आगीत टाकून दिला आणि तो तेथून निघून गेला.

वेताळाने गोष्ट पुरी केली व राजा विक्रमादित्यला तो म्हणाला, ''राजा, कमलने स्वार्थाबरोबर परोपकाराचा मार्ग स्वीकारला. आता सांग, स्वार्थ प्रशंसा करण्यायोग्य आहे कां? अनंतच्या आशीर्वादाने ताईतामधील दुष्ट प्रभाव नष्ट झाला ना? त्या स्थितीत अनंतने पहिल्यादां कोणाला आशीर्वाद दिला होता की नाही? माझ्या या प्रश्नांची उत्तरे तुला माहित असूनही तू सांगितली नाहीस तर तुझ्या डोक्याचे तुकडे तुकडे होऊन पडतील.''

विक्रमादित्याने सांगितले, ''स्वार्थ प्रशंसा करण्याजोगा नाही, परंतु स्वतःच्या फायद्यासाठी जर स्वार्थ असेल, आणि त्यामुळे जर कोणाचे नुकसान होत नसेल, तर स्वार्थ चुकीचा नाही. कमल स्वार्थी होता पण वाईट नव्हता. जे काम तो करीत असे, त्याच्या फळाची आशा तो करीत असे. आतां राहिली ताईताची गोष्ट. अनंतच्या आशीर्वादाने ताईतच्या दुष्ट प्रभाव नाहीसा झाला नाही. कमलच्या वडिलांच्या चांगुलपणाने कमलमध्ये चांगला बदल झाला. त्यामुळेच ताईतातील दुष्ट प्रभाव नाहीसा झाला. ताईतामुळे त्यांनी संपत्ती मिळविली, आपले आयुष्य सुखी केले आणि दुःखीकष्टी लोकांना मदत केली. चांगले नाव मिळविले. कमल ताईत मिळण्यासाठी योग्य व्यक्ती झाला होता.''

राजाच्या मौन-भंगामुळे वेताळ प्रेतासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(आधार : कमलेश यांची रचना)*








## कबुतरांची डाक



**आ**पण संदेश कसे धाडतो? सहजच प्रत्येकजण टपाल, फोन, फॅक्स, ई-मेल, तारा, व्हॉईस-मेल व इतर अत्याधुनिक नवी यंत्रें, यांचा विचार करतो. पूर्वी कबुतरांना संदेश पाठवण्यासाठी खास प्रशिक्षण देऊन तयार केले जात होते, हे आपल्याला माहिती आहेच. ही पद्धत आता मोडींत निघाली आहे, असं तुम्हाला वाटतं कां? छे, तसं मुळीच नाही. ओरिसामधल्या कटक या शहरांत पोलिस खात्याकडे एक हजार पाळीव कबुतरे आहेत. इतर पोलिस स्टेशनांकडे संदेश धाडण्यासाठी त्यांचा उपयोग करण्यांत येतो. डोंगराळ प्रदेशांत ही पद्धत उपयोगी ठरते. कबुतरांच्या पायाला एक छोटीशी कुपी बांधलेली असते. त्यांत संदेशाचा मजकूर असतो. ही कबुतरे संदेश घेऊन जातात व त्याचे उत्तर त्याच दिवशी परत घेऊन येतात!

## एक वेगळेच शिवमंदिर



बहुतेक सर्व शिवमंदिरांतून शिवाची मूर्ती नसून शिवलिंगाची पूजा केली जाते. हिमालयांतल्या अमरनाथ मंदिरातले बर्फाचे नैसर्गिक शिवलिंग प्रसिद्ध आहे. जेव्हां वर्षातल्या ठराविक महिन्यांत असंख्य यात्रेकरू तिथे येतात, तेव्हां गुहेंतले लिंग उन्हाळ्यांत हळूहळू वितळायला लागते. जिथे पूजेसाठी लिंग नाही, व नटराजाच्या नृत्यमुद्रेतल्या शिवाची पूजा केली जाते, ते मंदिर म्हणजे चिदंबरमचे शिवमंदिर. भरतमुनींच्या नाट्यशास्त्रांत वर्णन केलेल्या नृत्याच्या १०८ मुद्रा या मंदिरात कोरलेल्या आहेत.





# प्रवासी

राजेंद्रपुरी या गांवाच्या सीमेवर एक पडकी धर्मशाळा होती. सतत पडणाऱ्या पावसापासून वाचण्यासाठी चार प्रवासी एकामागून एक असे त्या धर्मशाळेत आले. त्यापैकी दोघे तरुण होते, तिसरा म्हातारा साधू होता, त्याची पांढरी दाढी होती. एक तरुण होता, परंतु त्याच्याकडे पाहिल्यावर असे वाटत होते की तो अगदी उनाड तरुण आहे.

ते दोन तरुण झोप येत नसल्यामुळे आपसांत गप्पा मारीत बसले होते. तो म्हातारा साधू पडणाऱ्या पावसाकडे पाहात कांहीतरी गुणगुणत होता. तो उनाड तरुण भिंतीला टेकून बसला होता आणि मधून मधून डुलक्या घेत होता.

त्या दोन तरुणापैकी एकाने दुसऱ्याला विचारुन त्यांची त्यांची नांवे जाणून घेतली. त्यापैकी एकाचे नांव सुनंद होते आणि दुसऱ्याचे नाव आनंद होते.

"तू कोणत्या गांवी राहातोस आणि कोणत्या कामासाठी तू जातो आहेस?" सुनंद विचारु लागला.

आनंदने उत्तर दिले, "मला गांवात नोकरी मिळाली नाही. ज्यांचे नातेवाईक मोठ्या पदावर आहेत, त्यांनाच त्या गांवात नोकरी मिळते. साध्या, छोट्या नोकरीसाठी पण खूप पैसे द्यावे लागतात. माझ्या जवळ तर एक नवा पैसा पण नाही. मला समजले की राजेंद्रपुरी शहरात योग्यतेनुसार नोकऱ्या मिळतात, म्हणून इतक्या लांब आलो. संस्कृत, गणित, व शास्त्र ह्या विषयांत मी प्रवीण आहे. कोणत्या तरी चांगल्या शाळेत नोकरी मिळेल ह्या आशेने आलो आहे. पण तू तुझ्याबद्दल कांहीच सांगितले नाहीस?"

त्याच्या बोलण्यावर आनंद थोडे हंसला आणि म्हणाला, "बरोबर, कोणीतरी म्हटले आहे ना! "दुरुन डोंगर साजरे." आपल्या दोघांची स्थिती सारखीच आहे. मी राजेंद्रपुरीचा राहणारा आहे. ज्या तऱ्हेची परिस्थिती तुमच्या राज्यांत



आहे तशीच परिस्थिति इथे आहे. मी तलवार चालविण्यांत आणि घोड्यावर बसण्यांत पटाईत आहे. पण मला शिपायाची नोकरी मिळत नाही. मी लांच देऊं शकत नाही म्हणून नोकरी मिळत नाही. तुमच्या राज्याची स्तुती ऐकली, ऐकले की तुमच्या राज्यांत पात्रता असणाऱ्यांना सहज नोकरी मिळते. म्हणून तिकडे चाललो होतो. आपल्या दोघांच्या हकिकतीवरुन असे वाटते की कोणीतरी खोटे सांगून आपल्याला फसवत तर नाही ना?''

''आपल्या दोन्ही राज्यांबद्दल असा खोटा प्रचार कोण करतो आहे, तेच कळत नाही.'' आनंद म्हणाला.

तो म्हातारा साधू त्या दोन तरुणांच्या गप्पा निमूटपणे ऐकत होता. तो मध्येच म्हणाला, ''मला माहित आहे. मी खूप राज्यांतून प्रवास करीत असतो. ज्या अनीती आणि अन्यायाबद्दल तुम्ही बोलत आहात, तो जवळजवळ सर्व राज्यांतून आहे. व्यवस्थित राज्यकारभार आणि प्रजेचे सुख हे केवळ राजाच्या हातांत नाही. त्या करिता राज्यांतील मंत्री, कोषाध्यक्ष, सेनाधिकारी आणि उच्च पदावर असणाऱ्या सर्व लोकांचे सहकार्य पाहिजे. राजा कितीही चांगला असला तरी कांहीही करुं शकत नाही. राजाला खूष ठेवण्यासाठी आणि आपला स्वार्थ साधण्यासाठी हे अधिकारी राज्यांत सुव्यवस्था आहे आणि लोक समाधानाने नांदत आहेत, असा प्रचार करतात. आणि शेजारच्या राज्याकडून होणारे आक्रमण थांबवू शकतात. त्या प्रचारामागे त्यांचा स्वार्थ आणि दुष्ट बुद्धी दिसून येते. तसा प्रचार करुन हे लोक राजाला निष्क्रिय बनवितात.'' साधूचे बोलणे ऐकून त्या तरुणाने ''ह्या परिस्थितींत कांही सुधारणा होऊं शकत नाही कां?'' असे विचारले.

''होऊं शकते. पूर्वीच्या काळीं राजे जनतेचे हित हेच आपले कर्तव्य मानीत होते. ते नेहमी वेष पालटून देशांत फिरत असत. त्यामुळे त्यांना राज्यांतील समस्याची ओळख होत असे. जनतेचे दुःख ते दूर करीत असत. परंतु आतां तसे होत नाही. म्हणून स्वार्थी अधिकाऱ्यांना आपले काम करणे सोपे जाते. त्याकाळीं राजे आपल्या कर्तव्याचे पालन करीत असत. आतां तुम्ही तरुणांनी एकत्र येऊन हे काम केले पाहिजे. सरकारला जाऊन भेटून राज्यांतील समस्या



त्यांच्यापुढे मांडल्या पाहिजेत. राजाचे लक्ष कर्तव्याकडे लावणे हे तुम्हा तरुण लोकांचे काम आहे. राजा चांगल्या स्वभावाचा असेल, त्याच्या मनांत जनतेबद्दल प्रेम असेल, तर जनतेच्या समस्या सोडवून परिस्थिती बदलू शकते.'' साधूने त्यांना उत्साह देत सांगितले.

भिंतीला टेकून बसलेला तो चौथा युवक त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होता. तो एकदम उठून त्या तिघांच्याकडे आला नि म्हणाला, ''तुमची तिघांची बोलणी मी ऐकली आहेत. या परिस्थितीत लवकरच बदल होईल. त्याच्यासाठी मी जरुर प्रयत्न करीन'' पुढे तो म्हणाला, ''सुनंद, राजेंद्रपुरीत तुला चांगली नोकरी मिळेल, अशी व्यवस्था मी करीन. त्याच बरोबर आनंदलाही त्याच्या योग्यतेप्रमाणे नोकरी देण्यासाठी प्रयास करीन. तिथला राजा माझा चांगला मित्र आहे.''

ते दोघे तरुण उपहासाने म्हणाले, ''पण आपण कोण आहात हे तर सांगितलेच नाही.''

तो तरुण हंसला आणि म्हणाला, ''मी राजेंद्रपुरी राज्याचा युवराज, रवितेज वर्मा आहे. लवकरच मला राज्याभिषेक होणार आहे. सिंहासनावर बसण्याआधी देशाची स्थिती पहाण्यासाठी मी बहुरुपी बनून सगळीकडे फिरतो आहे.'' असे म्हणून त्याने आपली पगडी काढली, खोट्या लावलेल्या दाढी-मिश्या काढून टाकल्या.

ते दोघे तरुण आश्चर्यचकित होऊन बघत राहिले. नंतर हात जोडून त्यांनी युवराजाला नमस्कार केला. युवराजाने साधूला नमस्कार केला, व तो म्हणाला, ''राज्यांतील अनीती थांबविण्या-साठी फक्त राजा एकटाच कांही करु शकत नाही. राज्यातील अधिकारी नीतीने चालणारे पाहिजेत. जनतेची स्थिती समजण्यासाठी राजाने नेहमी प्रयत्नशील राहिले पाहिजे. तुम्ही हा जो सल्ला दिलात तो अगदी उत्तम आहे. त्याकरिता मी तुमचा आभारी आहे. राजधानीत होणाऱ्या राज्याभिषेक समारंभाला आपण अवश्य यावे आणि आशीर्वाद द्यावा. माझी आपल्याला ही सविनय विनंती आहे.

साधुने हंसून हो या अर्थी मान हालवली आणि त्याला आशीर्वाद दिला.





# लांचखाऊ

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर असतां बोधिसत्व त्याच्या पदरी क्रयाधिकारी म्हणून काम करीत होते.

क्रयाधिकाऱ्यावर राज्यासाठी लागणाऱ्या हत्ती, घोडे वगैरे प्राण्यांची, शस्त्रास्त्रांची व इतर वस्तूंची खरेदी करण्याची जबाबदारी असे. अर्थातच त्याने प्राणी व पदार्थांच्या गुणधर्माची पारख करून किंमत ठरवायची असे. या कामात लांचलुचपतीला खूप जागा असे. परंतु बोधिसत्व इमानेइतबारे सर्व प्राण्यांची व मालाची चांगली पारख करून योग्य त्या किंमतीला ती खरेदी करीत असत.

ब्रह्मदत्त राजा फार लोभी व संशयी स्वभावाचा होता. त्याच्या मनांत आपल्या क्रयाधिकाऱ्याविषयी संशय होता. योग्य किंमतीपेक्षा जास्त किंमत देऊन स्वतःसाठी त्यांतून कांही रक्कम उचलीत असावा. कांही दरबाऱ्यांच्या तोंडी त्याने बोधिसत्वांविरुद्ध तक्रार ऐकली होती, कीं हा जर या पदावर राहला तर थोड्याच दिवसांनी राज्याचं दिवाळं निघायचं.

ह्या विचारात असतां एकदां राजोद्यानाच्या बाजूने राजवाड्याची जी खिडकी होती ती राजाने उघडली. एक माळी उन्हातान्हांत झाडांना पाणी घालीत होता, तो राजाला दिसला. 'किती इमानदार माणूस आहे, नाही तर इतक्या उन्हांत घाम गाळून याने झाडांना पाणी लावले असते कां?' असे राजाला वाटले.

दुसऱ्या दिवशी राजाने त्या माळ्याला बोलावून त्याला बोधिसत्वांच्या जागी क्रयाधिकाऱ्याच्या पदावर नेमले. राजाला वाटले की हा नवा अधिकारी खरेदी करतांना प्रामाणिकपणाने स्वस्तांत खरेदी करून राज्याचे पैसे वांचवील. परंतु झाले उलटे, तो जातीनेच दरिद्री होता. हातांत आलेली संधी कां दवडावी, म्हणून तो जास्त किंमत देऊन खरेदी करूं लागला. माल विकणारे व्यापारी त्याच्या हातावर चार पैसे ठेवून मालाची किंमत वाढवून घेऊं लागले. माळ्याला मालाच्या गुणधर्माची माहिती नव्हती. म्हणून हलका माल जास्त किंमतीला खरेदी होऊं लागला. कधीकधी व्यापाऱ्यांचे नुकसान सुद्धां होई. कारण मालाची पारख नसल्यामुळे तो सांगेल ती रक्कम व्यापाऱ्यांना मान्य करावी लागे. त्यांचा माल विकत घेणारा राजाचा क्रयाधिकारी, म्हणून फायदा होवो अगर नुकसान, त्याच्याविरुद्ध 'ब्र' काढण्याची हिंमत नसल्यामुळे, तो जी किंमत सांगे, त्या किंमतीला माल देऊन व्यापारी निघून जात. कोणी त्यांच्यावर अन्याय होतो आहे, असे उघडपणे बोलायला तयारच नव्हता.

एके दिवशी परदेशांतून एक घोड्याचा व्यापारी उत्तम जातीचे पांचशे घोडे घेऊन काशीच्या राजाकडे आला. राजाने लगेच आपल्या दरबारी क्रयाधिकाऱ्याकडे निरोप पाठवून त्याला सांगितले, की घोड्यांची पारख करून घोडे चांगले असले तर घेऊन त्यांची किंमत देऊन टाकावी.

क्रयाधिकाऱ्याने पांचशे घोड्यांची पारख केली व किंमत एका पायली तांदुळाहून जास्त असणे शक्य नाही असे मनाशी ठरवून पांचशे घोड्यांना मिळून एक पायली तांदूळ द्यायला आज्ञा केली व घोड्यांना तबेल्यांत नेऊन बांधायला सांगितले.

घोड्यांच्या व्यापाऱ्याला तर धक्काच बसला. आपण किती मूर्खपणा केला? तरी इतर व्यापाऱ्यांप्रमाणे पुढे निघून जायच्या ऐवजी त्याने सरळ महाराजांपर्यंत वर्दी कशी पोचवायची याविषयी राज्याचे जुने क्रयाधिकारी बोधिसत्व यांना भेटून त्यांच्यावर जो अन्याय झाला होता तो सांगून त्यांचा सल्ला विचारला. बोधिसत्वांनी सर्व ऐकून घेतले व म्हणाले - ''हे पहा, मी सांगतो तसे करा. या नव्या क्रयाधिकाऱ्याला मनःशांती मिळावी यासाठी पहिल्याने याच्या हातावर कांही रक्कम ठेवा व नंतर त्याला विचारा - 'आपण आमच्या घोड्यांची किंमत एक पायली तांदूळ सांगितलीत ती ठीकच आहे. तर एक विनंती आहे, आपण या पायलीभर तांदुळांची किंमत किती हे महाराजांसमक्ष



दरबारांत सांगू शकाल का?' क्रयाधिकाऱ्याने ते मान्य केले तर त्याला राजाच्या दरबारांत घेऊन या. त्यावेळी मी तेथे असेन. तुमच्यावर अन्याय होऊ नये, यासाठी सर्व आवश्यक ते करीन.''

बोधिसत्वांनी सांगितले त्याप्रमाणे त्या घोड्यांच्या व्यापाऱ्याने क्रयाधिकाऱ्याच्या हातावर कांही पैसे ठेवले आणि बोधिसत्वांनी विचारायला सांगितले होते, तसे क्रयाधिकाऱ्याला विचारले.

क्रयाधिकारी तर खूषच झाला व म्हणाला - ''त्यात काय! एक पायली तांदुळाची किंमत सांगणं तेवढं कठीण कांहीच नाही. उद्यां महाराजांना दरबारांत जाऊन मी सांगतो आणि त्यांच्याकडून होकार घेववितो.''

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. खचाखच गर्दी होती. सर्व मंत्री व सर्व अधिकारी हजर होते. महाराजांची परवानगी मागून बोधिसत्वसुद्धा दरबारात आले होते. घोड्यांचा व्यापारी राजाला अभिवादन करून म्हणाला - ''महाराज! आपल्या

नव्या क्रयाधिकाऱ्यांनी माझ्या पांचशे घोड्यांची किंमत एक पायली तांदूळ म्हणून ठरवून दिली आहे; ती ठीकच आहे. परंतु मला यात एक शंका राहिली आहे या एक पायली तांदुळाची किंमत किती मानावयाची?''

तोपर्यंत राजाला घडलेली गोष्ट कांहीच माहीत नव्हती. म्हणून त्याला आश्चर्यच वाटले. त्याने नव्या क्रयाधिकाऱ्याला विचारले - ''पांचशे घोड्यांची किंमत तू काय ठरवून दिलीस?''

''प्रभो! एक पायली तांदूळ!'' क्रयाधिकारी म्हणाला.

''अस्सं! फार छान, पांचशे घोड्यांची किंमत एक पायली तांदूळ असेल तर पायलीभर तांदुळाची किंमत किती?'' राजाने विचारले.

क्रयाधिकारी मागेपुढे न पाहतां एकदम म्हणाला - ''पायलीभर तांदुळांची किंमत किती विचारतां, प्रभो? सर्व काशीराज्य आणि त्याची मांडलिक राज्ये मिळून जितकी किंमत होईल तितकी!''

ते विचित्र उत्तर ऐकून मंत्री व राज्याचे इतर अधिकारी प्रमुख नागरिक हंसत टाळ्या वाजवू लागले. हंसूनहंसून त्यांच्या पोटांत दुखू लागले.

त्यांच्यापैकी एका नागरिकाने उठून नव्या क्रयाधिकाऱ्याला विचारले - ''आजपर्यंत राज्याची किंमत किती हे ठरविणे अशक्य वाटत होते आम्हाला. परंतु आज कळले की सर्व काशीराज्याची किंमत तू सांगतो आहेस तशी पायली भर तांदूळ इतकीच आहे. तुझ्या बुद्धिमत्तेचं कौतुक करावं तेवढं थोडंच आहे!''

तेव्हां बोधिसत्व दरबारात उभे राहून म्हणाले - ''या क्रयाधिकाऱ्याने सांगितले ते खरे आहे! त्यांत आश्चर्य करण्यासारखे काय आहे? त्याला हंसण्यात व त्याची थट्टा करण्यात काय अर्थ आहे? त्याने पांचशे घोड्यांची किंमत एक पायली तांदूळ सांगितली आणि एक पायली तांदुळाची किंमत सर्व काशी राज्य व त्याची मांडलिक राज्ये एवढी त्याने सांगितली. त्याप्रमाणे पांचशे घोड्यांची किंमत काशी राज्य व मांडलिक राज्य एवढी झाली हे कळते. म्हणून क्रयाधिकाऱ्याने पांचशे घोड्यांची किंमत ठरविली ती न्याय्य आहे.''

बोधिसत्व म्हणाले ते ऐकून सर्व दरबारी थक्क झाले. चौकशी केल्यावर घडलेली गोष्ट कळली. तेव्हां काशी राजाला आपली चूक कळली व त्याने लांचखाऊ क्रयाधिकाऱ्याला कामावरून कमी करून पुन्हां बोधिसत्वांना त्या पदावर नेमले.







# विष्णु पुराण

हिरण्यकश्यपाने प्रल्हादाला मिठी मारून म्हटले - ''प्रल्हादा! तुझ्यामुळे मला माझा हाडवैरी विष्णू ह्याच्यावर सूड उगवायला संधी मिळत आहे!'' असे म्हणत हिरण्यकश्यपाने आपली गदा उचलली आणि नरसिंहावतार घेऊन आलेल्या विष्णूशी द्वंद्वाला पुढे सरसावला. शेवटी नरसिंहाने भयंकर गर्जना केली आणि हिरण्यकश्यपावर झडप मारून त्याला उचलले आणि सभामंडपाच्या दाराजवळ घेऊन गेला.

दाराच्या उंबरठ्यावर बसून नरसिंहाने हिरण्यकश्यपाला मांडीवर उताणे झोपविले, आणि आपल्या तीक्ष्ण नखांनी कश्यपाचे पोट फाडून त्याला ठार केले.

राक्षसवीर नरसिंहावर हल्ला करायला धावले. विष्णुचक्राने त्यांचा संहार केला.

नरसिंहाने आंतड्यांचा हार स्वतः च्या गळ्यांत घालून घेतला आणि उग्र अट्टाहास केला. ते उग्ररूप पाहून सर्व देव भयभीत झाले. त्यावेळी प्रल्हाद नरसिंहावतार रूपांतील विष्णूचे स्तवन करू लागला.

''आपल्या वडिलांची अंत्येष्टी वगैरे करून राज्यव्यवस्था पहा,'' असा प्रल्हादाला नरसिंहाने आशीर्वाद दिला. नरसिंहावतारातील विष्णू अंतर्धान पावला. जयविजय यांचा अशा तऱ्हेने पहिला जन्म संपला.

विष्णूच्या आज्ञेप्रमाणे प्रल्हादाने चिरकाल राज्य केले व आपला पुत्र विरोचन याला राज्याभिषेक करून विष्णूची भक्ती करण्यासाठी वानप्रस्थाश्रम ग्रहण केला. विरोचनानंतर त्याचा मुलगा बळी गादीवर आला. क्षीरसागराचं मंथन झालं, त्यावेळी उच्चैश्रवा नावांचा जो घोडा निघाला होता तो बळीने बळकावला होता.

**६. त्रिविक्रम वामनावतार**



राक्षसांचा शिल्पकार मयासुर याने त्याला भूमीवर, पाण्यावर आणि अंतरिक्षांत चालू शकणारं एक वाहन तयार करून दिलं.

अमृत त्यांना मिळूं नये यासाठी जी लबाडी झाली होती त्याचा प्रतिकार करण्याच्या हेतूने बलीने देवांशी युद्ध सुरू केले. अमृतप्राप्ती व्या सहाय्याने देवांनी राक्षसांना शौर्याने व साहसाने तोंड दिले. बलीचे इंद्राशी भयंकर युद्ध झाले. देव-दानवांची समोरासमोर व गनिमी काव्याने अनेक युद्धे झाली. या युद्धांत राक्षसांचा पूर्ण पराभव झाला. राक्षसांचे गुरु शुक्राचार्य यांनी संजीवनी विद्येचा प्रयोग करून राक्षसांना पुनर्जीवित केले.

पराभव झाल्याने बलीचे धैर्य खचले नाही. द्विगुणित उत्साहाने त्याने राक्षस सैन्यांची जुळवा-जुळव केली आणि सर्व भूमंडल जिंकले आणि त्याच्यावर उत्तम तऱ्हेने राज्य करू लागला आणि चक्रवर्ती या नामे प्रसिद्ध झाला. शुक्राचार्यांनी त्याच्या हस्ते शंभर अश्वमेध यज्ञ करविले.

बलीचा उत्साह वाढला व त्याने स्वर्गावर स्वारी केली. त्याच्या समोर टिकाव न लागल्याने इंद्रादि देव स्वर्ग सोडून अरण्यांच्या आश्रयाला गेले. दिक्पाल बली चक्रवर्तीसमोर नमले. बलीचक्रवर्तीचे राज्य स्वर्ग, मृत्यू व पाताळ लोकांत निरंकुश झाले. बली धर्म व न्यायाने राज्य करीत असतां इंद्राची आई अदिती, पती कश्यप महर्षी यांच्याकडे गेली व आपली अपत्ये जे देव व इंद्र वगैरे, शचीसह अरण्यांत पळून गेले असल्याचे सांगून त्यांना परत स्वर्गाचे राज्य प्राप्त होईल, असा कांही मार्ग सुचविण्यास सांगितले.

त्यासाठी कश्यपाने विष्णूचे स्मरण करून व्रते व अनुष्ठाने करण्यास सांगितले. अदितीने त्या प्रमाणे व्रते व अनुष्ठाने करून विष्णूला प्रसन्न केले. विष्णूने तिच्या पोटी जन्म घेऊन देवांवरचे हे संकट दूर करण्याचे वचन दिले.

त्याप्रमाणे विष्णूने कश्यप व अदितीच्या पोटी वामनरूपात, म्हणजे एका गिड्ड्याच्या रूपांत, जन्माला येऊन दशावतारांपैकी पांचवा वामनावतार धारण केला.

वामन उपनयन संस्कार झाल्यावर वेदांचे अध्ययन पूर्ण करून, व इंद्राचा धाकटा भाऊ म्हणून, अदिती मातेच्या घरी वाढूं लागला. त्यावेळी बली नर्मदातीरी सर्व यज्ञ यागात श्रेष्ठ असा विश्वजित् याग करण्यात गुंतला होता. बली मोठ मोठी दाने करीत होता.

वामन एका बटूच्या रूपे कृष्णाजिन, कमंडलू वगैरे धारण करून, एक छत्री घेऊन व खडावा



घालून ब्रह्म तेज चेहऱ्यावर झळकत आहे, अशा थाटाने बली चक्रवर्तीकडे आला. हळूंहळूं पावले टाकीत एका गोंडस बालकाला येत असलेला पाहून यज्ञमंडपातले सर्व लोक कुतूहलाने वामनाकडे पहात राहिले. बली चक्रवर्ती वामनाला आनंदाने सामोरा गेला.

वामनाला पाहून बली चक्रवर्तीला अत्यानंद झाला. त्याने वामनाला विचारले - "बाळा, कोण रे तू? तुला बटुरूपात आम्ही पहिल्यानेच पाहातो आहे. कोठे जाण्याचा विचार आहे?"

वामन म्हणाला - "मी तुझ्याचकडे आलो आहे, राजा! मी कोणाचं नांव सांगू, सर्वच माझे आहेत! परंतु मी तूर्त एकटाच आहे. एक भिक्षुक आहे! तुझे आजोबा पण शूरवीर होऊन गेले. आपल्या पराक्रमाने तू आपली कीर्ती, त्रिलोकांत स्थापन केली आहेस!" ते ऐकून बळी थट्टा करीत म्हणाला - "तुझं बोलणं मोठे विचित्र दिसतं आहे! तू माझ्या पराक्रमाच्या गोष्टी बोलत आहेस. माझ्याशी द्वंद्वयुद्धाला तर आला नाहीस ना? मी यावेळी यज्ञ दीक्षा घेतली आहे, म्हणून मला युद्धाचा उत्साहही नाही!"

"हे बली चक्रवर्ती, हे तू काय म्हणतोस? तू माझ्याशी थट्टा करीत असं बोलतो आहेस! परंतु तुझ्या थोर पराक्रमाच्या गोष्टी दिगन्तात पसरल्या आहेत. तुझ्याशी बरोबरी मी काय करणार? तू जे दान करून एवढी कीर्ती संपादन केली आहेस, ती ऐकून मी तुझ्याकडे एक याचक होऊन आलो आहे!"

"अस्सं होय! मग तू काय वाटेल ते माग, मी द्यायला सिद्ध आहे!" बली म्हणाला. तेव्हां



शुक्राचार्यांनी बलीला बाजूला बोलावून सावध केले - "तो वामन बटू नसून, स्वतः विष्णूच ते रूप घेऊन आला आहे! तुला फसवून तुझे सर्वस्व हरण करण्यासाठी आला आहे! त्याला कसलेही दान करण्याचा विचार सोड!"

बली म्हणाला - "विष्णू सारखा पराक्रमी माझ्याकडे भिक्षुक होऊन आला आहे; हे माझे केवढे भाग्य! एवढेच नव्हे तर माझा मोठा विजयच नाही का? मी दान करण्याचं वचन दिलं आहे, आतां नकार देऊन असत्य भाषण करूं का?"

"आत्मरक्षणासाठी हे सत्य व हे असत्य असे मनात धरून बसतां कामा नये! अशा धर्माचं पालन करणं म्हणजे आत्महत्येसमान आहे!"

"त्याने माझे काही केले, कांहीही झाले तरी तो माझा पराभव होऊं शकत नाही, मी दानवीर, धर्मवीर म्हणूनच म्हणविला जाईन! शिबीचक्रवर्ती



सारखी दानशूर म्हणवून घेण्याची महत्वाकांक्षाही माझ्या मनांत नाही. मी देतो असे सांगून भीतीने आतां देत नाही असे सांगून भित्रा म्हणवून घेऊं कां?'' बली म्हणाला.

ते ऐकून शुक्राचार्यांना भयंकर राग आला. ते म्हणाले - ''मी तुझा गुरु म्हणून तुझ्या हिताचे ते सांगितले व ते न ऐकतां तू माझा सदुपदेश धिक्कारून हट्टाला पेटला आहेस. तर तू आपलं राज्य व सर्वस्व घालवून बसशील, असा मी तुला शाप देतो.'' बली म्हणाला - ''गुरुदेव! मला शाप दिलात, तो व्यर्थच झाला. कारण मी सर्व गोष्टींना तयार होऊनच दान करायला सिद्ध झालो आहे ना! गुरूच्या उपदेशाचा धिःकार करून मी जो शाप मिळविला, तो विष्णूनेच देवविला, ही गोष्ट त्या विष्णूला माहीत झाली आहे. आता त्याने मला अन्यायाने फसविले असे होणार नाही. तुमच्या शापाचा परिणाम शेवटी माझ्या हिताचाच ठरेल. म्हणून मी हा शाप आनंदाने स्वीकारतो.''

ते ऐकून शुक्राचार्य निरुत्तरच झाले, बली वामनाकडे जाऊं लागला तेव्हां शुक्राचार्य म्हणाले - ''हे दानवनाथ! विष्णू भिक्षा मागायला येऊन तुला भिकारी किंवा आणखी काय करील, माहीत नाही. तुझं हे त्रिलोकाधिपत्य, सर्व वैभव व संपदा ही इतके कष्ट करून कशाला संपादन केलीस? देह असेल तर ना हे सर्व उपयोगी रहाते!''

बली म्हणाला - ''राज्य, संपत्ति व वैभव ही शाश्वत नाहीत; ही जशी आली तशीच जाणार नाहीत का? हे शरीर देखील शाश्वत नसतंच!''

शुक्र म्हणाला - ''तुझा हा नाश तुझ्या एकट्याचाच नाही, दानवकुलाचा आहे, हे तुला कळायला हवं!''

''एवढेच नव्हे, एका दानवकुलोत्पन्नाने धर्माचे पालन केले आणि विष्णूला भिक्षा घातली. अशी दानवकुलाची कीर्ती सुद्धा होईल नाही का?'' असे म्हणत बली वामनाजवळ गेला.

दानवराज्ञी विंध्यावलीने स्वर्णकलशाने पाणी ओतले व सोन्याच्या ताम्हनात वामनाचे पाय धुतलेले पाणी आपल्या मस्तकावर सिंचन करून बली वामनाला म्हणाला - ''हे वामनरूपा! तुझ्यासारख्याने माझ्याकडे दान भिक्षा मागायला यावे, हे माझं सुकृतच म्हटलं पाहिजे! तुला जे पाहिजे असेल ते माग! राज्य, संपदा, राजवाडा, मणी, सुंदर स्त्रिया, उपजाऊ जमीन, सर्व साम्राज्य; किंबहुना माझा हा देह सुद्धां तुझाच आहे!''

वामन म्हणाला - ''हे महाबली, जरा थांब!



तू हे सर्व जे म्हणालास त्याची मला काय गरज? कृष्णाजिन धारण करणाऱ्या माझ्यासारख्या ब्रह्मचाऱ्याला फक्त तीन पावलाएवढी जागा मला पुरे! तीन पावलाएवढी जमीन! दिगन्तापर्यंत पसरलेल्या साम्राज्यांतला अगदी लहानसा तुकडा सुद्धां मला त्रिलोक मिळाल्यासारखाच आहे!''

''ठीक, तर ती तीन पावलंभर जागा घे!'' असे म्हणत बली जलकलशाने अर्घ्य देऊ लागला, तेव्हां तोटीतून पाणीच आले नाही. कारण शुक्र सूक्ष्म रूप धारण करून तोटीच्या तोंडाजवळ येऊन बसले व त्यांनी पाणी पडूं दिले नाही.

वामनाने दर्भाची कांडी घेऊन तोटीत कांही अडकले असल्यास ते काढण्यासाठी कोरून पाहिले. त्यामुळें शुक्राचार्यांचा एक डोळा फुटला व ते एकाक्ष झाले. अडथळा बाजूला होताच बलीच्या हाताने वामनाच्या ओंजळीत पाणी पडले. दानविधी पूर्ण होताच बली म्हणाला - ''आतां तू आपल्या पावलांनी मोजून जागा घे!''

वामनाचा देह एकाएकी वाढला आणि त्याला विराट रूप आले. लांबी रुंदी एवढी वाढली की सर्व पृथ्वी एका पावलाने व्याप्त झाली. वामनाच्या विराटरूप पावलाची सावली सर्व भूतलावर पसरली व सर्वत्र अंधकार पसरला. नंतर सर्व आकाश दुसऱ्या पावलाने मोजले गेले. सूर्यचंद्र व सर्व नक्षत्रमंडल त्याच्या पावलाला लागलेल्या रेणुकणासारखे दिसू लागले. तेव्हां ब्रह्मदेवाने आपल्या कमंडलातल्या पाण्याने विष्णुपादावर अभिषेक केला. त्या विष्णुपादावरून घसरून जे पाणी वाहूं लागले, ते आकाशगंगा होऊन स्वर्गांत मंदाकिनी नामे वाहू लागले.



"बली चक्रवर्ती! मी आपले तिसरे पाऊल कोठे ठेवूं?" असे त्रिविक्रम वामनाने विचारले.

बली म्हणाला – "हे त्रिविक्रमा! हे पहा माझे डोके, यावर ठेव!" असे म्हणत बलीने समोर डोके वांकविले.

विष्णूने आपले विराटरूप सोडले आणि स्वस्वरूप वामनरूपे प्रकट होऊन आपले तिसरे पाऊल बलीच्या डोक्यावर ठेवले व म्हणाला – "बली, माझ्या दोन पावलांनी पृथ्वी व आकाश दोन्ही व्याप्त केले. पण तिसरे पाऊल कांही तुझ्या सर्व डोक्याला व्याप्त करू शकत नाही!"

तेव्हां प्रल्हादाने येऊन म्हटले – "माझा नातू बली तुझा शत्रू होऊंच शकत नाही! त्याच्यावर करुणा, कृपा कर!" या शब्दांत प्रल्हादाने विनविले.

बलीची राणी विंध्यावली म्हणाली – "हे वामन श्रेष्ठा! माझ्या पतीस कोणत्याही प्रकारची हानी होणार नाही, असा अनुग्रह करणेच तुला योग्य होईल!"

वामन म्हणाला – "माते! तुझ्या पतीस, केव्हांही, कशा प्रकारचीही हानी करणे कोणालाही शक्य होणार नाही! म्हणून तर मी एक याचक होऊन आलो व दान मागितले; त्याचे धर्मबल असेच आहे!" नंतर प्रल्हादाकडे वळून तो म्हणाला – "बली मला किती प्रियपात्र आहे, माहीत आहे का?" असे म्हणत वामन विष्णुरूपांत लांब वेताच्या दंडासहित प्रकट झाला.

नंतर म्हणाला – "हे बली चक्रवर्ती! आजपर्यंत तुझी बरोबरी करूं शकेल असा कोणी जन्मलाच नाही व पुढेही जन्मणार नाही! आदर्श शासन करणाऱ्या चक्रवर्तीत तुझेच नांव प्रथम राहील. मी तुला भूतलांत पाठवीत आहे. तू पाताळ लोकाचा अधिपती म्हणून राहशील आणि शांति व सुखपूर्वक चिरंजीवी होशील. तुझी राणी, तुझे आजोबा प्रल्हाद तुझ्याबरोबरच राहतील. तुझ्या भूतलांच्या द्वारावर मी सर्वदा दिसेन व दंडपाणी म्हणून सर्वांचे रक्षण करीत, तुझे रक्षण करीन!" असे म्हणत वामन अंतर्धान पावला.







# चतुर मुलगा आणि दुष्ट सैतान



आफ्रिकेतील अतिशय घनदाट जंगलात एक गांव होते. त्या गांवात मोबुतो आपली बायको जेली आणि चतुर तरुण मुलगा एडने यांच्याबरोबर राहात होता. मोबुतोने गांवाच्या बाहेर जमिनीत कसावा (एक प्रकारचे धान्य) पेरले होते. त्यांच्या कुटुंबाला कसावापासून तयार झालेले पदार्थ फार आवडत असत.

कसावाचे पिक तयार होऊन कापणी करण्याची वेळ आली. मोबुतो आणि त्याची बायको जेली शेतावर गेले. मोबुतो म्हणाला, "उद्या आपण कसावाचा दलिया मटणाबरोबर खाऊ."

जेलीच्या मनात उद्याच कसावाचा दलिया बनवता येईल की नाही याबद्दल शंका होती. ती म्हणाली, "दलिया (रवा) करण्यासाठी मला कसावा साफ करुन कुटावा लागेल. हे सगळे काम आजच कसे होईल? तेव्हां आणखी एक दिवस तरी वाट पहावी लागेल."

ते दोघे शेतावर पोहोचले. पण शेताची अवस्था पाहून त्यांना धक्का बसला. सगळे पीक मुळापासून उखडून टाकले होते आणि कसावा घेऊन गेले होते. "आपण लुटले गेलो." जेली रडत म्हणाली.

"हे काम जरूर एखाद्या जंगली जनावराचे असणार!" मोबुतो जोरात म्हणाला. "सगळे शेत खराब करण्याअगोदर आपण त्यांना पकडले पाहिजे." असेही तो म्हणाला. दोघेजण गंभीरपणे विचार करीत झोपडीकडे परतले. एडनेने त्यांना पाहिले आणि त्याने त्यांच्या दुःखाचे कारण विचारले. मोबुतोने घडलेली हकिकत सांगितली. ती ऐकून त्या चतुर मुलाने एक योजना बनविली.

जेली म्हणाली, "ठीक आहे. चला, आपण त्या जनावरांना पकडण्यासाठी एक खड्डा खणून ठेवू. जे जनावर एकदा आले होते, ते परत येण्याची शक्यता आहे. आणि आपण त्याला पकडूं शकतो आणि आपले राहिलेले शेत वाचवूं शकतो. आणि जेवणासाठी भरपूर मांस देखील आपल्याला

"मिळेल." मोबुतोला ही योजना पसंत पडली. तो परत शेतावर गेला आणि खड्डा खणण्याच्या कामाला लागला.

मोबुतो काम करीत असतानाच एक दुष्ट सैतान तेथे प्रगट झाला. म्हणाला, "अरे! तू माझ्या जंगलात काय करतो आहेस?" मोबुतोने चमकून वर पाहिले, समोर सैतान उभा असल्याचे पाहून तो घाबरला. त्याने सैतानाच्या दुष्टपणाबद्दल बरेच ऐकले होते. परंतु प्रत्यक्ष त्याला आजच पाहिले होते.



"मी येथे जनावरासाठी खड्डा खोदत होतो. त्या जनावराने माझे शेत खराब केले आहे." मोबुतोने घाबरत उत्तर दिले. सैतान रागावला. तो म्हणाला, "माझ्या परवानगी शिवाय तू माझ्या जंगलात खड्डे कसे खणतोस? चल, आता मरणाला तयार हो."

मोबुतो भीतीने कापूं लागला. "मला क्षमा करा. सैतान महाराज, माझी चूक झाली. मला माझे घर चालवायचे आहे." सैतानने जरा विचार केला. म्हणाला, "ठीक आहे. ह्या वेळेस तुला सोडून देतो, पण एका अटीवर. जर खड्ड्यात नरपशू पडला तर तो जरूर घे, पण मादी पडली तर तिला मी घेणार."

मोबुतो ने होकार दिला त्याने खड्डा खणला, त्यावर झाडाची पाने, डहाळ्या टाकल्या. तो निघून गेला.

दुसऱ्या दिवशी मोबुतो खड्ड्याच्या जागी पोहोचला. लगेच सैतानही हजर झाला. मोबुतोने खड्ड्यांत पाहिले त्याने खड्डयात माकडाला पाहिले. त्याला खूप आनंद झाला. सैतान निघून गेला. दुसऱ्या दिवशी मोबुतोने खड्ड्याजवळ जाऊन उत्सुकतेने पाहिले. तेथे त्याला सांबर दिसला. त्याला खूपच आनंद झाला.

रोज मोबुतो खड्ड्याजवळ येत असे. त्याला तेथे नर-पशू दिसत असे. कधी तरस असे, तर कधी काळे मांजर, कधी डुक्कर तर कधी झेब्रा, अशी जनावरे तो पहात होता.

"मला असे वाटते की फक्त नर-पशूंनाच कसावा आवडतो." मोबुतोने आपले म्हणणे मांडले. सैतान कांहीच बोलला नाही.

एका महिन्यानंतर जेलीने शेतावर जाऊन सगळे पीक काढून आणण्याचा आणि नवीन बी पेरण्याचा निश्चय केला. मोबुतोचे डोके दुखत होते. त्यामुळे तो घरीच थांबला होता. बराच वेळ झाला पण जेली घरी परतली नव्हती. "मला भूक लागली." एकदम एडने म्हणाला. मोबुतोचा डोळा लागला होता. एडनेच्या आवाजाने तो जागा झाला. बाहेर अंधार पडू लागला होता. "जेलीला काय



झालं? ती परत कां आली नाही?" तो म्हणाला.

"चला, बाबा, आपण शेतावर जाऊन आईला घेऊन येऊ." एडने म्हणाला, तो खरोखर एक अतिशय हुशार मुलगा होता. दोघे शेतावर जायला निघाले. दोघे खड्ड्याजवळ पोहोचले. खड्डा वरून रिकामा दिसताच आंत कोणते जनावर पडले आहे हे दोघे पाहू लागले. आंतमध्ये जेली होती. खड्डा तिच्या लक्षांत आला नसेल आणि ती चुकून आंत पडली असेल, असे त्यांना वाटले.

"या वेळी आंत मादी-पशू आहे. शिकार माझी आहे." जवळून अतिशय घृणास्पद आवाज आला. मोबुतो घाबरला. सैतान त्याच्याजवळ उभा होता.

"नाही, नाही. तू हिला घेऊ शकत नाहीस. कारण ती माझी बायको आहे." मोबुतो एकदम ओरडला. "तू फक्त मादी-पशू घेऊ शकतोस." पण सैतानाने त्याचे म्हणणे ऐकले नाही. "माणूस सुद्धां एक जनावरच आहे. आजपासून ती माझी आहे." सैतान आपले हसूं लपवीत म्हणाला.

मोबुतो घाबरुन नुसतेच हातावर हात चोळत राहिला. त्याने घाबरुन हातानी चेहरा लपवून घेतला परन्तु एडने आपल्या आईला इतक्या सहजपणे जाऊं देणार नव्हता. "पहातोच, माझ्या आईला कसा घेऊन जातोस?" त्याने विचार केला आणि सैतानाला म्हणाला, "ठीक आहे. तुझी झाली. तर खड्ड्यात जाऊन तूच तिला वर काढ आणि घेऊन जा."

"नाही, मी हे पाहूंच शकत नाही. एडने, तू काही तरी काय रे बोलतोस?" मोबुतो जोरांत ओरडला.

परन्तु सैतान जोरात हंसला. "हो, मी तिला वर काढतो" असे जोरात म्हणून त्याने खड्ड्यांत उडी मारली.

"बाबा, उठा. खड्ड्यांत एक नर-पशू पडला आहे. चला, आपण त्याला पकडू." एडने म्हणाला.

हे ऐकताच मोबुतोने एकदम उडी मारली. आपल्या चतुर मुलाची चाल त्याच्या लक्षांत आली मोबतो जोर जोरांत हंसू लागला.

त्यांनी खड्ड्यात डोकावून पाहिले आणि तो म्हणाला "हा नर-पशु गुलाम होऊन आपली सेवा करील."

दुष्ट सैतानाच्या लक्षांत आले की तो फंसला गेला आहे. तो मोबुतोचा गुलाम बनूं शकत नव्हता. त्याची कांही तशी इच्छा नव्हती.

"तू हिला परत घेऊन जा." त्याने दुःखित अंतःकरणाने म्हटले. खड्ड्यांतून बाहेर पडून तो चुपचाप जंगलात निघून गेला. मोबुतो आणि एडने ह्या दोघांनी मिळून जेलीला खड्ड्यातून बाहेर काढले आणि तिघेही आनंदाने नाचत नाचत घरी परतले.





# श्रेष्ठ गुरु

विलासपुरचे महाराज रामभद्र म्हातारे झाले होते. त्यांनी राज्याचा कारभार आपला मुलगा वीरभद्रच्या स्वाधीन केला. ते त्याला म्हणाले, ''बेटा, मी जेव्हां राज्यकारभार हाती घेतला, तेव्हां राज्यातील बहुतेक नागरिक अशिक्षित होते, अंध श्रद्धाळू होते. त्यामुळे त्यांचे नुकसान तर झालेच, पण समाजाचेही नुकसान झाले. त्यांच्यासाठी मी राजधानीत एक विद्यालय स्थापन केले. परन्तु योग्य गुरु न मिळाल्यामुळे माझी इच्छा पूर्ण झाली नाही. फक्त निराशाच पदरी पडली. माझी तीव्र इच्छा आहे की तू पहिल्यादां त्या विद्यालयासाठी योग्य गुरु शोध. म्हणजे माझी इच्छा पूर्ण होईल.''

वीरभद्रने आपल्या वडिलांचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकले. आपल्या वडिलांची इच्छा पूर्ण करण्याचा त्याने निश्चय केला. त्याने ताबडतोब सर्व मंत्र्यांची सभा बोलावली व त्या विषयावर चर्चा केली. परंतु एकही मंत्री योग्य सल्ला देऊं शकला नाही. त्यापैकी विवेकी वृद्ध पंडित वाचस्पती राजाला म्हणाले, ''राजन्, ज्यांना शिक्षणांत रुची आहे, त्यांच्याकरिता माता-पिता आणि भोवतालचा परिसर हे गुरुच आहेत. आपल्या वडिलांनी राजधानीत अशिक्षित लोकांसाठी एक विद्यालय काढले. त्यांना वाटत होते की या विद्यालयांत शिक्षण घेऊन ते देशांत सगळीकडे जातील, आणि नागरिकांच्यात शिक्षणाबद्दल आवड निर्माण करतील, प्रसार करतील. परंतु त्यांनी नेमलेल्या गुरुंनी हे काम केले नाही ही दुःखाची गोष्ट आहे.''

''पण असे कां झाले? कारण काय घडले?'' वीरभद्रने विचारले.

''ज्यांच्या ठिकाणी पांडित्य होते ते फक्त पंडितच होऊन राहिले. ते योग्य गुरु होऊ शकले नाही. मोठमोठ्या पंडितांची नेमणूक झाली होती पण ते योग्य गुरु होऊं शकले नाहीत. मला असे वाटते की गुरुंच्या मोठेपणाची परिक्षा घेतली पाहिजे.'' वाचस्पती म्हणाले.

वीरभद्राला त्यांचे बोलणे ठीक वाटले. त्यांनी चांगल्या गुरुंच्या शोधासाठी त्याने गुप्त हेरांची नेमणूक केली.

त्याला कळले की दंडकारण्यात प्रशांत आणि प्रसेन नांवाचे दोन विद्वान पंडित आहेत. त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना विद्वान बनविले आहे. वीरभद्राने ही गोष्ट वाचस्पतींना सांगितली आणि त्या दोघांपैकी एकाची विद्यालयांत नेमणूक करण्याची विनंती केली.

वाचस्पतीने क्षणभर विचार केला, व ते म्हणाले, ''राजन् माझा एक सल्ला आहे. आपल्या विद्यालयांत शिकणाऱ्या वीस मुलांपैकी कोणीच नीट शिकले नाही. त्यांच्यापैकी दहा मुलांना प्रशान्तकडे सोपवावे, व प्रसेनकडे दहा मुले द्यावीत. सहा महिन्यानंतर ज्याचे विद्यार्थी जास्त तयार जास्त चांगले होतील, त्यांना विद्यालयाचे गुरु म्हणून नेमावे.''

वीरभद्रला वाचस्पतीचे बोलणे योग्य वाटले, व त्याप्रमाणे दहा विद्यार्थी प्रशांतकडे व दहा विद्यार्थी प्रसेनकडे पाठविले. प्रशांतकडे जे विद्यार्थी पाठविले होते, त्यापैकी तीन विद्यार्थी शास्त्रांत निपुण झाले, तर प्रसेनकडे पाठविलेल्या सात विद्यार्थ्यांनी सर्व शास्त्रांत सहा महिन्यांच्या आंत यश मिळवले.

वाचस्पतीने प्रसेनला विचारले, ''आपले



सात विद्यार्थी सर्व शास्त्रें शिकले. बाकीच्या तिघां बद्दल आपले काय मत आहे?''

राहिलेले तीन विद्यार्थी अगदीच मठ्ठ आहेत. त्यांना कितीही शिकविले तरी उपयोग नाही. त्यापैकी एकही जण नीट शिकू शकणार नाही.'' प्रसेनने विश्वासाने सांगितले.

त्यानंतर वाचस्पती प्रशांतला भेटले. त्यांना विचारले, ''आपल्या राहिलेल्या सात विद्यार्थ्यांबद्दल आपले काय मत आहे?''

प्रशांत म्हणाला, ''जे तीन विद्यार्थी हुशार होते, त्यांनी लवकर शिक्षण घेतले. राहिलेले सात विद्यार्थी त्यांच्या इतके हुशार नाहीत. त्यामुळे ते जरा मागे पडले. पण मला विश्वास वाटतो की सहा महिन्यानंतर ते ही योग्य शिक्षण घेतील. मला आणखी वेळ दिला, तर मी त्या सात

विद्यार्थ्यांना सुद्धां ह्या तिघांच्या बरोबर आणूं शकतो."

वाचस्पतीने सर्व गोष्टी राजाच्या कानावर घातल्या. वाचस्पती म्हणाले, "राजधानीतील विद्यालयामध्ये प्रशांतची नेमणूक करावी."

राजा वाचस्पतीचे बोलणे ऐकून आश्चर्यचकित झाला. म्हणाला, "गुरुदेव, प्रसेनने सहा महिन्यांत सात विद्यार्थ्यांना शास्त्रांत तयार केले, पण आपण त्यांच्या ऐवजी प्रशांतला विद्यालयात नेमावे अशी शिफारस करीत आहात; त्याने तर तीनच विद्यार्थी शास्त्रांत पारंगत केले आहेत. हे बरोबर आहे का?"

वाचस्पती गालांतल्या गालांत हसले आणि म्हणाले, "महाराज, आपल्या विद्यालयांतील मागासलेल्या विद्यार्थ्यांना प्रशांत आणि प्रसेन या दोघांनी हुशार बनविले, हे मान्य आहे. त्यांचे श्रेष्ठत्व त्यामुळे कळते. प्रसेनने सात विद्यार्थी आणि प्रशांतने तीन विद्यार्थी विद्वान बनविले. प्रसेन कडील विद्यार्थी जास्त प्रतिभावान आहेत, पण तीन विद्यार्थ्यांना त्यांनी मठ्ठ म्हटले. ते कधी शिकणार नाहीत, असे म्हटले. पण प्रशांतने कोणत्याही विद्यार्थ्याला मठ्ठ म्हटले नाही. यावरुन मला विष्णुशर्मा आणि तीन मूर्ख राजकुमारांची गोष्ट आठवली.

राजा म्हणाला, "आठवली, मला पण ती गोष्ट आठवली. पुढे बोला."

"महाराज, एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे, की प्रशांतने सात विद्यार्थ्यांना विद्वान बनविण्यासाठी मुदत मागितली आहे; त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना कमी मानले नाही, किंवा त्यांच्या चुका सांगितल्या नाहीत. जो गुरु विद्यार्थ्यांना कमी मानतो, निर्बुद्ध मानतो, तो चांगला आदर्श गुरु होऊं शकत नाही. ह्या सर्व कारणामुळे मी प्रशांतला आदर्श गुरु मानतो."

राजा वीरभद्रने वाचस्पतीची स्तुती केली आणि प्रशांतला विद्यालयात गुरुच्या जागी नेमले. त्या विद्यालयातील अनेक विद्यार्थी विद्वान झाले शिक्षणाचा प्रसार, करण्यासाठी तयार झाले आणि देशातील नागरिकांच्या मानसिक विकासात वाढ करण्यासाठी चांगले मदतनीस बनले.







# मोठ्या घरचे आमंत्रण

एका गांवात एक श्रीमंत जमीनदार रहात होता. तो फार गर्विष्ठ होता. त्या गांवात श्रीमंतांची घरे फार कमी होती. बहुतेक शेतकरी आणि नोकरी करणारे लोक त्या गांवात रहात होते.

तो श्रीमंत जमीनदार त्या लोकांवर फार चिडत असे. ते जरा जवळ आले की तो म्हणत असे, "हे लोक फार घाणेरडे आहेत." त्यामुळें जमीनदाराच्या जवळ शंभर फुटापर्यंत उभे रहाण्याची लोकांची हिंमत होत नसे.

एक दिवस सगळे शेतकरी गप्पा मारीत होते. एका शेतकऱ्याने गर्वाने थाप मारता मारता सांगितले, "मी आज जमीनदारांना थोड्या अंतरावरुन पाहिले. अगदी थोडे अंतर होते." तेव्हां एक गरीब शेतकरी जोरजोरांत हंसला आणि म्हणाला, "मी जर मनांत आणले तर जमीनदाराकडे जेवण्याचे आमंत्रण घेऊं शकतो. पैज लावता का?" त्यांची ही घमेंडखोर पैज ऐकून सगळ्या शेतकऱ्यां ना राग आला.

"तुझा चेहरा पहा. जमीनदाराच्या घरी जेवण्याचे आमंत्रण मिळण्या लायक तरी आहे कां? ते तुला पाहताच उचलून खड्ड्यांत फेकून देतील. तू आम्हाला काय मूर्ख समजतोस कां? कांहीही थापा मारतो." सगळ्यांनी त्याच्यावर हल्ला केला.

"मला खोटं बोलण्याची काय जरुर आहे? माझ्या मनांत आले तर मी केव्हांही जमीनदाराच्या घरी जाऊन जेवूं शकतो." शेतकरी म्हणाला.

"तू जर म्हणतोस तसे केलेस तर आम्ही तुला साठ शेर धान्य आणि बैलजोडी देऊं. हे काम जर तुझ्याकडून झाले नाही तर मात्र आम्ही जे काम तुला सांगू ते तुला करावेच लागेल. विचार करुन सांग" सगळे शेतकरी म्हणाले.

"तुमची ही अट मला मान्य आहे." गरीब शेतकरी म्हणाला.

तो गरीब शेतकरी त्याच दिवशी जमीन दाराच्या घरी गेला. चौकीदाराने त्याला घालवून देण्याचा प्रयत्न केला.

"जरा थांब. मला सरकारांना एक गुप्त बातमी द्यायची आहे." गरीब शेतकरी म्हणाला.

चौकीदार म्हणाला, "अरे, मला आधी ती बातमी सांग. मी जाऊन सरकारना सांगतो."

"ही बातमी सरकारांनाच आधी सांगितली

- २५ वर्षांपूर्वी चांदोबांत प्रसिद्ध झालेली गोष्ट -

पाहिजे. मी तुला ती सांगू शकत नाही.'' शेतकऱ्याने त्याला बातमी सांगण्यास नकार दिला.

चौकीदार जमीनदाराकडे गेला आणि त्याने शेतकऱ्याचे म्हणणे त्यांच्या कानावर घातले. जमीनदाराच्या मनांत ती गुप्त बातमी ऐकण्याची इच्छा निर्माण झाली. लगेच बातमी कळावी म्हणून, त्याने चौकीदाराला गरीब शेतकऱ्याला लवकर घेऊन येण्यास सांगितले. चौकीदार शेतकऱ्याला घेऊन आला.

''तू कोणती चांगली बातमी घेऊन आला आहेस?'' जमीनदाराने शेतकऱ्याला विचारले.

''मी ती चांगली बातमी तुम्हाला एकट्यालाच सांगू शकतो.'' शेतकऱ्याच्या ह्या बोलण्याने जमीनदाराची उत्सुकता आणखीन वाढली. त्याने चौकीदारास बाहेर जाण्यास सांगितले.

किसान शेतकरी कांही गुप्त बातमी सांगतो आहे, अशा आवाजात म्हणाला, ''सरकार, घोड्याच्या डोक्या इतक्या वजनाच्या सोन्याचा काय भाव होईल?''

''तू या गोष्टी मला कशाला विचारतोस?'' जमीनदार म्हणाला.

''सरकार, एका जरुरी कामासाठी मी तुम्हाला ही गोष्ट विचारतो आहे. तुम्हाला माहित असेल तर जरुर सांगा.'' शेतकरी म्हणाला.

''अरे, ते शुभ समाचार सांग ना!'' जमीनदार म्हणाले. शेतकऱ्याने मोठा श्वास घेतला आणि म्हणाला, ''तुमची इच्छा नसेल तर नका सांगू. पण मला आता खूप भूक लागली आहे. तेव्हां मी घरी जाऊन जेवून येतो, मग सांगतो.''

जमीनदाराची त्याला घरी पाठविण्याची इच्छा नव्हती. घोड्याच्या डोक्याच्या वजनाचे सोने तो हातांतून तसे निसटूं देणार नव्हता. त्याने नोकरांना बोलावले, ''ह्याला पोटभर जेवायला द्या.'' असे सांगितले.

शेतकरी पोट भरुन जेवला. जमीनदार त्याला म्हणाले, ''ज्या सोन्याबद्दल तू बोलतोस, ते घेऊन ये. मी तुला बक्षीस देईन.''

''सोने? माझ्याजवळ सोने कुठून असणार सरकार! मी विचारीत होतो की साठ शेर धान्य आणि एक बैलाची जोडी आणि घोड्याच्या डोक्याइतके सोने सारखेच आहे की नाही?'' शेतकरी म्हणाला.

त्याचे बोलणे ऐकून जमीनदार रागावला. म्हणाला ''आतां तू एक क्षणही माझ्या डोळ्यासमोर उभा राहिलास तर मी तुला मारीन. निघून जा.''

शेतकऱ्याने अट पुरी केली होती. त्याला साठ शेर धान्य आणि एक बैलजोडी सहज पणे मिळाली.







# दागिन्यांची भुरळ

**शेखर** तीन वर्षांचा होता तेव्हां त्याची आई वारली. त्याचा पिता महती हा त्याचा संभाळ एकट्याने करु शकत नव्हता. म्हणून त्याने दुर्गा नांवाच्या तरुणीशी दुसरा विवाह केला. लग्नानंतर महतीच्या लौकरच लक्षांत आलं कीं दुर्गा फार भांडकुदळ आणि कर्कशा आहे.

दुर्गा आपल्या पतीचे ऐकत नसे. तिला दागिन्यांचा हव्यास होता. त्यासाठी ती मागचा-पुढचा विचार न करता खर्च करीत असे.

महतीचे तीन अेकराची चांगली शेतजमीन होती. त्याच्या उत्पन्नांतून तो कुटुंबाचा खर्च चालवत होता. दुर्गाचा अकारण खर्च ही आता त्याला गंभीर समस्या निर्माण झाली. त्यावेळी शेखर दहा वर्षांचा झाला होता. दुर्गा घरांत आल्यानंतर ती शेखरला घरांतले बरेच काम करायला सांगत असे. घरकाम करुन तो शाळेंत जाई व चांगला अभ्यास करी. त्याला पुढे शिकावे, उच्च शिक्षण घ्यावे, अशी फार इच्छा होती. पण दुर्गाने त्याला वरच्या वर्गांत दाखल करायला विरोध केला.

तिने एके दिवशी शेखरला सांगितले, "शिकला आहेस तेवढं पुरे झालं आता. तुझा बाप काही जमीनदार नाही. शेतांत काम करण्यासाठी झालं तितकं शिक्षण पुरेसं आहे. जास्ती शिकायची स्वप्नें पाहू नकोस."

पण महतीच्या मनांत कांही निराळेच होते. त्याने दुर्गाला म्हटले, "हा आपला एकुलता एक मुलगा! जास्ती शिकायला पैसाही जास्त हवा हे खरे आहे. पण लागलं तर आपण अर्धा एकर शेत विकून टाकूं आणि त्याला शिकवूं. शिकून तो हुशार होईल आणि शेतीचे काम चांगल्याप्रकारे करायला लागेल." दुर्गाने पतीला ताडकन सुनावले.

"कांही झालं तरी शेताचा इंचभर तुकडा-देखील मी विकूं द्यायची नाही!" ती ओरडून म्हणाली.

नरेंद्र दीक्षित

त्यानंतर दोनच दिवसांनी महतीला शोधत एकजण तिथे आला. त्याने महतीच्या हातांत एक थैली दिली व नंतर तो म्हणाला, "हे बघा, खूप वर्षांपूर्वी शहरांत धान्याचा व्यापार करणाऱ्या नीलकंठाला तुम्ही दहा हजार रुपये दिले होते. त्यांचा व्यापार आता चांगला चालला आहे. पण सध्यां त्यांची प्रकृति तितकीशी बरी नसते. त्यांना काळजी वाटते आहे कीं तुमचे कर्ज न देता जर त्यांना मरण आले तर? याचा घोर त्यांच्या जिवाला लागून राहिला आहे." असं सांगून त्याने नमस्कार केला व तो इसम तिथून चालता झाला.

खुषींत येऊन महतीने दुर्गाला म्हटले, "लक्ष्मी-देवीने अचानक येऊन आपले दार वाजवले. या पैशांतला कांही भाग आपण शेखरच्या शिक्षणासाठी खर्च करुं या. आता कांही शेताचा इंचभर तुकडादेखील विकावा लागणार नाही."

दुर्गाने महतीच्या हातांतून ती थैली जोराने हिसकावून घेतली आणि ती उद्गारली, "शेखरचे कसले आलेय शिक्षण? पुढच्याच आठवड्यांत माझ्या काकीच्या नातीचे लग्न आहे ना! तेव्हां या रकमेचा मी चंद्रहार खरेदी करीन. आजच आपण शहरांतल्या सोनाराच्या दुकानांत जाऊं या!"

जवळच शेखर उभा होता. आपले वडील उदास झाले आहेत हे त्याला समजले. त्याने वडिलांचा हात पकडून म्हटले, "जाऊं दे बाबा, आईची इच्छा पूर्ण करा. मी शिक्षण बंद करीन आणि तुमच्याबरोबर शेतांत काम करीन." त्याच दिवशी दुर्गा सोनाराच्या दुकानांत गेली. तिने दहा



हजारांत आणखी दोन हजारांची भर घातली, आणि एक चंद्रहार खरेदी केला. भाड्याच्या बैलगाडींतून ते गांवाकडे परतले. अंधार पडूं लागला होता. गाडी थोड्या दूरवर गेली तोच मागून एक घोडागाडी वेगांत आली नि पुढे गेली. गाडींतून कांहीतरी वस्तू खाली पडली. पण त्या बग्गीतल्या लोकांच्या ते ध्यानांत आले नसावे. त्यांची बग्गी जास्तच वेगाने जात होती. महतीची बैलगाडी पुढे गेली तेव्हां दुर्गाने गाडीवान रतनला रस्त्यांत पडलेली वस्तू उचलण्यास सांगितले.

रतनने गाडी थांबवली आणि कडेला पडलेली वस्तू उचलून यांना दिली. ती एक सुंदरशी, लांकडी पेटी होती. रतनने ती उघडून बघितली.

त्यांतला चमचमणारा सोन्याचा हार पाहून रतन ओरडला, "बाप रे, किती सुरेख हार आहे हा!"



दुर्गाने त्याच्या हातातून तो हार हिसकावून घेत म्हटले, ''शहरांत जायला म्हणून मी तुझी गाडी भाड्याने घेतली. रस्त्यांत पडलेली पेटी उचलायला मीच तुला धाडले होते, म्हणून हा हार आता माझाच आहे.''

रतन मोठ्या आवाजांत ओरडूं लागला, ''बग्गींतून पेटी पडताना मीदेखील बघितली होती. मीच ती उचलून आणली, म्हणून हा हार माझा आहे.''

महतीने दुर्गाला दटावत म्हटले, ''हा तर शुद्ध अन्याय आहे कीं!''

दुर्गाने पतीच्या बोलण्याकडे लक्ष न देता रतनला म्हटले, ''हवं तर शंभर रुपये जास्त भाडे देते तुला. ते घे नि गप्प बैस.'' रतन पुटपुटला आणि गप्प बसला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं शेखर शेतांत कामाला गेला. रस्त्यांत त्याला बैलगाडीवाला रतन भेटला.

शहरांतून परत येताना जे घडलं ते रतनने शेखरला सविस्तर सांगितलं.

तेव्हां शेखर म्हणाला, ''ज्याचा हार हरवला असेल त्याला फार वाईट वाटले असेल. तो हार ग्रामाधिकाऱ्याकडे सोंपवणे हे न्यायाचे आहे. तू त्या हाराबद्दलची माहिती ग्रामाधिकाऱ्याला सांग.''

''तसं करुन मला काय मिळणार? उलट माझ्यावर चोरीचा आळ ठेवला जाईल. त्याशिवाय, ती बग्गी जमीनदाराची होती. तो हार हरवला तरी त्यांना कांही फरक पडणार नाही. तू मला असा कांहीतरी उपाय सांग कीं त्यामुळें तो हार माझ्याकडे येईल.'' रतनने उत्तर दिलं.

''दुसऱ्याची संपत्ती आपल्या मालकीची व्हावी अशी इच्छा धरणे कधीही योग्य नसते. ही वस्तू ज्याची आहे, त्याच्याकडे ती सुपुर्द करणे हेच बरोबर आहे. तुझं म्हणणं आहे कीं ती बग्गी जमीनदाराची होती, तर मग जमीनदाराला हे जाऊन सांग. तुझ्या दृष्टीने हेच ठीक होईल. नाहीतर तू उगीचच संकटात सांपडशील.'' शेखरने त्याला समजावलं.

''नको, नको, मी नाही तसं कांही करणार. कुणास ठाऊक, मला फार भीती वाटते आहे. मोठ्यांचा काय भरंवसा? ते माझ्याशीच दुष्टावा करायचे!'' असं बोलून रतन तिथून निघून गेला.

आठवड्यानंतर आपल्या कांकीच्या नातीच्या लग्नाला दुर्गा तो हार घालून गेली. सर्वांनी त्या हाराचे भरपूर कौतुक केले. त्यांनी दुर्गाला म्हटले, ''हा हार पाहून असं वाटतंय कीं कुणा जमीनदाराच्या कुटुंबियांसाठी हा खास बनवून घेतला असला पाहिजे.''

लग्नाला आलेली मंडळी जेव्हां जेवायला बसली, तेव्हां रायपुरच्या जमीनदाराचे नोकर घाईघाईने आंत आले आणि सांगू लागले, ''नुकतीच जमीनदारांच्या घरांत चोरी झालीय. चोरांनी मोठी पेटी फोडली, आणि त्यांतले दागिने घेऊन ते पसार झाले. आम्हाला आजच समजलं कीं त्यांतले कांही चोर या लग्नाला आले आहेत. ते कुठे आहेत? आता आमच्यापासून कांही ते पळून जाऊं शकणार नाहीत.''

आणि ते प्रत्येकाकडे निरखून बघूं लागले. त्यावेळी एका नोकराने दुर्गाच्या गळ्यांतला तो हार बघितला आणि तो म्हणाला, ''एवढी धिटाई! चोरीचा माल अंगावर घालून दिवसाढवळ्या तुम्ही हिंडता आहात? तूच चोरांची राणी आहेस कीं काय?''

जमीनदाराच्या नोकरांनी दुर्गाला पकडले आणि तिला व महतीला जमीनदाराकडे नेले.

आपल्या आईवडिलांना पकडून नेले आहे हे जेव्हां शेखरला कळले, तेव्हां रतनला बरोबर घेऊन तो जमीनदाराकडे गेला. प्रथम रतन तिकडे जायला आढेवेढे घेत होता, पण शेखरने त्याला समजावून सांगितले व घेऊन गेला. शेखर तिथे पोहोचेपर्यंत जमीनदाराने महती व दुर्गाला तुरुंगात टाकले होते.

शेखर रतनला घेऊन जमीनदाराला भेटला आणि रतनने त्या दिवसाची सविस्तर हकीगत जमीनदाराला सांगितली. सर्व माहिती



ऐकल्यानंतर जमीनदाराने रतनला विचारले, "ती बग्गी जमीनदारांची होती असं तू म्हणतोस. तर सांग, ती कोणत्या बाजूने आली आणि कोणत्या दिशेला गेली?"

"रायपुरकडून येऊन रामवरकडे गेली."

"गाडी चालवणारा कसा होता ते सांगशील कां?" जमीनदाराने विचारलं.

"मला त्याचा चेहरा स्पष्ट दिसला नव्हता. पण मोठी दाढी होती आणि लाल पगडी डोक्यावर होती." रतनने सांगितलं.

जमीनदाराने मिशीवरुन हात फिरवीत म्हटले, "जा, घोडागाडीवाल्या मार्तंडला घेऊन या."

थोड्याच वेळांत मार्तंडला तिथे आणण्यांत आले. तिथे येताच मार्तंडने जमीनदाराच्या पायाशी लोळण घेतली व म्हटले, "मालक, क्षमा करा! मी पोराबाळांचा बाप! रामभूपतीवर विश्वास ठेवला आणि मोहाच्या जाळ्यांत अडकलो. मीच त्याला चोरीचे हे दागिने घेऊन रामवरला पोंचवले होते."

त्यानंतर जी चौकशी झाली त्यावरुन कळलं कीं जमीनदाराचा मेव्हणा रामभूपती याने तो हार सोडून बाकी सगळे दागदागिने नगरांतल्या जवाहिऱ्यांकडे विकले होते. "आता समजलं कीं रामभूपती नुसता व्यसनीच नाही, तर चोरटाही आहे. आता मात्र दिरंगाई करुन चालणार नाही. त्याला शिक्षा ही झालीच पाहिजे. त्याला ताबडतोब पकडा आणि तुरुंगात डांबून ठेवा." जमीनदाराने आज्ञा फर्मावली.

त्याचवेळेला जमीनदाराने महती व दुर्गाला तुरुंगातून बाहेर आणले आणि त्यांना सांगितले, "तुमच्या मुलाच्या चांगुलपणामुळे मी तुम्हाला माफी देतो आहे. स्त्रियांना दागिन्यांचा सोस असतो आणि ते स्वाभाविक आहे. पण त्याचा अतिरेक नसावा. यापुढे हे नेहमी लक्षांत ठेवा." दुर्गाला जमीनदाराने अशी समज दिली.

दुर्गाने आपली चूक कबूल केली आणि पुन्हां अशी चूक करणार नाही अशी शपथ घेतली.

शेखरच्या प्रामाणिकपणाचे व तैलबुद्धीचे जमीनदाराने मन:पूर्वक कौतुक केले. त्याशिवाय त्याच्या उच्च शिक्षणासाठी ज्या सोयीसवलतींची जरुर होती, त्या सर्वांची व्यवस्था जमीनदाराने आपण होऊन करुन दिली.







# अस्वल्या मांत्रिक

## 8

**(आपला पाठलाग करणाऱ्या अस्वल्या मांत्रिकापासून वांचण्यासाठी दुर्मुखराजा उठून उभा राहिला. पण त्याला उग्रदंड राक्षस दिसला आणि पुन्हां तो भीतीने बेशुद्ध झाला. अंगरक्षकाला त्याने नाल्याचे पाणी आणायला सांगितले. नाल्याजवळ सोंडतुटका हत्ती होता, तो एकदम बिथरला आणि चित्कारत त्याचा पाठलाग करायला लागला. त्यानंतर....)**

उग्रदंड राक्षसाने आपल्या दिशेने येणाऱ्या हत्तीकडे एक नजर टाकली व तो अस्वल्या बधिकाला म्हणाला, "हे बघ, हा सोंडतुटका हत्ती तुझं वाहन आहे कां? हा तर रानटी हत्ती वाटतोय."

"हो ना! हा रानटी हत्तीच आहे. याने अरण्यांत माझी वाट अडवायचा प्रयत्न केला, तेव्हां मी त्याच्या सोंडेवर माझ्या परशूने प्रहार केला आणि त्याच्यावर स्वार होऊन त्याचे कान पिरगाळून त्याला इथें घेऊन आलो." अस्वल्या बधिकाने उत्तर दिले.

तेवढ्यांत तो हत्ती त्यांच्याजवळ येऊन पोंचला. त्याला बघून नागमल्ल दरोडेखोर आणि त्याचे दोघे साथीदार गुहेकडे धावत सुटले. बेहोश राजा दुर्मुख शुद्धीवर आला, आणि तीरासारखा धावत झाडींत पळाला. अंगरक्षक किंचाळत उग्रदंडाच्या मागे जाऊन उभा राहिला. उग्रदंडाने आपली दगडी गदा उचलून म्हटले, "अरेच्चा, थोड्या वेळापूर्वी तू म्हणालास कीं तू माझा अंगरक्षक आहेस. आता वाटतंय कीं मीच तुझा अंगरक्षक आहे. घाबरट, भेकड कुठला!" आणि



तो समोर येणाऱ्या हत्तीच्या वाटेतून बाजूला झाला.

अस्वल्या वधिक परशू फिरवीत हत्तीच्या-समोर जाऊन म्हणाला, "थांब, तू मला ओळखलं नाहीस कां? मी अस्वल्या वधिक आहे आणि तू माझे वाहन आहेस."

वधिकाचे बोलणें पूर्ण होते आहे तोंच हत्तीने त्याला सोंडेने लपेटून घेतले आणि त्याला दूर फेकायचा हत्तीचा विचार होता.

तेवढ्यांत उग्रदंडाने एक उडी मारुन तो हत्तीवर स्वार झाला, त्याचा एक कान पिरगाळीत पकडला, आणि आपल्या गदेने त्याच्या बगलेंत प्रहार केला. जखमी झालेल्या हत्तीने अस्वल्या वधिकाला खाली धरले आणि धप्पकन त्याला खाली पाडले.

त्यावेळी उग्रदंडाने विजेच्या चपळाईने त्याचे दोन्ही पुढचे पाय पकडले आणि त्याला उठवत तो म्हणाला, "अरे अंगरक्षका, लौकर जाऊन रानटी वेली तोडून आण. आपण याचे पाय बांधून टाकूं या."

उग्रदंडाची आज्ञा पाळण्यासाठी अंगरक्षक झाडीकडे पळत गेला. अस्वल्या वधिक शुद्ध हरपलेल्या माणसासारखा डोळे उघडमीट करीत होता.

डाव्या हाताने आपले डोके पकडून तो म्हणाला, "माझ्या जादूच्या परशूपेक्षांही तुझ्या देहांतले बळ अधिक शक्तीशाली दिसते आहे. तू मला वांचवलेस, म्हणून मी तुझ्यावर प्रसन्न आहे. माग, तुला काय हवंय?"

उग्रदंडाने अस्वल्या वधिकाकडे मंदस्मित करीत बघितले व म्हटले, "जर मला कांही मागायचंच असेल तर तुझे गुरु अस्वल्या मांत्रिक यांच्याकडूनच मागायचं आहे. पण आत्ता हा चवताळलेला हत्ती कांहीही करुं शकेल. तू याचे पाय घट्ट पकड."

अस्वल्या वधिकाने उग्रदंडाकडे तीव्र नजरेने बघत म्हटले, "मी या माझ्या अभागी वाहनाचे पाय धरुं? यापेक्षां अपमानकारक दुसरं काय असूं शकेल? हे बघ, माझ्या जादूच्या परशूने मी याच्या मस्तकाची शंभर शकले करुन टाकतो बघ." आणि त्याने आपला परशू उचलला.

"अरे, थांब! तू आजपर्यंत वधिकाचे जीवन जगलास. पण जर तू हत्तीला मारलंस तर तुझे काम पूर्ण करुन तू तुझ्या अस्वल्या मांत्रिकाकडे कसा जाऊं शकशील?" उग्रदंडने विचारले.

उग्रदंडाने जेव्हां वधिकाला त्याच्या कामाची



आठवण करुन दिली, तेव्हां तो खडबडून जागा होऊन बोलला, "हो, विसरलो होतो. पण तो दुष्ट दुर्मुखराजा आहे कुठे? इतका वेळ बेशुद्ध होऊन इथेच पडलेला होता कीं!" त्याने चारी बाजूंना बघितले.

खाली पडलेला हत्ती उग्रदंडाच्या पकडीतून सुटण्यासाठी तडफड करत होता. पण आपली पकड सैल न करताच उग्रदंडाने ओरडून विचारले, "अरे अंगरक्षका! कुठे मेला आहेस रे? वेली तोडून आणायला इतका वेळ?"

"मालक, हा मी आलोच!" असं म्हणत नागमल्ल दरोडेखोर आणि त्याचे दोन साथीदार एक लांबलचक दोरी घेऊन तिथे आले.

त्या दोरीने हत्तीचे पाय बांधायला उग्रदंडाने त्यांना सांगितले आणि तो पुढे म्हणाला, "वा वा, तुम्ही लोक खरे चोर आहात. आपल्याला लागणाऱ्या वस्तू तुम्ही अगदी सावधपणे जवळ बाळगता हं!"

हत्तीचे पाय बांधायचं काम नागमल्लने आपल्या अनुचरांवर सोंपवलं आणि तो बोलला, "उग्रदंड महाराज! आम्ही आहोत रानटी जीव! आपण जेव्हां इथून जाल तेव्हां आमची एक इच्छा आपल्याला पूर्ण करावी लागेल."

"कां नाही? जरुर पूर्ण करीन. तुमची हीच इच्छा आहे ना कीं या अस्वल्या वधिकाच्या हातून तुमचा तिघांचा शिरच्छेद व्हावा?" उग्रदंडाने विचारलं.

हे शब्द ऐकून नागमल्ल आपादमस्तक कांपायला लागला. तो कांही बोलणार, त्यापूर्वीच अस्वल्या वधिकाने परशू उचलून "सिरसभैरव"



अशी गर्जना करत म्हटले, "अरे, वाटसरुंना लुटणाऱ्या दुष्टांनो, दुर्मुखराजा कुठे आहे? याक्षणीं उत्तर दिलं नाहीत तर तुमची डोकीं उडवीन."

नागमल्लने चांचरत उत्तर दिले, "अस्वल्या महाराज! मला मारुं नका हो! दुर्जयगुप्त असं खोटं नांव सांगणारा दुर्मुखराजा इथेच कुठेतरी पडलेला आहे ना?"

"मीही हेच विचारतो आहे. तो आत्ता कुठे आहे? जर मी त्याचे मस्तक घेऊन गेलो नाही तर अस्वल्या मांत्रिक माझेच मस्तक उडवील." अस्वल्या वधिकाने रडवा चेहरा करुन म्हटले.

तोपर्यंत नागमल्लच्या साथीदारांनी हत्तीचे पुढचे पाय दोरीने कसून बांधून टाकले. त्यामुळे मागचे पाय झटकत हत्ती उठायचा प्रयत्न करुं लागला. त्याचवेळेला लांबलचक रानटी वेलींना खांद्यावर घेतलेला अंगरक्षक तिथे आला.



उग्रदंडाने नागमल्लुच्या साथीदारांना आज्ञा केली कीं त्या रानटी वेलींनी हत्तीचे मागचे पायदेखील बांधावेत.

तेव्हां तो अंगरक्षकाला म्हणाला, ''अरे अंगरक्षका, तू अशी नजर कां चुकवतो आहेस? कांहीतरी तू लपवतो आहेस, होय ना? झाडीच्या मागे दुर्मुखराजाला लपवून तर तू आला नाहीस ना?''

हा प्रश्न ऐकून अंगरक्षक थक्क झाला आणि म्हणाला, ''उग्रदंड महाराज, यावेळी मी दुर्मुखराजाचा नाही, पण आपला अंगरक्षक आहे ना?''

हे ऐकून अस्वल्या वधिक दोन पावले पुढे आला आणि दांतओठ खात तो अंगरक्षकाला म्हणाला, ''अरे, दुर्मुख कुठे लपलाय ते तुला ठाऊक आहे ना? तुझी ही बावरलेली नजर तेच सांगते आहे. खरं काय ते सांगशील, कीं तुझे डोके उडवून टाकूं?'' असं विचारत त्याने आपला परशू उचलला.

अंगरक्षक भेदरुन किंचाळला आणि उग्रदंडाच्या मागे उभा राहून बोलला, ''महाराज! आपल्या अंगरक्षकाचे रक्षण करण्याची जबाबदारी आता आपल्यावर आहे.''

अंगरक्षकाची मानगूट पकडून उग्रदंडाने त्याला पुढे ओढत म्हटले, ''हे बघ, तू जर दुर्मुखराजा कुठे लपलाय ते सांगितलं नाहीस तर तुला वांचवणं मला अशक्य आहे. तू जेव्हां वेली आणायला गेलास, तेव्हां तू त्या दुष्ट पळपुट्याला बघितलेलं आहेस. त्याच्याबरोबर कांहीतरी मसलत करुन तू आलेला आहेस. खरं आहे कीं नाही? खरं बोलला नाहीस तर तुला हत्तीच्या सोंडेच्या विळख्यांत धाडतो.'' असं म्हणत खाली पडलेल्या हत्तीकडे त्याने अंगरक्षकाला ओढत नेले.

अंगरक्षकाने रडतभेकत दोन्ही हात वर उचलून धरले व तो म्हणाला, ''उग्रदंड महाराज! मी आपल्यापुढे शरण आलो आहे. दुर्मुखराजाने मला अर्धे राज्य द्यायचे कबूल केले आहे. आणि असंही सांगितलं कीं जर मी तुम्हा सर्वांच्या डोळ्यांत धूळ फेकून इथून पळालो, तर आम्ही दोघेही उदयगिरी नगरांत जाऊं शकूं. त्यानंतर मला अर्धे राज्य देऊन राज्याभिषेक करायचा असे त्याने कबूल केले आहे.''

''हो तर! आणि तू त्याच्या शब्दावर विश्वास ठेवलास?'' उग्रदंड मोठ्याने हंसून म्हणाला. ''अरे अंगरक्षका! तू माणूस असून माणसांच्यावर विश्वास ठेवतोस, याचे मला फारच आश्चर्य वाटते आहे. उदयगिरीला पोचल्यावर तुझा



राज्याभिषेक होणार नाही, पण राजधानीमधे भर उन्हांत तुला फांसावर लटकावलं जाईल.''

''हे खरंच आहे, उग्रदंड महाराज! मी कुठेही जाणार नाही. माझे उरलेले दिवस मी आपल्या आश्रयाखाली राहीन.'' अंगरक्षकाने उत्तर दिले.

तोपर्यंत त्यांचे बोलणे ऐकत असताना मान डोलावणारा अस्वल्या वधिक पुढे आला. आणि तारसप्तकांत ओरडत बोलायला लागला, ''अस्वल्या मांत्रिकाचा विजय असो. तुम्ही ही वायफळ चर्चा बंद करा पाहूं. तुम्ही सर्वांनी अस्वल्या मांत्रिकाचा अपमान करणाऱ्या दुर्मुखराजाला पकडून इथें माझ्यासमोर हजर केला पाहिजे. तसं केलं नाहीत तर तुम्हा सगळ्यांची डोकी छाटून या रानटी वेलींत गुंफीन आणि त्यांची माळ बनवून माझ्या गळ्यांत घालीन.''

हे बोलणे ऐकून उग्रदंड राक्षस चिडून म्हणाला, ''अस्वल्या वधिका! या सर्वांचा शिरच्छेद करण्याची शक्ती तुझ्याकडे आहे कां?''

वधिकही संतापला आणि आपला परशू उंच धरुन उग्रदंडाला म्हणाला, ''माहीत आहे कां? हा माझा परशू अस्वल्या महाराजांच्या वराचा प्रसाद आहे. त्याच्याशी कुणीही लढूं शकणार नाही. बघा, नीट तपासून बघा, तुमच्या दगडी गदेने याच्याशी लढता येईल? कीं नाही?'' आणि अस्वल्या वधिक उग्रदंडाच्या दिशेने एक पाऊल पुढें सरकला.

उग्रदंड राक्षस एक पाऊल मागे गेला आणि म्हणाला, ''अस्वल्या वधिका, तू जरा शांत हो पाहूं. मी तुला आधीच सांगितलेलं आहे कीं आपण दोघे जर एकामेकांना संपवायचा बेत करुं



लागलो. तर ते या नीच दुष्टांना फायद्याचंच ठरेल.''

''ही गोष्ट खरी आहे, पण दुर्मुखराजाच्या मस्तकाचं काय? त्याशिवाय मी अस्वलमहाराजांकडे कसा जाऊं?'' अस्वल्या वधिकाने विचारलं.

''आपण सारेजण मिळून त्या राजाला आसपासच्या रानावनांतून शोधून काढूं. राजमहालांत व उद्यानांत विहार करणाऱ्या त्या भागूबाईला या भयानक अरण्यांत एकट्याने कुठेही जाता येणार नाही.'' उग्रदंडाने उत्तर दिलं.

त्यानंतर सारे लोक दुर्मुख पळून गेलेल्या दिशेने निघाले. तेवढ्यांत दुरुन एक चित्कार ऐकूं आला व शब्द कानावर आले, ''अरे, लवकर बाण चालव ना! मी उदयगिरीचा राजा आहे. माझे प्राण वांचवलेत तर तुम्हाला अर्धे राज्य देईन.''

हा आवाज दुर्मुखराजाचा होता. अंगरक्षक चिडला आणि राजाकडे धावत जात ओरडला, "दुर्मुखराजाने मला अर्धे राज्य द्यायचे वचन दिले होते, ते आता तो आणखी कुणाला तरी द्यायला चालला आहे. मला नाही हे सहन होत."

अंगरक्षक तिथे पोंचला तर त्याला काय दिसले? एका उंच वृक्षाच्या वांकलेल्या फांदीवर राजा दुर्मुख लोंबकळतो आहे. त्याच्यापासून थोड्या अंतरावर एक चित्ता आपला जबडा उघडून गुरगुरत दुर्मुखच्या दिशेने पुढे जातो आहे. त्या झाडाच्या खाली एक वन्य तरुण उभा असून निशाणावर नेम धरुन तयार आहे.

अंगरक्षकाला पाहून दुर्मुखराजा जोरांत कण्हत बोलला, "अरे, माझ्या अंगरक्षका! बघतोस काय? हा चिता माझ्यावर हल्ला करण्यापूर्वी आधी त्याच्यावर बाण सोड नि त्याला मार. या मूर्ख रानटी तरुणाकडून धनुष्यबाण ओढून घे."

हे शब्द ऐकून अंगरक्षक कांही बधला नाही. उलट त्याने विचारले, "महाराज! चित्त्याला मारल्यावर अर्धे राज्य देईन, हे शब्द आपणच बोलता होतात ना?"

"हो रे! मीच बोललो होतो. माझ्यावर हल्ला करण्यापूर्वी या चित्त्याला मारुन टाक." दुर्मुख किंचाळला. "महाराज, जर आपण आम्हा दोघांनाही अर्धे अर्धे राज्य देऊन टाकलेत, तर आपल्याला काय बाकी उरेल?" अंगरक्षकाने सरळ विचारले.

"अरे! मला माझे प्राण वाचवायचे आहेत, प्राण! समजलं कीं नाही?" दुर्मुख जोरांत ओरडला.

त्या रानांतल्या तरुणाने एकवार भोळ्या नजरेने दुर्मुखराजा आणि अंगरक्षकाकडे पाहिले नि म्हटले, "मला राज्य नको कीं अर्धे राज्य नको. पांच मोहरा दिल्यात कीं झालं!" असं म्हणून त्याने दुर्मुखराजावर हल्ला करायला टपलेल्या चित्त्यावर नेम धरुन बाण सोडला.

तो बाण सरळ चित्त्याच्या पोटांतच घुसला. चित्ता गरजला, परंतु त्याच्या पंजाच्या माऱ्यांत आलेल्या दुर्मुखराजाची फांदीवरची पकड सुटली आणि तो धप्पकन जमिनीवर खाली पडला. आणि त्याच्या जोडीला तो चित्तादेखील धाडकन खाली कोसळला.

**(अपूर्ण)**







वेताळ कथा

# प्रभावी बीज

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरचे शव खाली उतरवले, खांद्यावर घेतले, आणि तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, तू इतके कठोर परिश्रम करतो आहेस. त्याचं कारण कांही माझ्या लक्षांत येत नाही. परोपकाराच्या नांवाखाली कांहीतरी विशेष काम करण्याचा वेडा विचार तुझ्या मनांत घट्ट रुजलेला दिसतोय. हा शुद्ध अविचारी-पणा आहे. मी तुला परमेश नांवाच्या अशाच परोपकारी, पण अविचारी व्यक्तीची गोष्ट सांगतो. ती लक्षपूर्वक ऐक. परोपकाराच्या नांवाखाली त्याने



स्वतःचेच नव्हे तर आपल्या मुलाचे आयुष्य-देखील बिघडवले.'' आणि वेताळाने परमेश व त्याचा मुलगा अंजनकुमार यांची गोष्ट सांगायला सुरवात केली.

जगन्नाथपुरीचा परमेश हा एक परोपकारी सद्गृहस्थ होता. त्यासाठी त्याने आपले शेत, घर आणि सोने नाणें देखील गहाण ठेवले, व त्यावर कर्ज घेतले होते. मरतेवेळी त्याने आपला पुत्र अंजनकुमार याला सांगितले, ''मी तुझ्यावर मोठा अन्याय केला आहे. आंता आपली जी एकूण संपत्ती आहे, त्यापेक्षां कर्जाचा बोजा जास्त आहे. तरीदेखील तू धीर सोडूं नकोस. परोपकार करायचे सोडूं नकोस. तुझ्या आईची नीट काळजी घे. जर तुला कांही उपाय सुचला नाही, तर गांवाचा पुजारी रामावतार यांना जाऊन भेट व त्याला सल्ला विचार. त्यांनीच मला परोपकाराचा गुण अंगात बाणवण्यासाठी प्रोत्साहन दिले होते.

परमेश मृत्यू पावल्यानंतर गांवकऱ्यांनी त्याच्या घरावर धाड घातली. ज्याच्या हातांत जी वस्तू मिळाली, ती त्याने कर्जाच्या वसुली-साठी म्हणून उचलून नेली. सगळं संपल्यानंतर-देखील अंजनकुमारावर हजार मोहरांचं कर्ज बाकी होतं.

त्यावेळेला वराह नांवाच्या एका सावकाराने त्याला सांगितलं, ''परमेश अत्यंत प्रामाणिक गृहस्थ होता. तुला जे हजार मोहरांचं कर्ज फेडायचं आहे, त्यासाठी मी जामीन राहीन. पण जोपर्यंत तुझ्याकडून कर्जाची फेड होत राहील, तोपर्यंत तुझ्या आईने माझ्या घरी घरकामाची नोकरी करायला हवी.''

हे ऐकून अंजनकुमारच्या तोंडून संतापाने शब्दच फुटेना. अचानक त्याला आपल्या पित्याची आठवण आली. तो रामावतार यांना भेटायला त्यांच्या घरी गेला.

रामावतारने मोठ्या प्रेमाने अंजनकुमारचे स्वागत केले आणि म्हटलं, ''तुझ्या पित्याने जीवनभर परोपकार केला. त्याचा हा परोपकार, तुझ्या पित्याचे हेच पुण्य तुझे हित करील.''

''महाराज, परोपकार आणि पुण्य करुन माझ्या पित्याला काय लाभ झाला, ते मला कधी कळलंच नाही.'' अंजनने तिरस्कारयुक्त स्वरांत म्हटले.

''रामावतारने त्याची समजूत घालण्यासाठी



म्हटले, ''कुमार, तुझ्या पित्याबद्दल तुला बरीच कमी माहिती आहे रे! लहानपणीच त्यांना एका मोठ्या भयंकर रोगाची लागण झाली होती. त्या आजारांत रोगी दिवसेंदिवस अशक्त होतो आणि आजार वाढतो. साऱ्या शरीराला कांटे टोंचताहेत अशा तीव्र वेदना होतात, त्या सहन होत नाहीत. अशी पंधरा वर्षे दुखणें वाढत जाते आणि रोगी मरतो. पण तुझ्या पित्याने परोपकाराचे व्रत घेतले, आणि त्यामुळें त्या असाध्य रोगांतून त्याची मुक्तता झाली. तू नीट विचार कर. तुझे वडील स्वतःसाठी आणि आपल्या कुटुंबासाठी संपत्ती सांठवता सांठवता या आजाराने तडफडत राहिले असते, तर तुला चालले असते?''

''पुराव्याशिवाय कांही मी परोपकाराच्या सामर्थ्यावर विश्वास ठेवायला तयार नाही.'' अंजनकुमारने ठामपणे सांगितले.

''तर मग एक काम कर. तू रघुनाथ वैद्यबुवांना जाऊन भेट. तुझ्या पित्याला जो भयानक आजार झाला होता ना, त्या रोगाचे निदान या वैद्याने केले होते.'' रामावतारनी सांगितले.

अंजनकुमार सरळ रघुनाथच्या घरी गेला आणि आपण कां आलो ते सांगितलं. रघुनाथने त्याला नीट न्याहाळून नंतर म्हटले, ''तुझे वडील ज्या रोगाची शिकार झाले होते, त्या रोगाला वैद्यकशास्त्रांत कांहीही औषध नव्हतं. ही गोष्ट तुझ्या वडिलांना मी सांगितली. त्यानंतर ते रामावतारांकडे गेले. मला माहिती नाही कीं त्यांनी काय जादू केली, पण जोपर्यंत तुझे वडील जिवंत होते, तोपर्यंत ते निरोगी होते. कोणताही रोग



त्यांना शिवूं शिकला नाही. तुझ्या पित्याला जे शांतपणे मरण प्राप्त झाले, तसं मरण फारच थोड्या लोकांच्या भाग्यांत असतं.''

आता मात्र कुमारला रामावतारांच्या शब्दावर थोडाथोडा विश्वास वाटूं लागला. तो पुन्हां त्यांच्या घरी गेला आणि म्हणाला, ''आपण खरं काय तेच सांगितलंत. आता मी काय करुं ते मला सांगावं.'' रामावतार यांनी एक लहानसे कापडी गांठोडे आणून उघडले व म्हटले, ''यांत कांही बिया आहेत. हे बी पेरलं कीं दुसऱ्या दिवशी त्यांतून रोप बाहेर येतं आणि आठवड्यानंतर त्याचा वृक्ष होतो. असा वृक्ष झाला कीं तो माणसांना छाया आणि पक्षांना आश्रय देईल. आता असा वृक्ष इतरांच्यासाठी उपयोगी पडेल अशी योग्य जागा तू शोध, आणि तिथें एक बी



पेर. यालाच परोपकार म्हणतात, त्यामुळे तुझे भले होईल.''

कुमारने ते गाठोडे उचलले. त्या गांवातून दुसऱ्या गांवी जाणाऱ्या रस्त्याच्या ओसाड भागांत त्याने रस्त्यालगत एक खड्डा खणला. त्या खड्ड्यांत सोन्याचे एक नाणें त्याला मिळाले. त्या नाण्याच्या एका बाजूवर लक्ष्मी व एका बाजूवर विष्णूचे चित्र होते.

कुमारने त्याजागी एक बी पेरली व स्वतःशीच तो पुटपुटला, ''आज मी करतो आहे त्या परोपकाराचं हे प्रतिफळ होऊं दे.'' नंतर तिथून तो दुसऱ्या गांवी गेला आणि एका घरासमोर थांबला.

तितक्यांत त्या घराचा मालक राकेश दार उघडून बाहेर आला आणि कुमारकडे संशयाने नजर टाकीत म्हणाला, ''हल्लीं आमच्या गांवात चोरांची भीती फार वाढली आहे.'' आणि लगेच त्याने कुमारला घट्ट धरून ठेवले आणि त्याच्या सामानाची तपासणी केली. त्यांत त्याला ती बियांची पुरचुंडी आणि सोन्याचे नाणे मिळाले.

ते नाणे बघून तो चकित झाला व म्हणाला, ''हे तर आमच्या देवालयांत पुजले जाणारे पवित्र नाणे आहे. सहा महिन्यांपूर्वी हे हरवले होते. तूच ते चोरलं असशील.'' असं म्हणून त्याने कुमारला ओढतच घरांत नेलं.

घरांतल्या सर्वजणांनी ते नाणं ओळखलं, आणि कुमारला ते सारे वाईटसाईट शिवीगाळ करुं लागले. तेव्हां अंजनकुमारने अगदी दीनवाण्या स्वरांत म्हटले, ''महाराज, माझे वडील परमेश यांनी परोपकार हा आपल्या जीवनाचा आदर्श बनवला, आणि त्यासाठी अनेक कष्ट सोसले. त्यांच्या मरणानंतर मीदेखील त्या आदर्शाचं पालन करण्याचे ठरवले आहे. वाटसरुंना आसरा मिळावा म्हणून मी एका वृक्षाचं बी त्या जागी पेरायचं ठरवलं. त्यासाठी जो खड्डा खणला, त्यांत मला हे नाणं सांपडलं. खरंच, जर हे नाणं तुमचं असेल, तर तुम्ही हे ठेवा. पण मला चोर म्हणूं नका हो. माझ्या पित्याच्या आत्म्याला त्यामुळे धक्का बसेल.''

अंजनकुमार हा परोपकारी परमेशाचा मुलगा आहे असं जेव्हां त्या लोकांना समजलं, तेव्हां ते खजील झाले व आपल्या गैरसमजाचा त्यांना पश्चात्ताप झाला. कुमारला रामेश म्हणाला, ''खरंच, तू पित्याचा खरा पुत्र शोभतो आहेस.



तुझं या गांवात येणं हे आमचं सौभाग्य आहे. मी तुला जमीनदाराच्या घरी घेऊन जातो, चल.'' दोघेही जमीनदाराकडे जायला निघाले. वाटेत रामेशने जमीनदाराची कहाणी सांगितली.

जमीनदाराची सोळा वर्षांची मुलगी राधिका ही एका विचित्र रोगाने आजारी होती. त्यामुळें ती कमालीची अशक्त झालेली होती. दिवसें दिवस तिची प्रकृती खालावत चालली.

अन्नावरची वासना उडाली, जेवण पचेना. ''ह्या रोगावर कोणतेही औषध नाही'' असे वैद्यांनी स्वच्छ सांगितले. एका वैद्याने तर हेही सांगितले कीं या रोगाची लागण झाली तरी पुरुष पंधरा वर्षांपर्यंत जिवंत राहातात, पण स्त्रिया मात्र दोन वर्षांपेक्षां जास्त जगत नाहीत. राधिकाच्या आजाराला महिनाभराने दोन वर्षे पूर्ण झाली असती.

रामेशने अंजनकुमारला ही माहिती सांगून पुढें म्हटले, ''याबाबतींत तुझी मदत नक्की होऊं शकेल. एका वैद्याने जमीनदाराला सांगितले आहे कीं जे प्रभावी बी पेरल्यापासून एकाच दिवसांत रोप उगवते, आणि आठवडाभरांत त्याचा महावृक्ष बनतो, असले शंभर महावृक्ष ज्या उद्यानांत असतील, अशा उद्यानांत राधिकेने एक संपूर्ण दिवस राहिलं पाहिजे. त्या वृक्षांच्या हवेमुळे ती पुन्हां बरी होऊं शकेल आणि इतरांसारखी प्रकृति निरोगी राहील. तुझ्याजवळ ते प्रभावी बियाणें आहे. त्याच्या मदतीने हे काम सुकर होईल.''

जमीनदाराने कुमारची कहाणी ऐकल्यावर



त्याने त्याला लागलीच एक खूप मोठे उद्यानवन दाखवले व तिथली मोकळी जागाही दिली. कुमार त्या जागी बिया पेरायला लागला. पण त्याच्या जवळच्या बिया संपल्या.

फक्त एकच बी कमी पडत होती. कुमारने रामावतारकडे ही माहिती कळवून सल्ला मागायचे ठरवले. तितक्यांत एक मांत्रिक तिथे येऊन म्हणाला, ''राधिकाच्या आजारपणावर आणखी एक उपाय मला माहीत आहे. मी माझ्या मंत्र शक्तीने तिच्या आजार दुसऱ्या कुणाच्या तरी शरीरांत घालूं शकेन. पण त्या व्यक्तीने स्वेच्छेने त्या आजाराचा स्वीकार केला पाहिजे.''

जमीनदार व त्यांची पत्नी, दोघेही हा आजार घेण्यासाठी तयार होते. पण मांत्रिकाने सांगितले कीं आईवडील असले तरी त्यांच्या मनांत हा

आजार घेण्यासाठी चलबिचल होत होती. ते ऐकून अंजनकुमार पुढे आला आणि त्याने तो रोग स्वीकारण्याची इच्छा प्रकट केली.

मांत्रिकाने राधिकाचा रोग मंत्रशक्तीने कुमारच्या शरीरांत घातला. दुसऱ्याच क्षणीं राधिका लगेच पलंगावर उठून बसली, आणि कुमारने कण्हायला सुरवात केली आणि तो धाडकन जमिनीवर कोसळला.

तेवढ्यांत रामावतार तिथें आले व म्हणाले, ''आता माझ्याजवळ त्यापैकीं एकही बी शिल्लक नाही. परोपकार करण्यामधे अंजनकुमारही वडिलांच्यापेक्षां कमी नाही. आता ईश्वरच ह्याचे रक्षण करील.''

अंजनकुमारने पेरलेल्या बियांचे आठवड्या-नंतर महावृक्ष झाले. त्यानंतर एक दिवसभर कुमार त्या वृक्षांजवळ राहिला, व त्याची प्रकृति पूर्ववत झाली.

मुलीच्या इच्छेनुसार तिचे लग्न अंजनकुमारशी झाले. त्यावेळीं जमीनदाराने म्हटले, ''परोपकार करताना किती कष्ट सोसायला लागतात ते आत्ता मला कळलं.''

ही गोष्ट सांगून वेताळने पुढे म्हटलं, ''राजन्, परमेशची परोपकारी बुद्धी ही हित व अनहित या दोन्हींचं कारण आहे. त्याचे पुण्य म्हणून त्याला जे बी मिळाले, त्यांत कमी बिया कां असाव्यात? राधिकाचे आईवडील मुलीचा आजार स्वीकारायला कांकूं करत होते याचं आश्चर्य वाटत नाही कां? माझ्या या शंकांचे उत्तर ठाऊक असूनही तू मौन पत्करलेस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील.''

त्यावर विक्रमार्कनि उत्तर दिले, ''परोपकार करुन जो कीर्ति, प्रतिष्ठा व ऐश्वर्य मिळवायची इच्छा धरतो, तो खरा परोपकारी नव्हे. राधिकाच्या मातापित्यांच्या स्वभावांत निस्वार्थी परोपकारी बुद्धी नव्हती. आता बियांविषयी विचार केला तर एका बीच्या कमतरतेमुळे बाकीच्या बियांचा प्रभाव कमी होत नाही. तसं समजणं हे चुकीचं आहे.''

राजाचे मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार : सुचित्राची कहाणी)*






## स्त्री-हमाल



गुजरातेंतल्या भावनगर संस्थानातल्या राजवाड्यांत अनेक पुरुष सेवक नोकरीला होते. जेव्हां या संस्थानात रेल्वे सुरुं झाली, आणि भावनगर स्टेशन तयार झाले, त्यावेळेल तिथे स्त्रिया हमाल म्हणून नेमल्या जाव्यात असा फतवा काढण्यांत आला होता. अजूनही स्त्री-हमाल असणारे भारतांतले हे एकमेव स्टेशन आहे.

## कासवांचे घर

ईशान्य भारतांतल्या मिझोराम राज्यांत ख्रिश्चन धर्माचे नागरिक जास्त आहेत. सुमारे शंभर वर्षांपूर्वी ख्रिस्ती धर्म या राज्यांत नुकताच येत होता. ही शताब्दी ख्रिश्चन धर्मीयांनी मोठ्या धामधुमींत आणि भव्य प्रमाणांत साजरी केली. एका मोठ्या ढोलाच्या तालावर त्यांनी गाणी गायली आणि नृत्य केले. हा ढोल मिझोराममधल्या एका प्रचंड मोठ्या झाडाच्या बुंध्यातून तासून तयार केलेला होता.



हा बुंधा जेव्हां कापला, तेव्हां तो आंतून पोकळ होता. त्यांत दहा कासवें राहात होती. त्या झाडाच्या खोडांत ती कासवें किती वर्षें राहात

घेतली. त्याकाळी नदी हा प्रवासासाठी प्रमुख मार्ग होता. त्याने त्याची नाव पुलाजवळ उभी केली. पुलाजवळचा हा भाग अतिशय रहदारीचा होता, म्हणून त्याने नाव थांबवून लाटा मोजायला सुरवात केली. ही बातमी वाऱ्यासारखी सगळीकडे पसरली की नदीच्या लाटा मोजायला नवीन सरकारी अधिकारी आला आहे.

लोक आश्चर्यचकित होऊन वेगवेगळे तर्क करुं लागले. कांही असले तरी गांवकरी नित्यानंदाला मान देऊ लागले. गांवात त्याचा मान वाढला. राधालाही गांवात मान मिळूं लागला. हेच राधाला पाहिजे होते.

या मान-सन्मानामुळे त्याचा उत्साह वाढला आणि त्यांनी जबाबदारीची कामे वाढवून घेतली. नोंदणी पुस्तकांमध्ये नोंदणी करताना बाकीच्या नावाड्यांना ''मला त्रास देऊं नका'' असा इशारा करुं लागला. ज्यामुळे लाटा मोजण्याचे काम अर्धवट होईल, त्या कारणासाठी तो जाणाऱ्या-येणाऱ्या नावा तासनतास थांबवू लागला. ज्या नावाड्यांना लवकर जायचे असेल त्यांच्या-कडून नित्यानंद पैसे घेत असे. ह्या कामामुळें नित्यानंद स्वतःवर खूष होता. एक दिवस त्याला पाहिजे असलेली संधी मिळाली. एक दिवस कामावर असताना सोमनाथ व त्याचे कुटुंब शिकाऱ्यांत बसून जात असताना त्याने पाहिले.

सोमनाथ व त्याचे कुटुंब चांगल्या कपड्यात होते. ते नातेवाईकांच्या लग्नाला चालले होते. शिकारा हाकेच्या अंतरावर येताच नित्यानंदने त्यांना थांबवले. सोमनाथला आपला शिकारा का थांबवला हे लक्षात येईना. पण नित्यानंदने त्याला त्यांची नाव जाताना मोजणीत चुका होऊ लागल्या आहेत, असे कारण सांगून तो आपल्या कामात गढून गेला वेळ निघून चालला होता.

बरेच तास निघून गेले, पण नित्यानंदाचे काम संपतच नव्हते. सोमनाथ वेळेवर लग्नाला पोहोचूं शकत नव्हता, म्हणून खूप दुःखी झाला. परंतु नित्यानंदाचे काम सरकारी असल्यामुळे तो ते थांबवू शकत नव्हता.

शेवटी सर्व अपमान गिळून त्याने नित्यानंदाला जाऊं देण्याची विनंती केली. नित्यानंदाने होकार दिला आणि उपहासात्मक हास्य चेहऱ्यावर आणले. यानंतर सोमनाथ व कांता ह्यांनी झाले गेले विसरुन, स्वतःचा मान अपमान सोडून देऊन, नित्यानंद व त्याच्या कुटुंबाशी मैत्री केली.

*(पुर्नकथन : राजी रामन)*







# दयाळू मन

जयद्रथ हा प्रवेग देशाचा राज्यकर्ता होता. पाऊस न पडल्यामुळे राज्याच्या पूर्व प्रांतात दुष्काळ पडला. नागरिकांची बिकट स्थिती झाली. त्यांच्या प्रतिनिधींनी राजाकडे जाऊन परिस्थितीचे वर्णन केले.

जयद्रथाने धन व धान्य देऊन त्यांना मदत केली. तरीही नागरिक दुष्काळाच्या तक्रारी पाठवत राहिले.

''पूर, दुष्काळ किंवा रोगराईमुळे कधीकधी जनतेला अत्यंत कष्टमय जीवन जगावे लागते, आणि तेही नैसर्गिक आहे. त्या अडचणींशी धैर्याने टक्कर द्यायला लागते. राजा किती आणि कशी मदत देत राहाणार?'' जयद्रथाने एक दिवस नाराजीने म्हटले.

तेव्हां त्याच्या मुख्य मंत्र्याने म्हटले, ''महाराज, जिथें समस्या असते, तिथे त्याचे उत्तरदेखील असते. आपण तिथे जाऊन समक्ष परिस्थिती बघितली तर बरे होईल.'' जयद्रथाने तसे करण्याचे ठरवले. पण राजा म्हणून जर तो राज्यांत हिंडत राहिला तर लोकांनी त्याच्याभोवती गर्दी केली असती.

कारण सामान्य लोकांना एरवी राजाचे दर्शन दुर्लभ असते म्हणून वेषांतर करुन तो त्या भागांत हिंडत राहिला.

तिथें दुष्काळ तीव्र होता. एकवेळचे जेवण-देखील लोकांना दुर्मिळ झाले होते. राज्यांतल्या कांही भागांत तशी गरीबी होती. म्हणून राजाला त्यांत कांही नवे दिसले नाही.

ज्या नागरिकांना राजा भेटत होता, त्या सर्वांना जयद्रथ सांगे, ''मी परदेशी आहे. माझ्या देशांतल्या लोकांनाही कधीकधी संकटग्रस्त परिस्थितीशी टक्कर द्यावी लागते. पण माझ्या देशांतले लोक एकजुटीने अडचणींचे निवारण करतात, भरपूर कष्ट करतात आणि संकटातून

निरंजन



बाहेर पडतात. तुम्ही लोक तसं कांही करताना दिसत नाही!'' त्याच्या स्वरांत उपहास होता.

नागरिकांना त्याची टीका ऐकून वाईट वाटले. त्यांनी म्हटले, ''तुम्ही परदेशी आहात. आमच्या काळज्या तुम्हाला कशा समजतील? तुमच्या मनांत आमच्याविषयी थोडीसुद्धां दया, कणव नाही!''

''मीच कशाला, तुमचे महाराज जरी इथे आले तरी तेही हेच म्हणतील.'' जयद्रथ म्हणाला.

एक गृहस्थ रागावून म्हणाला, ''आमच्या महाराजांची पद्धत पाहिली तर तुमच्यासारखंच ते म्हणतील. कारण कष्ट म्हणजे काय ते फक्त कष्ट करणाऱ्याला माहीत असतं. ज्यांचं मन कोमल, दयाळू असतं, त्या गुणनिधीसारख्यांनाच आमच्या वेदना समजतील. तुम्हाला काय समजणार?'' हा गुणनिधी दक्षिण प्रांतात राहात होता. कुणी अचडणींत सांपडला असला कीं गुणनिधी त्याच्या घरी जायचा. त्याची अडचण कळली कीं गुणनिधी गहिवरुन जायचा. मग अंतः-करणाला भिडणारी एक कविता त्याच्या तोंडून बाहेर पडे. ऐकणारेही सदगदित होत, दगडाला देखील त्या कविता ऐकून पाझर फुटे.

दोन दिवसानंतर जयद्रथला गुणनिधी भेटला. प्रजेच्या कष्टाचे वर्णन काव्यरुपाने जेव्हां जयद्रथने ऐकले, तेव्हां त्याचे हृदयदेखील हेलावले. त्याचे डोळे पाणावले.

प्रजेचे दुःख आता त्याला चांगले समजले होते. गुणनिधीसारख्या गुणवंताला राजाचा अधिकारी म्हणून राज्यांतल्या एखाद्या प्रांतात पाठवला तर राज्याचे भले होईल. राजधानींत परतल्यावर जयद्रथने ही कल्पना मुख्यमंत्र्याला सांगितली.

मंत्र्याने कांही क्षण विचार करुन म्हटले, ''महाराज, गुणनिधी एक महान कवी आहे. पण राजाचे अधिकारी होण्यासाठी तो योग्य आहे कीं नाही, त्याची अगोदर परीक्षा घेतली पाहिजे. योग्यता है? माझी आपल्याला नम्र विनंती आहे की आम्ही त्याची परीक्षा घेईपर्यंत आपण त्याला राजाच्या प्रतिनिधीपदावर नेमणूक करुं नये व त्याला याबद्दल कांही सांगू नये.''

''तुम्हाला हवी तर जरूर घ्या. पण परीक्षेचं आयोजन तुम्हीच करायला हवं.'' जयद्रथाने



सांगितलं. मंत्र्याने गुणनिधीला बोलावून घेतले. त्याची शाही बंददास्त ठेवली. दुसऱ्या दिवशी राजा व मंत्री त्याला भेटायला गेले.

मंत्र्याने त्याला म्हटले, ''आपण फार दयाळू मनाचे आहात असं मी ऐकलंय. एका चांगल्या पतीपत्नीमधें समस्या निर्माण झाली आहे, तिचे निराकरण होईल या आशेने. तुम्हाला इथे बोलावले आहे.

त्यांची गोष्ट अशी कीं सुमती व चंद्र या दोघांचा प्रेमविवाह होऊन सुखी संसार सुरुं होता. पण सुमतीचे आईवडील आजारी पडले. त्याचवेळी चंद्रचे आईवडील कर्जाच्या डोंगराखाली दबले गेले. त्यांची परिस्थिती फारच केविलवाणी आली होती. त्यांत दुर्दैवाने एका मुनीने संतापून चंद्रला शाप दिला कीं तो लगेच वृद्ध होईल. चंद्रने गयावया केली. तोपर्यंत मुनीचा राग शांत झाला होता.

मुनीने त्याला सांगितलं, ''आठवड्याच्या आंत एका कोमल, दयाळू अंतःकरण असलेल्या पुरुषाच्या आंगठ्याचे एक थेंबभर रक्त तुझ्या डोक्यावर घातलेस, तर माझ्या शापाचा प्रभाव नष्ट होईल. पण त्यासाठी एक नियमदेखील जोडलेला आहे. पण तो दयाळू पुरुष तुझा नातलग असता कामा नये.''

ही कथा ऐकून गुणनिधी भारावून गेला. त्याने सुमती व चंद्रला भेटायची इच्छा प्रदर्शित केली. मंत्री व राजा त्याला बरोबर घेऊन एका झोंपडीत घेऊन गेले. गुणनिधीने चंद्रची कहाणी पुन्हां



ऐकली आणि त्याच्या परिवाराच्या दुर्दशेवर एक करुण कविता लगेच रचली. ती ऐकून कुणाचेही डोळे पाझरले असते. राजा व मंत्री या दोघांनाही ठाऊक होतं कीं ही कथा खोटी आहे, तरीदेखील ती कविता ऐकताना त्यांच्याही डोळ्यांतून अश्रूसरी ओघळू लागल्या.

गुणनिधीने त्या जोडप्याला सांगितले, "या जगांत सामान्य लोक सुखदुःख भोगतात. जे थोर लोक असतात त्यांची परीक्षा परमेश्वराने घेतलेली असते. मुनीने जरी शाप दिला, तरी परमेश्वर-देखील कुणा दयाळू गृहस्थाला तुमच्याकडे निश्चित पाठवील. कोणतेही संकट कायमचे स्थिर नसते. संकटकाळ संपत आला कीं परमेश्वर कांहीतरी उपाय निश्चितच सुचवतो. मानवाने श्रद्धा ठेवावी म्हणजे परिस्थिती लवकर पालटते." आणि त्या अर्थाची कविता ऐकवली.

त्यानंतर गुणनिधी राजा व मंत्र्याबरोबर तिथून परत राजवाड्यांत गेला.

मंत्र्याने राजाला म्हटले, "महाराज, गुणनिधी नुसताच कवी आहे. त्याचे कविमन आहे. पण तो परोपकार करीत नाही. त्याच्या काव्यातून लोकांच्या कष्टांची माहिती मिळते, पण कष्ट कमी होत नाहीत. राजाचा अधिकारी प्रजेच्या अडचणी, दुःखे, कमी करणारा हवा. त्यांना आधार देणारा हवा. गुणनिधीने चंद्रला नुसता सुमती व चंद्र यांच्या या अडचणीच्या काळांत त्यांना मदत करण्यासाठी देव अवश्य येईल म्हणून शाब्दिक दिलासा दिला. पण जर तो स्वतः दयाळू, कोमल अंतःकरणाचा आहे, तर त्याने स्वतःच्या रक्ताचा थेंब कां दिला नाही? प्रजेचे कल्याण करणाराच अधिकारी व्हायला योग्य असतो. नुसतंच कोमल मन काय कामाचं?"

जयद्रथाने मंत्र्याचा निर्णय मानला आणि या चतुराईबद्दल मुख्यमंत्र्याचे अभिनंदन केले. भावनेच्या भरांत राजाने चुकीचा निर्णय घेतला असता. पण मंत्रीमहाशयांनी राजाला सावध केले. त्यानंतर राजाने गुणनिधीचा सत्कार करुन त्याला परत पाठवले.



# खास बातम्या

## संगणक वाचनालय




भारतांतली पहिली डिजिटल लायब्ररी केरळ-मधल्या त्रिवेंद्रममधे सुरुं झाली आहे. तिचे उद्घाटन राष्ट्रपती डॉ.अे.पी.जे. अबदुल कलाम यांच्या हस्ते झाले. आत्तापर्यंत सुमारे ३०,००० पुस्तके या लायब्ररींत संगणकावर घेतली आहेत. दरवर्षी सुमारे दीडलाख पुस्तके व ताडपत्रांवरची हस्तलिखिते या ग्रंथालयांत नोंदवायची, असा संचालकांचा विचार आहे. सर्व भारतीय भाषांतील पुस्तके त्यांत असतील. ही लायब्ररी ही विद्यापीठाच्या लायब्ररीचा एक विभाग असेल. या उपक्रमाला अमेरिकेंतल्या कार्नेजी मेलन विद्यापीठाने मदत केली आहे. त्यांत डॉ. राज रेड्डी यांनी पुढाकार घेतला होता.

## फुलांचा रंग

मंदिरातल्या पूजेसाठी वापरलेल्या फुलांचा एक नवा उपयोग सांपडला आहे. ही फुले निर्माल्य म्हणून टाकून देण्याऐवजी ती चुरडून त्यांतून रंग काढता येतो. कोलकात्यामधल्या जाधवपूर विद्यापीठांतल्या संशोधक शास्त्रज्ञांनी या फुलांपासून तीन प्रमुख पक्के रंग काढण्यांत यश मिळवले आहे. लाल, पिवळा आणि निळा हे रंग फुलांपासून काढता आले आणि कापड रंगवण्यासाठी त्यांचा नंतर उपयोग होऊं शकेल. या रंगांचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. हा प्रयोग चालूं ठेवणे सहज शक्य आहे. कारण पश्चिम बंगाल हे राज्य फुलांची शेती करण्यांत देशांत तिसऱ्या क्रमांकावर आहे. कर्नाटक व तमिळनाड नंतर पश्चिम बंगालमधे रोज सुमारे ६५०० टन फुले निघतात. स्थानिक बाजारपेठेत येणाऱ्या फुलांपैकी








# राम-कृष्ण

नारायणपुरांत भूपाल हा एक सधन गृहस्थ होता. तो सर्वांशी फार प्रेमळपणे वागत असे. कुणी मदत मागितली तर न कुरकुरता मदत करीत असे.

एक दिवस सकाळीं स्नान केल्यानंतर तो अंगणात पूजेसाठी फुले तोडत होता. एक बारा वर्षांचा मुलगा तिथे आला व त्याला म्हणाला, ''मालक, नमस्कार. आपले नांव भूपालशेठ आहे ना?''

''हो, मीच भूपाल आहे. तू कोण आहेस आणि तुला काय हवंय?'' भूपालने विचारलं.

''माझं नांव कृष्णा आहे. आपल्या घरी काम असलं तर मला नोकरी हवी आहे.'' त्या मुलाने दोन्ही हात जोडून अतिशय नम्रपणे म्हटलं.

भूपालने हंसत विचारलं, ''तुला कसलं काम येतं रे?''

''जे आपण सांगाल ते काम मी करीन. मी लहान होतो तेव्हां माझे आईवडील वारले. मी मामाच्या घरी वाढलो आहे. मामीने घरांतले सगळे काम करायला मला शिकवलंय. आता त्यांची मुलं मोठी झाली आहेत, खर्च वाढतोय म्हणून तिला वाटलं कीं मी बाहेर कुठेतरी काम करुन आपल्या पोटापुरेसं कमवावं. या गांवात आपल्याला खूप मान आहे, म्हणून मी आपल्याकडे आलो.''

भूपाल म्हणाला, ''सध्यां मला कांही नोकर ठेवायची जरूरी नाही. पण हो, तुला जर शिकायचं असेल तर मी त्याची सोय करुं शकेन.''

कृष्णाने भूपालच्या पाया पडून गदगदलेल्या स्वरांत म्हटले, ''खरं म्हणजे मला पुढे शिकायचंय. ह्या वर्षीच मामीने माझी शाळा बंद करुन टाकली.'' कृष्णाच्या डोळ्यांतून अश्रू वाहात होते. भूपालने आपल्या मुलाला, रामला, बोलावले. तो कृष्णच्याच वयाचा होता. भूपालने रामला सांगितलं, ''हा कृष्ण आहे. तुझ्याबरोबर तुझ्या खोलीत राहील. त्याला तुझ्याबरोबर उद्या शाळेत घेऊन जा. मी मास्तरांना आज भेटतो.''

रमेश पंत



"हो बाबा." असं म्हणून राम कृष्णला घेऊन घरांत गेला.

भूपालची पत्नी राजेश्वरी हिला कांही ही गोष्ट आवडली नाही. रागावून ती तणतणली, "आणखी किती अनाथांना आपण आश्रय देणार आहोत, देव जाणे!"

"बघूं या की!" भूपालने हंसत उत्तर दिले.

राजेश्वरीला घरकामांत मदत करुन कृष्ण रामबरोबर शाळेंत जायला लागला. तोपर्यंत राम वर्गात नेहमी पहिल्या क्रमांकावर असे. पण आता कृष्णाचा क्रमांक पहिला व रामचा दुसरा यायला लागला.

हे कळल्यावर भूपाल म्हणाला, "कृष्ण तुझ्यापेक्षां जास्त हुशार आहे. तुला वाटेल तेव्हां अभ्यासांत जरा त्याची मदत घेत जा."

रामला हा सल्ला अपमानास्पद वाटला. त्याने आपल्या आईला सांगितलं, "आई, कृष्णाला आपल्या घरांतून जायला सांग आणि त्याची शाळाही बंद केली पाहिजे. माझाच पहिला क्रमांक नेहमी आला पाहिजे."

राजेश्वरीने त्याला दुजोरा देत म्हटले, "मी आधीच नको म्हटले होते. पण तुझे वडील माझं म्हणणं ऐकतील तर ना!"

बागेत झाडाखाली बसून कृष्ण अभ्यास करीत होता, तिथें ती जाऊन त्याला कडवटपणें म्हणाली, "हे बघ, यापुढे प्रत्येक परीक्षेंत प्रश्नपत्रिकेतला एक प्रश्न तू सोडवायचा नाहीस. समजलं कां?"

"आईसाहेब, पण मला सगळी उत्तरे येतात की!" कृष्णाने आश्चर्याने म्हटले.

"तरीसुद्धा प्रत्येक परीक्षेत प्रत्येक विषयांतला एक प्रश्न तू सोडून दिला पाहिजेस. त्याचे उत्तर लिहायचेच नाही. ही माझी आज्ञा आहे असे समज." राजेश्वरीने कडवटपणे म्हटले.

त्यानंतर मात्र राम पहिला येऊं लागला व कृष्णचा क्रमांक दुसरा येऊं लागला. हा बदल पाहून शिक्षकांना आश्चर्य वाटले. त्यांनी कसून चौकशी केली, तेव्हां खरे कारण त्यांना समजले. शिक्षकांनी कृष्णसाठी वेगळी परीक्षा घेतली आणि त्याला वरच्या वर्गांत बसवले. रामच्या वर्गांतून कृष्ण पुढे गेला म्हणून राम फारच खूष झाला.

शिक्षकांच्याकडून सविस्तर गोष्ट जेव्हां भूपालला समजली, तेव्हां तो शिक्षकांना म्हणाला, "तुम्ही चांगलं केलंत, त्यामुळें कृष्णाला न्याय मिळाला. पण रामचे मात्र ह्यामुळे नुकसान झाले आहे. कुणाचाही मत्सर करणे हे चूक आहे हे रामला कळायला हवे. दुसऱ्यांशी स्पर्धा केली तरच आपली प्रगती होते. हे त्याला समजले पाहिजे. राम एक चांगला विद्यार्थी कसा होईल याची जबाबदारी मी तुमच्यावर सोंपवतो आहे."

शिक्षकांनी जरा विचार करुन उत्तर दिले, "रामचे नुकसान होणार नाही असा मी प्रयत्न करीन."

त्या दिवशी शिक्षकांनी वर्गांत एक गोष्ट सांगितली. एक राजा होता. त्याचा एकुलता एक मुलगा युवराज घोड्यावर बसण्यांत पटाईत होता. तो घोडा भरधांव पिटाळत असे, व त्याचे सहकारी त्याच्या बरेच मागे राहात. ते युवराजाची तोंडभर स्तुती करीत.

एके दिवशी अचानक युवराजाची भेट भिल्लांच्या प्रमुख नेत्याच्या मुलाशी झाली. हा भिल्ल युवक या युवराजापेक्षां जास्त सफाईने व वेगाने घोडदौड करीत असे. ते बघून युवराजाचे मित्र भिल्ल युवकाची स्तुती करायला लागले. साहजिकच युवराजाच्या मनांत असूया निर्माण झाली.

भिल्ल युवकाने एकदा युवराजाला म्हटले, "घोड्याला वेगाने दौडवण्याखेरीज मला आणखीही कांही खास गोष्टी येतात. त्या मी आपल्याला शिकवीन."

"ते कांही मला तू शिकवायची जरूर नाही. मला कोणत्याही स्पर्धेची चीड येते. यापुढे उगीच



माझ्यासमोर बढाई मारुं नकोस.'' युवराजाने संतापून त्याला फटकारले.

एकदा अरण्यांत जाताना युवराज आपल्या घोडेस्वार साथीदारांपासून वेगळ्या दिशेला गेला व रस्ता चुकला. तो अरण्यांतल्या निर्जन भागांत शिरला. तो भिल्ल युवक त्याच वेळी पर्वतदेवीला प्रणाम करुन घोड्यावरुन त्या वाटेने परत येत होता. त्याने युवराजाला पाहून नम्रपणे अभिवादन केले व त्याच्याशी कांही संभाषण करणार, तितक्यांत युवराजाने नाराजीने तोंड फिरवले. दुसऱ्या बाजूला युवराजाने पाहिले, तर झाडाच्या मागे एक वाघ त्यांच्यावर झेप घ्यायच्या तयारींत होता, तो युवराजाला दिसला.

युवराज म्यानांतून तलवार बाहेर काढतोय तोंवर वाघाला पाहून घोडा घाबरला. भिल्ल युवकाला हे दृश्य दिसताच त्याने आपल्या घोड्याला टांच दिली आणि वाघावर नेम धरुन त्याच्यावर आपला भाला फेंकला. नेम अचूक लागला. वाघाने डरकाळी फोडली. तो जमिनीवर कोसळला आणि तडफडूं लागला. युवराजाने वळून पाहिले. काय झाले ते त्याला लगेच समजले. त्याने आपला घोडा भिल्ल युवक जवळ नेला आणि म्हटले ''तू नुसताच उत्तम घोडेस्वार नाहीस. पण केव्हां काय करायला पाहिजे हे ही तुला कळतं. तू माझा जीव वाचवलास, त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.''

ही गोष्ट मुलांना सांगून शिक्षकांनी पुढे म्हटले, ''बघा, जर युवराजाने भिल्ल तरुणाकडून अश्वारोहणां-तल्या कांही खुबी शिकून घेतल्या असत्या, तर वाघाशी सामना करताना तो अयशस्वी झाला नसता. मानव हा जन्मभर विद्यार्थी असतो. जी गोष्ट आपल्याला येत नाही, ती दुसऱ्याकडून शिकण्यांत लाज वाटायचं कारण नाही. जीवनांत आपली उन्नती करायची असेल तर आपल्यापेक्षां जास्त हुशार व्यक्ती आपल्याबरोबर असायला हव्यात. स्पर्धेची संवय असावी म्हणजे व्यक्तीचा विकास होतो.'' रामकडे बघत शिक्षक म्हणाले. दुसऱ्या दिवशी राम शिक्षकांना नम्रपणे म्हणाला, ''माझ्यासाठी एक खास परीक्षा घेऊन मला ही वरच्या वर्गात घाला. मी कृष्णाशी चढाओढ करीत अभ्यास करीन.''

राममधे झालेला हा बदल पाहून शिक्षकांना फार आनंद वाटला.





# जागतिक शांतता ज्योत



अथेन्समधें तेरा ऑगस्टला २८ वे ऑलिंपिक खेळ सुरुं होणार आहेत. त्यांच्या संयोजन समितीने भारताला एक आगळा सन्मान प्रदान केला आहे. ऑलिंपिक ज्योत सांखळी पद्धतीने नेण्यासाठी भारताची प्रथमच निवड झाली आहे. गेल्या मार्चच्या २५ तारखेला ही ज्योत समारंभपूर्वक प्रज्वलित करण्यांत आली आणि पांच खंडांमधून होणारा तिचा प्रवास लगेच सुरुं झाला. हजारों क्रीडारासिकांच्या मनांत ही ज्योत पाहून क्रीडाप्रेम उचंबळून आले. नवी दिल्लींत ही ज्योत १० जूनला सांखळी पद्धतीने मिरवत नेली होती.

ही ज्योत खेळांचे सामने चालूं असेपर्यंत पेटती ठेवतात. ही प्रथा इ.पू. ७७६ मधें सुरुं झाली आणि पुढें ११०० वर्षे चालूं राहिली होती. नंतर मात्र १५०० वर्षें त्यांत खंड पडला. १८९६मधें ऑलिंपिक खेळ पुन्हां सुरुं करण्यांत आले. पण ऑलिंपिक ज्योत मात्र १९२८ मधें ॲमस्टरडॅम इथें झालेल्या खेळांच्या वेळीं पुन्हां प्रज्वलित झाली. सांखळी पद्धतीने ही ज्योत मशालीसारखी हातांतून नेण्याची प्रथा १९३६ मधें बर्लिनमधल्या ऑलिंपिक्सच्या वेळेपासून सुरुं झाली.

ही मशाल प्रज्वलित करण्याच्या विधीयुक्त पवित्र समारंभाला अकरा पुजारिणी उपस्थित असतात. त्यांची प्रमुख पुजारीण ही मशाल एका वक्राकार आरशासमोर धरते. त्यावर सूर्याचे किरण परावर्तित होऊन ही मशाल पेटवली जाते. नंतर ती खेळांच्या मैदानावर पायीं नेण्यांत येते. ही मशाल घेऊन धावत जाणारा प्रत्येकजण थोडे अंतर पार करतो आणि पुढच्या खेळाडूच्या हातांत ही मशाल देतो. ज्या देशांत खेळ आयोजित केले जातात, त्या देशाचा नामवंत क्रीडापटू सर्वांत शेवटी ती मशाल घेऊन मैदानात प्रवेश करतो. साऱ्या मैदानांत एकवार धावत फेरी मारुन तो किंवा ती, ती मशाल घेऊन त्या ज्योतीपात्राकडे जातात आणि या मशालीने ती ज्योत पेटवतात. खेळांच्या स्पर्धा संपेपर्यंत ही ज्योत अखंड तेवत असते, आणि शेवटी ती शांत करण्याचा समारंभदेखील तितकाच भावगंभीर व विधीयुक्त असतो.



अथेन्सच्या यंदाच्या या खेळांच्या ज्योतीचा विषय आहे, ''ज्योत फिरवा, जग मेळवा'' संयोजन समितीने म्हटले आहे ''ही ज्योत दिल्लीला आल्यामुळे ऑलिंपिक चळवळीत भारताचे योगदान आम्ही मान्य केले आहे. ऑलिंपिक खेळस्पर्धा पुन्हां स्वगृहीं (अथेन्सला) होत आहेत. त्यासाठी सर्व भारतीयांना आम्ही हा क्रीडाउत्सव साजरा करण्याचे आवाहन करीत आहोत.''



# किल्ल्यांतली कुत्री

**ब्रह्म**दत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्व काशीजवळच्या स्मशानात एका कुत्र्याच्या जातीत जन्म घेऊन, कुत्र्यांचा सरदार म्हणून रहात होते.

एके दिवशी राजा आपल्या रथांत बसून वनविहार करून सूर्यास्तसमयी किल्ल्यांत परतला. सारथी घोड्यांना तबेल्यांत घेऊन गेला आणि रथ राजवाड्याच्या आवारात उघड्यावर सोडून गेला. त्या दिवशी रात्री मुसळधार पाऊस झाला. रथ पाण्याने भिजून गेला. राजवाड्यांतली कुत्री उतरून खाली आली व रथाला बांधलेल्या वाद्या, घोड्यांचे लगाम, वगैरे कातडी सामान त्यांनी कुरतडून खाल्ले.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर राजाच्या नोकरांनी घडलेले वृत्त राजाला जाऊन कळविले. राजाने संतापून हुकूम सोडला की दिसेल त्या कुत्र्याला धरून ठार करा. राजाज्ञेप्रमाणे राज्यांतल्या सर्व कुत्र्यांचा संहार सुरु झाला. कांही कुत्री राजाच्या शिपायांच्या हातून निसटून स्मशानात बोधिसत्व रहात तेथे गेली व म्हणाली, - "प्रभो, महाराजांच्या रथाचे कातडी सामान कांही कुत्र्यांनी कुरतडून खाऊन टाकले म्हणे. म्हणून महाराजांनी आज्ञा काढली आहे की दिसेल त्या कुत्र्याला धरून ठार करा."

बोधिसत्व विचारात पडले. किल्ल्यांतल्या रथाजवळ बाहेरची कुत्री पोचणे सुद्धां शक्य नाही. कारण किल्ल्यांत रात्रंदिवस पाहारा असतो. याचा अर्थ असा की रथाचे कातडी सामान किल्ल्यांतल्या कुत्र्यांनीच खाल्लेले असणार! तर मग खऱ्या अपराधी कुत्र्यांना पकडून आपल्या अनुयायांचं रक्षण करणे आपले कर्तव्य आहे.

ते कुत्र्यांना म्हणाले - "तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. मी महाराजांना भेटून परत येईपर्यंत तुम्ही इकडेच रहा." असे कुत्र्यांना सांगून बोधिसत्व "धर्माचा जय असो!" "राजाने न्याय द्यावा!" असे मनात म्हणत राजवाड्यांत गेले.



त्या वेळी महाराज राजसभेत सिंहासनावर बसून न्यायविचार करीत होते.

बोधिसत्वांनी सिंहासनाखालून लपून राजसभेत प्रवेश केला व राजासमोर जाऊन उभे राहिले. राजाचे शिपाई बोधिसत्वांना धरायला धावले. परंतु राजाने त्यांना बाजूला रहायला सांगितले.

बोधिसत्वांनी राजाला नमस्कार केला व म्हणाले - "महाराज, आपण राज्यांतल्या सर्व कुत्र्यांचा वध करण्याची आज्ञा केली आहे म्हणे! त्याचे कारण कळू शकेल का?"

"त्यांनी माझ्या रथाचे सर्व कातडी सामान फस्त करून टाकलं आहे. म्हणून तशी आज्ञा काढावी लागली." राजा म्हणाला.

"तो गुन्हा कोणत्या कुत्र्यांनी केला, ते आपल्याला माहीत आहे का?" बोधिसत्वांनी विचारले.

राजाने माहीत नसल्याचे सांगण्यासाठी नकारार्थी मान हलविली. तेव्हां बोधिसत्व म्हणाले - "महाराज, गुन्हेगार कुत्री कोण ह्या गोष्टीची चौकशी केल्याशिवाय सर्व राज्यातल्या कुत्र्यांना ठार करणे हे न्याय्य होईल का? तुमचे शिपाई राज्यांतल्या सर्वच कुत्र्यांना ठार करणार आहेत की कांहींना जिवंत सोडणार आहेत?" बोधिसत्वांनी विचारले.

"राज्यांतल्या सर्व कुत्र्यांना ठार करण्याची आज्ञा मी काढली आहे. परंतु किल्ल्यांत आम्ही पाळलेल्या कुत्र्यांच्या जिवाला कोणत्याही प्रकारचा धोका नाही." राजा म्हणाला.



"आपल्याला गुन्हा करणारे कुत्रे कोण हे माहीत नाही. तरी किल्ल्यांतल्या कुत्र्यांना वगळून इतर कुत्र्यांना ठार करण्याची आज्ञा आपण काढलीत. यामुळे आपला पक्षपात, द्वेष, अविवेक आणि भीति, ह्याच अवगुणांचा पगडा आपल्यावर असल्याचे प्रगट होत आहे. राजपुरुषांत ज्या लक्षणांची आवश्यकता असते त्यात यांपैकी एकही नाही." बोधिसत्वांनी धीटपणे आपली बाजू मांडली.

राजा विचार करून म्हणाला - "तर मग तू आपल्या चातुर्याचा उपयोग करून आमच्या रथाचे कातडी सामान कोणी खाल्ले हे सिद्ध करून दाखव!"

"तो गुन्हा किल्ल्यांत राहणाऱ्या तुमच्या कुत्र्यांचाच आहे, ते मी सिद्ध करून दाखवितो." बोधिसत्व म्हणाले.

"तू सिद्ध करून दाखव, मी आपली आज्ञा मागे घेईन." राजाने हमी दिली.

बोधिसत्वांनी राजाला थोडे ताक व थोड्या दुर्वा आणवायला विनंती केली. राजाच्या नोकरांनी ताक व दुर्वा आणून दिल्यावर बोधिसत्वांनी दुर्वा चटणीसारख्या चांगल्या वाटून घेतल्या व त्यांत ताक कालविले आणि ते किल्ल्यांतल्या कुत्र्यांना प्यायला लावले.

जेमतम दोनतीन मिनिटेच गेली असतील किल्ल्यांतली कुत्रीं ओकू लागली व त्यांच्या पोटातून जीर्ण न झालेले कातड्याचे तुकडे बाहेर पडूं लागले.

ते पाहतांच राजाला आश्चर्यचकित होताना पाहून बोधिसत्व म्हणाले - "महाराज, आपले नोकर कुत्र्यांना पोटभर खायला घालीत नाहीत, म्हणून उपाशी कुत्र्यांनी भुकेने जीव कासावीस झाल्यामुळे रथाचे कातडी सामान खाल्ल्याचे आपण पाहतांच आहां!"

राजाला फार आनंद झाला व म्हणाला - "हे कुत्र्याच्या रूपांत असलेले बोधिसत्वच असणार. आणखी दुसरे कोण असणार?" सर्व दरबाऱ्यांना सांगून राजाने आपले श्वेतछत्र बोधिसत्वांच्या डोक्यावर धरायला सांगितले व त्यांचा सत्कार केला.

बोधिसत्वांनी राजाला धर्मबोध केला, आणि स्मशानांत त्यांचे अनुयायी रहात होते, त्यांच्याकडे निघून गेले.

राजाने कुत्र्यांची राखण करणाऱ्या नोकरांना बोलाविले व चौकशी केली तेव्हां कळले, की ते कुत्र्यांसाठी राज्याकडून मंजूर केलेल्या रकमेतून स्वतः बरीच रक्कम उचलीत होते व त्यामुळे कुत्र्यांना पोटभर खायला मिळत नव्हते. राजाने त्या नोकरांना कामावरुन कमी केले व त्यांच्या जागी कुत्र्यांची राखण करायला नवे नोकर नेमले. त्या दिवसापासून राजाने किल्ल्यातील कुत्र्यांनाच नव्हे तर राजधानीतील सर्व कुत्र्यांना पोटभर खायला घालण्याची व्यवस्था करून दिली.

त्यानंतर राजा बोधिसत्वांच्या धर्मबोधा-प्रमाणे वागू लागला व प्रजेच्या सुखासाठी त्याने अनेक कामे केली.

बोधिसत्वांनी याप्रमाणे इहलोकांत अनेक वर्षे धर्मोपदेश केला आणि अनेकांचा उद्धार केला.







# विष्णुपुराण

बली चक्रवर्ती सुतल लोकांत जाऊन पाताळ लोकाचा सम्राट झाला आणि नित्यनियमितपणें विष्णूची पूजा करीत सुखाने राहूं लागला. देवांना स्वर्ग व इंद्राला स्वर्गाचे राज्य प्राप्त झाले.

बली राही त्या सुतल लोकांच्या द्वारावर वेत्रदंड धारण करून वामन रूपांत विष्णू द्वारपालकाचे काम करीत असतां एकदां रावणाच्या मनांत सुतल जिंकण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न झाली व तो सुतल लोकात गेला. हा गिड्डा आपल्याला काय अडवणार या घमेंडीत रावण प्रवेश करू लागला. तेव्हां वामनरूपातील विष्णूने विराट रूप धारण करून पायाच्या अंगठ्याने रावणाला उडविले. त्या धक्क्याने रावण लंकेत जाऊन पडला.

एका काळी आपण जेथे राज्य केले आणि जेथे सर्वदा सुकाळ होता, तेथे शेतात पिके वगैरे कशी निघत आहेत हे पाहण्यासाठी बली दरवर्षी एकदा भूलोकांत अदृश्य रुपाने येतो. धान्ये चांगली निघावी, त्यांना रोग होऊं नये, यासाठी खतपाणी देतो. पिकांना कृमिकीटकांची बाधा होऊं नये याची काळजी वाहातो. तो येतो तेव्हां त्याच्या स्वागतार्थ दिवाळीचा सण भूलोकांत साजरा होतो. दुसऱ्या दिवशी बलिप्रतिपदा म्हणून बलीची पूजा होते. वामनाने त्रिविक्रम रूप घेऊन आकाशाला व्याप्त केले होते, त्याचे स्मरण म्हणून आकाशदीप-म्हणजे आकाशकंदील लावतात.

दक्षिणेकडील महासागरात बली येतो त्याचे द्वार म्हणून दक्षिण दिशेला एक दीप लावतात. त्याला बलिदीप असे नांव पडले.

बलिचक्रवर्तीचे वंशज पल्लव चक्रवर्ती, त्यांनी बलीच्या नांवे महाबलीपुरम येथे उत्तम शिल्पाचा नमुना असलेले एक नगर वसविले आणि



कांचीपुरम येथे त्रिविक्रम वामनावताराची एक मूर्ती व देवालय निर्मिले.

बलिचक्रवर्तीचे राज्य होते तोपर्यंत चिरडलेल्या क्षत्रिय राजांनी नंतर पुन्हां डोकी वर काढली. बळी तो कान पिळी, हाच न्याय झाला. राजकर्त्यांच्या निरंकुश कारभारामुळे प्रजेचा वाली कोणी राहिला नाही.

तेव्हां विष्णूने दशावतारांपैकी सहावा परशुरामावतार धारण केला आणि एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली.

त्या काळांत सर्व क्षत्रिय राजघराण्यात थोर असा हैहयवंशी राजा कार्तिकियार्जुन हा होता. तो सुदर्शन चक्राचा अंश म्हणून जन्मला होता.

एकदां विष्णू योगमुद्रेत असतां शंख व चक्र यांच्यामध्ये वादविवाद सुरु झाला.

''सहस्त्र किरणधारी सूर्याचे रज गळून पडल्यामुळे त्यांतून विश्वकर्म्याने माझी निर्मिती केली. पृथ्वीवर सर्वत्र व्यापून टाकलेल्या राक्षसांचा मीच तर संहार केला. मला धारण करून विष्णूने चक्रधारी विष्णू ही कीर्ती संपादन केली! तुला नुसते ओरडण्याशिवाय काय येते रे?'' सुदर्शन चक्र शंखाला म्हणाले.

तेव्हां पांचजन्य शंख म्हणाला - ''होय रे, चक्र पुरुषा! एवढा गर्व करण्याचे कारण नाही! तू पृथ्वीवर एक घमेंडखोर राजा म्हणून जन्माला येशील! विष्णू मुनिकुमाराचं रूप घेऊन, लाकडे फोडायच्या एका कुऱ्हाडीसह येऊन तुझा सर्व गर्व हरण करील!'' या शब्दात शंखाने शाप दिला.

तो शाप मिळाल्याने चक्रपुरुष कार्तवीर्यार्जुन नामें जन्माला आला व त्याने पृथ्वीवर चारही दिशा व्याप्त करून टाकणाऱ्या एका विस्तीर्ण साम्राज्याची स्थापना केली. तो भगवंताचा अवतार अशा दत्तात्रेयाचा भक्त व शिष्य होता. त्याच्या कृपेने कार्तवीर्यार्जुनाला अणिमादी अष्ट सिद्धी व अनेक शक्ती प्राप्त झाल्या. त्याला गरज पडे, तेव्हां त्याला सर्व आयुधधारी सहस्त्र हातांची प्राप्त होई,'' असे सूत ऋषींनी सांगतांच निमिषारण्यांतील मुनींनी सूत महर्षींना निवेदन केले - ''मुनिवर्य, दत्तात्रेय हा विष्णूचा अवतारच नाही का? त्या दत्तात्रेयाची कथा ऐकण्याची फार इच्छा आहे!''

सूत महर्षींनी दत्तात्रेयाची कथा सांगायला सुरवात केली:

अत्रि मुनींनी पुत्रेच्छेने विष्णूला भगवंत मानून त्याचे स्मरण करून फार मोठी तपश्चर्या केली.

एका बाजूला ब्रह्मदेव व दुसऱ्या बाजूला महेश



अशा रूपांत विष्णू प्रकट होऊन अत्रि मुनींना म्हणाला - ''मुनिवर्या! मी तुला दत्त म्हणून झालो आहे! आम्ही तिघेही एकच असल्याकारणाने त्रिमूर्तींच्या अंशरूपे मी तुझा पुत्र म्हणून जन्मलो. दत्तात्रेय नांवाने मला सर्व ओळखतील!'' असे सांगून विष्णू अंतर्धान पावला.

त्याच वेळी त्रिमूर्तींच्या अर्धांगिनी म्हणून गर्व करीत असलेल्या सरस्वती, लक्ष्मी व पार्वती यांच्या समोर येऊन नारदाने अत्रि-मुनींची साध्वी स्त्री अनुसूयेच्या पातिव्रत्याचा महिमा त्रिलोकात अद्वितीय असल्याचे सहेतुक सांगितले आणि असेही सांगितले की तिने त्रिमूर्तींना व त्याच्या अर्धांगिनींना साध्य नव्हते ते करून दाखविले.

अनसूयेने गंगेला त्रास देणाऱ्या पापांच्या भुतांचे निर्मूलन केले; नारदाने लोखंडाच्या घुगऱ्या करून तिला खायला दिल्या, त्या तिने खाऊन पचवून दाखविल्या. सूर्याचा उदय थांबवून रोखून ठेवणाऱ्या सुमतीला सूर्योदय होऊं देण्यास समजावून सांगितले, आणि सूर्योदयानंतर तिचा पती मरण यायला तेव्हां अनसूयेने सुमतीच्या पतीला पुनर्जिवित करून दाखविले.

अनसूयेच्या पातिव्रत्याची थोरवी ऐकून तिघी देवी अनसूयेचा द्वेष करूं लागल्या आणि तिघींनी त्यांचे त्यांचे पती आल्याबरोबर अनसूयेचे पातिव्रत्य भंग करून यायला पतींना पाठविले.

ब्रह्मा, विष्णू व महेश मुनिवेष धारण करून अत्रिमुनींच्या आश्रमांत गेले आणि 'भवति भिक्षान् देही!' म्हणून आश्रमासमोर अतिथि रूपे उभे राहिले. तोपर्यंत अत्रिमुनि तपश्चर्या पुरी करून आश्रमांत परतले नव्हते. अतिथि सत्कार करण्याचा भार एकट्या अनसूयेवर येऊन पडला.





अनसूयेने त्रिदेवांचा सर्व प्रकारे अतिथि-सत्कार करून त्यांना जेवायला बसायला सांगितले.

तेव्हां कपटवेष धारण करून आलेल्या त्रिमूर्तींनी अनसूयेला म्हटले - ''हे साध्वी! आमचं एक अखंड व्रत आहे, ते... ते.'' असे मागे पुढे करीत राहल्यावर म्हणाले - ''तू नग्न होऊन वाढलेस तरच आम्ही जेवू.''

अनसूयेने ''अस्सं होय? तर ठीक तसंच!'' असे म्हणत त्यांच्यावर पाण्याने प्रोक्षण केले. त्या बरोबर तिघां अतिथींना अर्भक रूप प्राप्त झाले. त्यांना पाहून अनसूयेचे मातृत्व उचंबळून आले. तिने त्या तिघां तान्ह्या मुलांना मांडीवर घेऊन त्यांना दूध पाजले. त्रिमूर्ती अनसूयेच्या मांडीवरच झोपले.

अनसूयेने त्यांना पाळण्यांत झोंपविले आणि म्हणाली - ''आज त्रिमूर्ती माझी मुले झाली. माझं केवढं भाग्य! सर्व ब्रह्मांडच यांचा पाळणा, चार वेद त्या पाळण्याच्या चार दोऱ्या, आणि प्रणवनाद ओंकार त्यांना झोंपविणारी ओवी!'' या शब्दांत तिने ओवी म्हटली.

त्याच वेळी आश्रमांत कोठून तरी एक पांढरा शुभ्र बैल आला आणि दारावर येऊन उभा राहिला आणि मान हलवून कांहीतरी बोलत असल्या-सारखा भासला. नंतर एक मोठा गरुड पक्षी आपले पंख फडफडवून आश्रमावर घिरट्या घालू लागला. त्यानंतर एक राजहंस चोंचीत एक कमळ धरून आश्रमाच्या उंबरठ्यावर उतरला.

त्या पाठोपाठ चार रंगांची गोजिरवाणी कुत्र्याची पिले शेपट्या हलवीत घरात शिरलीं. त्यांच्या बरोबर एक नाग आपली फडा काढून पुढे आला. इतक्यात महती वीणेवर नीलांबरी रागिणी वाजवीत नारद व त्याच्या पाठीमागून सरस्वती, लक्ष्मी व पार्वती त्रिदेवी आल्या.

नारद अनसूयेला म्हणाला - ''माते, या तिघी साध्वी उंबरठ्यावर त्यांच्या पतींच्या वाहनांना पाहून तिघींचे पती येथे असतील म्हणून त्यांच्या शोधार्थ आल्या आहेत. बराच वेळ झाला तरी पतिदर्शन न झाल्याने त्या पतिविरहाने कासावीस झाल्या आहेत. त्यांचे पती त्यांना परत कर बाई!''

अनसूया तिघींना नमस्कार करून नम्रपणे म्हणाली - ''मातांनो! त्या पाळण्यांत तीन तान्ही मुले आहेत, तुमचे पती असतील तर घेऊन जा!''

तिघी देवी थक्क होऊन पाहू लागल्या. तान्ही मुलं तिन्ही एक सारखींच दिसत होती आणि गाढ



झोपी गेली होती. तिघी परस्परांची तोंडे पाहून मागेपुढे करू लागलेल्या पाहून नारद म्हणाला - ''तुम्हाला आपला पती ओळखता येत नाही का? अशा लाजू नका! लवकर उचला आपापल्या पतीला!'' घाई-घाईने तिघींना एकेका तान्ह्या मुलाला उचलले.

तिघी तान्ही मुलं त्रिमूर्ती होऊन प्रगट झाली. सरस्वतीने शंकराला, लक्ष्मीने ब्रह्मदेवाला आणि पार्वतीने विष्णूला उचलून घेतले होते. तिघी लाजल्या आणि दूर जाऊन उभ्या राहिल्या. तेव्हां ब्रह्मा, विष्णू व महेश परस्परांना चिकटून एक झाले.

त्याच वेळी अत्रिमुनी आश्रमात परतले. आपल्या आश्रमात त्रिमूर्तींना पाहून मुनिवर्यांनी हात जोडले. त्या बरोबर त्रिमूर्ती दत्तात्रेय रूप घेऊन उभे होते. मध्ये विष्णू व आजूबाजूला ब्रह्मा आणि शंकर यांची मुखे होती. दत्तात्रेयाला सहा हात होते आणि त्या हातांत शंख, चक्र, गदा, पद्म त्रिशूल आणि कमंडल होते. खांद्यावरच्या झोळींत भिक्षापात्र लोंबत होते. अशा तऱ्हेने त्रिमूर्ति दत्तात्रेय होऊन अत्रि व अनसूया यांचे पुत्र म्हणून अवतरले.

नारदाने नादनामक्रिया रागात दत्तात्रेयाचा स्तोत्रपाठ सुरु केला. ''शंकराचे वाहन नंदी हा त्या दत्तात्रेयाच्या पाठीमागे गोऱ्हा होऊन उभा राहतो. चार वेद कुत्र्याच्या चार पिलांसारखे बरोबर राहतात. नाग, साप, गरुड व हंस, आजूबाजूला फिरत असतात. दत्तात्रेय सर्वदा महर्षीसारखा जंगलात हिंडत राहून एकांतात आत्मानुसंधान करीत राहतो. अनेक दिव्य शक्ती



आणि अष्टसिद्धी देणाऱ्या दत्तात्रेयाची मुनी सिद्ध व ज्ञानी सर्वदा आराधना करीत राहतात. असा हा दत्तात्रेय हैहय वंशाचे आराध्य दैवत म्हणून पूजिला जातो.''

कार्तवीर्यार्जुन दत्तात्रेयाची पूजा व अर्चना करून महाबलशाली झाला आणि विजययात्रेला निघाला.

जमदग्नी ऋषींच्या मुलांत राम हा सर्वांत धाकटा. तो नेहमी कुऱ्हाड धारण करून आश्रम आणि जनपद स्थापन करण्यासाठी जंगले कापीत सर्वदा फिरत असे. त्याने हिमालयांत राहून तपश्चर्या केली व शंकराला प्रसन्न केले. शंकराने त्याला महाशक्तिशाली असा परशू दिला. तेव्हां पासून तो परशुराम झाला. भृगु वंशात जन्मला असल्याने त्याला भार्गव राम नांवही प्राप्त झाले.

एकदां परशुरामाची आई रेणुका नदीवर

स्नानाला व पाणी आणायला गेली, व बराच वेळ झाला तरी परतली नाही. जमदग्नी ऋषींनी दिव्य दृष्टीने बायको काय करीत होती हे पाहिले. चित्ररथ गंधर्व अप्सरांसह जलक्रीडा करीत होता. ती जलक्रीडा रेणुका देहभान विसरून पहात होती. त्यामुळे जमदग्नी ऋषींना फार राग आला.

बायको परत आल्यावर जमदग्नी मुनींनी आपल्या सर्व मुलांना बोलावून घेतले आणि आईचे डोके छाटून टाकायला सांगितले. परशुरामाच्या वडील भावांपैकी कोणीही आईचे डोके कापायला तयार झाला नाही. परशुराम जंगलातून फिरून परतल्यावर जमदग्नी मुनींनी त्याला त्याच्या वडील भावंडांची डोकी आणि आईचे डोके कापून टाकायला सांगितले.

परशुरामाने उलट उत्तर न देतां पित्याच्या आज्ञेप्रमाणे एका घावात सर्व भावांची डोकी व आईचे डोके छाटून टाकले. जमदग्नी ऋषी मुलावर खूष झाले व त्यांनी त्याला काय हवे ते मागून घ्यायला सांगितले.

परशुराम म्हणाला - ''माझ्या सर्व भावांना व आईला पुनर्जीवित करावे!''

जमदग्नी ऋषींनी त्यांना पुनर्जीवित केले. आपल्या तपश्चर्येच्या महिम्यावर इतका विश्वास असलेल्या आणि बुद्धिमान अशा परशुरामावर ऋषी प्रसन्न झाले व आशीर्वाद देऊन म्हणाले - ''परशुरामा! तू चिरंजीवी होशील!''

कार्तवीर्यार्जुन आपली विजययात्रा संपवून आपली राजधानी माहिष्मती येथे परत येत असतां वाटेत जमदग्नी ऋषींचा आश्रम लागला. त्यावेळी राजा व त्याचे सैन्य फार भुकेले होते. जमदग्नी ऋषींकडे कामधेनूचा अंश असलेली होमधेनू होती. तिच्या साहाय्याने जमदग्नी ऋषींनी कार्तवीर्यार्जुन व त्याच्या सैन्याचे उत्तम प्रकारे आदरातिथ्य केले. त्या गाईला काय पाहिजे ते देण्याची शक्ती असल्याचे कार्तवीर्याला कळले. त्याने विचार केला, कीं अशी गाय आपल्याकडे असली तर सैन्याला रसद व पाण्याची उणीव कधीच भासणार नाही. म्हणून त्याने आपल्या सैनिकांना आज्ञा केली की त्या गाईला माहिष्मतीला धरून घेऊन चला. जमदग्नी ऋषी गाईला अडवून धरायला आले. त्यांना जमिनीवर ढकलून सैनिक गाईला धरून घेऊन गेले.







# ती जमीन सपाट कशी बनवली?



**स्कॉटलंड** या देशाचे सौंदर्य अभूतपूर्व आहे. हा दोन भागांत विभागला गेला आहे. दक्षिणेची सखल हिरवी भूमी आणि उत्तरेकडची डोंगरराजी.

उत्तरेकडचा हा भाग खरोखरीच अतिशय देखणा व नयनमनोहर आहे. पर्वतांच्या रांगांमधून लहानलहान दऱ्याखोरी आहेत. प्रशस्त निळेशार पाण्याचे प्रवाह आहेत, त्यांना लॉक्स म्हणतात. या भूमीचे निसर्गसौंदर्य फारच सुंदर व गूढरम्य आहे. इथें मानव नतमस्तक होतो. सृष्टीदेवता आपल्या साऱ्या वैभवानिशी इथें अजूनही सर्वश्रेष्ठ व उन्नत आहे.

मात्र याला एक अपवाद आहे. जर तुम्ही लॉक शीलच्या किनाऱ्यावरुन आंतल्या बाजूला चालत गेलात, तर तुम्ही एका छोट्या दरीत पोंचाल. पर्वताच्या मांडीवरच जणूं कांही ती दरी बसलेली आहे. ती पाहून तुम्ही आश्चर्यचकित व्हाल. आजूबाजूच्या सगळ्या दऱ्याखोऱ्यांतून ओबडधोबड दगडांच्या राशी विखुरलेल्या आहेत आणि ही दरी मात्र अगदी सपाट आणि मऊशार कशी काय झाली? पण थांबा, याच्यामागे एक विलक्षण कथा आहे.

फार फार पूर्वीच्या काळांत या दरींतदेखील आसपासच्या दऱ्यांसारखे अणकुचीदार धोंडे, फत्तर व खडक पसरलेले होते. सारी जमीन ओसाड आणि खडकाळ होती. तिथें चालणंदेखील मुष्कील होतं, तेव्हां शेतीबागाईत तर दूरच! साहजिकच तिथे राहणारे लोक गरीब होते, कारण पीक काढण्याजोगी जमीन त्यांच्याजवळ नव्हती. त्यांची गुरेढोरेही भुकेने तडफडून मरत होती, कारण त्यांना तिथें पुरेसा चारा नव्हता. त्यांचे जीवन अतिशय हलाखीचे होते.

त्या दरीच्या खालच्या बाजूला निम्म्या वाटेवर डोंगराच्या पायथ्यापाशी एक छोटेसे घर होते. त्यांत एक ज्ञानी वयोवृद्ध सद्गृहस्थ होता.

त्याने अनेक पोथ्यापुराणे वाचलेली होती. त्यामुळें त्याला प्रत्येक अडचणीवरचा उपाय माहिती होता.

एके दिवशी त्या भागांतल्या तरुणांनी सभा बोलावली आणि ठरवले कीं आता हे कष्ट फार झाले! यापुढे अडचणी सहन करणे अशक्य होते. म्हणून ते खेडे सोडून सर्वांनी दुसरीकडे, जिथें शेतीला चांगली जमीन असेल, अशा नव्या भागांत वस्ती करायची. पण अशी भूमी कुठल्या बाजूला सांपडेल?

"चला, आपण आपल्या ज्ञानीबाबांनाच विचारुं या." कुणीतरी सुचवलं आणि सर्वांनी त्याला संमती दिली. ज्ञानीबाबांना आपली अडचण सांगायला ते डोंगर उतरुन खाली गेले.



त्या सर्वांनी बाबांना सांगितलं, "आमच्या जमातींत आम्ही सगळ्यांपेक्षां गरीब आहोत. पण त्याचा अर्थ आम्ही आळशी आहोत असं नाही. आमची दरी व माळ लहान आहे, खडकाळ आहे नि ओसाड आहे. हा भाग सोडून आम्हाला दुसरीकडे जायचे आहे. तेव्हां जिथले डोंगर दयाळू आहेत, आणि शेतीबागायतीला वाव मिळेल अशी भूमीही कृपाळू आहे अशी भूमी आम्हाला कुठल्या दिशेला मिळेल, ते आपण सांगाल कां?"

बाबांनी जरा वेळ विचार केला. खाली वाकून त्यांनी जमिनीवरची मूठभर माती हातांत घेतली.

"आपल्या या खोऱ्याइतकी मऊ माती कुठे ही सांपडणार नाही." त्यांनी सांगितलं.

"ते खरं आहे. पण हा दगडमाळ इथून हलवणे हे कांही सामान्य माणसांना जमणारे काम नाही. ते आम्हाला कसं काय करता येईल?" तरुणांनी उत्सुकतेने विचारलं.

"हूंऽऽऽ" बाबांनी गंभीरपणे विचार करुन म्हटलं, "बघूं या, तुमच्या या समस्येचं कांहीतरी निवारण व्हायला हवं."

त्या काळांत पृथ्वीवर राक्षस राहात होते. तसे दोन अजस्त्र आणि महाशक्ती शाली राक्षस शेजारच्या उंच पर्वतावर राहात होते. त्या दोघांपैकी कोण जास्त ताकदवान, यावर त्यांचे नेहमी भांडण होत





असे. त्या दिवशी त्या दोघा राक्षसांना शोधायला म्हणून ज्ञानीबाबा त्या पर्वतावर चढून गेले.

"असे भांडत बसणें म्हणजे मूर्खपणा आहे. त्यामुळे तुमच्यापैकी कोण श्रेष्ठ हा निर्णय तुम्ही कधीच घेऊं शकणार नाही." ज्ञानीबाबांनी त्यांच्यासमोर एक प्रस्ताव ठेवत म्हटले, "मी फक्त एक म्हातारा माणूस आहे. पण मला पूर्णपणे विश्वास आहे कीं हा वादाचा मुद्दा मी कायमचा मिटवूं शकेन. तुम्ही उद्यां खालच्या खोऱ्यांत या. तुमच्या ताकदीचे प्रमाण ठरवायला मी तुम्हाला एक काम देईन. म्हणजे तुम्हा दोघांच्यापैकी जास्त बलशाली राक्षस कोण आहे ते सर्वांना दिसेल आणि कळेल."

दुसऱ्या दिवशी उजाडताच दोघे राक्षस पर्वत उतरुन जेव्हां खोऱ्याकडे जायला लागले, तेव्हां त्यांच्या पावलांचा आवाज ढगांच्या गडगडाटा-सारखा वाटत होता. ज्ञानीबाबा आणि खोऱ्यांतले झाडून सारे जण पुढे आले, आणि त्यांनी या दोन्ही राक्षसांचे स्वागत केले.

"आता बघायला हवं, हे लहानलहान दगड तुम्ही किती अंतरापर्यंत फेकूं शकाल? तुमच्या पर्वताच्या शिखरापर्यंत फेकता येईल कां?" बाबांनी त्या पर्वताकडे बोटाने खूण करीत विचारलं.

दोघेही राक्षस खदाखदा हंसले. दोघांनीही खाली वाकून दोन मोठ्या शिळा अशा सहजगत्या उचलल्या कीं जणूं समुद्राच्या किनाऱ्यावरुन एखादा बारीक दगड उचलतो आहोत. आणि त्यांनी त्या शिळा दूर पर्वतांच्या रांगेच्या दिशेने फेकल्या.

"तुम्ही दोघांनीही आपली शक्ती समान आहे हे दाखवून दिलंत, त्याबद्दल तुम्हाला दाद द्यायलाच हवी हं! पण त्यामुळे काय झालंय, कीं तुमच्यापैकीं जास्त बलवंत कोण याचा निर्णय करणे कठीण होणार आहे. तेव्हां हीच गोष्ट आणखी पुन्हां एकदा कराल कां? पण यावेळेला जरा मोठाले खडक घ्या, म्हणजे बरं!" ज्ञानीबाबाने त्यांचे कौतुक करीत सांगितले.

राक्षसांना पुन्हां सांगावं लागलं नाही. दोन प्रचंड मोठे खडक त्यांनी उचलले. एकएक खडक इतका मोठा होता कीं तो जागचा हालवायलाच किमान १५-२० लोकांची शक्ती अपुरी पडली असती. लोकांचे डोळे विस्फारलेले होते. दोन्ही राक्षसांनी ते खडक लांबवर उडवून दिले.

पण ज्ञानीबाबा मात्र शांतगंभीर होते. त्यांनी म्हटले, ''ही परीक्षा घेणे आणि निर्णय देणे हे फारच कठीण काम आहे खरे! पण आता आपण दुसऱ्या तऱ्हेने प्रयत्न करुं या. तुम्हाला इथे मैदानांत आणखी भरपूर मोठे, अवजड पत्थर, धोंडे दिसत आहेतच. तुमच्यापैकीं कोण जास्ती दगड फेंकू शकेल तो श्रेष्ठ. प्रथम डाव्या हाताने फेंकायचे आणि नंतर उजव्या हाताने फेंकायचे, चालेल ना?''

वेळ न दवडता दोन्ही राक्षसांनी दगड डाव्या हाताने उखडून फेंकायला सुरवात केली. सगळीकडे हिंडत आणि दगड उचलून फेंकत होते, तेव्हां भयंकर आवाज व धडधडाट होत होता.

जेव्हां त्यांचा डावा हात दुखायला लागला, तेव्हां त्यांनी उजव्या हाताने दगड उचलून फेंकायला सुरवात केली. सूर्यास्त होईपर्यंत त्यांची ही स्पर्धा सुरुं होती. तोपर्यंत थोडेच लहान दगड शिल्लक राहिले होते. दोघा राक्षसांबद्दल सांगायचं तर ते आता इतके थकून गेले होते कीं त्यांना उभे राहाणेदेखील कठीण झालेले होते.

आता ज्ञानीबाबा म्हणाले, ''अजूनदेखील तुमच्या दोघांत जास्त ताकदवान कोण ते आम्हाला सांगता येणार नाही. कारण जे दगड तुम्ही फेंकलेत, ते मोजतमोजताना आम्ही चुकलो. म्हणून आता तुम्हीच जाऊन बघा की कोणता दगड सर्वांत जास्त दूर फेंकलेला आहे ते! तो दगड सांपडला की आमच्याकडे घेऊन या. मग आपण बघूं या कीं ही कर्तबगारी पुन्हां कोण करुं शकेल? नक्की तेव्हांच आपल्याला समजेल कीं तुम्हा दोघांच्यात जास्त बलवान कोण आहे !''

ते दोघेही महामूर्ख राक्षस आत्तापर्यंत आपसांत भांडत होते, ते सर्वांत जास्त दूर अंतरावर फेंकलेल्या दगडाचा शोध घेण्यास निघाले. शेवटच्या क्षणीदेखील त्यांच्या लक्षांत आलं नाही कीं चतुर ज्ञानीबाबांनी त्यांच्या ताकदीचा उपयोग आपले उद्दिष्ट साध्य करण्या-साठी केला होता.

जर तुम्हाला कळलं कीं आजदेखील ते दोघे ते दगड शोधत आहेत, तर तुम्हाला आश्चर्य वाटायला नको, कारण ते परत आलेच नाहीत. असं म्हणतात कीं जेव्हां वारा डाव्या बाजूला वाहातो तेव्हां त्यांच्या भांडणाचा आवाज ऐकायला येतो. पण त्या खोऱ्याचं पुढे काय झालं? तिथले दगडधोंडे तर अगदी छानपैकीं काढून टाकलेले होते ना!

तिथल्या लोकांनी ताबडतोब जमिनीची मशागत सुरुं केली व बियाणें पेरले. ती जमीन जणूं कांही त्यांना साफसूफ करुन बक्षीस दिलेली होती. अद्यापही ही जमीन ही स्कॉटलंडमधली सर्वांत सुपीक जमीन समजली जाते. त्याबद्दल ज्ञानीबाबाचे आभार मानले पाहिजेत.







# कंजूष व बहुरूपी

गुरुनाथ गांवातला एक सधन गृहस्थ, पण होता अत्यंत कंजूष!

एकदा त्यांच्या गांवात एक बहुरुपी आला. संन्याशाच्या वेषांत येऊन गुरुनाथचे दारी उभा राहून तो ओरडूं लागला, ''ओम् भवती भिक्षां देहि!''

ते शब्द गुरुनाथला कर्णकर्कश वाटले. बाहेर येऊन त्याने एकवार त्या संन्याशाकडे बघितले व त्याला विचारले, ''अरे, तुला रे काय झालंय? भीक मागायला तू आंधळा आहेस कीं लंगडा?'' असं बोलून त्याने दार बंद करुन घेतले.

दुसऱ्या दिवशी बहुरुपी आंधळ्याचे सोंग घेऊन आला. गुरुनाथच्या दारासमोर उभा राहून म्हणाला, ''माई, आंधळ्याला थोडं दान द्या हो!''

त्याला पाहून गुरुनाथ पुन्हां चिडून म्हणाला, ''अरे, भीक मागायला तू कांही मुका-बहिरा आहेस कां? जा, पुढे चालूं लाग!'' तिसऱ्या दिवशी बहुरुप्याने मुक्याचे सोंग घेतले आणि हातांतली घंटा वाजवीत तो गुरुनाथच्या दारासमोर उभा राहिला.

गुरुनाथने त्याला बघून विचारले, ''अरे, तुला रे काय झालं आता?''

बहुरुप्याने आपण मुका असल्याची खूण केली. ''मुका आहेस होय? मग काय झालं? हाती पायी धड आहेस कीं! काम कां नाही करत?'' असा उपदेश करुन गुरुनाथने दार बंद केले.

दुसऱ्या दिवशी गुरुनाथच्या पत्नीला स्वयंपाकघरांत एक साप दिसला. ती पळतच बाहेर आली. बाहेर ओटीवर बसलेल्या गुरुनाथला ती म्हणाली, ''अहो, घरांत साप आलाय. अहो साप आहे साप!''

गुरुनाथ धावतच आंत गेला. स्वयंपाक घरांत सरपटणाऱ्या सापाला बघून साप-साप म्हणत तो ही पळत बाहेर आला.

आसपासच्या घरांतले लोक धावत आले.

- २५ वर्षांपूर्वीं चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट -



सापाला मारण्याचा प्रयत्न करण्याऐवजी ते उलटसुलट प्रश्न विचारुं लागले. ''साप कुठे आहे? किती मोठा आहे? नाग आहे की काय? कोणत्या जातीचा साप आहे? त्याचा रंग कसा आहे?'' एक ना दोन. पण त्याला पकडायला कुणी घरांत शिरले नाहीत.

तेवढ्यांत तिथे एक गारुडी आला. गुरुनाथच्या जीवांत जीव आला. कपाळावरचा घाम पुसत त्याने विचारलं, ''हे बघ, आमच्या स्वयंपाक-घरांत नाग शिरलाय. त्याला पकड आणि आम्हाला वांचव रे.''

''काय म्हणताय? नाग आहे? दिसतोय कां तो कुठे?'' गारुड्याने विचारलं.

''नाही, आता दिसत नाही. बिळांत शिरलाय बहुतेक.'' गुरुनाथने सांगितलं.

''तर मग पकडणं कठीण आहे. आणि नागाने जर डूख धरली तर बारा वर्षे तो विसरत नाही आपल्या शत्रूला. एका फटक्यांत जर त्याला मारता आलं नाही, तर फारच मोठ संकट उभं राहील.'' गारुड्याने त्यांना आणखी घाबरवून टाकलं.

''तुम्हीच असं बोलायला लागलात तर आमची काय धडगत होईल हो?'' गुरुनाथ केविलवाणा झाला होता. ''ठीक आहे. मी साप पकडतो, पण हे काम आहे मोठे धोक्याचे! माझे प्राण संकटात आहेत. मी यासाठी पांचशे रुपये घेईन.'' गारुडी म्हणाला. पांचशेचा आंकडा ऐकून गुरुनाथचा श्वास अडकला. ''बापरे, इतके रुपये?'' त्याने मनोमन विचार केला.

शेवटी शंभर रुपयांवर सौदा ठरला आणि गारुडी स्वयंपाकघरांत शिरला. त्याने आपली पुंगी वाजवायला सुरवात केली. भिंतीमधल्या एका फटीतून साप बाहेर आला आणि आपला फणा उभारुन डोलायला लागला. गारुड्याने पटकन त्याची मान पकडली आणि त्याला टोपलींत बंद केला.

गुरुनाथचा जीव भांड्यात पडला पण आता त्या गारुड्याला शंभर रुपये द्यावे लागतील म्हणून पुन्हां त्याचा जीव घाबरा झाला. गारुड्याने शंभर रुपये घेतले आणि गुरुनाथची स्तुती करीत तो तिथून चालता झाला.

नंतर जरा खोलांत जाऊन चौकशी केली तेव्हां समजलं कीं गारुडी म्हणजे बहुरुपीच होता. त्याने गुरुनाथच्या दरवाजावर अनेकवेळा खटखट केली होती, पण त्याला एकदाही भिक्षा मिळाली नव्हती. म्हणून त्याने आपला पाळलेला साप गुरुनाथच्या घरांत सोडून दिला. हे समजल्यावर गुरुनाथचा राग उफाळून आला.

त्याने गांवाच्या पाटलाकडे तक्रार केली कीं बहुरुप्याने त्याला फसवलं होतं आणि म्हणून त्याचे रुपये त्याला परत मिळावेत.

पाटलाने बहुरुप्याला बोलावून त्याची हजेरी घेतली. बहुरुप्याने सारी वस्तुस्थिती पाटलाला सांगितली, व तो म्हणाला, ''साहेब, आपणच सांगा, गुरुनाथसारखे श्रीमंत लोक जर आम्हा कलाकारांचे पोषण करणार नसले, तर आमची काय अवस्था होईल?''

पाटलाने समजावलं, ''ऐक, जर तू आपल्या कलेचं प्रात्यक्षिक दाखवून बक्षीस मिळवलंस, तर त्यांत आम्हाला वाईट वाटणार नाही. पण तू गुरुनाथला फसवलंस; म्हणून तू त्याचे पैसे परत देऊन टाक.''

बहुरुप्याने गुरुनाथला शंभर रुपये परत दिले. तेव्हां पाटलाने आपला निर्णय सांगितला. ''गुरुनाथजी! ज्या झाडाला फळें लगडलेली असतात, त्याच्यावरच लोक दगड फेकतात. ज्याच्याकडे पैसे असतात, त्याच्या आश्रयाला निर्धन व्यक्ती जातात. हा बहुरुपी तुमच्याकडे आपली भूक भागवण्यासाठी आला होता. तुमच्यासारख्या लोकांनी त्याला दान देणे हे तुमचेही कर्तव्य ठरते. तुम्ही त्याला पंचवीस रुपये बक्षीस द्या पाहूं!''

गुरुनाथने बहुरुप्याला पंचवीस रुपये तर दिलेच, पण त्याने जो धडा शिकवला तो आदर्श मानून, गुरुनाथने आपला चिक्कूपणादेखील सोडला. समाजाबद्दलचा त्याचा दृष्टीकोण जास्त उदार आणि समजूतदार झाला.





# साहसी

**तो** एक लहानसा देश होता. देशाच्या टोंकाला एक गांव होते. तिथे रंगदेव व सोमदेव हे दोघे भाऊ राहात होते दोघांचे एकमेकांवर फार प्रेम होते व ते एकत्र एकाच घरांत राहात होते. दोघांच्या बायकाही खेळीमेळीने व एकमेकीशी समजूतदारपणे वागत होत्या. त्यामुळे त्या दोघा भावांना कधी त्रास झाला नाही.

एकदा संध्याकाळच्या वेळेला दोघे भाऊ आरामांत बसले होते व इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत होते. अचानक रंगदेवने सोमदेवास म्हटले, ''आपण ह्या गांवातच राहिलो तर आपली प्रगती कधी होणार नाही. जशी आज परिस्थिती आहे, तशीच कायम राहील. त्यापेक्षां आपण जर आपले शेत विकले, आणि चंद्रहास महाराजांच्या आश्रयाला गेलो, तर कांहीतरी सुधारणा होईल.''

सोमदेवला भावाचा विचार पटला. तो म्हणाला, ''तू अगदी बरोबर बोलतो आहेस. महाराजांना साहसी माणसे आवडतात असं मी ऐकलं आहे. आपल्या दोघांचा स्वभाव धाडसी आहे. ते नक्कीच आपल्याला आश्रय देतील, आणि आपल्या आयुष्याचा कायापालट होईल.''

रंगदेवाच्या पत्नीने त्यांची ही चर्चा ऐकली व म्हटले, ''महाराजांकडे जरूर जा. पण जायच्यापूर्वी आधी कांहीतरी एखादे धाडसी कृत्य करुन दाखवा; म्हणजे महाराज तुमच्यावर खूष होतील. नुसताच ''आम्ही साहसी आहोत'' म्हणून स्वतःचा डंका पिटण्यांत कांही अर्थ नाही.''

तिचा हा स्पष्ट विचार दोघा भावांना पटला. कांही दिवसांपूर्वी त्यांच्या गांवात वाघ आला होता. जेव्हां लोक गोळा झाले, तेव्हां तो झाडींत पळाला. या दोघांनी त्या वाघाला मारायचे ठरवले.

दुसऱ्याच दिवशी दोघांनी हातांत तलवार व भाला घेऊन अरण्याचा मार्ग धरला. ते जेव्हां अरण्यांत शिरले, तेव्हां थोड्याच अंतरावर त्यांना एका झाडाच्या पाठीमागे तो वाघ एक मेलेली हरिणी खाताना दिसला. त्यांना बघून वाघ गुरगुरत त्यांच्या दिशेला वळला. या दोघांवर तो झेप टाकणार, तितक्यांत एका भावाने वाघाच्या छातीवर भाला फेंकला आणि दुसऱ्याने वाघावर सपकन तलवारीने वार केला. अशा रितीने दोघांनी मिळून त्या वाघाला मारले.

नंतर दोघांनी वाघाला ओढत ओढत गांवात आणले. पाहाता पाहाता लोकांची गर्दी जमली. सर्वांनी त्यांचे कौतुक केले आणि म्हटले, ''याला म्हणतात साहस! तुम्ही दोघेही असामान्य व धाडसी आहात. तुमची कितीही वाखाणणी केली तरी ती अपुरी आहे.''

हे साहसी काम केल्यानंतर दोघांनी आपापली शेतजमीन विकली व आवश्यक ते सामान बरोबर घेऊन ते सपत्नीक राजधानीला गेले. तिथे त्यांनी एका धर्मशाळेत मुक्काम ठोकला.

तिसऱ्या दिवशी त्यांनी वाघाचे कातडें घेतले आणि ते महाराजांच्या दर्शनासाठी निघाले. त्यांनी त्यावेळीं वीरासारखा पोशाख केला होता. त्यांची कल्पना होती कीं त्यांचा वेष व वाघाचे ते कातडे बघितले, कीं द्वारपाल त्यांना आदराने राजाकडे घेऊन जातील. पण तसं झालं नाही. द्वारपालांनी त्यांना स्वच्छ सांगितलं कीं जोपर्यंत त्यांना बक्षीस मिळत नाही, तोपर्यंत त्या दोघांना कोणत्याही परिस्थितीत आंत जायला मिळणार नाही.

द्वारपालांनी अशी कुणाचीही भीती न बाळगता उघडउघड बक्षिसी मागणें, हे या दोघा भावांना विचित्र वाटले. पण ते तरी काय करुं शकणार? महाराजांचे दर्शन व्हावे यासाठी त्यांनी दोघांनी दोनदोन मोहरा त्या द्वारपालांना दिल्या आणि आंत पाऊल ठेवले.

त्यांचा वीरवेष आणि हातावरचे वाघाचे



चामडे पाहून राजा चंद्रहास खूष होण्याऐवजी नाराज झाला. त्यांच्या येण्याचे कारण त्याने विचारले. तेव्हां दोघा भावांनी आपण वाघाला कां व कसे मारले, आणि त्यासाठी कसे धाडस केले, हे सविस्तर सांगितले.

त्यासाठीं त्यांनी आपल्या जिवाशी खेळ खेळून वाघ मारला हे ही सांगितले. पण त्यांच्या कहाणींत राजाला रस नव्हता. त्याने कोरड्या आवाजांत म्हटले, ''तुमच्यासारखे साहसी वीर भरपूर आहेत आपल्या देशांत! सगळ्यांना कांही इथें दरबारांत मला नोकरी देता येत नाही.'' आणि राजाने दोघांना शंभरशंभर मोहरा देऊन निरोप दिला.

आपापले पती निराश होऊन परतलेले पाहून त्यांच्या बायकादेखील निराश झाल्या. दोन दिवसानंतर रंगदेवाची पत्नी म्हणाली, ''कधीकधी आपल्या मनांत जे असतं, ते होत नाही. पण

सूर्यवंशी



आता गांवी परत जाणं अशक्य आहे. त्यापेक्षां जास्त मोठा अपमान दुसरा कोणताही असणार नाही. आता महाराजांनी रकम दिली आहे, त्यांतून इथेच कांहीतरी व्यापार आपण सुरुं करुं या.''

तिचा सल्ला सर्वांना पटला. त्यांना वाणसामानाची चांगली माहिती होती, म्हणून किराणा मालाचे एक दुकान काढायचे असा त्यांनी ठाम विचार केला. दुसऱ्या दिवसापासून त्यांचा व्यापाराचा प्रयत्न सुरुं झाला. पण त्यांतही त्यांना विशेष यश मिळाले नाही.

तो काळ त्यांना अनुकूल नव्हता. कोणताही व्यापारंधंदा सुरुं करायचा असेल, तर प्रथम नगरपालकाची संमती घ्यायला हवी, हा तिथे नियम होता. म्हणून रंगदेव व सोमदेव हे दोघे भाऊ नगरपालकाच्या घरी गेले. तिथें गेल्यानंतर त्यांना कळले कीं व्यापार करण्याची परवानगी हवी असेल तर दोनशे मोहरा भेट म्हणून द्यायला लागत होत्या.

हे कळल्यानंतर सोमदेव मोठ्या आवेशाने म्हणाला, ''भाऊ, बघ बरं, राज्यांत जिथें बघावं तिथें अगोदर भेटबक्षीस म्हणून लांच मागितली जाते. ईमानदारी कांही उरलेलीच नाही. वाटतं कीं महाराजांनी मुद्दामच असल्या लांचखोरांना नियुक्त केलेलं आहे. चल, आपण त्यांनाच जाऊन विचारुं या.''

रंगदेवला सोमदेवचा विचार रास्त व खरा वाटला. तो म्हणाला, ''व्यापार करायचा कीं नाही, ते नंतर ठरवू या. पण अगोदर तू म्हणतोस तसे महाराजांकडे जाऊन त्यांना भेटूं या.''

दोघे जण जेव्हां राजभवनावर पोहोचले, तेव्हां तिथल्या द्वारपालाने सुद्धां त्यांच्याकडे बक्षिसी मागितली. अशा प्रसंगी काय करायचं ते सोमदेवाने अगोदरच ठरवून ठेवलेलं होतं.

त्याने केविलवाण्या सुरांत म्हटलं, ''भाऊ, माझ्याजवळ आता फुटकी कवडीदेखील शिल्लक नाही बघा! फक्त ही सोन्याची अंगठी आहे. कृपा करुन मला आणि माझ्या भावाला आंत जाऊं द्या. जर महाराज आमच्यावर खूष झाले आणि त्यांनी आम्हाला कांहीतरी भेटवस्तू दिली, तर ही अंगठी मी तुम्हाला नक्की बक्षीस देईन.''

''जर मला नंतर देणार असशील तर ती आत्ताच देऊन टाक कीं!'' असं म्हणून द्वारपालांनी त्याची अंगठी जबरदस्तीने काढून घेतली.

ते दोघे आंत गेल्याबरोबर राजा चंद्रहासने त्यांना ओळखले आणि चढ्या स्वरांत विचारलं, ''आता पुन्हां कसल्या कामासाठी आला आहात?''

सोमदेवने नम्रपणे सारी हकीकत सांगितली आणि तो पुढे म्हणाला, ''महाराज, वाघापेक्षांही



जास्त भयंकर आहे हा लांचलुचपतीचा रोग! जर आपल्याला वाटत असेल कीं मी खोटे सांगतोय, तर लगेच त्या द्वारपालांना बोलवावे आणि त्यांची स्वतः तपासणी करावी. त्यांच्याजवळ माझी सोन्याची, निळ्या खड्याची आंगठी मिळेल.''

सोमदेवाचे हे स्पष्ट बोलणें ऐकून राजाच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा पसरली. सोमदेवाकडे प्रसन्नपणे, कौतुकाच्या नजरेने पाहात राजाने म्हटलं, ''मला असेच तुझ्यासारखे निर्भय नागरिक हवे आहेत. तू अगदी बरोबर बोललास. हा लांच खाण्याचा रोग वाघापेक्षांही जास्त घातक आहे. मला नुकतंच समजलं कीं जमिनीवरच्या चटईखाली पाणी पसरतं तसा हा रोग पसरतो आहे. पण, किमान चारपांच प्रामाणिक मदतनीस असल्याखेरीज मी याचे समूळ उच्चाटन करुं शकणार नाही. माझ्याजवळ कुणीतरी याबद्दल तक्रार घेऊन येईल आणि या भ्रष्टाचाराबद्दल कांहीतरी ठोस सांगेल, म्हणून मी वाट पाहात होतो. पण यासाठी थांबायची काय गरज? असे मनांत विचार आले आणि परमेश्वराने देवदूता-सारखे तुम्हाला दोघांना माझ्याकडे धाडले आहे.''

राजाचे बोलणे ऐकून सोमदेवाला अतिशय आनंद झाला, आणि त्याने पुन्हां वांकून राजाला प्रणाम केला.

दोनतीन क्षणानंतर राजाने सोमदेवाला सांगितलं, ''आजपासून तू राज्याच्या सर्व कर्मचाऱ्यांवर लक्ष ठेवायचेस. या विभागाचा प्रमुख म्हणून मी तुझी नेमणूक करतो आहे. कितीही मोठा अधिकारी असेना का, जर तो विश्वासघात करीत असेल, लांचखाऊ असेल, तर त्याला न्यायालयांत आणून हजर करण्याचा अधिकार मी तुला देतो आहे. आता तू खूष आहेस ना?''

नंतर रंगदेवाकडे वळून राजाने सोमदेवाला म्हटलं, ''मला वाटतं. तुझा मोठा भाऊ तुझ्यासारखा बडबड्या व अति उत्साही नसावा. पण वाघाला मारताना आणि इथल्या भ्रष्ट अधिकाऱ्यांना पकडून देताना, त्याने तुझ्यासारखेच धाडस दाखवले आहे. मी त्याला नवा नगरपालक म्हणून नेमतो आहे.''

अशा रितीने दोन्ही भावांनी राजाच्या दरबारांत उच्च जागा मिळवल्या. त्यांनी अनीती व लांचखोरीचे निर्मूलन करण्यासाठी योग्य ते प्रयत्न केले आणि त्यांत ते यशस्वीही झाले. त्यांच्या या हुशारीमुळे दोघेही राजाचे आवडते अधिकारी बनले.



# आपले पंतप्रधान

गेल्या २२ मेला डॉ. मनमोहन सिंग भारताचे १४वे पंतप्रधान बनले.

श्री. नरसिंहराव पंतप्रधान असताना डॉ. मनमोहन सिंग जून १९९१पासून १९९६च्या मेपर्यंत अर्थमंत्री होते. त्यापूर्वी ते रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाचे गव्हर्नर होते, आणि प्लॅनिंग कमिशनचे उपाध्यक्ष होते.

डॉ. मनमोहन सिंग यांचा जन्म २६ सप्टेंबर १९३२ला पश्चिम पंजाब-मधल्या गाह या गांवी झाला. हा भाग आता पाकिस्तानांत आहे. १९४१ साली त्यांचे कुटुंब अमृतसरला येऊन स्थायिक झाले, व सुक्या मेव्याचा व्यापार करीत साधे जीवन जगत होते. असं म्हणतात कीं डॉ. सिंग यांना फी देता येत नव्हती, म्हणून एक वर्ष कॉलेजला जाता आले नाही. त्यांचा सदैव पहिला नंबर असे. त्यांचे वडील गुरुमुखसिंग कोहली यांनी आपल्या मुलाला मोठ्या अभिमानाने सांगितले, "एक दिवस तू या देशाचा पंतप्रधान होशील." होशियारपूरच्या पंजाब विद्यापीठांतून ते अर्थशास्त्राचे पदवीधर झाले आणि शिक्षणासाठी झालेले कर्ज फेडण्यासाठी त्यांनी कॉलेजमधे प्राध्यापकाची नोकरी धरली.



डॉ. मनमोहन सिंग पुढच्या अभ्यासक्रमासाठी इंग्लंडमधे कैंब्रिज विद्यापीठांत दाखल झाले. उत्कृष्ट प्रगतीबद्दल त्यांनी अनेक बक्षिसे मिळवली. नंतर त्यांनी डॉक्टरेटसाठी ऑक्सफर्ड विद्यापीठांत प्रवेश घेतला. एक शांत, कष्टाळू विद्यार्थी म्हणून त्यांची गणना होत होती.

ऑक्सफर्ड किंवा कैंब्रिजमधे त्यांना प्राध्यापक होता आले असते, पण त्यांनी मायदेशी परत यायचा निर्णय घेतला. चंदीगडला पंजाब विद्यापीठांत ते अर्थशास्त्राचे प्राध्यापक झाले. त्यानंतर दिल्लीच्या जवाहरलाल नेहरु विद्यापीठांत व दिल्ली स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समधे ते मानद प्राध्यापक झाले. १९७२साली त्यांनी सरकारी सेवेंत प्रवेश केला आणि अर्थमंत्रालयाचे ते प्रमुख सल्लागार बनले.

अर्थमंत्री झाल्यानंतर त्यांनी आर्थिक क्षेत्रांत अनेक बदल घडवून आणले. १९९१जुलैमधे पहिलेच अंदाजपत्रक सादर करताना ते म्हणाले, "भारत ही जगांतली एक महासत्ता लौकरच होणार आहे." पंतप्रधान डॉ. मनमोहन सिंग देशाला उच्च पातळीवर नेतील, म्हणून सारा देश त्यांच्याकडे आशेने बघतो आहे.

चंदामामाच्या लाखो वाचकांतर्फे त्यांनी त्यांची कारकीर्द दैदीप्यमान होवो ही शुभेच्छा!





# अस्वल्या मांत्रिक

## 9

*(हत्तीने अंगरक्षकाचा पाठलाग केला, आणि तो पळतपळत उग्रदंडाजवळ पोंचला. त्यावेळांत दुर्मुख राजा शुद्धीवर आला आणि अरण्यांत पळाला. तिथे एका वनवासी पारध्याने चित्त्यावर बाण चालवला. जखमी चित्ता राजा दुर्मुखबरोबरच फांदीवरुन खाली पडला. त्यानंतर...)*

राजा दुर्मुख आणि जखमी चित्ता फांदीवरुन खाली पडले आणि राजा अंगरक्षकावर किंचाळून ओरडला, "अरे, बघता काय? आणखी एक बाण सोडून या चित्त्याला मारा!"

दुर्मुख झाडावरुन पडला तो मधेच दुसऱ्या लहान झाडावर आदळला, आणि तिथून घसरुन जमिनीवर पडला. त्यामुळे त्याला विशेष लागले नाही.

अंगरक्षकाने चित्त्याकडे एकदा रागावून बघितले आणि तो म्हणाला, "महाराज! जखमी असूनदेखील हा चित्ता आपल्यावर हल्ला करण्याच्या बेतांत आहे."

राजा चित्त्यापासून वांचला होता. तो तिथून लांब गेला आणि त्याने अंगरक्षकाकडे भेदक नजरेने बघत म्हटले, "अरे तुझा डोके ठिकाणावर आहे कां? ह्या क्षणीं तलवारीने त्याचे डोके उडव. हा पारधी आपल्या राज्यांतला आहे कां? दिसतोय तर अगदीच बावळट नि मूर्ख!"

तेवढ्यांत त्या चित्त्याने गुरगुरत आपला जबडा उघडून दांत विचकले, आणि एकेक पाऊल टाकत तो दुर्मुखराजाच्या दिशेने वळला. तोपर्यंत हे सर्व निमूटपणे पाहात बसलेल्या



अरण्यवासी पारध्याने किंचित स्मितहास्य करीत म्हटले, "भले मी मूर्ख असेन, पण सोन्याच्या मोहरांची किंमत ठाऊक नसण्याइतका मूर्ख नव्हे! मला पांच मोहरा देणार होतात त्याचे काय झाले? आत्ता मला त्या देत कां नाही?" असं म्हणून त्याने धनुष्यावर बाण चढवला आणि अंगरक्षकाच्या दिशेने नेम धरला आणि त्याला विचारले, "तू यांना महाराज म्हणतोस! तू त्यांची चेष्टा करतो आहेस कीं हे खरेखुरे महाराज आहेत?"

चित्ता राजावर पुन्हां एकदा झेप घेण्याच्या तयारींत होता हे अंगरक्षकाला दिसले. आपली तलवार सर्रकन उपसत त्याने राजाला म्हटले, "महाराज! आपणदेखील म्यानांतून तलवार उपसा आणि चित्त्याशी लढायला तयार व्हा; नाहीतर ह्या जखमी चित्त्याने आपल्या दोघांना एकाच वेळी मारलं तरी त्यांत कांही आश्चर्य वाटायला नको!"

तोपर्यंत त्या पारध्याने अंगरक्षकासमोरच एक बाण सोडून जमिनींत घुसवला आणि भात्यांतून आणखी एक बाण काढून अंगरक्षकाच्या दिशेने नेम धरुन विचारले, "तू माझ्या प्रश्नाचे उत्तर कां दिले नाहीस? आत्ताच माझा बाण तुझा प्राण घेईल!"

दुर्मुखराजाने म्यानांतून तलवार बाहेर उपसली आणि तो चित्त्याच्याजवळ जायच्याऐवजी घाबरून मागे फिरत म्हणाला, "अरे पारध्या! आता बघ तू, मी उदयगिरीचा राजा दुर्मुखच आहे. नशीबाचे फांसे फिरले, म्हणून मी या अरण्यांत हालअपेष्टा सोसतो आहे. तुझा नेम चित्त्याच्या काळजावर लागला नाही. आणखी एक बाण सोड आणि त्याला ठार मार!"

"आपण आधी कां सांगितलं नाहीत? सैनिक सोबत न घेता या अरण्यांत येण्याची आपली फार मोठी चूक झालीय."

असं म्हणून पारध्याने आपला अंगरक्षकाकडे रोखलेला नेम चित्त्याच्या दिशेने वळवला आणि बाण सोडणार तेवढ्यांत चित्त्याने गर्जना करीत राजाकडे उडी घेतली.

चित्त्याच्यामुळे राजा घाबरला आणि मागे वळून सुसाट पळत सुटला. चित्ता त्याचा पाठलाग करुं लागला. तेव्हां तिकडून येणाऱ्या उग्रदंड राक्षसाने राजाला चटकन एका हाताने थांबवले आणि त्याला रागावून तो म्हणाला, "राजा दुर्मुख! भेकड कुठला. चित्त्याला बघून भागुबाईसारखा कुठे पळून जातो आहेस? तू कसला आला आहेस राजा?"

राजा दुर्मुख आपादमस्तक थरथर कांपत



होता. तो कांहीतरी बोलणार तेवढ्यांत तो जखमी चित्ता चपळाईने त्याच्याजवळ आला. उग्रदंडाने चित्त्याला अशी जोरांत लाथ हाणली कीं तो चित्ता खालीच कोसळला.

त्याने झटकन चित्त्याची मान पकडली आणि राजाला म्हटले, "देशावर सत्ता चालवणाऱ्या तुझ्यापेक्षां हा चित्ता जास्ती शूर आहे!"

तोपर्यंत चोरांचा सरदार नागमल्ल, त्याचे दोन सहाय्यक आणि त्यांच्यामागोमाग अस्वल्या वधिक तिथें येऊन पोंचले. दुर्मुखकडे पाहात नागमल्ल म्हणाला, "आता तुम्हीच दुर्जयगुप्त नसून महाराज दुर्मुख असल्याची कबुली दिलीत. म्हणून आम्ही आपल्याला राजधानींत नेऊन सुरक्षितपणें पोंचवतो. मग जे आपल्याला योग्य वाटेल ते इनाम आपण आम्हाला द्यावे."

हे बोलणे ऐकून वधिक ओरडला, "सिरस भैरव!" आणि परशू उंचावीत पुढे म्हणाला, "अरे, तुम्ही सर्वजण कान उघडे ठेवून नीट ऐका! या दुर्मुखराजाचं मस्तक मिळावं म्हणून आमचे गुरु अस्वल्या मांत्रिक वाट पाहात आहेत. त्यांचे मस्तक मी छाटून घेऊन जाईन. तुम्हाला त्यांचं धड राजधानीला घेऊन जाता येईल. आणि त्यासाठी तुम्हाला काय इनाम मिळेल, ते आहे ठाऊक? नीट ऐका! या राजाचे वारस तुमचा शिरच्छेद करतील."

"अरे अस्वल्या वधिका! तू तर अगदी हुशारीचीच गोष्ट बोललास कीं!" उग्रदंडाने म्हटले. त्याच्या हाताच्या पकडींत धडपडत असलेल्या चित्त्याला दूर फेंकून चारी बाजूंना विखुरलेल्या आपल्या लोकांकडे एकवार बघून तो



पुढे म्हणाला, "असहाय्य स्थितींत असलेल्या या दुर्मुख राजाचे शिर कापून नेण्याचा विचार न्यायाला धरुन नाही. तुम्हाला काय वाटतं?"

अस्वल्या वधिकाखेरीज इतर सर्वांनी उग्रदंड राक्षसाच्या म्हणण्याला दुजोरा दिला. त्यावर अस्वल्या वधिकाने दीनवाण्या चेहऱ्याने आपला परशू खाली सरकवला, आणि म्हटले, "तर मग माझं काय होईल? महान शक्तीमान अस्वल्या मांत्रिकाने आपल्या मंत्रबळाने मला, एका माणसाला, अशा अस्वलाच्या रुपांत बदलून टाकलंन, म्हणजे मी या राजाचे शिर छाटून घेऊन जाईन. जर मी त्यांच्या आज्ञेचं पालन केलं नाही आणि रिकाम्या हाती गेलो तर तो माझे प्राण घेतील. नाहीतर जन्मभर मला अस्वलाच्या रुपांतच ठेवतील. बाप रे! मग माझी काय दशा होईल?"

"हे ही ठीक आहे. तर मग याला दुसरा उपाय कोणता आहे?" उग्रदंड राक्षसाने विचारले.



अंगरक्षक थरथर कांपत उग्रदंडासमोर येऊन म्हणाला, ''उग्रदंड महाराज! माझी एक सूचना आहे. या राजा दुर्मुखला त्या मांत्रिक महाराजांकडे जिवंतच घेऊन जावे. तेच काय तो निर्णय घेतील.''

''ही सूचना चांगली आहे. वधिका, तुला काय वाटतं?'' उग्रदंडाने विचारलं.

''हे भयंकर अरण्य ओलांडून या राजाला इथून अस्वल्या मांत्रिकाकडे घेऊन जाणे हे कांही साधंसुधं काम थोडंच आहे? कोणत्याही क्षणीं तो आपल्याला फसवून पळून जाऊं शकतो. याच्याअगोदर त्याने तसा प्रयत्न केलाच होता. पण त्या चित्त्याच्यामुळें हा पुन्हां माझ्या तावडीत सांपडला आहे.'' असं म्हणून अस्वल्या वधिकाने दुर्मुखच्या दिशेने एक पाऊल पुढे टाकले.

दुर्मुख ओरडून उग्रदंडाच्या मागे जाऊन उभा राहिला आणि कांपऱ्या स्वरांत म्हणाला, ''उग्रदंड महाराज, मी आपल्याला शरण आलो आहे. मला वांचवा!''

''तुला मी अभय दिले आहे. तू घाबरुं नकोस!''

या शब्दांबरोबरच उग्रदंड राक्षसाने राजाच्या मस्तकाला स्पर्श केला आणि अस्वल्या वधिकाला म्हटले, ''वधिका, मी या राजाला मांत्रिकाकडे घेऊन जाण्याची जबाबदारी घेतो. तू आपल्या वाहनावर, तुटक्या सोंडेच्या हत्तीवर स्वार हो, मी ह्या राजाच्याबरोबर चालत येतो.''

''उग्रदंड! तुझा शब्द तू नक्की पाळशील ना? हे बघ, मी आत्ताच जाऊन माझ्या हत्तीला बांधलेल्या दोऱ्या कापून त्याला इथें घेऊन येतो.'' असं म्हणून वधिक तिथून गेला.

त्याच्यामागून पारधी आपल्या धनुष्यावर बाण चढवीत घाईने पावले टाकीत येऊन म्हणाला, ''अरे अस्वल्या वधिका, तू उतावळेपणाने हत्तीच्याजवळ जाऊं नकोस. तुम्ही सारेजण बोलण्यांत गर्क होतात म्हणून तुम्हाला सिंहाची गर्जना आणि हत्तीचा चित्कार ऐकायला आला नसेल. एवढ्या वेळांत सिंहाने हत्तीचे कुंभस्थळ फोडले असेल.''

''अरे, असं आहे कां?'' असं म्हणून, आता वधिक जास्त गोंधळून गेला होता. तो धावतच हत्तीजवळ गेला. एक सिंह दोऱ्यांत जखडलेल्या हत्तीच्या मस्तकावर आपल्या पंजाने फटकारा मारण्याचा प्रयत्न करीत होता. आणि हत्ती चित्कारत आपल्या तुटक्या सोंडेने सिंहाला पकडण्याचा व आपल्या दोऱ्या तोडण्याचा प्रयत्न करीत होता.



ते पाहून अस्वल्या वधिक चिडलेल्या स्वरांत ओरडला, ''ओहो, माझ्यासारख्याच्या वाहनाला तू मारणार आहेस की काय?'' आणि आपला परशु उचावून तो सिंहावर चालून गेला.

सिंहाने चिडून गर्जना केली आणि अस्वल्या वधिकावर त्याने उडी घेतली. वधिकाने सिंहाच्या दिशेने आपला परशू फेंकला, पण तो चुकून सिंहाच्या मागच्या पायाला लागला. सिंह खाली पडला पण लागलीच तडफडत उठून उभा राहिला आणि वधिकावर पुन्हां हल्ला करायला सरसावला. तेवढ्यांत त्या वनवासी पारध्याने सिंहाच्या छातीवर नेम धरुन एक बाण सोडला.

बाणाची जखम होताच सिंह एका बाजूला गडगडत खाली पडला. मोठ्याने गरजत त्याने उठायचा प्रयत्न केला, पण तितक्यांत अस्वल्या वधिकाने त्याच्या कंठावर परशुचा वार केला.

त्याचा कंठ अर्धा चिरला गेला होता आणि सिंह अर्धमेला झाला होता. वधिकाने पुन्हां परशु उचलून आणखी एक वार करणार तोंच पारध्याने त्याचा हात पकडून त्याला थांबवले नि म्हटले, ''अहो अस्वलमहाशय, हे काय करता आहात? सिंह तर संपलाच आहे. त्याच्यावर पुन्हां वार करुन त्याची कातडी बिघडवूं नका. मला त्याची आयाळ आणि त्याचे चामडे हवे आहे.''

अस्वल्या वधिक धापा टाकीत म्हणाला, ''भाऊ, किती अचूक नेम आहे रे तुझा! तू जर एकटा जीव सदाशिव असशील, तर माझ्याबरोबर चंद्रशिला नगरांत कां येत नाहीस? मी महाराजांना सांगून तुला माझा सहाय्यक वधिक म्हणून नेमणूक करुन घेईन.''



पारध्याने लवून उत्तर दिले, ''मी जरुर तुमच्या-बरोबर राजधानीला येईन. जर नोकरीच करायची असेल तर ती तुमच्यासारख्या वीराकडेच करायची आहे मला!''

अस्वल्या वधिक कांहीतरी म्हणणार होता, तोच उग्रदंड इतर लोकांबरोबर तिथे येऊन म्हणाला, ''वा, अस्वल्या वधिकाला तर एक फारच चांगला सेवक मिळाला कीं!''

हे कौतुकाचे शब्द ऐकून वधिकाला फार आनंद झाला. आपला परशु उचलून तो म्हणाला, ''अरे नागमल्ल! तू आणि तुझे अनुयायी आत्ता जाऊन माझ्या वाहनाच्या दोऱ्या सोडवून द्या.''

''महाशय, आपली आज्ञा प्रमाण आहे. पण दोऱ्या सोडवताना तो आमच्यावर हल्ला करुन आम्हाला पायदळी तुडवणार नाही ना, याची जबाबदारी मात्र तुमची आहे!'' चोरांच्या सरदाराने म्हटले.

"अरे, माझ्या आज्ञेतले वाहन माझ्या अनुमतीशिवाय इतरांची कधी हानी करेल कां?" असं म्हणून तो हत्तीच्याजवळ पोंचला. त्या चोरांनी हत्तीची बंधने सोडवली आणि वधिक हत्तीच्या पाठीवर बसला.

तुटक्या सोंडेचा हत्ती, आपल्या दोऱ्या सोडवल्या गेल्यावर चित्कारत उठून उभा राहिला. अस्वल्या वधिकाने पारध्याला हाताने खूण करीत जवळ बोलावले आणि आज्ञा केली, "अरे पारध्या, तुला या अरण्यांतले सारे मार्ग चांगलेच माहिती आहेत. तू माझ्या वाहनाच्या मस्तकावर बैस आणि त्याला चंद्रशिला नगराकडे जाण्याचा मार्ग दाखव."

नंतर उग्रदंड राक्षसाकडे वळून वधिकाने म्हटले, "ऐक, दुर्मुखराजाला पळून जाऊं न देता त्याला माझ्या पाठोपाठ घेऊन येण्याची तुझीच जबाबदारी आहे ना?"

उग्रदंड राक्षसाने होकारार्थी मान हालवीत म्हटले, "हे बघ, अस्वल्या मांत्रिकाकडे माझे एक काम आहे. तू हत्तीवर बसून पुढे जा. आम्ही सारेजण तुझ्यामागून येतो आहोत. ज्यांना आमच्याबरोबर यायचं नसेल. त्यांनी अरण्याचा मार्ग ठरवून दिल्यानंतर ते त्यांच्या मार्गाने जाऊं शकतील."

"वा, वा, तू तर लाखमोलाची गोष्ट सांगितलीस. राजा दुर्मुखखेरीज बाकी साऱ्याजणांना मी या क्षणींच स्वतंत्र करतो आहे. त्यांना हवं तर इथल्या अरण्यांतल्या श्वापदांबरोबर ते आनंदाने राहूं शकतील."

आणि त्यानंतर अस्वल्या वधिक हत्तीवरुन जाऊं लागला. सोंडतुटक्या हत्तीने आता पळायला सुरवात केली. म्हणून बाकी इतर लोक जरा मागे पडले. तेवढ्यांत झाडीच्या मागच्या बाजूने अचानक दोन हत्ती पुढे आले आणि त्यांनी अस्वल्या वधिकाला रोखले.

त्या हत्तींच्यावर जे चार सैनिक स्वार झालेले होते, ते ओरडून म्हणाले, "उदयगिरीच्या महाराजांचा विजय असो." आणि असा जयघोष करीत त्यांनी अस्वल्या वधिकावर बाणांचा वर्षाव सुरुं केला. *(अपूर्ण)*







वेताळ कथा

# सौंदर्य

निश्चयाचा पक्का विक्रमार्क झाडाजवळ आला. त्याने झाडावर चढून शव खाली उतरवले, खांद्यावर टाकले आणि तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने विचारलं, "राजन्, तू अत्यंत उच्च कोटीचा बुद्धिमान आहेस हे मला चांगले माहीत आहे. योग्य व अयोग्य यांतला फरक तुला माहीत आहे. पण मध्यरात्रीच्या वेळी तू इकडे निरर्थक कां फिरतो आहेस? माणूस कितीही हुशार असला तरी कधीतरी, अडचणीच्या काळांत तो आपले मनस्वास्थ हरवतो आणि कांहीतरी मूर्खपणा करुन बसतो. फार फार वर्षांपूर्वी जयंत नांवाच्या एका राजकुमाराने असाच मूर्खपणा केला होता. तो मदनासारखा



सुंदर होता. मानसिक संतुलन बिघडल्यामुळें त्याने काय केले ते मी तुला सांगतो.'' आणि वेताळाने जयंताची गोष्ट सांगायला सुरवात केली.

कांचननगरीचा महाराज रघुवर्मा होता. दोन मुलींच्या पाठीवर त्याच्या पत्नीने एका मुलाला जन्म दिला. तो बालक अत्यंत देखणा होता त्याचे अद्भुत सौंदर्य पाहून राजाराणी आश्चर्यचकित झाले. त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. त्याचे नांव त्यांनी जयंत ठेवले. त्यांचे मोहक सौंदर्य पाहात आणि त्याचे लाडाने पालनपोषण करण्यांत ते गुंग झाले होते.

रुपाबरोबरच जयंताच्या अंगी सद्गुणदेखील भरलेले. होते. बाळपण संपून किशोरावस्था सुरुं झाली तेव्हां त्याच्या पित्याने जयंतला आरवली पर्वतराजींत स्थायिक झालेल्या गुरु कृष्णचंद्र यांच्या गुरुकुलांत पाठवले. सर्व विद्यांचे शिक्षणक्रम संपल्यानंतर राजकुमार जयंत राजधानीला परत आला.

तो परत आल्यावर त्याला राज्याभिषेक करायचा व राज्यकारभाराची जबाबदारी त्याच्यावर सोंपवायची असे राजदंपतीने अगोदरच ठरवले होते. परंतु जयंतने याला मान्यता दिली नाही, कारण त्याला आपला देश हिंडून पाहायचा होता. राजाने त्याच्या इच्छेला मान्यता दिली, त्याला एक उत्तम घोडा व इतर आवश्यक ते सामान देऊन राजाने त्याला निरोप दिला.

राजवाड्यांतून बाहेर पडल्यानंतर जयंत देशाच्या पूर्व भागांत असलेल्या पर्वतराजीजवळ पोंचला. त्या पर्वतामधले सर्वांत उंच शिखर होते कांचनगिरी! त्या शिखरावर एक प्राचीन देवीचे मंदिर होते. त्या मंदिरात कात्यायिनीदेवीच्या प्रतिमेची पूजा करण्यासाठी यक्ष, किन्नर, गरुड, गंधर्व व इतर देवी देवता येत असत. जयंतने देखील या मंदिराबद्दल ऐकले होते. म्हणून देवीच्या दर्शनासाठी तो कांचनगिरीच्या शिखरावर आला होता.

शिखराचा भाग अतिशय स्वच्छ व शुद्ध होता. मंदिरासमोरच एक सरोवर होते. त्यांत पांढरी व लाल रंगाची कमळें फुललेली होती. जयंताने त्या सरोवरांत उतरुन स्नान केले आणि नंतर देवीचे दर्शन घेतले.

जेव्हां तो परत वळला, तेव्हां मंदिराच्या सभामंडपातून वीणेचा सुमधुर नाद त्याला ऐकूं



आला. त्याने त्या दिशेला वळून पाहिले तर मेघांच्या रंगाचे वस्त्र नेसलेली एक देवकन्या वीणा वाजवीत होती. आश्चर्यचकित डोळ्यांनी तिच्याकडे पाहात जयंत तिच्याजवळ गेला. तिने वीणा खाली ठेवली आणि प्रसन्नपणें हंसून ती म्हणाली, ''मी गंधर्वकन्या चित्रलेखा आहे. आपण कोण आहात ते मला कळेल कां?''

जयंतने मोठ्या आनंदाने तिला आपल्याबद्दल सगळी माहिती दिली व तिच्याशी थोडा वेळ तो बोलला.

त्याचे बोलणे ऐकून चित्रलेखा म्हणाली, ''मला आजपर्यंत कुणीही गंधर्व तरुण आवडला नाही, म्हणून मी अजून लग्न केलेले नाही. आपले सौंदर्य पाहून मी मंत्रमुग्ध झाले आहे. आपण दोघे विवाहबंधनाने एकत्र होऊं या आणि इथें गंधर्वलोकांत सुखाने आयुष्य घालवूं या.''

चित्रलेखेची ही मागणी ऐकून जयंत चकित झाला तो म्हणाला, ''मी माझ्या या देशाचा भावी राजा आहे. सिंहासनावर बसण्यापूर्वी देशाच्या कानाकोंपऱ्यात मला हिंडून यायचे आहे, जनतेच्या सुखदु:खाबद्दल माहिती काढायची आहे. हे माझे सध्याचे लक्ष्य आहे. विवाह करण्याचा माझा आत्तातरी विचार नाही.'' असे म्हणून तो तिथून जाण्यासाठी निघाला. पण त्याला थांबवीत चित्रलेखा त्याला म्हणाली, ''मला वाटतं, माझे बोलणें कांही तुम्हाला आवडले नसावे, हरकत नाही, पण निदान कांही काळ आपल्याबरोबर देशांत भ्रमण करण्याची अनुमती आपण द्यावी.'' तिने विनवून म्हटले.



तिची ही विनंती जयंत अव्हेरुं शकला नाही. त्याने संमती दिली. चित्रलेखा आनंदून गेली नि घोड्यावर बसली.

जयंत चित्रलेखाबरोबर अनेक प्रदेशांतून हिंडत होता. प्रत्येक ठिकाणीं जनतेचे कष्ट, त्यांच्या अडचणी तो जाणून घेत होता व जमेल तशी त्यांना मदत करीत होता. जे जेवण मिळत होते. ते तो आनंदाने स्वीकार करीत होता. जमिनीवर झोपायची वेळ आली तरी न कुरकुरता झोंपत होता. चित्रलेखालाही तसेच करावे लागले. तिलादेखील पृथ्वीतलावरच्या लोकांची जीवन-पद्धती हळूंहळूं समजायला लागली. मानवी जीवनाच्या नवरसांचा अनुभव तिला येऊं लागला.

एके दिवशी चित्रलेखा व जयंत अरण्यांतून प्रवास करीत होते. एका झाडाखाली एक अत्यंत



कुरुप तरुणी बसलेली त्यांना दिसली. ती फारच उदासवाणी दिसत होती जयंतने तिला तिच्या दुःखाचे कारण विचारले. त्या युवतीने उत्तर दिले. "माझे नांव जलजा आहे. मी जन्मतःच अशी कुरुप आहे. रवी नावाच्या एका तरुणाचे माझ्यावर फार प्रेम आहे. तो म्हणतो कीं लग्न केले तर जलजाशीच करेन. पण त्याच्या आईने ह्याला साफ विरोध केला. जर रवीने जलजाशी लग्न केले तर आपण विहिरींत उडी घेऊन आत्महत्या करुं अशी तिने त्याला धमकीही दिली आहे. मला हे सारं कांही आता सहन होत नाही. मी या अरण्यांत मृत्यू मिळावा म्हणून आले होते. पण मला मरण्याचे साहसदेखील होत नाही."

तिची ही कहाणी ऐकून जयंताच्या मनांत तिच्याविषयी दया निर्माण झाली. त्याने चित्रलेखेला म्हटलं, "तू देवकन्या आहेस. हिला सुरूप करण्याची शक्ती तुझ्यामधे आहे कां?"

चित्रलेखाने स्मितहास्य केले व ती जलजानजीक आली. तिने जलजाच्या मस्तकाला तीन वेळां स्पर्श केला. क्षणार्धांत जलजाचे एका सुंदर युवतींत रुपांतर झाले. दोघांपाशी कृतज्ञता व्यक्त करुन ती तिथून निघून गेली.

जलजा दिसेनाशी झाल्यावर चित्रलेखाचे अभिनंदन करण्यासाठी जयंत मागे वळला तर त्याला चित्रलेखाचे रूप संपूर्णपणे बदललेले दिसले व ती एखाद्या कुरुप स्त्रीसारखी दिसायला लागली होती. ता कांही वेळ गप्प बसला. आताची चित्रलेखा आणि कांही वेळापूर्वीची चित्रलेखा यांच्यात जमीन अस्मानाचा फरक होता. तो अवाक् होऊन तिच्याकडे बघत राहिला.

कांही क्षणांनंतर जयंतने चित्रलेखाला विचारले, "तू इतका मोठा त्याग कां केलास? आपले सौंदर्य तू जलजाला कां दिलेस?"

चित्रलेखाने लगेच उत्तर दिले, "इतके दिवस मी तुमच्यासोबत राहिले. मला कळलं कीं निस्वार्थी सेवा आपल्याला आनंद देत असते. शिवाय, जलजाकडे दुसरा कोणताही उपाय नव्हता. म्हणून मी तिला माझे सौंदर्य प्राप्त करुन दिले."

तिच्या या उत्तरामुळें जयंत अतिशय खूष झाला. तो तिला म्हणाला, "तू कुरुपिणी नाहीस. तुझ्यांतला मनमोहक निस्वार्थीपणा चमकतो आहे. मी तुझ्याशी विवाह करायचा निर्णय घेतला आहे." आणि त्याने तिचा हात धरला.



दुसऱ्याच क्षणीं चित्रलेखाला तिचे मूळ सौंदर्य प्राप्त झाले.

ही कहाणी सांगितल्यावर वेताळाने आपल्या शंका प्रकट करीत विक्रमार्कला विचारले, "राजन्, जयंत हा निश्चितच एक अत्यंत सुंदर पुरुष होता. त्याचे सौंदर्य पाहून साक्षात गंधर्वकन्या मोहित झाली. तिच्याशी विवाह करण्यास जयंताने नकार दिला. पण पुढे तीच सौंदर्यवती जेव्हां एक कुरुप तरुणी झाली, तेव्हां मात्र जयंत लगेच तिच्याशी विवाह करण्यासाठी तयार झाला.

हे त्याचे वर्तन त्याची मानसिक स्थिती ठीक नसल्याचे सुचवत नाही कां? त्याचा व्यवहार अविचारी व अर्धवट वाटत नाही कां? माझ्या या शंकांचे उत्तर माहित असूनदेखील जर तू मौन पत्करलेस, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन पडतील.

विक्रमार्कने म्हटले, "जयंताची मानसिक स्थिती उत्तम असल्याचे त्याचे वर्तन आपल्याला सुचवते. त्याला अविचार किंवा भ्रम समजणे ही तुझी चूक आहे. बाह्य शारिरीक सौंदर्याकडे सुरुवातीपासूनच जयंत ओढला गेला नव्हता. त्याला उत्तम गुणांची जाण होती. आणि ते जेव्हां त्याला दिसले. तेव्हां त्याने त्याला मान्यता दिली. त्याने चित्रलेखाचा विवाहाचा प्रस्ताव अगोदर नाकारला होता. ती त्याच्यासमवेत राहिली आणि तिला त्याचा परनिष्ठ स्वभाव समजला. त्याची निस्वार्थी सेवा आणि सद्गुण पाहून ती त्याच्यावर जास्तच भाळली, आणि तिने त्याच्या पावलावर पाऊल ठेवले. तिने आपले शारिरीक सौंदर्य गमावले, पण त्याग, परोपकार हे गुण कमावले. हे पाहून जयंताला ती जास्त सुंदर व मनमोहक वाटायला लागली. म्हणून त्याने तिचा आनंदाने स्वीकार केला. यामुळें चित्रलेखाला आपले मूळ रूप परत मिळाले. हा त्याग व निरपेक्ष सेवेचा महिमा आहे."

राजाचा मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार - कु. करुणा यांची रचना)*





# भारताचा झरोका

## सणांचे तीनशे दिवस



श्रीरंगमच्या श्रीरंगनाथस्वामी मंदिराचे हे खास वैशिष्ट्य आहे कीं वर्षातले तीनशे दिवस इथें कांही ना कांही सण वा उत्सव चाललेला असतो. इथले दुसरे वैशिष्ट्य म्हणजे इथले गोपुर तेरामजली असून २३५ फूट उंचीचे आहे. भारतांतले हे सर्वात उंच गोपुर आहे. देशांतल्या पांच प्रमुख वैष्णव मंदिरांपैकी हे एक आहे. श्रीरंगम हे बेट त्रिचनापल्लीपासून पंधरा किलोमीटर अंतरावर आहे. या मंदिराच्या प्रांगणात, मुख्य मंदिराखेरीज गणेश, विष्णू, दुर्गा, राम व लक्ष्मण, वटपत्रावरचा बाळकृष्ण, हनुमान, धन्वंतरी यांची व इतर देवतांची स्वतंत्र मंदिरे आहेत. त्यामुळे अनेक उत्सव इथे साजरे होत असतात. डिसेंबरमधे येणारी वैकुंठ एकादशी हा सर्वात महत्वाचा उत्सव असतो.

## आस्था, अब्जावे बालक

११ मे २००० रोजी दिल्लीमधल्या रुग्णाल्यांत पहांटे ५ वाजता जेव्हां आस्था ही बालिका जन्मली, तेव्हां ती भारताचा इतिहास घडवत होती. तिच्या जन्मामुळे भारताची लोकसंख्या एक अब्ज (शंभर कोटी) झाली. विसाव्या शतकाच्या सुरवातीला भारताची लोकसंख्या तेवीस कोटी होती. आणि विसाव्या शतकाच्या अखेरीस जगाची लोकसंख्या सहाशे कोटी किंवा सहा अब्ज होती. जागतिक आरोग्य संघटनेच्या अंदाजाप्रमाणे २०४५ सालापर्यंत भारतदेशाची लोकसंख्या इतर सर्व देशांपेक्षा जास्त असेल.





## भुताची मदत

लक्ष्मीपुर गांवात अन्नपूर्णा एक लहानशी खानावळ चालवीत होती. त्या दिवशी मध्य-रात्रीपर्यंत जेवायला येणाऱ्या वाटसरुंना, प्रवाशांना, ती जेवण वाढीत होती. सगळी आवरासावर करुन ती आता जरा विश्रांति घेणार तेवढ्यांत तिथे एक म्हातारा इसम येऊन पोंचला.

अन्नपूर्णाने त्याला विचारलं, "ही कांही यायची वेळ आहे कां? मध्यरात्र झाली तरी लोक कांही मला घटकाभर आराम करुं देत नाहीत. जेवायचं असलं तर सांगा. थोड्याच वेळांत तयार होईल."

त्या म्हाताऱ्याने आपल्या खांद्यावरची झोळी खाली ठेवत म्हटले, "अन्नपूर्णा, ईश्वराच्या कृपेने मी भुकेला नाही कीं तहानेला नाही. फक्त मला बाहेरच्या पडवींत झोपायला जागा दे."

आश्चर्याने अन्नपूर्णेने विचारले, "तहानभूक नसायला तुम्ही कांही योगी आहात कीं काय?"

म्हातारा प्रेमळपणे हंसून म्हणाला, "हो, एक प्रकारे मी योगीच आहे. माझं नाव रामेश. मीदेखील इथलाच राहाणारा होतो. जेव्हां मी तरुण होतो, तेव्हां माझे घर जळाले. त्या आगीत माझे आईवडील, बायको, बहीण, – सगळेजण जळून गेले. मला विरक्ती आली आणि मी गांव सोडून निघून गेलो. तेव्हां तुझी आई सरस्वती ही खानावळ चालवीत होती. तेव्हां तू अगदी छोटी होतीस. तुझं नांव माझ्या चांगलं लक्षांत आहे. मी गांव सोडल्यानंतर तीर्थयात्रेला गेलो. एका योग्याच्या दयाळूपणामुळें मला तहानभूक लागत नाही. मला ज्योतिषाचं ज्ञान आहे. मी कुणाचंही भविष्य सांगू शकतो."

अन्नपूर्णेने उत्सुकतेने विचारलं, "मी तर तुम्हाला एक सामान्य प्रवासी समजले होते. माझं भविष्य तुम्ही सांगाल?" रामेशने डोळे मिटले आणि आश्चर्यचकित नजरेने पाहात असलेल्या अन्नपूर्णेला म्हटले, "अन्नपूर्णा, तू पैसे घेऊन जेवण वाढतेस. तू खरीखुरी अन्नपूर्णा आहेस.



दमलेल्या भागलेल्या प्रवाशांची तू तहानभूक भागवतेस. देव तुझ्यावर फार प्रसन्न आहे. मी आता लौकरच मरणार आहे. माझी इच्छाशक्ती आणि दिव्य दृष्टी मी तुला दान म्हणून देईन, आणि काशीला जाऊन महादेवाच्यासमोर मला मुक्ती मिळेल. उद्या सकाळीं उजाडताच तू गांवाबाहेरच्या वडाच्या झाडाजवळ ये. त्या शक्ती मी तुला तिथें देईन.''

सकाळीं दोघेही तलावाच्या कांठी गेले. अन्नपूर्णाने तळ्यांत स्नान केले. रामेशने आपल्या शक्ती तिला देत म्हटले, "अन्नपूर्णा, कोणत्याही परिस्थितीत या योगशक्तींचा उपयोग स्वार्थासाठी करायची नसतो. यांचा जर तू दुरुपयोग केलास तर तुला वेड लागेल, आणि तू गांवोगांव भटकत राहाशील.'' तिला सावधानतेची सूचना देत रामेश म्हणाला.

ते ऐकून ती सुन्न झाली. तिच्या मनांत विचार आला कीं ज्या शक्तींचा उपयोग करायचा नाही, त्या काय कामाच्या? ती बराच वेळ विचार करीत होती; तोपर्यंत रामेश तिथून निघून गेला आणि बघताबघता दिसेनासा झाला.

अन्नपूर्णाला तो गेल्याचे वाईट वाटले, पण तिचा नाईलाज होता. झाली गोष्ट विसरून ती पुन्हां आपल्या खानावळीच्या कामांत गुंतली.

गोविंद हा तिचा दत्तक मुलगा होता. त्याच्या लक्षांत आलं कीं अन्नपूर्णाचा पूर्वीचा उत्साह आता कमी झालाय. एक दिवस त्याने याचं काय कारण ते तिला खोदूनखोदून विचारलं. तेव्हां अन्नपूर्णाला मिळालेल्या दिव्यशक्तीबद्दल तिला त्याला सांगावेच लागले. त्यांचा दुरुपयोग केला तर काय संकट येईल, हेही तिने त्याला सांगितले.

गोविंदला हे सारं स्वप्नवत वाटलं. पण तो ते विसरला नाही. दुपारच्या वेळी गोविंद त्या वडाच्या झाडाजवळ गेला. झाडाकडे एकवार नजर टाकून तो आता झाडाखाली सांवलींत बसणार, तितक्यांत झाडावरून एक विचित्र आकार खाली उतरला. ते भूत आहे हे गोविंदला कळलं. तो भीतीने थरथर कांपायला लागला.

भुताने खुणेने सांगितलं कीं घाबरूं नकोस, आणि पुढे ते गोविंदाला म्हणालं, ''ज्या अन्नपूर्णाने तुझे पालनपोषण केले आहे, तिला दिव्यशक्ती देणाऱ्या रामेशचा मी पिता आहे. साऱ्या परिवारासकट मी आगीत जळून मेलो म्हणून मी भूत झालो आहे. तू अन्नपूर्णाच्या



मुलासारखा आहेस, म्हणून तिने जर दिव्यदृष्टी वापरून तुझे भविष्य सांगितले तर तो स्वार्थ होईल, दुरुपयोग होईल. पण अन्नपूर्णेची शक्ती तुझ्या उपयोगाची व्हावी म्हणून मी तुला त्यांत मदत करूं शकेन.''

त्याच्या बोलण्याने गोविंदाच्या मनांत उत्साह शिरला. तो म्हणाला, ''ते कसं शक्य आहे? माझ्या आईसमान अन्नपूर्णेच्या शक्ती मला कशा शुभ ठरतील?'' रामेशच्या बापाचे भूत म्हणाले, ''हे बघ, मी तर मेलेलो आहे, म्हणून त्याबद्दल मला जास्त सांगायचे नाही. पण तू माझ्या भविष्याबद्दल तिच्याशी बोलूं शकशील कीं! ते जाणून घे आणि नंतर मी तुला मदत करीन.''

गोविंद घरी परत गेला आणि त्याने अन्नपूर्णाला सारी हकीकत सांगितली.

आपल्याला मिळालेल्या शक्तीची परीक्षा घ्यायची वेळ आता आली आहे, हे पाहून अन्नपूर्णाला आनंद वाटला. पण तिने त्या भुताचे भविष्य पाहिले, तेव्हां तिला जरा भीती वाटली. कारण तो भुताच्या योनींतून मुक्त होणार होता. हे असं केलं तर त्यांत स्वार्थ होईल कीं काय, ही तिला काळजी वाटली.

आपली शंका दूर करण्यासाठी ती गोविंदच्या-बरोबर वडाच्या झाडाखाली गेली.

भूत झाडावरून खाली उतरले, त्याने अन्नपूर्णाला नम्रपणे प्रणाम केला व ते म्हणाले, ''तुम्हाला माहीत आहे की मी रामेशचा पिता आहे. आगीत जळालेली रामेशची बहीण, म्हणजे माझी मुलगी गिरीजा होती. ती आता शेजारच्या शिवपुर गांवात माझा धाकटा भाऊ शिवराज याची नात म्हणून



जन्मली आहे. ती आता मोठी झाली आहे. पण ती मुकी आहे. तुमच्या इच्छाशक्तीमुळें ती बोलूं शकेल, तिला वाचा येईल. माझ्या धाकट्या भावाला तुम्ही जाऊन सांगा कीं तुमचा मुलगा गोविंद याच्याशी त्याच्या नातीचे लग्न व्हावे अशी तुमची प्रबळ इच्छा आहे. शिवराज श्रीमंत आहे, तेव्हां तो मुलीला भरपूर पैसाअडका देईल. तुमचा मुलगा श्रीमंत होईल. आणि मलाही त्या पिशाच्चयोनींतून मुक्ती मिळेल. त्यांत कोणताही स्वार्थ नाही, उलट सारे पुण्यच आहे.'' असं म्हणून भुताने पुन्हां एकदा अन्नपूर्णाला प्रणाम केला व ते झाडावर जाऊन बसले.

अन्नपूर्णाने भुताचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले, नि तिच्या साऱ्या शंकाकुशंका दूर झाल्या. गोविंदला घेऊन ती शिवपुरला गेली, आणि आपल्या दैवी शक्तीच्या प्रभावाने तिने शिवराजच्या नातीला बोलती केली. आता ती मुकी राहिली नव्हती.

अन्नपूर्णाकडून सारी परिस्थिती कळल्यानंतर शिवराजने आपल्या एकुलत्या एक नातीचे लग्न गोविंदशी करून दिले. लग्नाच्या वेळीच वरदक्षिणा म्हणून त्याला एक शेतमळाही दिला.

अन्नपूर्णाच्या दिव्य शक्तिबद्दल आसपासच्या गांवात माहिती फैलावली.

ओळीने धनिक, व्यापारी, वगैरे आपापले भविष्य जाणून घेण्यासाठी तिच्याकडे यायला लागले. तिच्या योगशक्तीच्या बळाने ती त्यांचे भविष्य सांगत होती. त्यासाठी मोबदला मागणे हा स्वार्थ ठरला असता, म्हणून ती कांहीही पैसे मागत नव्हती.

पण प्रजेच्या उपयोगासाठी येणारी रुग्णालयें व शाळा यांच्यावर त्यांच्याकडून पैसे देववत होती.

अशा तऱ्हेने, खानावळ चालवणारी अन्नपूर्णा, योगशक्तीची अन्नपूर्णा, म्हणून ओळखली जाऊं लागली. तिचा गांवात मान वाढला, तिच्या आज्ञेनुसार लोक समाजकल्याणाची कामें करायला लागले. ती बरीच वर्षे जगली आणि तिने लोकांचे जीवन व विचार सुधारले.





## लोकप्रिय टपाल तिकीटे



गेल्यावर्षी २००२ साली काढलेल्या तिकीटांविषयी टपाल-खात्याने एक चांचणी घेतली. त्यांत रिलायन्स उद्योगसमूहाचे संस्थापक, कै. धिरुभाई अंबानी यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ काढलेले तिकीट सर्वांत अधिक लोकप्रिय ठरले. दुसऱ्या क्रमांकावर कथकली नृत्यावरचे तिकीट होते. भारत-जपान मैत्रीच्या संदर्भात हे तिकीट प्रसिद्ध झाले होते. जपानी नृत्यनाट्य काबुकी हे कथकलीशी साम्य दाखवते. भारतीय सेनेने एव्हरेस्ट शिखरावर पाय ठेवला त्याप्रीत्यर्थ काढलेले तिकीट हे तिसऱ्या क्रमांकांवर आले.

## वयाची अट नाही

किमानी ओंगांगा मरुगे हा केनियामधल्या एकडोरे इथल्या प्राथमिक शाळेंतल्या पहिल्या इयत्तेतला विद्यार्थी आहे. तुम्ही विचाराल कीं ''मग त्यांत काय विशेष?'' किमानी ८४ वर्षांचा आहे आणि काठीच्या आधाराने तो शाळेंत जातो. त्याचे वर्गमित्र सहा नि सात वर्षांचे आहेत. केनियाच्या स्वातंत्र्यलढ्याचा सैनिक म्हणून किमानीला निवृत्तीवेतन मिळते. त्याला पैसे मोजतादेखील येत नव्हते. बायबल वाचता येईना म्हणून त्याला वाईट वाटत असे. २००२ साली केनियामधे प्राथमिक शालेय शिक्षण मोफत झाले. म्हणून त्याने आयुष्यांत प्रथमच शाळेंत प्रवेश घेतला. त्याला बत्तीस नातवंडे आहेत, त्यापैकीं दोन त्याच शाळेंत आहेत. पण ती वरच्या वर्गांत



आसामची लोककथा

# राक्षसाची फजिती

शहरापासून दूर असलेल्या एका लहानशा खेड्यांत दोघे मित्र राहात होते. त्यांची मैत्री विचित्र परिस्थितींत झाली होती. मोईत्र जन्मांध होता आणि फुकन जन्मतःच पांगळा होता. जवळच्या एका वडाच्या झाडाखाली ते नेहमी भेटत आणि भरपूर वेळ गप्पा मारीत.

ते 'बिहू' उत्सवाचे दिवस होते आणि सारे गांवकरी त्या उत्सवांत सामील होत होते. दुर्दैवाने, मोईत्र आणि फुकन त्या उत्सवाची गंमत पाहूं शकत नव्हते. पण त्यांनी त्यांतून एक मार्ग शोधला. मोईत्र फुकनला आपल्या खांद्यावर बसवून नेणार होता. मोईत्र तगडा होता आणि त्याचे पायही चांगले बळकट होते. फुकन उंच नि बारका होता, तेव्हां मोईत्रला त्याला खांद्यावर उचलून घेणे सहज शक्य झाले.



त्या उत्सवी जत्रेंत जाऊन ते हिंडले. फुकन सार्‍या दृश्यांचे छान वर्णन मोईत्रला सांगत होता, आणि त्यांनी आनंदाने उत्सवाची मजा अनुभवली. मोईत्र चालून दमला की ते त्यांच्या ठरलेल्या वडाच्या झाडाखाली विश्रांति घेत होते.

झाडाखाली बसलेले असताना एके दिवशी मोईत्र म्हणाला, "अरे मित्रा, आपण या खेड्यांत किती दिवस असे नुसते रिकामटेकडेपणाने काढायचे? आपण कुठेतरी दुसरीकडे जाऊं या आणि कांहीतरी करुं या."

फुकन जरा चांचरत म्हणाला, "मी तुझ्या खांद्यावर बसून इथें या गांवात हिंडणे ठीक आहे. पण शहरांत गेलो तर खूपच चालायला लागेल कीं रे!"

"त्याची नको काळजी करुंस. मी दमलो कीं आपण थांबून जरा विसावा घेऊं. तू मार्ग दाखवला नाहीस तर मला कुठेही जाता येणार नाही."

दुसर्‍याच दिवशी दोघे मित्र जवळच्या देवळांत गेले, त्यांनी मनोभावे प्रार्थना केली आणि मोठ्या धीराने या अनोळखी प्रवासाला सुरवात केली. वाटेंत दिसणार्‍या प्रत्येक गोष्टीचे फुकन अगदी बारीकसारीक तपशीलासह वर्णन करीत



होता. ते ऐकताना मोईत्रला चालण्याचे श्रम जाणवले नाही, व खांद्यावरचे ओझेही जड वाटले नाही.

वाटेंत फुकनला एका झाडाखाली एक लहानशी डफली दिसली. कुणीतरी ती तिथे टाकली असावी मोईत्रला वाटले कीं ती बरोबर न्यावी. त्यांनी ती घेतली.

जरा पुढे गेल्यानंतर त्यांना एक विहीर दिसली. त्यांनी पाणी काढले, आणि आपली तहान भागवली. तिथेच एक दोरी पडली होती. फुकनने दोरीला डफली बांधली आणि खांद्यावर अडकवली. पुढे जाताजाता त्यांना एक तळे दिसले. तळ्याच्याभोवती मोठी उंच झाडे होती. हिरव्यागार गवतावर त्यांनी जरा आराम करायचे ठरवले.

फुकनला एक कासव हळूहळू त्यांच्याकडे येताना दिसले. त्याने मोईत्राला विचारले, "आपण हे बरोबर घेऊन जायचं, कीं इथेंच त्याला सोडून घेऊं या?"

"पण त्याचा आपल्याला काय उपयोग?" मोईत्राने विचारले.

"होईल कांहीतरी उपयोग. ते आपल्याकडे येतंय, त्याला आपली मदत हवी असेल." फुकन म्हणाला. मोईत्राला कल्पना पटली. त्याने दोरीच्या दुसर्‍या टोंकाला कासव बांधले आणि दोरी खांद्याला अडकवली. त्यांचा प्रवास पुढे चालू झाला. जेव्हां ते अरण्याजवळ पोचले, तेव्हां अंधार पडायला लागला होता. मोईत्र आता दमला होता. "आपण रात्री राहायला कुठेतरी जागा शोधायला हवी." त्याने खांद्यावर बसलेल्या फुकनला म्हटले. "मला दूरवर एक मोठे घर दिसते आहे. चल मित्रा, आपण तिथेच जाऊं या."

ते तिथे पोंचले तेव्हां बाहेर कुणीच नव्हतं. म्हणून ते घरांत शिरले एका खोलींतून घोरण्याचा जोरदार आवाज येत होता. एक कुरूप राक्षस तिथे गाढ झोंपला होता. या दोघा मित्रांना जरा भीतीच वाटली. पण एव्हाना रात्र झाली होती आणि अंधारात दुसरा आसरा शोधणे कठीण झाले असते. फुकनला दिसलं कीं राक्षसाच्या खोलीला बाहेरुन कडी घालता आली असती. कांहीही



आवाज न करता त्याने ती कडी घातली. ते दुसर्‍या खोलींत गेले, आणि त्यांनी त्या खोलीला आंतून कडी लावली. त्या खोलींत बरेच खाद्यपदार्थ होते. त्यांनी त्यांतले घेऊन पोटभर खाल्ले आणि ते दोघेही जरा वेळ पडून राहिले. अधूनमधून फुकन उठून खिडकींत डोकावून पाहात, दुसर्‍या खोलींत कांही हालचाल होतेय कां, त्याचा अंदाज घेत होता.

एकाएकी कासवाने हालचाल केली आणि ती डफली खाली पडली. तेवढ्या आवाजाने तो राक्षस



जागा झाला. त्याच्या खोलीला बाहेरुन कडी घातलेली पाहून तो चकितच झाला. "माझ्या घरांत शिरुन हा आगाऊपणा करण्याचे कुणाचे धाडस असेल?" तो दार ठोठावूं लागला. "दार उघडा आधी!" तो ओरडला आणि दारावर थापा मारु लागला.

थोडा वेळ दुसऱ्या खोलींतून कांहीच आवाज येईना. तेव्हां मोईत्रने फुकनच्या कानांत सांगितले, "त्याच्या आवाजापेक्षां मोठा आवाज काढून आपण त्याला उत्तर दिले पाहिजे." फुकनने ती डफली घेतली आणि जोरजोराने बाजवली. त्याचा आवाज राक्षसांच्या आवाजापेक्षां आणि दारावरच्या थापांपेक्षां मोठा होत होता. राक्षस चमकला. "माझ्यापेक्षां जास्त ताकदवान राक्षस दुसऱ्या खोलींत आलेला दिसतोय कीं काय? कोण आहेस रे तू?" राक्षसाने पुकारले.

मोईत्राचा आवाज भसाडा होता. त्याने उत्तर दिले, "आधी तू कोण आहेस ते सांग!"

"मी एक राक्षस आहे." राक्षसाने सांगितले.

"मग मी तर राक्षसांचा राजा आहे." मोईत्राने जमेल तितका मोठा आवाज काढून ओरडून सांगितले.

"उगीच बढाया मारुं नकोस. तू राक्षसांचा राजा आहेस याला पुरावा काय आहे?" राक्षसाने आव्हान दिले.

"आधी तुझा पुरावा तर दाखव, कीं तू मोठा राक्षस आहेस!"

राक्षसाने आपला एक केस उपटला आणि खिडकींतून त्या खोलींत फेंकला. तो जमिनीवर पडला तेव्हां धाडकन आवाज झाला. "हा जर माझ्या डोक्यावरच्या केसाचा आवाज आहे, तर मी किती ताकदवान आहे, ते तुला कळलं असेलच."

मोईत्राने फुकनला आपल्या खांद्यावर उभा राहून ती दोरी त्या खोलींत टाकायला सांगितली. त्यानंतर मोईत्र पुन्हां ओरडला, "हा बघ माझा केस! पाहा किती जाड आहे तो! या एका केसाने मी तुझे हातपाय बांधीन."

आता राक्षस जरा घाबरला. त्याची शक्ती तो कशी दाखवणार होता? त्याने आपल्या केसांतली एक ऊ काढली आणि खोलींत टाकली." ही बघ माझ्या केसातली ऊ! ही बेडकाएवढी मोठी आहे. आता तरी पटलं कां? मीच तुझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे!" राक्षसाने ऐटींत सांगितले.

मोईत्राला काय सांगावे ते क्षणभर सुचेना. तेव्हां फुकनला ते कासव दिसले. त्याने ते उचलले



आणि खिडकींतून भिरकावले. "मी तुझ्या ऊला पायाखाली चिरडतोय! माझ्या डोक्यांतल्या या ऊला तू चिरडून दाखव पाहूं! तुला जमणारच नाही ते!"

राक्षसाने रागाने कासवाला चिरडायचा प्रयत्न केला. पण त्याचे कवच इतके टणक होते कीं कांही केल्या त्याला तडा पडेना. आपला शत्रू बराच ताकदवान असला पाहिजे असं राक्षसाला वाटलं. जर दोघांची मारामारी करायची वेळ आली, तर आपण नक्कीच हरणार आहोत, असं समजून त्याने आपला पवित्रा बदलला.

"ठीक आहे, तू माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहेस हे मी मान्य करतो. आता तू बाहेर ये. मला तुझ्याशी मैत्री करायची आहे. आपण दोघेही इथे सुखाने राहूं या."

"कबूल, कबूल!" मोईत्राने उत्तर दिले. तो पुढे म्हणाला, "दोन राक्षस एका जागी कधीच राहात नाहीत. तुझ्या डोक्यांतली ऊ इतकी चवदार होती, तेव्हां तुझे मांस किती चविष्ट असेल त्याची मी कल्पना करुं शकतो. तू जर इथून गेला नाहीस तर माझ्या भोजनाची अडचण तुझ्या मांसाने नक्कीच भागेल. येऊं कां मी बाहेर?" मोईत्राने अगदी मोठ्याने ओरडून म्हटले.

"नको, नको, मी जातो इथून. तू इथे राहा आणि माझे घर, त्यांतले सामानसुमान सगळे तुलाच ठेव!" राक्षस घाईघाईने म्हणाला.

त्याने तिथून जायचे ठरवले, तेवढ्यांत त्याला कडी काढल्याचा आवाज आला. तो भलताच घाबरला आणि पळत सुटला.

मोईत्र आणि फुकन बाहेर आले आणि त्यांनी बघितले तर तिथे राक्षसाचा मागमूस नव्हता. ते दोघे दुसऱ्या खोल्यांतून फिरले. राक्षसाने गोळा केलेली संपत्ती पाहून त्यांना खूपच आश्चर्य वाटले. त्यांनी त्यांतले जवाहीर, दागिने, व जमेल तितकी चांदीची भांडी उचलली.

राक्षसाच्या पलंगाशेजारी फुकनला डोळ्यांत घालायच्या नेत्रांजनाची बाटली दिसली. "हे बघ मोईत्र, हे अंजन तुझ्या डोळ्यांत घालून पाहूं या."

मोईत्राच्या डोळ्यांत फुकनने ते अंजन घातले. आणि मोईत्राला नीट दिसायला लागलं. त्याला दुसऱ्या कोपऱ्यांत एका औषधी तेलाची बाटली दिसली.

त्याने फुकनच्या पायावर त्यांतले तेल चोळले. फुकनच्या पायांतही शक्ती आली नि तो त्याला नीट चालता येऊं लागले. दोघा मित्रांनी तिथली मूल्यवान संपत्ती जमा केली आणि ते दोघे आपल्या गांवी परत गेले. तिथे त्यांनी मोठे घर बांधले आणि ते सुखाने राहूं लागले.





# विद्याधिकारी

चंद्रसेन कांचनपुरचा दक्ष राज्यकर्ता होता. पित्याच्या आकस्मिक मृत्यूमुळें लहान वयांतच त्याच्यावर राज्यकारभाराची जबाबदारी पडली. त्याने राज्यव्यवस्थेंतच नव्हे, तर सामाजिक सुधारणादेखील बऱ्याच केल्या. जनतेचे कल्याण करण्याची तीव्र इच्छा आणि दूरदृष्टी ठेवून आंखलेले धोरण, यामुळे राज्यांतले गोरगरीब व श्रीमंत, सारेचजण सुखी होते व राज्य समृद्ध होत होते. तो राजा एक सुशिक्षित युवक होता. शिक्षणपद्धतींत चांगली सुधारणा करण्याची त्याची इच्छा होती. त्यासाठी चंद्रसेनराजाने दरबारांतले विद्वान, राजगुरु, प्रमुख कवि व पंडित यांना निमंत्रण दिले. त्या सर्वांनी मिळून निर्णय घेतला कीं राज्यांत एकाच प्रकारची शिक्षणपद्धती चालू करायची. ज्या विषयाची विद्यार्थ्याला आवड असेल, त्या विषयाचे शिक्षण त्याला मिळावे अशी व्यवस्था व अनुमती असावी. राजनीती व समाजशास्त्र यांचा अभ्यासदेखील त्यांनी अवश्य करायला हवा. संकटाच्या प्रसंगी आत्मसंरक्षण महत्वाचे असते, म्हणून शरीरसंवर्धनासाठी तरुणांना व्यायाम, शस्त्रविद्या वगैरे विषयांचे शिक्षणही अवश्य द्यावे.

यासाठी एक कार्यक्षम विद्याधिकारी नेमला जावा, असे त्या सर्वांनी एकमताने ठरवले. त्या अधिकाऱ्याच्या मार्गदर्शनाखाली राज्यांत असलेल्या सर्व गुरुकुलांमधले प्रमाणित शिक्षणक्रमांची योजना राबवली जावी.

आता इतक्या मोठ्या जबाबदारीचे पद सांभाळणारी व्यक्ती अत्यंत श्रेष्ठ व विद्वान असली पाहिजे. त्याशिवाय योग्य-अयोग्य काय, त्यांतला फरक चांगल्या प्रकारे जाणणारी असायला हवी. अशा व्यक्तीची निवड करण्याचे अवघड व गुंतागुंतीचे काम राजा चंद्रसेन याने राजगुरु महेंद्रभट्टावर सोपवले.

या पदावर नेमणूक व्हावी म्हणून चुरस सुरुं झाली. कारण हे अत्यंत महत्वाचे पद होते, त्याला

मीना जयराम



उत्तम वेतन व सुविधा होत्या आणि राजाची वरचेवर भेट होण्याची संधी निश्चितच मिळाली असती. आपले भाग्य या परीक्षेंत आजमावून पाहावे म्हणून कितीतरी तरुण राजधानीला आले. राजगुरु महेंद्रभट्ट एक उत्कृष्ट विद्वान, बुद्धिमान व बहुश्रुत महर्षी होते. ते या उमेदवारांची अगोदर लेखी परीक्षा घेत होते आणि त्यांत यशस्वी होणाऱ्यांची तोंडी मुलाखत घेत होते. यामुळें लेखी परीक्षेत उत्तीर्ण न झालेल्या उमेदवारांना घरी परत जावे लागले.

कांचनपुरी राज्यांतल्या सुंदरपुर गांवात इंद्रदत्त नांवाचा एक तरुण राहात होता. त्याने सर्व शास्त्रांचे शिक्षण गुरुकुलांत घेतलेले होते. लहान असताना तो काशीला गेला होता. तिथे त्याने महापंडितांची सेवा-शुश्रुषा केली, आणि शिक्षण घेऊन तो महापंडित बनला. आपण शिकलेली विद्या आपण इतरांनादेखील शिकवली पाहिजे असे त्याच्या फार मनांत होते. त्याला विद्याधिकारी पदाच्या नियुक्तीबद्दल कळलं. तो लगेच राजधानींत आला.

तिथे त्याने एका धर्मशाळेंत मुक्काम ठेवला. दोन दिवस तो राजधानींत हिंडत होता आणि त्याने बरीच माहिती गोळा केली. त्या जागेसाठी कितीतरी तरुण उमेदवार आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करायला उत्सुक होते. राज्यांत सुविधा, आवड असूनही अनेक विद्यार्थी आळशीपणामुळे शिकत नव्हते.

तिसऱ्या दिवशी इंद्रदत्त सकाळींच राजगुरुला भेटायला गेला. त्यावेळीं तिथे अंतिम चांचणीसाठी सेनाध्यक्षाचा मुलगा दुर्जय व कोषाधिकारींचा मुलगा विक्रम, एवढेच उरले होते.

इंद्रदत्ताला बघूनच महेंद्रभट्टाला तो आवडला. त्याची माहिती राजगुरुने विचारली आणि प्रश्न केला की दोन दिवसापूर्वी जर तो राजधानींत आला तर राजगुरुकडे यायला इतका उशीर त्याने कां केला?

इंद्रदत्ताने नम्रपणे खुलासा केला, "आर्य, क्षमा असावी. मी सारं कांही सांगतो. मी ज्या पदाची इच्छा मनांत बाळगली आहे, ते पद फार मोठ्या जबाबदारीचे आहे. म्हणून मला त्याबद्दलची माहिती गोळा करायची होती. आपल्या या नगरांत एकूण नऊ शाळा आहेत. राज्यांतल्या सर्व शाळा, व गुरुकुलांची एकूण संख्या, शंभरापेक्षां जास्त असणार नाही. आपल्या राज्यांतले विद्यार्थी आणि शाळा, या दोन्हींच्या आंकड्यांचा मेळ जमत नाही, गुरुंच्या मर्जीनुसार शिक्षण दिलं जातं



आहे. आता माझी तरी अशी धारणा आहे कीं विद्यार्थ्यांच्या कुवतीनुसार व गुणवत्तेनुसार सर्वांना सारखी संधी मिळाली पाहिजे, आणि अशा शैक्षणिक संस्थांची आवश्यकता आहे." इंद्रदत्ताने आपले मत सांगितले.

विद्याधिकाऱ्याच्या पदाची जबाबदारी व महत्व इंद्रदत्ताला नीट समजले आहे असे महेंद्रभट्टाला वाटले.

"ही जागा तुला मिळेलच असा तुझा समज कसा झाला?" महेंद्रभट्टाने प्रश्न केला.

"मी जे काम हातांत घेतो ते पूर्ण करण्याचा आटोकाट प्रयत्न करतो. तो माझा स्वभाव आहे. त्याशिवाय जर आशा नष्ट झाली तर भविष्य शून्यच होईल."

इंद्रदत्ताने आत्मविश्वासाने सांगितले. त्याचे हे उत्तर ऐकून महेंद्रभट्टने दुर्जन व विक्रमला तिथे बोलावले, आणि त्या तिघांना विचारले, "सर्वांत जास्त वेगाने धावते ते मन! त्यानंतर दुसऱ्या स्थानावर कोण आहे?"

"वायु" दुर्जनने सांगितले.

"नाही, अग्नी!" विक्रम म्हणाला.

"मला वाटतं, बातमी! हे आपल्या प्रश्नाचं उत्तर आहे. वारा आणि आगीपेक्षांही जास्त वेगाने बातमी फैलावते. माझे गांव राज्याच्या दूरच्या कोंपऱ्यांत आहे. पण या निवडीसंबंधीची बातमी तिथेही पोंचली. म्हणजे वार्ता वेगवान असते हे सिद्ध होत नाही कां?" इंद्रदत्ताने म्हटलं.

"आणखी एक प्रश्न! मानवाला कोण जाळतं?" महेंद्रभट्टाने विचारले.

"अग्नी!" दुर्जनने लगेच उत्तर दिले.



"हो हो, अग्नी केवळ मानवालाच नव्हे, तर कांहीही, कुणालाही, जाळून टाकूं शकतो." विक्रमने ठामपणे सांगितले.

"आर्य, अग्नीपेक्षांही जास्त पीडादायक आहे खोटा आरोप किंवा कलंक! त्यामुळें माणसांच्या स्वभावांत बदल होऊं शकतो. खोट्या आरोपाने माणूस आंतल्याआंत जळत राहातो." इंद्रदत्ताने सांगितलं.

"यानंतरचा प्रश्न! मृत्यूला आपल्याजवळ आणणारा कोण?"

"अनारोग्य!" दुर्जयचे उत्तर. विक्रम म्हणाला, "चिंता!"

"आर्य, अनारोग्य आणि चिंता मृत्यूला आपल्याजवळ आणतात, पण त्या दोन्हीचे मूळ कारण आहे, क्रोध! क्रोधामुळे विवेक आपल्यापासून दूर जातो.

आपल्या मनांतले विकार अकारण वाढत राहातात. अनेक धक्के सहन करणारे आपले शरीर मृत्यू सहजपणे गिळंकृत करुं शकतो." इंद्रदत्ताने म्हटले.

त्याचे हे उत्तर ऐकून महेंद्रभट्टाच्या चेहऱ्यावर सुहास्य दिसूं लागले. त्याने विचारले, "इंद्रदत्त, तुझी उत्तर देण्याची पद्धत मला आवडली. जर तुला हे विद्याधिकारीचे पद जर मिळाले, तर ते कसे सांभाळशील?"

"मोठ्यांचे मत स्वीकार करीन. आपल्या देशांत कितीतरी तरुणतरुणी आपापल्या बुद्धिमत्तेचे, गुणांचे प्रदर्शन करण्यासाठी उतावीळ आहेत. अशा गुणवंतांना जर संधी दिली, तर त्यांच्यापैकी प्रत्येकजण स्वतःच एक संस्था चालवूं शकेल, संधी न मिळाल्यामुळे निराश झालेल्यांना प्रोत्साहन मिळेल, आणि त्यांना विद्यादान करता येईल. माझ्या ज्ञानाला आपल्या अनुभवाची जोड देऊन कांचनपुरांतल्या प्रत्येक तरुणतरुणीला शिक्षणाची संधी मिळेल, यासाठी सर्वतोपरी प्रयत्न मी करीन." इंद्रदत्तने आवेशाने म्हटले.

त्यानंतर आठवड्यांतच इंद्रदत्ताची विद्याधिकाऱ्याच्या पदावर नेमणूक झाली. महेंद्रभट्टाचा विश्वास अनाठायी नव्हता. इंद्रदत्ताने अतिशय प्रतिभावंत अधिकारी म्हणून नांव मिळवले आणि चंद्रसेन राजाच्या राज्यांतल्या विद्यार्थ्यांसाठी तो कल्पवृक्ष बनला.







# राजकन्या व सेनाधिकारी

बिजिंग ही राजधानी असलेला आजचा चीन देश, ही गोष्ट घडली तेव्हां अस्तित्वांत नव्हता. हा प्रचंड भूभाग लहानलहान राज्यांनी व्यापलेला होता. त्यापैकी एक राज्य होते च्यू!

सुमारे २६०० वर्षांपूर्वी च्यू या राज्यावर झुआंग राजा राज्य करीत होता. त्या काळांत ही राज्यें नेहमी आपापसांत लढत असत. अशाच एका लढाईत झुआंग राजाची जीत झाली होती. आपला विजय साजरा करण्यासाठी व आपल्या सेनाधिकाऱ्यांचा सन्मान करण्यासाठी म्हणून राजाने एक मोठी मेजवानी दिली. कारण त्यांच्या शौर्यामुळे तर त्यांचे राज्य विजयी झाले होते!

राजवाड्याच्या प्रांगणात शानदार मांडव घातलेला होता आणि तिथे हा समारंभ होता. वादक सुमधुर संगीत वाजवीत होते आणि त्याच्या साथीवर कांही उत्तम नर्तिका रंगमंचावर नृत्य करीत होत्या. आमंत्रितांना स्वादिष्ट पदार्थ व पेये दिली जात होती आणि सारे वातावरण आनंदाने भारलेले होते. राजाने जेव्हां राजकन्या 'क्षू' ला निमंत्रितांच्यामधे जाऊन त्यांच्यावर गुलाबपाणी-शिंपडण्यास सांगितले, तेव्हां त्या सर्वांचा आनंद द्विगुणित झाला. राजकन्या क्षु ही त्याकाळच्या सर्व तरुण मुलींमधे सर्वांत सुंदर गणली जात होती. तिच्या या कृतीमुळें सर्व पाहुण्यांना आपला चांगला सन्मान झाल्यासारखे वाटले.



अचानक सोसाट्याचा वारा सुटला आणि सगळ्या मेणबत्त्या विझून गेल्या. मंडपात अंधार झाला आणि छत पेलणारे लांकडी खांबदेखील हलायला लागले. संगीत व नृत्य थांबले, पण कुठेही गोंधळ किंवा बेशिस्तपणा नव्हता. नोकरमंडळी पुन्हां मेणबत्त्या पेटवीपर्यंत पाहुणे निमूटपणे थांबलेले होते.

राजकन्या क्षू मात्र हुंदके देत आपल्या पित्याच्या आसनाकडे धावली आणि तिने राजाच्या कानांत कांही तरी सांगितले. "बाबा, कांहीतरी भयंकर घडलंय हो! अंधार झाल्याबरोबर एका अधिकाऱ्याने माझा हात धरुन मला जवळ ओढले. मी त्याच्या हातांतून माझा हात सोडवून घेतला आणि तेव्हां त्याच्या कोटावरची फीतही खेचून ओढली. आता पुन्हां मेणबत्त्या लावायची आज्ञा तुम्ही द्या. म्हणजे गुन्हेगार कोण आहे ते निश्चित समजेल."



# मातृऋण

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर राज्य करीत असतां बोधिसत्वांनी गाईच्या एका पाड्याच्या रुपांत अवतार धारण केला. तो पाडा सुंदर काळ्या रंगाचा होता. त्याला पाहून पाहणाराचे मन हरपून जात असे. त्याचे सौंदर्य पाहून त्याच्या मालकाला तर आनंदच झाला, इतर लोकांनाही तो हवाहवासा वाटे.

त्या पाड्याचा मालक एका म्हातारीच्या घरांत भाड्याने रहात होता. कांही दिवसांनी त्याच्या मालकाला ते गांव सोडून जावे लागले. जातांना त्याला भाड्याचे पैसे देणे शक्य नव्हते. म्हणून भाड्याऐवजी तो पाडाच म्हातारीला देऊन मालक निघून गेला.

त्या म्हातारीला आपला असा दुसरा कोणी नव्हता. ती त्या पाड्यालाच आपल्या मुलासारखी प्रेमाने पाळूं लागली.

भाताची पेज, कोंडा, पेंड, वगैरे पौष्टिक पदार्थ ती त्या पाड्याला खायला घालीत असे. दररोज ती त्या पाड्याला कालव्यावर घेऊन जाऊन वाळक्या गवताच्या बोळ्याने त्या पाड्याचे सर्व अंग घासून ती त्याला धुवी, त्या पाड्यावर तिचे इतके वात्सल्य, इतके प्रेम होते, कीं तिने त्या पाड्याला कधी बांधून ठेवले नाही.

काळा पाडा वाढत गेला तसतशी त्याला सुंदर कोवळी शिंगे येऊ लागली. तो इतर गुरांबरोबर गांवभर मन मानेल तिकडे हिंडे फिरे. मुलं त्याच्यावर चढून मजा करीत. त्याच्या गळ्याखालील पोळ्याला हाताने गोंजारीत.

एके दिवशी तो पाडा विचार करू लागला, "मला इतक्या पुत्रवात्सल्याने लहानाचा मोठा करणारी म्हातारी किती गरीब आहे. अंगात पुरेशी शक्ती नसून ती माझी किती सेवा करते व माझ्यासाठी किती कष्ट सहन करते. मी तिला चार पैसे मिळवून आणून दिले तर तिला थोडा हातभार लावल्यासारखा होईल."

पण पैसे मिळवायचे कसे? तो विचार करूं लागला. त्याच सुमारास एक व्यापारी आपल्या पांचशे गाड्यांत धान्याची पोती घालून त्या गांवाजवळ आला. त्या गाड्या त्या गांवापर्यंत आला. त्या गाड्या त्या गांवापर्यंत सरळ रस्त्यावर निर्विघ्नपणे चालत आल्या होत्या. परंतु त्या गांवाला लागून जो ओढा होता तो पार करून जाणे कठीण होतं. वाळूंत खूप प्रयत्न करूनही गाड्या पुढे जात नव्हत्या. म्हणून सर्व गाड्या ओढ्याच्या अलीकडच्या कांठावरच थांबल्या. गांवातून भाड्याने बैल आणून ओढा पार करण्याचा व्यापाऱ्याने प्रयत्न करून पाहिला. पण तो प्रयत्नही फुकट गेला.



त्याच वेळी व्यापाऱ्याला ओढ्याच्या पलीकडच्या काठावर इतर गुरांबरोबर चरत असलेला म्हातारीचा पाडा दिसला. त्याच्याबरोबर एखाददोन चांगले बैल असतील असा विचार करून व्यापारी ओढ्यापलीकडे गेला. परंतु तो काळा पाडाच त्याला कामालायक दिसला. त्याला वाटले की हा पाडा चांगला दांडगा आहे, एकामागून एक गाड्यांना जुंपलेल्या बैलांच्या मदतीने एकटाच सर्व गाड्या पार घेऊन जाऊ शकेल.

असा विचार करून व्यापाऱ्याने तेथल्या गुराख्यांना विचारले, " हा पाडा कोणाचा आहे रे? याला मी कांही वेळ घेऊन जाऊ का? माझ्या गाड्या नदीपार न्यायच्या आहेत. तुम्ही मागाल ते देईन!"

"तुम्ही हा पाड्याला घेऊन जा आणि आपल्या गाड्या नदीपार पोचत्या करा. ह्याचा कोणी मालक असा नाहीच. हा मन मानेल तसा हिंडतो फिरतो." गुराखी म्हणाले. व्यापाऱ्याने एक दोरी त्या पाड्याच्या गळ्यांत बांधली, आणि त्याला ओढून नेऊ लागला, परंतु तो पाडा जागचा हललाच नाही. व्यापाऱ्याच्या नोकरांनी खूप प्रयत्न केला तरी ते त्यांना अशक्य झाले.

व्यापारी थोडा वेळ विचार करीत उभा राहिला. त्याला वाटले की कदाचित मेहनतीची मजुरी पाड्याला हवी असेल. तेव्हां तो त्या पाड्याला म्हणाला - "तुला पाहून तू कोणी वृषभराज असावास असे वाटते आहे. तू माझ्या पांचशे गाड्या ओढ्याच्या पार नेल्यास तुला गाडीमागे दोन रुपये देईन. एक हजार रुपये मिळतील."

व्यापाऱ्याच्या तोंडातून ते वाक्य निघताच, सर्व कांही कळल्यासारखा तो काळा पाडा जागचा हलला आणि ओढ्यापलीकडे गाड्या

उभ्या होत्या त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिला. व्यापाऱ्याच्या नोकरांनी एका गाडीला त्याला जुंपला. पाडा सहजी ती गाडी पलीकडच्या तीरावर घेऊन गेला.

सर्व गाड्या पार गेल्यावर व्यापाऱ्याने एका लांब पिशवीत पांचशे रुपये घालून पाड्याच्या गळ्यात ती पिशवी बांधली. पाड्याच्या रूपात असलेल्या बोधिसत्वांनी व्यापाऱ्याची ती लबाडी ओळखली. 'या व्यापाऱ्याला लोभ दिसतो आहे. त्याने आपलं वचन मोडले आहे.' नंतर तो पाडा जी गाडी त्याने सर्वांत प्रथम ओढ्यापलीकडे नेली होती, तिच्या समोर अशा तऱ्हेने आडवा उभा राहिला कीं गाड्या पुढे जाणेच शक्य नव्हते.

व्यापाऱ्याने ओळखले की हा पाडा सामान्य नाही, खूप समजूतदार आहे. व्यापाऱ्याने आणखी पांचशे रुपये दुसऱ्या एका पिशवीत टाकले व ती पिशवीसुद्धा पाड्याच्या गळ्यांत बांधली आणि म्हणाला - "थोर आत्म्या! मी जे वचन दिले होते, त्याप्रमाणे एक हजार रुपये तुझ्या गळ्यांत बांधले आहेत. आतां माझ्या गाड्या पुढे जायला वाट दे!" पाडा तेथून निघाला व सरळ म्हातारी रहात असे तेथे जाऊन उभा राहिला. त्याने पांचशे गाड्या वाळूंतून ओढून ओढ्याच्या पार नेल्या होत्या. म्हणून तो दमला होता व त्याचे सर्व अंग धुळीने व वाळूने माखून निघाले होते. म्हणून म्हातारीने एक कपडा घेऊन त्याचे सर्व अंग पुसून काढले व त्याच्या अंगाखांद्यावर गोंजारीत ती हात फिरवू लागली. तिने पिशव्या पाहिल्या, त्यांत पांचपांचशे रुपये होते.

ती चकित झाली. तितक्यात गुराख्यांनी येऊन घडलेली गोष्ट सांगितली. म्हातारीच्या डोळ्यांत प्रेमाश्रू झळकू लागले.

त्याचे पोळे गोंजारीत ती म्हणाली - "बेटा, तू माझ्यासाठी एवढी मेहनत केलीस? मला कशाला रे एवढे पैसे?" नंतर तिने पाड्याच्या अंगाला तेल चोळले व गरम पाण्याने त्याला न्हाऊं घातले.

अशा तऱ्हेने इतक्या वात्सल्याने पाळणाऱ्या मातृस्वरूप त्या म्हातारीचे मातृ-ऋण फेडून बोधिसत्वांनी आपला अवतार समाप्त केला.







# विष्णुपुराण

जमदग्नी पडला होता तो मरूनपडल्या सारखाच राहून गेला. रेणुकादेवी पतीच्या अंगावर पडून शोक करू लागली. त्याच वेळी जंगलातून आश्रमात परशुराम परत आला. घडलेले वृत्त ऐकून परशुरामने आपला परशु उचलला आणि तो वार करायला म्हणून उगारला आणि मागे वळून न पाहाता तो माहिष्मती नगराकडे धावला.

त्याच वेळी भृगुमहर्षी कोठून तरी आले आणि जमदग्नी ऋषींच्या आश्रमात गेले. त्यांनी रेणुकेचे सांत्वन केले आणि आपल्या यौगिक शक्तीने जमदग्नीला जिवंत केले.

तिकडे माहिष्मती नगरीला ज्या गाईला धरून नेले होते, ती गाय आश्रमवासियांनी मागितल्यानंतर दिली, नाही म्हणून त्या गाईला सैनिक मारीत होते आणि काठीने टोचीत होते. त्याच वेळी परशुराम प्रलयकाळ रुद्राचा अवतार धारण केल्यासारखा संतापून आला. सैनिक त्याला पाहून पळून गेले. परशुरामाने गाईला सोडविले व आश्रमांत जा, या अर्थी तिला शिवून खूण केली. गाय सुटल्याच्या आनंदात उड्या मारीत निघून गेली.

"हे नृपाधमा! संरक्षक म्हणून तू रहायला पाहिजेस, पण तू दुर्भाग्यांवर चालून येऊं लागलास तर तुला शिक्षा करणे भागच आहे! राजवाड्यांतून चल ये बाहेर!" कार्तवीर्याने प्रथम परशुराम कोणी सामान्य मुनिपुत्र आहे असे समजून दुर्लक्ष केले, परंतु परशुरामाचे उग्र रूप पाहून आपल्या सहस्र-बाहूसह तो युद्धाला सामोरा आला.

कार्तवीर्यार्जुनाने ज्या ज्या अस्त्र शस्त्रांचा प्रयोग केला, त्यांचा परशुरामाने आपल्या कुऱ्हाडीने धुव्वा उडवून दिला, त्याने कार्तवीर्यार्जुनाचे सहस्रबाहू, झाडाच्या फांद्या कापून काढतो तसे



सपासप कापून काढले. कार्तवीर्याचा देह त्या स्थितीत मृत होऊन जमिनीवर आदळला. तेव्हां त्याला तो चक्रपुरुष असल्याचे व शापमुक्त झाल्याचे आठवले. परशुराम हाच विष्णू आहे हे ओळखून त्याने त्याला मनांतल्या मनांत नमस्कार केला. त्याने आपला देह सोडला आणि तो सुदर्शन चक्रांत विलीन झाला.

परशुराम घरी परतला. वडील सुखरूप असल्याचे पाहून त्याने जे केले, ते वडिलांना निवेदन केले.

जमदग्नी ऋषी म्हणाले - "बाबा रे! तू जे केलेस ते आपल्यासारख्या ऋषी व मुनींना योग्य नाही. त्याचा परिहार म्हणून तपश्चर्या कर."

"बाबा! राजा अधर्म करूं लागला की त्याला योग्य शिक्षा देण्याचा अधिकार सर्वांना पोचतो. तरी तुमची आज्ञा आहे म्हणून मी तिचे पालन करतो. त्याचे प्रायःश्चित्त म्हणून नाही." आणि तो जंगलात जाऊन तपश्चर्या करूं लागला.

कार्तवीर्यांचे एक हजार मुलगे सर्व हैहय-वंशीयांना एकत्र करून जमदग्नींच्या आश्रमावर चालून आले. त्यावेळी जमदग्नी ऋषी समाधी लावून तपश्चर्येत मग्न होते. रेणुकादेवीने "रामा, येरे!" अशी एकवीस वेळां हाक मारली.

हैहयवंशीयांनी जमदग्नी ऋषींचे मुंडके उडविले. रेणुकेने एकवीसवेळां छाती बडवून आक्रोश केला व शोकविव्हळ अवस्थेत पतीच्या देहावर ती पडून राहिली. राजपुत्रांनी आश्रमाला आग लावली. त्या अग्नीत रेणुका पतीदेहाबरोबर जळून गेली.

जंगलांत परशुराम तपश्चर्या करीत होता. त्याचे ध्यान भंग झाले. त्याच्या कानावर मातेची हाक एकवीस वेळा येऊन आदळली. त्याच्या मनाला फार वाईट वाटले. तत्काळ तो आश्रमांत आला.

आश्रमाला आग लागली आहे, आईवडील त्या आगीत भस्म झाले आहेत, आश्रमवासियांना आणि त्यांच्या मदतीला धावून आलेल्यांची हैहयवंशीयांचे सैनिक कत्तल करीत आहेत, हे त्याला दिसले.

परशुरामाला शंकराच्या कृपाप्रसादाने परशू मिळाला होता, त्या शंकराचेच स्मरण केले आणि परशु उचलला व तो अग्निज्वाळेसारखा उठून उभा राहिला. झाडें बुंधापासून कापतात त्याप्रमाणे जे समोर दिसले त्यांचा त्याने संहार केला.

त्यांच्यामधें पडलेले जमदग्नीचे डोके उचलून त्याने छातीला लावले व तो म्हणाला - "बाबा! माझ्या डोळ्यांना एक टिपूसही येत नाही. इतका



भडका या छातीत पेटला आहे. क्षत्रियांच्या रक्ताने मी तुला तर्पण करतो. त्यांच्या रक्तात तुझे डोके बुडवून तुझी अंत्येष्टी करतो!" असे म्हणत परशुराम एका उंच खडकावर चढून बसला. त्याने परशू उचलला व प्रतिज्ञा केली कीं पृथ्वीवर क्षत्रिय म्हणून जो कोणी आढळेल त्याचा मी शिरच्छेद करीन!" असे एकवीस वेळा म्हणून त्याने प्रतिज्ञा केली. सर्व दिशा दुमदुमल्या. त्याची भयंकर प्रतिज्ञा ऐकून ब्रह्मदेव व ऋषी मुनींनी येऊन त्याला शांत करण्याचा प्रयत्न केला.

भृगुमहर्षी म्हणाले - "बाबा रे! त्या दुष्टांना तो देवच योग्य ती शिक्षा करील. साधू व सज्जनांचे रक्षण करील. तू शांत हो!"

परशुराम म्हणाला - "तो देव आकाशांतून खाली पडणार नाही. मनुष्यरूपे जन्म घेऊन मनुष्यांतच राहील. तसाच मी आहे असे माझ्या आजोबांनी समजावे. शांतवचने सांगून मला शांत करण्याचा प्रयत्न करुं नये!" असे म्हणत तो पळूं लागला, हिमालयावर पोंचला, आणि शंकराचे स्मरण करुन पुन्हां तपश्चर्या करू लागला.

शंकर प्रसन्न होऊन प्रगट झाला व परशुरामाला शांत करू लागला. परशुराम म्हणाला - शंकराच्या आज्ञेशिवाय मुंगीसुद्धा चावत नाही, नाही कां? तुला मी हे सर्व सांगायला हवं का? माझी प्रतिज्ञा पूर्ण व्हावी यासाठी मला आवश्यक ती शक्ती दे!"

शंकराने त्याला अनेक अस्त्रे दिली व एक विशेष अस्त्र देत आनंदाने आशीर्वाद देत शंकर म्हणाला - "हे भार्गव अस्त्र म्हणून तुझ्याजवळ राहील. तू सकारण जन्म घेतलेला अवतारपुरुष आहेस."



परशुराम सर्व क्षत्रियांवर चालून गेला. क्षत्रियांच्या अत्याचारामुळे पिडलेली प्रजा त्याच्या आधाराने पुनर्जीवित झाली. कार्तिकियाच्या मुलांबरोबर सर्व हैहयवंशीय राजधानी सोडून पळून गेले. परशुरामाने राजधानीवर आग्नियास्त्र सोडले. परशुरामाच्या क्रोधाग्नीत माहिष्मती राजधानी एकवीस दिवस जळत राहिल्यावर नामशेष झाली.

कार्तिकियाचे एक हजार मुलगे आणि हैहय-वंशीय क्षत्रिय, देशभर पसरलेले क्षत्रिय राजे, या सर्वांनी मिळून परशुरामाशी युद्ध करण्याचे ठरविले. पशूंची मुंडकी उडवितात, त्या तऱ्हेने परशुरामाने सर्वांचा संहार करुन त्यांच्या रक्ताची तीन तळी करून जमदग्नीने डोके त्यांत बुडविले, आणि पित्याचे तर्पण केले. त्यानंतर त्याने अग्नीची पूजा केली.

शमंतपंचक या नांवे प्रसिद्ध झालेली ती रक्ताची कुंडे ज्या प्रदेशांत होती, तो प्रदेश

नंतरच्या काळात कुरुक्षेत्र या नावे प्रसिद्ध झाला. त्यानंतर बऱ्याच वर्षांनी त्या प्रदेशांत नरसंहार झाला, किंवा नरबली देण्यात आला. महाभारताचे युद्ध म्हणून ते युद्ध प्रसिद्ध झाले.

परशुरामाने यज्ञ केला आणि पवित्र होऊन वडिलांच्या सर्व उत्तरक्रिया केल्या. नंतर तो क्षत्रियांचा संहार करायला निघाला. त्याने क्षत्रियांना शोधून, हुडकून काढून आपल्या कुऱ्हाडीला त्यांचा बळी दिला. क्षत्रिय मातांनी आपापल्या कुळाचे जे अंकुर होते त्यांना वांचविण्यासाठी त्यांना ब्राह्मण कुटुंबियांकडे नेऊन लपविले. त्यांनी ब्राह्मण स्त्रियांसारखा पोशाख केला आणि आपल्या मुलांना वांचविले.

अशा तऱ्हेने परशुरामाने सर्व पृथ्वी चाळून काढली आणि स्वतःला क्षत्रिय म्हणविणारे कोणी दिसत नाहीसे होईपर्यंत त्यांचा संहार चालू ठेवला. त्याच्या स्वाऱ्या चालूं होत्या आणि त्याची प्रतिज्ञा पूर्ण झाली. क्षत्रियांचा संहार झाल्यानंतर त्याने काबीज केलेली सर्व भूमी कश्यप मुनींना दान केली. आणि दक्षिणेकडील समुद्रांतल्या महेंद्र पर्वतावर तपश्चर्या करण्यांत तो लीन झाला.

ब्राह्मणांच्या घरांत, मुनींच्या आश्रमांत वाढून मोठे झालेल्या सर्व क्षत्रिय कुमारांना, सर्वांना कश्यप मुनींनी परशुरामाने दान केलेली जमीन व राज्यें वाटून दिली. पुन्हां राज्ये निर्मिली गेली आणि राजवंश अस्तित्वांत आले.

अशा राजवंशापैकी इक्ष्वाकु राजवंशात रघु नांवाचा राजा होऊन गेला. त्याने फार मोठी कीर्ती संपादन केली आणि रघुवंशाचा संस्थापक झाला.







रघुवंशात विष्णूने दशरथ महाराजांचा मोठा मुलगा, युवराज म्हणून अवतार धारण केला. हाच रामावतार, हा अवतार आदर्श मानव म्हणून आचरणांत दर्शवून विष्णूने राक्षसांचा संहार केला. रामराज्य हे एक आदर्श राजाचे राज्य म्हणून जगाला उदाहरण झाले, प्रजेच्या सुखासाठी कोणताही त्याग करावा लागला तरी तो करण्याचे रामाने उदाहरण घालून दिले.

"दशावतारात सातवा अवतार हा रामावतार, हे वाल्मीकि ऋषींनी रचलेल्या रामायणात निरूपित केले. हे काव्य फार प्रसिद्ध झाले." असे सांगून सूत महर्षींनी रामकथा सांगायला सुरवात केली.

हिरण्यकश्यप, व हिरण्याक्ष विष्णूच्या हाती मरण पावले. त्यानंतर त्यांनी दुसरा जन्म घेतला. दुसऱ्या जन्मांत राक्षस कुळात रावण व कुंभकर्ण म्हणून जन्माला आले.

रावणासुराने मोठी तपश्चर्या करून ब्रह्मदेवा-कडून देव, यक्ष, गंधर्व यांच्यापैकी कोणाच्याही हातून मरण येणार नाही असा वर प्राप्त केला.

मानव मात्र त्याला कांही करूं शकणार नाहीत, या भ्रमात राहून त्याने वर मागितला. त्यांत वर मागताना त्याने मानवांचा उल्लेख ब्रह्मदेवाकडून करवून घेतला नाही.

कुंभकर्ण हा पर्वतासारखा अवाढव्य शरीर असलेला होता. त्याने तपश्चर्या करून सहा महिने झोप आणि सहा महिने जागरण असे वर मागून घेतले व मनुष्यांना ठार करून तो त्यांना खाऊ लागला.

रावणाने कुबेराचे पुष्पक विमान अपहरण करून घेतले आणि त्याला लंकेतून पळवून लावले. त्याने लंकेवर बळजबरीने अधिकार केला आणि लंकेश्वर हे नांव धारण करून त्रिलोक जिंकले.

रावणाला दहा तोंडे होती, म्हणून त्याला दशमुख हे नांव मिळाले. त्याने कैलासात जाऊन नंदीला चिडविले कीं नंदीचे तोंड हे माकडासारखे आहे. आणि म्हणून त्याला नंदीचा शाप मिळाला की माकडेंच तुझ्या लंकापुरीला जिंकतील.

आपल्या वीस हातांनी आपले भुजबल दाखविण्यासाठी रावणाने कैलास पर्वताला उचलले तेव्हां शंकराने आपल्या पायाच्या बोटाने दाबल्याबरोबर पर्वत खाली दाबला गेला, तेव्हां रावण मोठ्याने ओरडू लागला, म्हणून रव करणारा तो रावण हे नांव त्याला मिळाले, त्यापूर्वी त्याला दशकंठ हे नाव होते.

रावणाने आपले एकेक डोके कापून शंकराला अर्पण केले आणि प्रत्येक वेळी स्तोत्रगान करून

शंकराचा अनुग्रह प्राप्त केला. रावण हा जितका मोठा शिवभक्त होता तितकाच मोठा अहंकारीही होता. जितका मोठा पराक्रमी, तितकाच दुर्वर्तनी होता.

परस्त्रीला अपहरण करून आणणे म्हणजे फार मोठे आणि असामान्य शौर्य, असे मानून स्त्रियांचे अपहरण करणे, ह्यांत भूषण मानण्याची त्याने एक परंपराच चालू केली. जी स्त्री अनूकूल नसेल तिच्यावर बलात्कार केला तर त्याच्या दहा डोक्याची हजार शकले होऊन पडतील, असा त्याला शापही होता. रावणाची बायको मंदोदरी, ही भय राक्षसाची मुलगी. पतीच्या हिताच्या गोष्टी ती त्याला सांगे. त्याचा सावत्र भाऊ विभीषण चांगल्या स्वभावाचा होता. तो रावणाला नेहमी चांगल्या गोष्टी सांगे. पण कोणी हिताची गोष्ट सांगितली तरी रावण ऐकत नसे.

विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील भूभाग, समुद्र व बेट हे रावणाचे साम्राज्य म्हणून, लंकेचे महा-साम्राज्य म्हणून, राक्षसांची कायम वस्ती तेथे असे. ते नरभक्षक होते. आर्यावर्तात कोठे यज्ञ होत, तिथें जाऊन त्यांत विघ्ने आणीत, ऋषी मुनींना ठार करीत आणि त्यांत आनंद मानीत. आश्रम व मनुष्यांच्या वस्त्यांची जाळपोळ करीत.

कृषध्वज नांवाचा एक राजर्षी वेदांचा पाठ करीत असतां त्याला वेदवती नावाची मुलगी झाली. तिने विष्णूलाच आपला पती मानून ती तपश्चर्या करू लागली. तिला पाहून रावणाने तो विष्णूपेक्षां मोठा असल्याचे सांगून त्याच्याशीच विवाह करून घ्यायला सांगितले व तिला उचलून तो घेऊन गेला.

वेदवती म्हणाली - "दुष्टा, दुरात्म्या! तू ज्या अंगाला स्पर्श केलास त्या शरिराचा मी त्याग करते. तुझ्या लंकेतच मी स्वतः जन्म घेऊन मी तुझ्या सर्वनाशाला कारण होते. विष्णूच माझे हरण करील." असे म्हणत तिने योगाग्नी प्रज्वलित केला व स्वतःला जाळून घेतले.

राक्षसांचे निर्मूलन करुन लोककल्याण करण्याचे व्रत घेऊन विष्णूने अवतार धारण करण्याची वेळ आली. विष्णू मानव रूप व देव वानर रूपे जन्माला आले.







# सुरेखाची समजूत

सुरेखा आपल्या आईवडिलांची एकुलती एक मुलगी होती. पांच वर्षांच्या मानाने ती फारच चुणचुणीत होती. पहावं तेव्हां ती गडबड करीत असायची आणि घरभर इकडून तिकडे नि तिकडून इकडे अशी हिंडताना दिसायची. एकदा रात्रीच्या वेळेला आईने सुरेखाला म्हटलं, "बाळ सुरेखा, मागल्या दारी जाऊन बाहेरचा झाडू घेऊन ये बरं!"

"मागच्या अंगणात अंधार आहे आई. तिथें मला कांहीच दिसणार नाही. मी नाही जाणार तिथें" सुरेखाने उत्तर दिलं.

"त्यावर आईने हंसून म्हटलं, "बाळे, अंधाराला कांही घाबरायचं नसतं. तिथें तर विघ्नेश्वर राहातो. मग तुला कसली आली आहे भीती? विघ्नेश्वर तर नेहमी सर्वांच्याबरोबर असतो; तो आपलं रक्षण करतो हो!"

आईकडे टक लावून बघत सुरेखाने विचारले, "आई, खरंच कां विघ्नेश्वर तिथें राहातो? तू खरंच सांगते आहेस कां?" तिच्या आवाजांत पुरेपूर आश्चर्य भरलेले होते.

"हो, अर्थातच तिथे राहातो. तिथेच नाही, तर तो जिकडेतिकडे असतो. जेव्हां आपण त्याची प्रार्थना करतो, तेव्हां आपल्याला तो जरुर पडेल तेव्हां मदत करतोच." आईने मुलीला धीर देत सांगितले.

सुरेखाने थोडा वेळ विचार केला. आणि ती तडक मागील दरवाज्याजवळ गेली. तिने दार उघडून आपला हात बाहेर पसरला आणि तिने मोठ्या आवाजांत हांक मारली, "अरे विघ्नेश्वर, तू खरोखरच तिथे असलास, तर तिथे पडलेला झाडू माझ्या हातांत जरा दे रे!"

- सुमती

# हिरा परत मिळाला !

एका नगरांत एक हिऱ्यांचा व्यापारी राहात होता. तो लबाड होता. आपल्या नगरांतल्या रहिवाशांना तो कधी फसवत नसे, पण दूरदूरच्या देशांतून तिथे येणाऱ्या प्रवाशांना फसवण्यांत तो कधी मागे सरला नाही.

एके दिवशी एक म्हातारा इसम त्याच्या दुकानांत आला. व्यापाऱ्याने नेहमीप्रमाणे एक खोटे हास्य केले आणि त्याचे स्वागत केले.

''माझ्या नातीचा विवाह होणार आहे. ती माझी फार लाडकी आहे. तिला या प्रसंगी एक हिरा द्यावा असं माझ्या मनांत आहे. पण आत्ता माझ्याजवळ फक्त चांदीची पांचशेच नाणी आहेत. तेवढ्या किंमतीत एखादा हिरा मिळेल कां? माझं जहाज तासाभरांत निघेल. दुसऱ्या दुकानांत जाऊन चौकशी करण्याइतका मला वेळ नाही.'' तो म्हातारा म्हणाला.

''पांचशे चांदीच्या नाण्यांत तुम्हाला कुठेही हिरा मिळणार नाही. पण तुमचं तुमच्या नातीवरचं प्रेम पाहून मला फारच कौतुक वाटतं. म्हणून तेवढ्याच नाण्यांच्या बदल्यांत मी तुम्हाला एक चांगला हिरा देईन.'' व्यापाऱ्याने सांगितलं. पण त्याने म्हाताऱ्याला जो खडा दिला, तो हिरा नसून चमकणारा कांचेचा तुकडा होता.

त्या बिचाऱ्या म्हाताऱ्या प्रवाशाला आपण फसवले गेलो आहोत हे कांही कळलं नाही. तो खूष होऊन आपल्या जहाजाकडे परतला.

पांच वर्षांनंतर एक तरुण प्रवासी येऊन त्या व्यापाऱ्याला भेटला. ''हे बघा भाऊसाहेब, आमचे पूर्वज आमच्या शहरांतले एक मोठे खानदानी कुटुंब होते. माझे आजोबादेखील एक श्रीमंत सरदार होते. पण काळ बदलला, आणि आमची सारी संपत्ती खलास झाली. साऱ्या किंमती वस्तू विकाव्या लागल्या. आजपर्यंत मी एक वस्तू मात्र जपून ठेवलीय, कारण माझ्या आजीचा हा आवडता हिरा आहे. आता मला हा विकायची पाळी दुर्दैवाने आली आहे. तुम्ही हा विकत घ्याल? मी हा स्वस्तांत देईन.'' अनोळखी तरुणाने सांगितले.





त्या हिऱ्यांच्या व्यापाऱ्याचे डोळे एकदम चमकले. त्याला अनुभवानंतर ठाऊक होतं कीं खानदानी श्रीमंत लोकांचे चिरंजीव तांब्याच्या किंमतीत सोने विकून टाकतात. ''हिरा दाखवा तरी आधी.'' त्याने विचारलं.

त्या तरुणाने आपल्या थैलीतून



मोठ्या काळजीपूर्वक ते उघडले. त्यांत एक लहान वस्तू चमकत होती.

व्यापाऱ्याने उत्सुकतेने ती वस्तू उचलली. पण एका क्षणांतच त्याला कळले कीं ती फक्त एक कांचेचा तुकडा आहे.

''अरे तरुण मित्रा! तुझा गैरसमज आहे. हा हिरा नाही, फक्त कांचेचा तुकडा आहे. व्यापाऱ्याने म्हटलं.

''तुम्ही माझी चेष्टा करीत आहात. ही एक अनमोल खानदानी चीज आहे. जर तुम्हाला याची किंमत सांगता येत नसेल तर आणखी कुणीतरी नक्की याचे मूल्य ओळखेल.'' तरुणाने जोर देऊन सांगितले.

''शक्य आहे. मग हा दुसरीकडे कां घेऊन जात नाहीस तू?'' व्यापाऱ्याने सल्ला दिला.

''याचा अर्थ इतकाच कीं तुम्ही ह्याला हिरा समजत नाही. मी हा हिरा घेऊन दुसऱ्या चांगल्या जवाहिऱ्याकडे जाऊं शकतो आणि हा चांगल्या किंमतीला विकूं शकतो. पण तेव्हां कांही तुमच्या कानावर येणार नाही कीं हा एक महाग हिरा आहे. मी हा तुमच्याजवळच ठेवून देतो. तुम्ही हा मुळीच विकत घेऊं नका. फक्त आपल्या दुकानांत ठेवून घ्या. हा विकला गेला तरच मला त्याची किंमत द्या.'' तरुणाने पर्याय सुचवला.

व्यापाऱ्याचा वेळ निष्कारण फुकट चालला होता. ही ब्याद टाळावी म्हणून त्याने त्या तरुणाची अट मानली व विचारले, ''हा मी केवढ्याला विकूं?''

''एक हजार चांदीची नाणी!'' त्या तरुणाने उत्तर दिले.

''पांचसहा महिन्यानंतर येऊन हा हिरा विकला गेलाय कीं नाही ते पाहीन'' असेही त्याने जाण्यापूर्वी सांगितले.

तो गेल्यावर व्यापाऱ्याने सुटकेचा विश्वास टाकला आणि तो कांचेचा तुकडा कांचेच्या कपाटांत बेफिकिरपणे ठेवून दिला.

पांच महिने उलटून गेले. एक दिवस सधन घराण्यांतला वाटेल असा एक भारदस्त गृहस्थ त्या व्यापाऱ्याच्या दुकानावर आला.

''माझी चुलत बहीण श्रीमार्गची राजकुमारी आहे. तिच्या लग्नासाठी मी कांही खास हिऱ्यांच्या शोधांत आहे.'' त्याने सांगितलं.

व्यापाऱ्याने त्याला आपले सर्वोत्तम हिरे दाखवले. पण त्या गृहस्थाला ते कांही पसंत पडले नाहीत. असले हिरे त्याने यापूर्वी खरीदले होते.

अचानक त्याची नजर त्या कांचेच्या तुकड्यावर पडली. त्याचा चेहरा चमकून उठला. ''मी अशा प्रकारच्या अनोख्या हिऱ्यांच्यासाठी तर आलो आहे! दाखवा पाहूं तो खडा. निदान एक तरी मिळाला! तुम्ही हा मला अगोदर कां नाही दाखवलात?'' नाराजीचे खोटे नाटक करीत त्या गृहस्थाने विचारले.

"हा मी दुसऱ्या एका गिऱ्हाईकाला द्यायचे कबूल केले आहे." व्यापाऱ्यानेही खोटी फुशारकी मारली. त्याला आश्चर्य वाटले. त्या मालदार सज्जनाला हिऱ्यांतले कांहीच कळत नसावे किंवा स्वतःला या खास जातीच्या हिऱ्याची माहिती नसावी असे त्याला वाटले.

"तुम्ही दुसऱ्या ग्राहकाला केवढ्याला द्यायचे कबूल केले आहेत?" त्या सद्गृहस्थाने विचारले.

व्यापाऱ्याने संधीचा फायदा घ्यायचे ठरवले. "दोन हजार चांदीची नाणी." त्याने सांगितले.

"फारच छान! मी तुम्हाला तीन हजार नाणी देईन!" तो गृहस्थ म्हणाला.

"मग ठीक आहे. घेऊन टाका!" लबाड व्यापारी खुषींत म्हणाला.

"आता नाही. मी शंभर नाणी देऊन हा खडा माझ्यासाठी राखून ठेवतो. सगळी रोख रक्कम घेऊन मी आठवड्यानंतर येतो. जर मी आलोच नाही, तर ही शंभर नाणी तुम्ही ठेवा, आणि तो खडा तुमच्या गिऱ्हाईकाला विकून टाका. काय?"

गृहस्थाने सांगितले. व्यापाऱ्याला फारच आनंद झाला. त्या तरुणाला हजार नाणी देऊनदेखील त्याच्याजवळ भरपूर नाणी शिल्लक राहिली असती. किती फायदेशीर हा सौदा होता. व्यापाऱ्याने मोठ्या प्रेमळपणे याला संमती दिली.

दुसऱ्याच दिवशी तो तरुण मुलगा तिथें पोंचला. "अजून जर माझा हिरा विकला गेला नसेल तर कृपा करुन मला तो परत द्या. मला कळलंय कीं श्रीमार्गच्या महाराजांचा पुतण्या इथें आला आहे. त्यांना खास प्रकारचे हिरे घ्यायचे आहेत असं समजलंय. त्यांना मी हा हिरा हजार नाण्यांना विकूं शकेन." तो तरुण म्हणाला.

"ही घ्या तुमची हजार नाणी!" व्यापाऱ्याने त्या तरुणाला हजार नाणी दिली व हिरा ठेवून घेतला.

तो तरुण नाणी घेऊन निघून गेला. राजाचा पुतण्या हिरा घ्यायला केव्हां येतोय त्याची वाट बघत व्यापारी बसला होता.

एक आठवडा झाला, दोन आठवडे गेले, एक महिना उलटून गेला.

पण राजाचा पुतण्या कांही उगवला नाही. पण त्या व्यापाऱ्याला मात्र कुणा प्रवाशामार्फत एक पत्र मिळाले.

"जो हिरा मी तुम्हाला दिला होता, तोच हिरा माझ्या आजोबांनी पांच वर्षांपूर्वी तुमच्याकडून खरेदी केला होता. आता ते हयात नाहीत. पण हा हिरा तुम्हाला विकून मात्र माझा फायदा झाला आहे. तुम्हालाही तुमची ही किंमती वस्तू परत मिळाली, म्हणून फार आनंद झाला असेलच."

व्यापाऱ्याने कपाळावर हात मारला आणि अतिशय संतापाने त्याला रडूं कोसळले.







# लोभ हा वाईटच असतो

**फार** वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका गांवात गंगादास नांवाचा एक वैद्य राहात होता. तो उत्तम वैद्य होता, रोग बरा करीत होता, पण फार लोभी होता. गरीब रोग्यांविषयी त्याच्या मनांत मुळीच दयामाया नसे. त्याच्याकडे जो औषधासाठी येई, त्याच्याकडून भरपूर पैसे तो उकळत होता.

म्हणून सामान्य लोक त्याच्याकडे रोग चिकित्सा करायला जायला घाबरत असत. पण आसपासच्या वीसपंचवीस कोसांमधे दुसरा एकही वैद्य नव्हता. म्हणून लोकांचाही नाईलाज होत होता.

लोकांना लुबाडून संपत्ती सांठवली तरी गंगादासची हाव कमी झाली नाही. उलट तो जास्तीच लोभी झाला.

त्याच गांवात रामनाथ हा एक सधन गृहस्थ होता. तो फार दयाळू होता. इतरांना सढळ हाताने तो मदत करीत असे लो त्याला फार मान देत असत. गंगादासला त्याचे वैषम्य वाटत असे. रामनाथच्या उदारपणामुळें गंगादासची प्रतिष्ठा कांही वाढत नव्हती. रामनाथची फजिती करण्याचे गंगादासने खूप प्रयत्न केले, पण त्यांत त्याला यश आले नाही.

एकदा मात्र गंगादासला अचानक सुसंधी मिळाली. रामनाथचा एकुलता एक मुलगा आजारी झाला. त्याची प्रकृति फारच बिघडली. नाईलाजाने रामनाथने गंगादासला मुलाला औषधोपचार करण्यासाठी बोलावणे पाठवले.

गंगादासने मुलाला तपासले. एक खोल श्वास घेत तो म्हणाला, "हे पहा, हा फार घातक रोग आहे. आणि यावर एक कष्टमय आणि फारच खर्चिक असा उपाय आहे."

रामनाथने गंगादासचा हात पकडून म्हटले, "गंगादासजी, तुम्हाला माहीत आहे कीं हा माझा एकटाच मुलगा आहे. पाहिजे तेवढे कष्ट होवोत, तुम्ही ह्याला वाचवलंच पाहिजे जो कांही खर्च होईल, तिथें मी हात आंखडता घेणार नाही."

- २५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट -



गंगादासने खोटी सहानुभूती दाखवीत म्हटले, ''रामनाथजी, मला आपला स्वभाव ठाऊक आहे कीं! मी अगदी मेहनतीने त्याचे औषध तयार करीन. त्याच्या उपचारासाठी एकशे अकरा वर्षे जुने झालेले महातूप हवे आहे आणि स्वर्णभस्म तयार करायला हवे. त्याच्यासाठी एक मणभर सोने मला लागेल.''

वैद्याच्या तोंडून हे शब्द ऐकले आणि रामनाथचे काळीज भीतीने कांपायला लागले. गंगादासचा दुष्ट कावा त्याच्या लक्षांत आला. तरीही रामनाथने नम्रपणे म्हटले, ''महाशय, मी माझी सारी मालमत्ता विकली तरीदेखील मणभर सोने मिळणार नाही. आपण कांहीतरी दुसरा मार्ग सुचवावा.''

''या आजाराला दुसरा कांहीही इलाज नाही. जी तुमची इच्छा! तुम्हीच निर्णय करुन ठरवा. तुम्ही तुमची मालमत्ता जपणार आहात कीं तुमच्या मुलाचा जीव वांचवणार आहात?'' गंगादासने स्पष्टपणें सांगितलं.

गंगादासच्यापुढे विनवणी केली तरी कांही उपयोग होणार नाही. हे रामनाथ ओळखून होता. गंगादास पाषाणहृदयी होता. म्हणून देवावर विश्वास ठेवून रामनाथने मणभर सोन्याची मागणी मान्य केली.

उपचार केल्यानंतर रामनाथची सारी संपत्ती गंगादासच्या मालकीची झाली. औषधें तयार करायला फार कष्ट पडले, असा आविर्भाव गंगादासने आणला होता. रामनाथचा मुलगा बरा झाला आणि पूर्वीसारखा हिंडू फिरुं लागला.

गंगादासने रामनाथवर जो अन्याय केला होता, त्यामुळें रामनाथ आंतून संतापाने जळत होता. त्याने मनाशी निश्चय केला कीं याचा सूड घेऊन रामनाथला चांगला धडा शिकवायचा. नाहीतर अशा तऱ्हेने गंगादास आणखी कित्येक परिवारांना त्रास देत राहील व त्यांची संपत्ती घशांत घालील. आपली पत्नी व मुलगा यांना बरोबर घेऊन रामनाथने ते गांव सोडले.

रामनाथ गंगादसवर सूड उगवून संधी मिळाली कीं त्याचे घरदार लुटून नेणार आहे, अशी गांवात अफवा पसरली. रामनाथच्या एका विश्वासू शेतकऱ्याने ही बातमी गांवात सांगितली होती.

ते ऐकून गंगादास घाबरला. कारण त्यांचे गांव तर लहानसे होते आणि गंगादासला मदत करणारा एकही गांवकरी नव्हता. जवळ जे सोनेनाणें



जमलेले होते, ते शहरांत नेऊन सरकारी तिजोरींत सुरक्षित ठेवावे असे त्याने ठरवले.

आपले दोन विश्वासू नोकर सोबत घेऊन गंगादासने सगळे सोने व रोकड बरोबर घेतली आणि सकाळ झाल्याबरोबर गंगादास शहराकडे निघाला.

डोंगराच्या वळणावरुन जाताना चोरांनी त्याला गराडा घातला. गंगादास फारच भ्यायला. चोरांशी सामना देण्याची त्याची तयारी नव्हती. एकूण वीसजण चोर होते. त्यांनी गंगादासला त्या डोंगरातल्या गुहेंत नेऊन डांबले. पण त्याच्याजवळच्या रोकड व सोन्याला हात लावला नाही. म्हणून गंगादासला फारच आश्चर्य वाटले त्याने गुहेच्या बाहेर पहारा करणाऱ्या चोराला जवळ बोलावून विचारले, ''हे बघ बाबा, माझ्याकडे थोडेसे रुपये आहेत. ते घेऊन मला सोडून दे ना!''

''आमच्या नेत्याची तशी आज्ञा नाही!'' चोराने बेफिकिरपणे उत्तर दिले.

''बरं, आता हे सांग की मला कांही खायला प्यायला देणार आहात कीं उपाशी मारणार आहात मला?'' गंगादासने विचारलं.

''त्यासाठी किंमत दिलीत तर जे तुम्ही मागाल ते देईन.'' चोराने उत्तर दिले.

''किती रुपये हवेत?'' गंगादासने विचारले.

''जेवणासाठी एक लाख रुपये आणि पाण्यासाठी पन्नास हजार!'' चोराने सांगितले.

गंगादास थक्क होऊन पहात राहिला. ''अरे, जेवणासाठी लाख रुपये? हा तर अन्याय आहे.'' त्याने दांतओठ खात रागाने म्हटले.



"हा अन्याय आहे कीं न्याय आहे हे कांही मला समजत नाही. त्याची किंमत एवढी आहे, इतकंच! आता तुम्हीच ठरवा तुम्हाला काय पाहिजे ते! जेवण हवं की रुपये हवेत?" चोराने अगदी निर्विकारपणे सांगितलं.

गंगादासने दोन दिवस अन्नपाण्याशिवाय कसेबसे काढले. त्याला वाटलं कीं रामनाथबरोबर त्याने लबाडी केली होती, त्याची शिक्षा देवाने त्याला या स्वरुपांत दिली.

भुकेने तो कळवळला होता. डोळ्यांसमोर अंधारी येत होती. त्याने विचार केला की जर तो अन्नपाण्याशिवाय तडफडून मेला, तरी त्याची सारी धनदौलत चोरांच्या हातांत सांपडली असती; त्यापेक्षां थोडे खाऊन पिऊन प्राण वांचवले तर बरे!

चोराला बोलावून गंगादासने आपली संमती दिली. अशा प्रकारे पैसे देऊन जेवण व पाणी मिळत गेले. पण दोन आठवडे होण्यापूर्वीच गंगादासचे सारे रुपये व सोनेनाणे संपून गेले. आता मात्र घासभर अन्नासाठी आणि ओंजळभर पाण्यासाठी पुन्हां तडफड होणार होती. या विचाराने त्याला रडूं आवरेना.

त्याने चोरांच्या नायकाला बोलावणे धाडले आणि त्याला नमस्कार करुन अतिशय काकुळतीने भोजन मागितले. "गंगादास, ज्या वेळीं तू रामनाथची मालमत्ता गिळंकृत केलीस आणि गांवकऱ्याचे पैसेही लुबाडलेस, तेव्हां त्या सर्वांना अशाच यातना झाल्या होत्या. तुला त्यांची परिस्थिती कळली नव्हती कां?" चोरांच्या नायकाने विचारले.

त्याचा आवाज ओळखून गंगादासने म्हटलं, "रामनाथ, मला क्षमा कर. पैशाच्या लालचीमुळे मी आंधळा झालो होतो. लोभीपणामुळें मी तुम्हाला सर्वांना लुटले. सगळ्या गांवकऱ्यांना सतावले. त्यांच्या असहाय्यतेचा मी फायदा घेतला आणि वैद्यकीच्या नियमांच्याविरुद्ध मी पैसे घेत सुटलो. आज तू माझ्या डोळ्यांत अंजन घातलेस. आत्ता मला जिवाचे मोल काय असते ते समजते आहे." हे शब्द कसेबसे उच्चारुन गंगादास ढसाढसा रडायला लागला.

गंगादासची समजूत घालून, त्याला रामनाथने पुन्हां आपल्या गांवात परत आणले. त्यानंतर मात्र गंगादास एक परोपकारी वैद्य बनला.







# सासू-सून

सुंदरी माहेरी अत्यंत लाडांत वाढलेली होती. घरांतले कोणतेही काम ती कधी करत नव्हती. पण लग्न झाल्यानंतर मात्र सासू तिच्याकडून घरांतले सगळे काम करवून देऊं लागली.

जेव्हां जेव्हां सुंदरी माहेरी जाई, तेव्हांतेव्हां ती आपल्या आईजवळ आपले दु:ख सांगत डोळ्यांतून अश्रू गाळीत बसायची. मग तिची आई तिची समजूत घालीत म्हणायची, ''आम्ही तुला कांहीही कामधाम शिकवलं नाही, ही आमची अगदी मोठी चूक झाली खरी! पण तुझ्या सासूबाई आमची ही चूक सुधारत आहेत. कांहीही काम न करता घरांत नुसतेच रिकामे बसून राहायचे, हे कांही तुला शोभत नाही. तुझ्या सासूबाई आईप्रमाणेच आहेत. त्या सांगतील ते ऐक आणि तशी नीट वाग.''

पण सुंदरीचा पिता म्हणाला, ''काम शिकवत असतील ते ठीक आहे, पण सुनेला त्रास कशाला द्यायचा? ते कांही नाही, मी माझ्या मित्रांना सांगून तुझ्या नवऱ्याला शहरांत नोकरी देववतो. म्हणजे तुझे कष्ट कमी होतील.''

वडिलांच्या म्हणण्याप्रमाणे सुंदरीचे कष्ट दूर झाले. तिचा पती अभय याला जशी शहरांत नोकरी मिळाली, तशी ती दोघे शहरांत आली आणि त्यांचे नवे घरकुल सुरुं झाले. घरांतले घरकाम करायला सुंदरीने भागमती नांवाची एक कामवाली मदतनीस ठेवली.

भागमतीचं वागणं पाहून सुंदरीला नेहमी आश्चर्य वाटत असे. शेजारी शारदा ही गृहिणी राहात होती, तिच्याकडे भागमती मन लावून काम करायची. शारदाला तीन मुलें होती - दोन मुली व एक मुलगा. मुली नेहमी आरडाओरडा, दंगा करीत असत. अजून सुंदरीला मूलबाळ नव्हते. तरीसुद्धां सुंदरीच्या घरांत काम करताना भागमती नेहमीच चिडचिड करीत असे.

कांही दिवसानंतर सुंदरीच्या सासूबाईने आपण येत असल्याचा निरोप पाठवला. आपण कांही महिने तरी राहूं, हेही तिने कळवलं होतं. हे समजल्यावर सुंदरी घाबरली. आपली सासू इथे येऊन त्रास देईल आणि सारखं कामाला जुंपेल याची तिला चिंता नव्हती. खरी काळजी भागमतीची होती.

सासूबाई आल्यानंतर नेहमीप्रमाणे त्या येताजाता टोमणे मारायच्या, घरकामाचा रगाडा वाढवायचा, ही त्यांची संवय होती. पण भागमतीला कुणी कांही बोललं तर ती लगेच फटकळपणें उत्तर द्यायची. काम किती वाढलंय हा पाढा ती रोज बोलून दाखवायची. आपली नाराजी जाहीरपणे सांगायची. सासूबाई आल्यानंतर तर ती जास्तच चिडायला लागली होती. तिला कांही बोललं तर काम सोडून जायची धमकी ती देऊं लागली. भागमती गेली तर दुसरी बाई कुठली मिळणार? सारं काम सुंदरीला करावं लागलं असतं.

सुंदरीने आपल्या पतीला आपली समस्या सांगून म्हटलं, ''सासूबाई माझं कांही ऐकणार नाहीत. पण तुम्ही आईला सांगा कीं भागमतीशी भांडणतंटा करूं नकोस!''

अभयने बायकोच्या इच्छेनुसार आई आल्यानंतर तिला सांगितले, ''आई, तुला त्रास होऊं नये व मदत व्हावी म्हणून भागमती नांवाची मदतनीस ठेवली आहे. पण तुला एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवायला हवी हं! शहरांत राहाणारे गांवांत राहाणाऱ्यांपेक्षां वेगळ्या स्वभावाचे असतात. थोडे स्पष्ट बोलतात, कुणाची फिकीर बाळगत नाहीत!

कुणी नाराजी दाखवलेली त्यांना आवडत



नाही. तू भागमतीशी नीट वागलीस, तिला सांभाळून घेतलेस तर इथें आरामांत राहाशील. ती काम सोडून जाणार नाही, ही जबाबदारी तुझी! नोकराचाकरांशी कसं वागावं ते कांही तुझ्या सुनेला नीटसं जमत नाही.''

अभयची आई चतुर होती. मुलाने सुनेच्या सांगण्यावरून हे प्रास्ताविक केलंय, हे तिच्या लगेच लक्षांत आलं. सुनेला धडा शिकवायचा तर भागमती काम सोडून कशी जाईल, ते पाहायचं तिने ठरवलं. भागमतीला भरपूर काम पडेल असं ती करायला लागली. पण भागमती मात्र निमूटपणे काम करत होती, आणि तिची कुरबूरही थांबली होती. तरीसुद्धां, कांही चुकलं कीं अभयची आई भागमतीला रागावत होती.

कांही दिवस भागमती गप्प बसली. पण जेव्हां तिला असह्य झालं, तेव्हां अभयच्या आईला ती

कस्तुरी श्रीवास्तव



म्हणाली, "तुम्ही सारखं असं बडबडत राहिलात तर मी निघून जाईन."

"उगीच धमकी देऊं नकोस. जायचं तर निघून जा. तू गेलीस तरी माझी सून सगळं कामकाज सांभाळील बरं!" अभयच्या आईने ताठ्यांत सांगितलं.

त्यावर भागमती गप्प बसली. सासूबाई जे जे काम सांगत होत्या, ते आनंदाने करुं लागली. एक दिवस भागमती सुंदरीला म्हणाली, "तुमच्या सासूबाई आल्यावर घरांतले काम बरेच कमी झाले आहे. त्या इथेंच कायमच्या राहिल्या तर चांगलंच की!"

भागमतीचं बोलणं सुंदरीला विचित्र वाटलं; पण भागमती काम सोडण्याचा विचार करीत नाही. हे पाहून तिला हायसे वाटले. तिने अभयला सांगितलं, "तुमची आई जशी होती, तशीच आहे. त्यांच्या स्वभावात कांहीही बदल झालेला नाही. त्यांना पाहिजे तितके दिवस राहूं देत की! भागमती पहिल्यासारखी सारी कामं नीट करतेय!"

अभयला आईचा स्वभाव चांगलाच ठाऊक होता म्हणून त्याला कांहीच आश्चर्य वाटलं नाही. पण भागमतीचं वागणं मात्र त्याला विचित्र वाटलं. असेच दोन महिने गेले. सासूबाई कांही गांवी परत जायचं नांव काढेना. सुंदरीची देखील कांही तक्रार नव्हती. सासूबाई भागमतीला रागवायला लागल्या, तरीदेखील भागमती पहिल्यापेक्षां जास्त काम करत राहिली.



एक दिवस शेजारची शारदा सुंदरीच्या सासूबाईंना मंदिरात घेऊन गेली. देवदर्शन झाल्यानंतर दोघीजणी देवळासमोरच्या झाडाखाली पारावर बसल्या.

शारदाने सुंदरीच्या सासूबाईंना सांगितले, "तुम्ही रागावूं नका, पण राहावत नाही म्हणून विचारतेय. तुम्ही गांवी परत केव्हां जाणार आहात?" सासूबाईंनी या प्रश्नाला रागावून उत्तर दिले, "मी गांवी परत जावं याची तुला कां ग इतकी घाई?"

त्यावर शारदा नम्रपणे म्हणाली, "रागावूं नका, सासूबाई! मीही तुमच्या सुनेच्या, सुंदरीच्या वयाचीच आहे. मी तीन लहान मुलांची आई आहे. त्यांना सांभाळणे मला एकटीला जमत नाही. भागमती तुमच्या घरांत काम करते. तशी माझ्या घरांतही करते आहे. पण तिचा स्वभाव अगदी विक्षिप्त आहे. तिला गप्पा मारायला, भोचकपणा करायला फार आवडतं. माझ्या पतीने तिची ही आवड लक्षांत ठेवली. तिच्यासारखी कष्टाळू, चांगली कामवाली कांही शहरांत लगेच मिळणार नाही, म्हणून ते मुद्दामच तिच्यादेखत मला कांही वेळा रागावतात किंवा गांवातल्या इतर लोकांच्या गोष्टी सांगत बसतात. ते ऐकून भागमती अतिशय खूष होते. त्या आनंदात ती घरांतलं सारं काम अगदी मन लावून करुन टाकते. तुम्ही सुनेच्या तक्रारी सांगता, सुनेला कधीमधी रागावता, ते तिला नक्कीच आवडतं. म्हणून ती तुमच्या घरी कामाला उशीर करत नाही कधी!

त्यावरुन वाटतं कीं माझे पती तुलनेने तुमच्यापेक्षां खूपच कमी बोलत असावेत. खरंच, पण मी हे म्हटलं म्हणून रागावूं नका हां सासूबाई!"

हे ऐकून सुंदरीची सासू गप्पच झाली. शेजारी-पाजारी तिचे सुंदरीशी वागणे, त्या दोघींची आपसांतली तेढ, याच्याबद्दल काय बोलत असतील देव जाणे! लोकांना काय, टाळ्या पिटायला विषय हवाच असतो. तेव्हांपासून सासूच्या वागण्यांत बदल झाला. ती आता घरांत बरेच काम करायला लागली. भागमतीने देखील काम सोडण्याची धमकी द्यायचे बंद केले. कारण नाहीतर ही चांगली नोकरी हातांतून गेली असती, हे तिला पक्के ठाऊक होते.



# तिखट रोडगा

सुभाष हा दाणापुरांतल्या धनिकांपैकी एक होता. जरी तो श्रीमंत होता, तरी त्याला आपल्या दोन्ही मुलांची, चंद्र व सूर्य, यांची फारच काळजी वाटत होती. दोघेही आता दहा व बारा वर्षांचे झाले होते, पण दोघांना काडीची अक्कल नव्हती.

सुभाषला भेटायला आलेल्या एका नातलगाने त्याला सांगितले, "तुझ्या मुलांच्या शिक्षणाची इतकी चिंता कशासाठी करतो आहेस? आमच्या गांवात एक पंडित आले आहेत. ते अगोदर माणसाच्या मनाची परीक्षा करतात. त्यांत कांही त्रुटी आढळल्या, तर त्या सुधारण्यांत त्यांचा हातखंडा आहे."

सुभाष त्या पंडितांना भेटला. त्याचे सविस्तर बोलणे ऐकल्यानंतर पंडितांनी म्हटलं, "जशी बुद्धिमान माणसे असतात, तशीच भोळी व खुळीही असतात. त्यांत फारशी काळजी करण्याचे कारण नाही. मी एक दिवस तुमच्याकडे येईन आणि तुमच्या मुलांची चांचणी घेईन."

एका आठवड्यानंतर पंडित सुभाषच्या घरी आले. त्यावेळी सुभाष दोन्ही मुलांना थाळींत जेवायला वाढीत होता. एका भांड्यात तिखट रोडगा ठेवला होता.

सूर्य व चंद्र, दोघांनीही तो पदार्थ मागितला. पंडितांनी त्या दोघांना सांगितले, "तो तिखटजाळ आहे बरं! एक तुकडा खाल्लात कीं तुम्हाला समजेल. फक्त एकवार तो पदार्थ डोळ्यांनी पाहा."

दोघे भाऊ जेवायला लागले. तेव्हां चंद्र म्हणाला, "दादाने दोनदा त्या भांड्याकडे बघितलंय. आता नक्की तो आजारी पडेल."

त्यावर पंडितांनी सुभाषला म्हटलं, "तुमच्या दोन्ही मुलांमधे धाकटा मुलगा जरासा हुशार दिसतो आहे. मी आता त्याच्यापासूनच त्यांचा अभ्यास सुरू करीन."

*-कमलनाथ*







# अस्वल्या मांत्रिक

## 10

*(अस्वल्या वधिकाकडून दुर्मुखराजाचा शिरच्छेद झाला असता, तो उग्रदंडामुळे वाचला. दुर्मुखला मांत्रिकाकडे घेऊन जाण्याची जबाबदारी त्याने घेतली. वन्य शिकारीदेखील अस्वल्या वधिकाच्याबरोबर चंद्रशिला नगरांत जायला तयार झाला. हत्तीवर बसून आलेल्या चार आगंतुकांनी अस्वल्या वधिकास अडवले. यानंतर...)*

आपल्यावर येऊन पडणाऱ्या बाणांना परशूने अडवत वधिक त्यांना दूर हटवूं लागला. आपल्या तुटक्या सोंडेच्या हत्तीला त्या सैनिकांवर चालून जायला त्याने आज्ञा दिली. दोन हत्तींचा सामना झाला. भयंकर चीत्कार करीत दोन्ही हत्ती एकमेकांशी लढायला लागले. त्यावेळी अस्वल्या बधिकाने "जय सिरस भैरव" अशी आरोळी ठोकून शत्रूच्या हत्तीवर आपल्या परशु फेकला. त्याच्या घावामुळें हत्तीचा एक दांत केळीच्या बुंध्यासारखा तुटला, आणि दूर जाऊन पडला. त्या गडबडींत तो पारधी हत्तीवरुन घसरुन खाली पडला.

दांत तुटलेला हत्ती वधिकाच्या हत्तीच्यासमोर घाबरुन पळाला, तेव्हां दुसऱ्या हत्तीवर स्वार झालेले सैनिक भेदरले व ओरडून म्हणाले - "आम्हाला वाटलं होतं कीं हत्तीवर बसलेला कुणीतरी अस्वलाचे कातडे पांघरुन गंमतीत बसला आहे, पण आता वाटतं कीं हा युद्ध विद्या शिकलेला एक खराखुरा अस्वलच आहे." असं म्हणून आपल्या हत्तीला त्यांनी मागच्यामागे



वळवले. अस्वल्या वधिकाने आपला अंगरक्षक बनलेल्या त्या पारध्याकडे बघितले. तो जमिनीवर बेशुद्ध पडलेला होता.

आपल्या हत्तीला त्याने पुढे जाऊं दिले आणि पळून जाणाऱ्या दोन्ही हत्तींना आडवले व म्हटले, "अरे, मी कांही खरा अस्वल नव्हे! अपराध्यांचे मस्तक उडवणारा मी पेशाने वधिक आहे. जर तुम्हाला आपले प्राण बांचवायची इच्छा असली तर थोडा वेळ कां होईना, पळून जायचा प्रयत्न करुं नका. माझ्या प्रश्नांची उत्तरे द्या."

त्याचा भयानक आवाज आणि त्याहूनही भयंकर आकृती बघून ते सैनिक भीतीने थरथर कांपू लागले.

त्यानंतर अस्वल्या वधिकाने सोंडतुटक्या हत्तीबरोबर शत्रूच्या हत्तींच्याभोवती दोन वेळा प्रदक्षिणा घातली. आपला परशु त्यांतल्या एका हत्तीच्या डोक्यावर टेकवून त्याने सैनिकांना विचारले, "अरे, आता खरं काय ते सांगा, तुम्ही कोण आहात? तुम्ही "दुर्मुख महाराज की जय" अशा घोषणा केल्यात. त्या राजाचे मस्तक माझ्याकडे गहाण ठेवलेले आहे."

उत्तरादाखल शत्रूच्या एका सैनिकाने आपले डोके लववून वधिकाला प्रणाम केला नि म्हटले, "महाराज, आम्ही ज्या राजाचा जयघोष केला, ते उदयगिरीचे राजा दुर्मुख आहेत. त्यांना एक हत्तीवर स्वार असणाऱ्या व्यक्तीने त्या अरण्यांत बंदी बनवले आहे. म्हणून त्यांची सुटका करण्यासाठी आम्ही त्यांना शोधतो आहोत.

हे ऐकून वधिक आश्चर्यचकित झाला व म्हणाला, "तुमच्या महाराजांना शत्रूपासून बांचवण्यासाठी तुम्ही या दाट अरण्यांत फक्त चौघेजणच आला आहात कां?"

ते सैनिक एकमेकांकडे बघूं लागले. अस्वल्या वधिकाने यावेळी आपला परशु त्यांच्या हत्तीच्या मस्तकावर टेकवून त्यांना धमकावले, "अरे, तुम्ही जर खरं काय ते सांगितलं नाहीत तर या हत्तीचं कुंभस्थळ या परशूने चिरुन टाकीन. त्यानंतर तुमच्या डोक्यांचीही तीच दशा होईल."

त्यावर एक सैनिकाने उत्तर दिले, "महाराज! दुर्मुख राजाच्या किल्ल्यावर सूर्यभूपती नांवाच्या एका मांडलिक सरदाराने हल्ला करुन गड ताब्यांत घेतला आहे. त्यावेळी जी लढाई झाली, त्यांतून आम्ही कसेबसे बाचलो. आणि आमच्या राजाच्या शोधांत या अरण्यांत इथें आलो आहोत."

"तुमची राजनिष्ठा कौतुक करण्याजोगी



आहे. पण ज्या राजासाठी तुम्ही इतकी सगळी संकटे झेललीत, तो दुर्मुखराजा चंद्रशिला नगरीवर हक्क गाजवण्यासाठी आला होता. पण वाटेंत एक मोठा मांत्रिक आणि कालीवर्मा नांवाचा एक महान वीर यांचा अपमान राजाने केला आणि तो संकटात सांपडला आहे. तो उदयगिरीला जिवंत पोंचणे कठीणच आहे. तेव्हां तुम्ही आता दुसऱ्या एखाद्या राजाच्या दरबारांत नोकरी शोधायला जावे हे बरे!" अस्वल्याने समजावले.

तेवढ्यांत दुर्मुखराजाचा अंगरक्षक तिथे पळतपळत येऊन म्हणाला, "वधिक महाराज! तुमच्या मागोमाग चालत असताना आम्ही हत्तीची आरोळी ऐकली. तेव्हांच आम्हाला शंका आली की आपल्या हत्तीला या अरण्यांतल्या हत्तींनी अडवलं तर नसेल?"

दुसऱ्याच क्षणीं तो पारधी शुद्धीवर आला व उठून बसला. आपली तीरकमान हातात घेऊन त्याने सैनिकांच्या रोखाने नेम धरला व विचारले, "कुणी आमच्या वधिकमहाराजांना अडवले आहे?"

"अंगरक्षक महाराज! आम्हाला बांचवा." असं ओरडून सैनिकांनी हत्तीच्या पाठीवरुन खाली उडी मारली.

आपल्याला ओळखून हांक मारणारे हे कोण लोक असावेत, या विचाराने अंगरक्षकाने त्यांना निरखून विचारले, "अरे, तुम्ही आहात होय? नगरांत राहायचे सोडून या अरण्यांत तुम्ही कशासाठी आला आहात?"

हा प्रश्न ऐकून अस्वल्या वधिक मोठमोठ्याने हंसायला लागला व म्हणाला, "ते तर एक मोठेच



रामायण आहे. तुमच्या दुर्मुखराजाच्या किल्ल्यावर कुणा मांडलिकाने ताबा मिळवला आहे. पण थोड्याच वेळाने त्याचा शिरच्छेद होणार आहे. तेव्हां याचा त्याला कांहीच फायदातोटा नाही!"

त्यावेळीच राजा दुर्मुख व त्याच्या मागून उग्रदंड राक्षस व वन्य डाकूही तिथे आले. दुर्मुखने आपल्या सैनिकांना ओळखले व त्यांना विचारले, "तुम्ही इथे कां आलात?"

सैनिकांनी उत्तर देण्यापूर्वीच अस्वल्या वधिक हत्तीवरुन खाली उतरुन दुर्मुखला म्हणाला, "दुर्मुख! हाच प्रश्न तुझ्या अंगरक्षकांनीदेखील त्यांना विचारला होता. मी सांगतो, ऐक! तुझा किल्ला कुणा मांडलिकाकडे गेलेला आहे."

"कोण आहे तो मांडलिक?" दुर्मुखने आपली तलवार परजत सैनिकांना विचारले, "माझा तर एकच सूर्यभूपती मांडलिक आहे. त्यानेच माझा



गड ताब्यांत घेतला असेल. दुसऱ्याच्या ताब्यांत गड देऊन तुम्ही पळपुटे इथें आलात होय? या ...धासाठी मी आत्ताच तुम्हाला यमसदनाला ...ठतो." असं म्हणून दुर्मुख सैनिकांच्या दिशेने झेपावला.

उग्रदंड राक्षसाने झटकन पुढे होऊन दुर्मुखचा हात पकडला, व त्याला थांबवीत म्हटले, "दुर्मुख, उतावीळपणा करुं नकोस. प्रथम अस्वल्या वधिक व मांत्रिकाच्या तावडीतून स्वतःला वांचव. त्यानंतर तुझा किल्ला तुला परत मिळावा म्हणून आम्ही सर्वजण तुला मदत करुं."

हे ऐकून दुर्मुख जरा नरमला. उग्रदंडाचे दोन्ही हात पकडून तो म्हणाला, "उग्रदंड महाराज! जर माझा मृत्यू निश्चित होणारच असेल, तर मला एका राज्याचा राजा म्हणूनच मरण येऊं दे. तुमच्या मदतीने त्या दुष्ट मांडलिकाचे मस्तक किल्ल्याच्या बुरुजावर लटकावून मी अगदी आनंदाने त्या अस्वल्या मांत्रिकाकडे माझा शिरच्छेद करण्यासाठी जाईन."

दुर्मुखचे दुःख पाहून उग्रदंड राक्षसाला त्याची दया आली. त्याने अस्वल्या वधिकाकडे जाऊन विचारले, "ऐक, वधिका! दुर्मुखच्या मागणीत कांहीही चूक नाही. आपण तसं करायचं कां?"

दोनचार क्षण विचार करुन अस्वल्या वधिकाने सर्वांकडे नजर फिरवीत म्हटले, "तुम्ही सगळे मिळून शेवटी मला फसवणार तर नाही ना?" आणि तो आपल्या परशूची धार तपासूं लागला.

उग्रदंडाने विचार केला कीं अस्वल्या वधिक उगीच चिडण्यापेक्षां प्रथम त्याला जरा शांत करायला हवे. त्याने हंसतहंसत वधिकाच्या खांद्यावर जरा थोपटल्यासारखे करुन म्हटले, "वधिक भाऊ! तुमच्या परशुचे पाते किती धारदार आहे ते आम्हाला ठाऊक आहे ना! पण अस्वल्या मांत्रिकाने जे मस्तक आणायला सांगितलं आहे ते राजा दुर्मुखचं कीं पदच्युत झालेल्या दुर्मुखचं?"

अस्वल्या वधिकाला हा प्रश्न नीटसा कळला नसावा. तो गोंधळून म्हणाला, "उग्रदंड! मला वाटतं की तूं कांहीतरी उलट सुलट बोलून मला धर्मसंकटात टाकणार नाहीस ना? जे सांगायचं आहे, ते स्पष्टपणे सांगून टाक कीं!"

"तर, मग ऐक! दुर्मुखराजाला आपल्या प्राणांपेक्षां आपल्या राज्याची जास्त काळजी वाटतेय. म्हणून राजद्रोही सूर्यभूपतीला किल्ल्यांतून पळवून लावले तर जगांत तो सगळ्यांना उजळ



माथ्याने सांगू शकेल कीं उदयगिरीचा किल्ला हा दुर्मुखराजाचाच आहे. आणि नंतर आपण त्याला अस्वल्या मांत्रिकाकडे घेऊन जाऊ!"

राजा दुर्मुखने दोन्ही हात जोडून नम्रपणे म्हटले, "वधिक महाराज, कांही घटकांच्यानंतर मी हे जग सोडून जाणार आहेच. तेव्हां माझी ही अंतिम इच्छा पूर्ण करावी."

वधिकाने होकारार्थी मान डोलावली. त्याच वेळी पारध्याने एका झाडाच्या बुंध्यावर एक बाण तटकन सोडला व म्हटले, "वधिकराजा! त्या मांडलिकाला माझ्या बाणाची शिकार होऊं दे. अरण्यांतले पक्षी मारणाऱ्या शिकाऱ्यांकडून तो करवसुली करत असे."

लागलीच चोरांचा सरदार नागमल्ल आपली तलवार उपसून बोलला, "तो सूर्यभूपती फारच दुष्ट आहे. आम्ही प्राणांची पर्वा न करता अरण्यांतून जाणाऱ्या प्रवाशांना लुटून आमचे पोट भरतो. आम्ही लुटलेल्या मालांतला अर्धा भाग वसूल करुन आणण्यासाठी तो त्याचे सैनिक पाठवीत असे."

"असं करत होता काय? तर मग चलाच. आपण अस्वल्या मांत्रिकाला आपण मांडलिकांचे मस्तकदेखील भेट देऊं या. पण हे सांग, उदयगिरी नगर इथून किती दूर आहे? अस्वल्या वधिकाने त्वेषाने विचारले.

"पायवाटेने जर गेलं तर अर्ध्या प्रहराच्या आंत आपण उदयगिरीला पोंचू शकतो. मी सर्वांच्यापुढे राहून रस्ता दाखवतो. अस्वल्या वधिक भाऊ, मला तुमच्या तुटक्या सोंडेच्या हत्तीवर बसायची परवानगी द्याल कां?" पारध्याने विचारले.



अस्वल्या वधिकाने मान डोलावली आणि तो हत्तीवर जाऊन बसला. उग्रदंड राक्षसाने दुर्मुख-राजाचे खांदे पकडून त्याला वर उचलले आणि त्याला दांत तुटलेल्या हत्तीवर बसवत तो वधिकाला म्हणाला, "अरे वधिका! तुझ्या संमतीनचे मी या दुर्मुखराजाला हत्तीवर बसवतो आहे. थोडा वेळ कां होईना, पण राजा म्हणून दुर्मुखचा मान आपण ठेवायला हवा, नाही कां?"

दुर्मुखराजाबरोबर आणखी दोन सैनिक हत्तीवर बसले आणि चोरांचा नायक नागमल्ल, त्याचे दोन साथीदार आणि दुसरे दोन सैनिक, असे दुसऱ्या हत्तीवर चढून बसले. पारधी रस्ता दाखवीत होता. उग्रदंड राक्षस आपली दगडी गदा खांद्यावर ठेवून मोठमोठ्या टांगा टाकीत त्यांच्यामागून चालायला लागला.

अर्ध्या प्रहरानंतर ते सर्वजण अरण्यांतून एका

मोठ्या मैदानांत पोंचले. समोर एक मोठा किल्ला, त्याच्यामागे राजवाडा आणि एक नगर त्यांना दिसूं लागले. किल्ला पाहताच दुर्मुखराजा काळजीच्या स्वरांत अस्वल्या वधिकाला म्हणाला, ''वधिकमहाराज, यावेळी त्या दुष्ट सामंताकडे थोडे घोडेस्वार व थोडे पायदळ निश्चित असेल. आपण तर मूठभर आहोत. त्यांच्याशी कसा सामना करणार?''

''ओहो! यावेळीं तुझ्या मनांत ही शंका येते आहे कीं काय?'' असं म्हणून वधिकाने आपला परशू उचलला आणि मागून चालत येणाऱ्या उग्रदंडाला हांक मारुन दुर्मुखची ही शंका त्यांना ऐकवली.

उग्रदंड राक्षसाने आपली गदा जमिनीवर आपटून म्हटले, ''अरे अस्वल्या वधिका! तुझा परशू आणि माझी गदा शेंकडों शत्रूंना कंठस्नान घालूं शकतात. पण जास्ती रक्त सांडण्यापेक्षां, त्या किल्ल्यावर ताबा मिळवणाऱ्या मांडलिकाला पकडून त्यालाच कसा ठार मारायचा त्याच्या-बद्दल कांहीतरी विचार कर ना!''

उग्रदंडचे बोलणे पूर्ण होताक्षणींच नागमल्ल हत्तीवर बसला होता तो उठून उभा राहिला व म्हणाला, ''महाराज! त्याच्यासाठी मी यापूर्वींच एक कल्पना योजून ठेवलेली होती. माझे दोन्ही साथीदार आणि मी प्रथम उदयगिरींत प्रवेश करुं, आणि त्या मांडलिक सरदाराला आम्ही सांगू कीं दुर्मुखराजाला आम्ही पकडून आणलेले आहे. त्याच्यासाठी आपण आम्हाला कोणते इनाम देणार आहात? म्हणजे तो आपल्या कांही अंगरक्षकांच्यासह आपल्याकडे येईल.''

''वा वा! तू अगदी छान उपाय योजून ठेवला आहेस की रे नागमल्ल! तर मग तुम्ही आत्ताच पुढे व्हा!'' उग्रदंडाने आज्ञा केली.

चोरांचा सरदार नागमल्ल व त्याचे साथीदार हत्तीवर बसून किल्ल्याच्या दिशेने कांही अंतरावर जाऊन पोंचले, तेवढ्यांत किल्ल्याच्या जड दरवाजाचा मोठा आवाज झाला आणि वारुळांतून मुंगळे बाहेर पडावेत, तसे कित्येक घोडेस्वार आणि पायदळाचे सैनिक किल्ल्यांतून बाहेर पडले.

(क्रमशः)







वेताळ कथा

# आत्माभिमानी

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ परतला. त्याने झाडावरुन प्रेत खाली काढले, खांद्यावर घेतले आणि तो स्मशानाच्या दिशेने चालायला लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने राजाला विचारलं, ''राजन्, या भयंकर ठिकाणीं तू मध्यरात्रीं कोणत्या उदात्त ध्येयाने प्रेरित होऊन इतके कठोर परिश्रम झेलत आहेस? आपली इच्छा, स्वातंत्र्य व लक्ष्य, यांच्यासाठी आपल्या प्राणांचा-देखील त्याग करायला तयार असलेले कित्येक तरुण मी पाहिलेले आहेत. त्यांचा आवेश बघण्यासारखा असतो. पण जरा परिस्थितींत बदल झाला तर घाबरुन जाऊन ते आपले लक्ष्य



विसरतात आणि भेदरुन जाऊन पळपुट्यासारखे वागायला लागतात व आपला पवित्रा बदलतात. एक भिल्ल तरुण गिरीधर याचे उत्तम उदाहरण आहे. तुझा थकवा दूर करण्यासाठी मी तुला त्याचीच गोष्ट सांगतो ती ऐक.'' आणि वेतालाने पुढील गोष्ट सांगितली.

घाटावरच्या सरदार कोंडदेव यांचा भार्गव हा एकुलता एक पुत्र होता. बालवयापासूनच तो अतिशय स्वाभिमानी होता, पण अहंकारी नव्हता. जरी तो सरदाराचा मुलगा होता तरी उर्मट नव्हता. समवयस्क तरुण मुलांच्यात तो मिळून मिसळून वागत असे. चर्चा-वाद झाले तर तो नेहमी सांगे, कीं मनुष्याला स्वाभिमान असलाच पाहिजे.

दरवर्षीं त्या प्रदेशांत भार्गवीदेवीची पूजा होत असे. त्या वेळेला तिरंदाजी, खड्गयुद्ध व इतर खेळांच्या स्पर्धा होत होत्या. विजेत्यांचा सत्कार होई, त्यावेळेला गिरीधर त्यांना उत्तेजन देत म्हणाला, ''प्रत्येकाने आपल्या जमातीच्या विमुक्तीसाठी किमान एकेक भाला तरी बनवला पाहिजे आणि आपल्या आदर्शांसाठी जीव द्यायलादेखील मागे पाहाता कामा नये.'' त्याचे हे आवेशयुक्त भाषण ऐकून भिल्ल तरुणांनी उत्साहाने टाळ्या वाजवल्या व जयघोष केला.

भार्गवघाटीच्या चारी बाजूंनी पर्वत आहेत. पण दक्षिणेला मात्र आंत यायला एक बारीकशी खिंड आहे. त्या रस्त्याने पुढे दुसऱ्या दिशेला गेलं की कांचनपुर राज्याची सीमा सुरुं होत होती. कनकसेन हा तिथे राज्य करीत होता. त्याच्या पणजोबांच्या वेळेपासून भार्गव घाटीचे सरदार त्याचे मांडलिक राज्य होते. त्यापूर्वी घाटीची प्रजा स्वतंत्र होती. गिरीधरने आपली घाटी मांडलिक राज्य कशी झाली याबद्दल अनेकवेळां वडिलधाऱ्या मंडळींना विचारले.

पण ही गोष्ट सांगणारा मरतो आणि राज्याचे अकल्याण होते असे सांगून दरवेळेला त्यांनी हा विषय टाळला.

भार्गवीमातेच्या मंदिराचे वृद्ध पुजारी आता खूपच थकले होते. गिरीधर त्यांना भेटला आणि त्याने या रहस्याबद्दल सांगण्यास कळकळीने विनवले. पुजारीजीने सत्यकथन केले आणि त्याचे निधन झाले.

भार्गवघाटीमधे अनेक जातीची फळझाडें व जनावरे भरपूर होती. मध व इतर वनौषधी तिथें



मुबलक होत्या. कुठलीही जडीबुटी तिथें हमखास मिळत असे. कांचनपुरच्या राजाला जेव्हां या घाटीचं महत्व समजलं, तेव्हांपासून त्याचे सैनिक घाटीवर हल्ला करीत, गरीब भिल्लांना धमकावत, नि त्रास देत असत. त्यांनी कष्टाने गोळा केलेला मध घेऊन जात, सांबरशिंगे आणि जनावरांची कातडी लुटून नेत असत. त्यांच्याशी कसा सामना द्यायचा ते बिचाऱ्या भिल्लांना समजेना.

दरवर्षीप्रमाणे भार्गवीदेवीचा उत्सव होणार होता. तो पाहाण्यासाठी कांचनपुरचा सेनापती कांही सैनिकांसह तिथे आला होता. भार्गवीमातेची जेव्हां पूजा चालली होती, तेव्हां अचानक मंदिराच्या पुजाऱ्याच्या अंगात देवी आली असावी. तो बेभान होऊन ओरडायला लागला, ''जर आपल्या पोराबाळांसकट आपल्याला या घाटींत सुखरूप राहायचं असेल तर माझी एक गोष्ट तुम्ही ऐकाल कां?''

भिल्ल सरदाराने लगेच सांगितले, ''सांगा माते, आपण सांगाल तसंच आम्ही करुं!''

''आजपासून दर पौर्णिमेला तीन बुधले भरुन मध, बारासिंग्यांची एकवीस शिंगे आणि तीन टोपल्याभरुन काष्ठौषधी माझ्यासमोर आणून ठेवा आणि नंतर ती या सैनिकांच्या स्वाधीन करा. जोपर्यंत महाराज स्वत:हा नियम रद्द करीत नाहीत, तोपर्यंत कोणत्याही परिस्थितींत या नियमाचे उल्लंघन होता कामा नये. नाहीतर तुमचेच नुकसान होईल.''

''असंच होत राहील, माते आपल्या आज्ञेचे



योग्य तऱ्हेने पालन होईल'' भिल्लराजाने आश्वासन दिले. बाकी लोकांनी होकार दिला. सेनापतीने समतीदर्शक मान डोलावली.

त्या दिवसापासून भार्गव घाटी कांचनपुरची मांडलिक झाली. तेव्हांपासून सैनिकांनी भिल्लांना त्रास देणे कमी केले. पण दर पौर्णिमेला येऊन ते मध, फळें, व औषधी वस्तू घेऊन जाऊं लागले.

ही पद्धत गिरिधरला सहन होईना. त्याने तडफदारपणे भिल्ल तरुणांना सांगितले, ''बनदेवी या गोष्टी आपल्याला देते. आपण त्या मोठ्या कष्टाने गोळा करतो. त्या या सैनिकांना देऊन, आपण उपाशी राहून त्यांचे गुलाम होऊन राहायचं? कां? आपण सगळेजण एकत्र झालो तर त्यांची शिरजोरी चालणार नाही.''



''असं म्हणूं नकोस रे पोरा. हा आगीशी खेळ होईल. राजाच्या सैन्यापुढे आपली कुवत ती काय असणार?'' पित्याने मुलाला समजावयाचा प्रयत्न केला.

एक दिवस गिरीधरने पित्याला सांगितले, ''मी स्वत: जाऊन राजाला भेटतो. आपल्या काय अडचणी आहेत ते मी त्यांना सांगतो.''

''राजाने जर आपली विनंती ऐकली तर चिंताच नाही. नीट नम्रपणे सांगून बघ.'' पित्याने सुचवलं.

दुसऱ्याच दिवशी, दोन मित्रांना घेऊन गिरीधर राजधानीला गेला, आणि राजाला भेटून त्याने जनतेच्या हालअपेष्टांबद्दल सांगितले. ते ऐकल्यानंतर राजा कठोरपणे म्हणाला, ''भार्गव घाटी हा आमचा मांडलिक प्रांत आहे. आमचाच अधिकार तिथे चालतो. जर तुम्हाला हा कर द्यायचा नसेल तर घाटी सोडून दुसरीकडे निघून जा.''

''भार्गवघाटी तर आमची माता आहे. महाराज, घाटी सोडून जाणे आम्हाला शक्य नाही. असा विचार आम्ही स्वप्नांतदेखील करणार नाही. क्षमा करावी आम्हाला.'' असं म्हणून गिरिधर दरबारांतून बाहेर आला.

एक आठवडा झाला. जेव्हां राजा दरबारांत बसला होता, तेव्हां एक तरुण भिल्ल तिथे आला. राजाला वंदन करुन त्याने त्याला एक पत्र दिले. राजा पत्र वाचूं लागला. त्यांत गिरीधरने लिहिले होते,

''महाराज, तीन पिढ्यांच्यापूर्वी पुजाऱ्याच्या धमकीमुळे घाबरुन आमच्या पूर्वजांनी वचन दिले होते व ते त्याचे पालन करीत आले आहेत. तेव्हांपासून आम्ही आपल्याला कर चुकता करतो आहोत आणि अडचणी सोसत आहोत. मी आपल्याला केलेली विनंती पण अव्हेरली, हे आमचे दुर्भाग्य आहे. आता आम्ही स्वत:ला स्वतंत्र म्हणून घोषित करणार आहोत. तसा आम्ही निर्णय घेतलेला आहे. आमचे लोक लढाईला व मरायला तयार आहेत पण रक्तपात व्हावा असे मला वाटत नाही. यानंतर माझा एक प्रस्ताव आहे. भिल्ल तरुणांचा प्रतिनिधी म्हणून आपल्या वीरांपैकी कुणाशीही मी द्वंद्वयुद्ध करायला तयार आहे. त्यांत जर मी जिंकलो तर आपण आमची घाटी स्वतंत्र म्हणून घोषित करावी. जर माझा पराजय झाला तर आम्ही लगेच ही घाटी सोडून दुसरीकडे कुठेतरी जाऊं. आपण माझी ही विनंती मान्य कराल अशी आशा आहे. हे युद्ध केव्हां व कुठे होईल तेवढे कळवावे. आपल्या आदेशाची वाट पाहाणारा, भार्गव घाटीचा गिरीधर.''

पत्र वाचून राजाच्या भिवया वर चढल्या. मनांतला राग आवरीत तो भिल्ल तरुणाला म्हणाला, ''ठीक आहे, पुढल्या पौर्णिमेला संध्याकाळी राजधानीच्या मैदानांत ही स्पर्धा होईल. हे गिरिधरला जाऊन सांग.''

राजाच्या आज्ञेप्रमाणे पौर्णिमेच्या दिवशी या स्पर्धेची जय्यत तयारी करण्यांत आली. जेव्हां गिरिधरने दोघा मित्रांच्याबरोबर मैदानांत पाऊल ठेवले, तेव्हां सैनिकांनी त्याला चारी बाजूंनी गराडा घातला आणि त्याला कैद केले.

हा अनपेक्षित पवित्रा पाहून गिरिधर क्षणभर स्तब्ध राहिला. नंतर मात्र राजाकडे तो रागाने बघत राहिला.

राजाने त्याची टर उडवीत म्हटले, ''गिरिधर, तुझा शूरपणा खरोखरीच कौतुक करण्याजोगा आहे, पण तू राजाचा धिक्कार करुन आपला जीव मात्र संकटात टाकला आहेस. कांट्यानेच कांटा काढता येतो. हा क्षत्रियांचा धर्म आहे. जे लोक पिढ्यान् पिढ्या शांत, सुखी जीवन घालवत आहेत, त्यांच्या हृदयांत तू स्वाभिमान, स्वातंत्र्य यांचे बीज पेरलेस. त्यांना जागृत करुन, त्यांना बुचकळ्यांत टाकून राज्यांत गोंधळ माजवण्याचा तुझा हेतू दिसतो, हा सरळ राजद्रोह आहे. तू क्षमा करण्यास पात्र नाहीस. याक्षणीं तुझा मी शिरच्छेद करुं शकतो.

पण अनावश्यक रक्तपात व्हावा अशा मताचा



मीही नाही. म्हणून मी तुला एक निराळी संधी देतो. भार्गव घाटीची प्रजा आता माझ्या विरोधांत आहेच. ज्यांना स्वातंत्र्य हवे आहे, त्यांना मी ते देईन - पण एका अटीवर!''

''सांगा, कोणती अट आहे?'' गिरिधरने विचारले.

''तुला जर भार्गवघाटी स्वतंत्र व्हायला हवी असेल तर त्यासाठी तू जन्मभर माझ्या राजवाड्यांत राहिलं पाहिजेस, आणि तिथल्या सेवकांप्रमाणे राहून आजन्म माझा दास बनून राहावं लागेल. हे तुला मान्य आहे कां?''

प्रथम गिरिधर चकित झाला, पण लगेच त्याने स्वतःला सांवरत म्हटले, ''मी मनापासून आपली ही अट मान्य करतो आहे.''

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजन, गिरिधर अत्यंत स्वाभिमानी होता. पण मग त्याने आजन्म गुलामी कां स्वीकारली? हे त्याच्या स्वभावातले अचानक झालेले परिवर्तन कशामुळे असेल? प्राण जाईल म्हणून तो घाबरला तर नव्हता ना? की परिस्थितीपुढे वांकणे हेच श्रेयस्कर असे त्याला वाटले? माझ्या या साऱ्या शंकांची उत्तरे माहीत असूनही जर तू मौन पाळलेस, तर तुझ्या मस्तकाची अनेक शकले होऊन पडतील.''

विक्रमार्क राजा उत्तरादाखल म्हणाला, ''गिरिधर- मधे कोणताही बदल झाला नव्हता. आपल्या जमातीच्या लोकांना स्वातंत्र्य मिळावे हे त्याच्या जीवनाचे लक्ष्य होते. आणि ते त्याने मिळवलेही! पण त्यासाठी त्याने आपले स्वातंत्र्य पणाला लावले. तो घाबरला नव्हता किंवा परिस्थितीपुढे नमलादेखील नाही. परिवाराच्या गौरवासाठी व्यक्तीगत अभिमान बाजूला ठेवणे, एका गावाच्या गौरव राखण्यासाठी एखाद्या परिवाराचा अपमान होणे, किंवा देशाच्या गौरवासाठी एक गांव अपमानित होणे, यासाठी मनाची तयारी असणे. हा श्रेष्ठ, उदात्त त्याग आहे. त्याने आपल्या बांधवांसाठी त्याग केला. तेव्हां गिरिधर हा अत्यंत स्वाभिमानी व प्रखर देशाभिमानी होता हे निश्चित! त्याचे गुण गावेत तितके थोडेच आहेत.''

राजाचा मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार : सुचित्राची रचना)*



# ... कोण असतो?



भारताचे राष्ट्रपती डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम यांच्या जीवनकथेंतले हे एक पान आहे.

भारताला नुकतेच स्वातंत्र्य मिळाले होते त्या काळांतली ही गोष्ट आहे. ग्रामपंचायतीच्या निवडणुका होत होत्या. रामेश्वरमहून जनाब अबुल पकीर जैनुलाबदीन हे निवडून आले, आणि नंतर ते पंचायतीचे अध्यक्ष झाले. त्यांची मनमिळाऊ प्रामाणिक वृत्ती आणि सर्वांशी स्नेहशील वागणूक, या गुणांमुळेच त्यांची निवड झाली होती. धर्म किंवा त्यांची आर्थिक परिस्थिती या निकषांवर झालेली नव्हती.

एका संध्याकाळीं छोटा अब्दुल कलाम रॉकेलच्या दिव्याच्या उजेडांत अभ्यास करीत होता. दारावर थाप वाजली आणि एक अनोळखी इसम आंत आला. त्याने सांगितलं कीं अब्दुलच्या वडिलांना कांहीतरी सामान द्यायचं होतं. वडील तर नमाज पढायला गेलेले होते. अब्दुल कलामची आईदेखील नमाज पढायला गेली होती. म्हणून छोट्या अब्दुलने पलंगावर ते सामान ठेवायला त्या इसमाला सहज सांगितलं. त्याप्रमाणे त्याने ते सामान पलंगावर ठेवलं आणि तो निघून गेला.

जेव्हां अब्दुलचे वडील तिथे आले, तेव्हां त्यांनी ते पुडके पाहिले. ''हे काय आहे? इथें कुणी ठेवलंय?'' त्यांनी विचारलं. ''कुणीतरी आले होते आणि त्यांनी तुम्हाला देण्यासाठी ते तिथें ठेवलंय.'' छोट्या अब्दुलने उत्तर दिलं. त्यांत एक किंमती धोतर, शाल, मिठाई व फळें होती. त्यासोबत एक चिठ्ठी होती. वडिलांनी कांहीच खुलासा मागितला नाही. संतापून त्यांनी अब्दुलला जोराने मारायला सुरवात केली. त्याची आई मधे पडली आणि त्यांनी मारणें थांबवावे, म्हणून तिने कळवळून विनंती केली. त्या पोराची त्यांत कांहीच चूक नव्हती. त्यावर त्यांनी एका इस्लामिक वचनाचा दाखला दिला. ते म्हणाले की जेव्हां तो सर्वश्रेष्ठ एखाद्याची एखाद्या जागी नेमणूक करतो, तेव्हां त्याच्या गरजा भागतील याचीही सोय तो करतो. त्यापेक्षां जास्त कांही जर इतरांकडून घेतले गेले तर ती बेकायदेशीर मिळकत आहे. ''कोणतीही भेट देण्यामागे कांहीतरी हेतू असतो, आणि म्हणून अशी भेटवस्तू स्वीकारणें हे पाप आहे.''

वडिलांच्या या तापट प्रतिक्रियेवर अब्दुलने




## ताजमहालाला ३५०वर्षे झाली

आधुनिक जगांतल्या सात आश्चर्यपैकी आगऱ्याचा ताजमहाल हा एक आहे. सम्राट शाहजहान याने ३५० वर्षांपूर्वी ही इमारत बांधली. ताजमहालाची उंची २४४फूट आहे, पण अत्यंत प्रमाणबद्ध व नीटस बांधणी असल्यामुळे त्याची ही उंची जाणवत नाही. वास्तविक दिल्लीचा कुतुबमिनार हा जगांतला सर्वांत उंच मनोरा आहे. हा ताजमहालच्या चारशे वर्षे अगोदर बांधलेला आहे आणि तो ताजमहालपेक्षां चार फूट कमी उंच आहे! ताजमहालच्या चारी बाजूंच्या भिंतीवर अरबी लिपींत कुराणांतील वचने फारच सुबक व समान अक्षरांत कोरलेली आहेत. मुमताजमहलच्या थडग्याभोवतीची जाळी प्रथम सोन्याची केलेली होती. पण त्याची नासधूस व चोरी होईल अशी शंका आल्यामुळे बादशहाने संगमरवरी जाळी बनवली. शाहजहानचा मुलगा औरंगजेब याने अनेक लष्करी मोहीमांचा खर्च भागवण्यासाठी मूळची सोन्याची जाळी विकली. त्याजागी सध्यां साधीजाळी असून त्यावर नाजूक पानांची नक्षी कोरलेली आहे.



## जागतिक विक्रम

भारताच्या स्वातंत्र्यलढ्यांत महात्मा गांधी यांच्या नेतृत्वाखाली निघालेली दांडीयात्रा हा एक महत्वाचा टप्पा आहे. हा एक जागतिक विक्रमदेखील आहे, हे तुम्हाला माहीत आहे कां? जगांतली ही सर्वांत मोठी-२५ दिवस चाललेली - नागरी कायदेभंगाची चळवळ आहे. गांधीजी व त्यांचे ७८ सहकारी यांनी साबरमतीपासून दांडीपर्यंतचे ३८८ किलोमीटरचे अंतर १९३०मधें १२ मार्च ते ५ एप्रिलपर्यंत पायी चालत पार केले.







## अमर पांडेचे ज्योतिष

सनतपुर गांवात अमर पांडे हा एक प्रसिद्ध ज्योतिषी राहात होता. त्याच्याकडे जे लोक येत. त्यांची जन्मकुंडली पाहून तो भविष्य सांगत असे. ज्यांच्याकडे कुंडली नव्हती, त्यांच्या जन्म-नक्षत्राचा आधार घेऊन तो पत्रिका तयार करी आणि भविष्य सांगे.

गृहशांतीच्या नावाखाली तो शांतीपूजा व हवन करायचा व त्यांच्याकडून भक्कम पैसे उकळायचा.

अमर पांडेचे भाग्य म्हणा किंवा योगायोग असेल, त्याने केलेले भाकित बऱ्याच वेळेला तंतोतत खरे ठरायचे. जेव्हां त्याचे भविष्य खरे ठरत नसे, आणि लोक जोरांत त्याची चर्चा करीत, तेव्हां गोडगोड बोलून तो त्यांना शांत व संतुष्ट करीत होता.

भास्कर पांडे हा अमर पांडेचा दूरचा नातलग होता. एक दिवस त्यांची अचानक बाजारपेठेंत भेट झाली. भास्कर पांडेने अमर पांडेला कडव्या स्वरांत सांगून टाकलं, ''मला वाटलं होतं कीं तू ज्योतिष शास्त्रांतला महापंडित आहेस. गेल्या वेळेला मी तुझ्याकडे आलो होतो तेव्हां तू सांगितलं होतंस कीं सहा महिन्यांत माझ्या मुलीचे लग्न ठरेल. आता वर्ष होऊन गेलं, पण अजून कांही तिचं लग्न जमलेलं नाही. नातेवाईक असूनदेखील तू माझ्याकडून भरपूर पैसे घेतले होतेस. खरं बघितलं तर तू कांही ज्योतिषी नसावास असंच वाटतं.''

अमरपांडे रागाने लालपिवळा झाला व त्याने उत्तर दिले, ''तोंड सांभाळून बोल. तू काय समजलास मला? मी काशीच्या महापंडितांच्या शिष्य आहे. ज्योतिष शास्त्रांत प्रवीण आहे. माझं ज्योतिष खोटं आहे हे तू कसं रे म्हणतोस? तू दाखवलेली कुंडलीच चुकीची असेल.''

त्यावर भास्कर पांडेने लगेच सांगितलं, ''अरे,

कल्की



तुला आठवत नाही कां तूच तर तिची कुंडली बनवली होतीस ना?''

अमरपांडे कांही क्षण स्तब्ध होता. नंतर तो म्हणाला, ''तर मग तू मला चुकीचे नक्षत्र सांगितले असशील किंवा चुकीची जन्मवेळ असेल. एका पळाची जरी चूक झाली तरी ग्रहांच्या जागेत फेरबदल व्हायची शक्यता असते. असल्या बारीक सारीक गोष्टी तुझ्यासारख्या अडाणी लोकांना कशा समजणार? चल जा आता.'' असं म्हणत तो तिथून सटकला.

ज्या लोकांना अमर पांडेला असले प्रश्न विचारायचे धैर्य नव्हते, ते आपले निमूटपणे गप्प बसत व स्वतःशीच म्हणत, ''हे तर आपलेच दुर्दैव आहे. दुसऱ्याला कशाला बोल लावायचा?''

ज्योतिषाच्या नांवावर अमरपांडे लबाडी करतो आहे ही बातमी गुप्तहेरांनी जमीनदाराला सांगितली. त्याचे खरे स्वरुप लोकांपर्यंत कसे पोंचवायचे यावर जमीनदार गंभीरपणे विचार करुं लागला.

अशा वेळी राजाचा एक प्रतिनिधी फिरतफिरत सनतपुरांत आला आणि जमीनदाराला भेटला. जमीनदाराने त्याला लबाड अमर पांडेबद्दल सांगून म्हटले, ''या भामट्या ज्योतिषीमुळें फक्त आमच्या गांवातली नव्हे, तर आसपासच्या गांवातली जनतादेखील फसवली जात आहे. याचा हा लुच्चेपणा कसा उघडकीस आणावा ते मला कांही सुचत नाही!''

राजाच्या प्रतिनिधीने ह्याच्यावर बराच विचार करुन एक उपाय जमीनदाराला सुचवला. त्याच्या दुसऱ्याच दिवशी रात्रीच्या वेळी अमर पांडेच्या घरांत चोर घुसले आणि तिजोरींत ठेवलेले दागिने व रोकड त्यांनी लुटून नेली.

उजाडताच ही बातमी गांवभर पसरली. जिकतेतिकडे ह्याचविषयी बोलले जात होते. जो ज्योतिषी लोकांचा भूतकाळ, वर्तमानकाळ व भविष्याबद्दल सांगायचा, त्याच्याच घरांत चोरी झाली, आणि त्याबद्दल त्याला कांही कसे कळले नाही? सर्वांना याचेच आश्चर्य वाटत होते. कांहीजणांना तर आसुरी आनंद झाला. त्यांचं मत होतं की जे झालं ते चांगलंच झालं.

अमर पांडे भेटेल त्याला आपली रडकथा ऐकवूं लागला. दुसऱ्या दिवशी जमीनदाराने त्याला बोलावून घेतले. अमरपांडेला आशेचा किरण



दिसला. बहुतेक चोर पकडले गेले असतील, आणि आपले पैसे व दागिने परत देण्यासाठी जमीनदाराने बोलावले असेल असा त्याचा ग्रह झाला. तो लगबगीने जमीनदाराच्या वाड्यावर गेला. तिथें बाहेरच्या अंगणात अनेक गांवकरी बसले होते व जमीनदार मधें बसून कांहीतरी आपसांत बोलत होता.

जमीनदाराने उदासवाण्या अमर पांडेला नखशिखांत पाहिले व खवचटपणें विचारले, ''अमर पांडेजी, तुम्ही तर सगळ्यांना मुहूर्त काढून देता, साऱ्या इलाख्याचे ज्योतिष वर्तवता कीं नाही? मग तुमच्याच घरी चोरी होणार हे भाकित तुम्हाला समजले नव्हते कां?''

हा प्रश्न ऐकून अमरपांडे गोंधळला व नंतर म्हणाला, ''महाशय, मला ठाऊक होतं कीं काल रात्रीं घरांत चोर येणार आहेत. पण नियति कोण बदलणार? म्हणून मी त्याकडे विशेष लक्ष दिले नाही.''

जमीनदाराने कठोरपणे सांगितलं, ''जर तुझं हे म्हणणं खरं असेल तर याचा असा अर्थ होतो कीं तू दोन अपराध केलेले आहेस. पहिला, चोर घरांत चोरी करण्यासाठी येतील हे तुला ठाऊक होतं; तरी पण ही गोष्ट तू लपवलीस आणि अप्रत्यक्षपणें त्यांना पळून जायला मदत केलीस. दुसरा अपराध म्हणजे जर होणारे टळत नाही असं असेल, तर ज्योतिषाच्या नांवावर तू लोकांना फसवत होतास. फक्त त्यांच्याकडून भरपूर पैसा मात्र उकळतो आहेस. याबर तुला काय सांगायचंय?''

''आपण जे म्हणता आहात, ते मी कसं काय



नाकारणार?'' असं म्हणून अमर पांडेने खाली वाकून दोन्ही हात जोडले. तिथे हजर असलेले सर्वजण हंसायला लागले.

जमीनदाराने हंसतच पुढे म्हटले, ''अमर पांडे, तुझे ज्योतिष जाऊं दे, तू तर मोठा भाग्यवान आहेस कीं रे!

काल जो राजप्रतिनिधी इथे आला होता, त्याने काशीला जाऊन ज्योतिष-शास्त्राचा सखोल अभ्यास केलेला आहे. सकाळीं राजधानीला तो परत गेला तेव्हांच त्याने पहारेकऱ्यांना सावध राहाण्याचा इशारा देऊन म्हटले कीं रात्रीं गांवात एखाद्या घरांत चोरी होईल. म्हणून पहारेकरी सावध होते.

तुझ्या घरांतून चोर जेव्हां बाहेर पडले, तेव्हां पहारेकऱ्यांनी त्यांना पाहिले व पकडलेच असते. पण चोरांनी जेव्हां पहारेकरी जवळ येताना बघितले, तेव्हां चोरीचा सारा माल तिथेच टाकून त्यांनी पळ काढला.''

''म्हणजे माझे पैसे, दागिने सुरक्षित आहेत? ही सारी आपली कृपा!'' अमर पांडेने म्हटलं.

तेव्हां जमीनदाराने आवाज चढवून म्हटलं, ''आत्ताच तुझा सारा माल घेऊन जा. पण यापुढे ''मी ज्योतिषी आहे'' असं धिटाईने सांगू नकोस. लोकांना कांहीतरी थातुरमातुर ज्योतिष सांगून फसवूं नकोस. त्यांत लबाडी आहे. त्याऐवजी या धनाचा उपयोग करुन कांही व्यापार कर किंवा शेतजमीन विकत घेऊन शेती कर.''

''महोदय, मी आपली आज्ञा कशी बरे पाळणार नाही? आपल्या सर्वांच्या साक्षीने मी शपथ घेतो कीं या क्षणापासून मी ज्योतिषी नाही.'' अमर पांडेने सांगितलं.

त्यावर जमीनदाराने तिथे जमलेल्या सर्व लोकांना उद्देशून म्हटलं, ''अमर पांडेसारखे लबाड ज्योतिषी भोळ्या, अंधश्रद्धाळू, व गरीब लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेतात. आजवर हा होता, उद्यां आणखी कोणी अनंत पांडे येऊन फसवूं नये, म्हणून आपणच सावध राहायला हवं! त्यांच्या तावडीत सांपडता कामा नये!''





# बातम्यांमधली मुलें

## अमेरिकन मॅरथॉनचे भारतीय विजेते



**सॅन** होजे, कॅलिफोर्निया इथला पंधरा वर्षांचा गौतम पेरी, हा सॅन फ्रॅन्सिस्को क्रॉनिकल मॅरथॉनमधे १९ वर्षांखालील गटामधे चवथ्या क्रमांकावर आला. १९०० स्पर्धकांमधे तो वयाने सर्वांत लहानापेक्षा जरा मोठा होता. त्याला ३ तास, ४६ मिनिटे, ४७ सेकंद इतका वेळ लागला. सर्वांत लहान होता एक बारा वर्षांचा मुलगा! त्याला गौतमपेक्षां २ तास जास्त लागले आणि तो १३९८ गुणांनी गौतमच्या मागे होता.

गौतमचे कुटुंब हैदराबादहून अमेरिकेला राहायला गेले. त्याला धावण्याच्या शर्यतींची सुरवातीपासून आवड होती. पहिल्या मॅरथॉन शर्यतीत भाग घेतल्यानंतर गौतम म्हणाला, ''मला समाधान वाटतंय. पण सव्वातीन तासांच्या वेळांत शर्यत पूर्ण करणें हे माझे लक्ष्य होते. वीस मैल एकट्याने पळत असताना फक्त रस्त्यावर लक्ष ठेवणें अशक्य होते. आजूबाजूची दृश्यें पाहावीशी वाटत होती. दोन वर्षांतच मला प्रमुख पथकाबरोबर धावायचं आहे.''

गौतमने तेलगु भाषेचा सराव ठेवलेला आहे. तो तेलगु चंदामामा नियमितपणे वाचतो.

## शब्दांचा जादुगार

गेल्या जूनमधे वॉशिंग्टनमधे ७७वी नॅशनल स्पेलिंग ही स्पर्धा झाली. कोलोराडोमधला आठवींत शिकणारा अक्षय बुद्धीगा हा भारतीय मुलगा दुसरा आला. एका शब्दाचे स्पेलिंग सांगताना तो अडखळला, आणि त्यामुळे चौदा वर्षांच्या डेव्हिड टिडमार पहिल्या क्रमांकावर आला. त्याला बारा हजार डॉलर्सचे बक्षीस मिळाले.

२००२ साली याच स्पर्धेत अक्षयचा थोरला भाऊ प्रत्युष, हा विजेता होता.



केरळची लोककथा

# कनवाळू कोचुन्नी

तुम्हाला इंग्लंडच्या शेरवुड जंगलातला रॉबिनहुड माहीत असेलच ना? शेकडो वर्षांपूर्वी तो इंग्लिश धनिकांना लुटायचा, आणि ती लूट गरीबांना वाटायचा. कांही वर्षांपूर्वी केरळमधे कोचुन्नी नांवाचा इसम श्रीमंतांना लुबाडत असे. खास करुन जे श्रीमंत संपत्तीचे प्रदर्शन करीत असत, आणि गरीबांना त्रास देत, अशा लोकांचा त्याला राग येत असे. पण कोचुन्नीने हा लुटीचा पैसा कधी स्वतःसाठी वापरला नाही. गरजवंतांना तो पैसा कोचुन्नी वाटून टाकत असे. गरीबांचा तो वाली होता. पण ''कायमकुलमचा कोचुन्नी'' असं नुसतं नांव घेतलं तरी सधन लोक टरकून राहात. दक्षिण केरळमधे कायमकुलम या भागांत कोचुन्नी वावरत असे.



एक सावकार दागिने गहाण ठेवून, त्यावर भरमसाट व्याज आकारुन, लोकांना कर्जाऊ रकमा देत असे. अनेकजणांना त्याचे व्याज व मुद्दल परत देणे जमायचे नाही. मग सावकार ते दागिने घेऊन त्याचे पैशांत रुपांतर करी. अशा रीतीने तो चांगलाच गबर झाला.

हा सांठवलेला पैसा वापरुन त्याने एक मोठे घर बांधले. घर कसले, तो लहानसा किल्लाच होता. त्याच्या भिंतींना विटांचे दुहेरी थर होते. ''इतका प्रचंड खर्च कशासाठी केला'' असे जर त्याला मित्रांनी विचारले तर तो हळू आवाजांत उत्तर देई, ''कोचुन्नीचं कांही सांगता येत नाही. घरफोडीसुद्धां करायचा! लोकांचे दागदागिने माझ्याकडे असतात, ते मला जपून ठेवायलाच हवेत की! आता मला शांतपणे झोप लागते. दहा कोचुन्नी आले तरी आता त्यांना आंत येता येणार नाही.''





त्याची ही बढाई कोचुन्नीला कळली. त्याने या सावकाराला धडा शिकवायचे ठरवले. एक दिवस तो ह्या सावकाराकडे कर्ज मागायला गेला. जर सावकाराने कर्ज द्यायचे नाकबूल केले तर त्याच्या घरांत शिरण्याचा कांहीतरी मार्ग शोधायचा व चोरी करायची, असा कोचुन्नीचा विचार होता. पण झाले उलटेच! सावकाराने लागलीच त्याला हवी होती ती रक्कम दिली. आता कोचुन्नीची पंचाईत झाली. आता त्याच्याघरी चोरी करणे बरोबर ठरले नसते. पण तरीसुद्धां, कोचुन्नीला सावकाराला थोडीफार नमवायची इच्छा होतीच.

कांही दिवसानंतर, एका कृष्णन नायरने सावकाराजवळ दागिने ठेवून एक हजार रुपये कर्जाऊ घेतले. जेव्हां कोचुन्नीला हे कळलं, तेव्हां तो अंधार पडायच्या वेळी सावकाराच्या घरी गेला. तो पूर्वी तिथे गेला होता, त्यामुळे त्यावेळी सावकार काय करीत असेल ते त्याला माहीत होते.

सावकाराने संध्याकाळीं अंगाला तेलाने मालिश केले होते आणि आवारांतल्या छोट्या तळ्यांत नंतर तो आंघोळ करीत असे. कोचुन्नीने त्याला तळ्याकडे जाताना बघितले, आणि तो घराच्या दाराजवळ गेला. त्याने सावकारासारखा आवाज काढला व सावकारीणबाईला सांगितले, ''हे बघ, त्या कृष्णन नायरने घेतलेले पैसे परत आणले आहेत. ते घे आणि रेशमी रुमालांत बांधून ठेवलेले त्याचे दागिने त्याला परत दे.''

सावकारीणबाई दाराजवळ आली, तिने पैशाची पिशवी हातांत घेऊन उभ्या असलेल्या माणसाकडे ओझरते बघितले आणि ती पिशवी घेऊन ती आंत गेली. आंतून रेशमी रुमालांत बांधलेले गठ्ळें तिने त्या माणसाला दिले. हे सगळं होईपर्यंत सावकाराची आरामांत आंघोळ चालली होती. कोचुन्नी रेशमी गठ्ळे घेऊन घाईघाईने बाहेर पडला व अंधारांत दिसेनासा झाला.

कर्जाची मुदत संपण्यापूर्वीच कृष्णन नायर सावकाराकडे गेला. त्याने व्याजासकट मुद्दलाची रक्कम दिली आणि दागिने परत मागितले. सावकार आंत गेला आणि त्याने तिजोरी उघडली. कृष्णन नायरने दिलेले रेशमी रुमालांत बांधलेले दागिने तिथें नव्हते! तो चक्रावला.

त्याने बायकोला हांक मारली व त्या रेशमी गठ्ळ्याबद्दल विचारले. तिने रागावून उत्तर दिले,



"एवढ्यांत कसे विसरलात? तुम्हीच तर त्या दिवशी मला सांगितलेत कीं कृष्णन नायरने आणलेले पैसे घे आणि त्याचे दागिने त्याला परत दे म्हणून!"

"मग ते पैसे कुठे आहेत?" सावकाराने तिला विचारले.

"तिजोरींत आहेत, एका लाल फडक्यांत बांधलेले आहेत बघा." तिने सांगितले.

सावकाराने ते बांधलेले लाल फडके उघडून पाहिले. त्यांत पैसे नव्हते. पण कांही गोल, नाण्यांसारखेच दिसणारे धातूचे तुकडे होते.

कृष्णन नायर बाहेर थांबलेला होता. सावकार बाहेर दारापाशी त्याच्याजवळ गेला, काय घडलं ते त्याला सांगितलं व त्याचे माफी मागितली. सावकाराने त्या दागिन्यांची किंमत किती होती ते विचारले, आणि तेवढे पैसे त्याने कृष्णन नायरला दिले. नायर समाधानाने घरी गेला.

पण सावकार व त्याची पत्नी, या दोघांचे चेहरे चिंताग्रस्त होते. या सुरक्षित घरांत येऊन आपल्याला हातोहात फसवणारा हा ठक कोण असावा याचा दोघेही खूप विचार करीत होते. सावकाराने तिला विचारले, "तुला त्या माणसाचा चेहरा तरी आठवतो आहे कां?"

"कसा आठवणार? तुम्हीच तर मला सांगितलं होतंत कीं तो देतोय ते पैसे घे आणि त्याला दागिने परत दे म्हणून! मला वाटलं तोच कृष्णन नायर असेल!" तिने उत्तर दिले.

आत्ता मात्र एकच विचार सावकाराला सतावूं लागला. "हा इसम कोचुन्नी तर नसेल?" तो जागच्या जागी शहारला. जर सावकारासारखा हुबेहुब आवाज काढून तो त्याच्या पत्नीलाच हातोहात फसवूं शकतो, तर यापेक्षांही आणखी धोकादायक कृत्य तो पुढल्या वेळेला करूं शकेल.

कांही घटकानंतर त्यांच्या फाटकातून खुद्द कोचुन्नीच आंत येताना त्यांना दिसला. "काय झालं? दोघेही खूप काळजींत दिसता आहात!" कोचुन्नीने सरळसरळ विचारले.

सावकार मुखस्तंभासारखा गप्प बसला होता. त्याच्या बायकोने धीर एकवटला आणि काय घडले ते सविस्तर सांगितले.

कोचुन्नी किंचित हंसला आणि त्याने आपल्या उपरण्याच्या घडीतून एक रेशमी गठळी बाहेर काढली व ती सावकाराला दिली. "सगळे दागिने बरोबर आहेत कीं नाही ते मोजून बघा बरं! कृष्णन नायरला बोलावणे पाठवा. त्याला त्याचे दागिने देऊन टाका आणि तुमचे पैसे परत घ्या. तुमच्या या किल्ल्यांत मी येऊं शकणार नाही अशी तुम्ही बढाई मारली होती, असं मला कळलं होतं. म्हणून म्हटलं जरा तुमची थोडी गंमत करावी!" कोचुन्नीने हंसून सांगितलं.

सावकार खजील झाला आणि त्याने कोचुन्नीची माफी मागितली. त्यानंतर मात्र सावकाराने आपली व्यवहारशैली सुधारली आणि कर्ज मागणाऱ्यांना कधी त्रास दिला नाही. कोचुन्नीने-देखील सावकाराला त्यानंतर कधी सतावले नाही. सावकाराला कोचुन्नीबद्दल आपुलकी वाटायला लागली.

दुसरा एक ख्रिश्चन गृहस्थ सुक्या खोबऱ्याचा व्यापार करीत असे. त्याचा व्यापार कधीही चांगला चालला नाही. त्याला नेहमी पैशाची चणचण भासे आणि उसनवार करावी लागे. तो भरमसाट व्याज देऊन कर्ज घेत होता. कधी तो वेळेवर कर्ज फेडायचा, आणि कधी ते कर्ज फेडण्यासाठी तिसऱ्याकडून उसने पैसे घ्यायचा. कसाबसा तो धंदा करीत होता. पण केव्हांतरी आपल्याला चांगले दिवस येतील अशी त्याची श्रद्धा होती. एक दिवस हा व्यापारी खोबरें विकून अलेप्पीहून परत येत होता. त्याचा सौदा फारसा फायदेशीर झालेला नव्हता. तो होडीत खाली मान घालून बसला होता. घरखर्चाचा महिनाभर मेळ कसा काय घालायचा या विचाराने तो काळजीत होता. संध्याकाळची वेळ होती. होडीवालादेखील निमूटपणे होडी वल्हवीत होता. दुसरी एक होडी मागून वेगाने वल्हवीत येत असल्याचा आवाज त्यांना ऐकूं आला. ती होडी ह्या होडीच्या अगदी जवळ आली, आणि त्यांतून एका माणसाने या होडींत उडी मारली. व्यापारी खूपच घाबरला. त्याचे हातपाय कांपायला लागले.

व्यापाऱ्याने त्या माणसाला ओळखले. तो कोचुन्नी होता. त्याने जोरांत विचारले, "कोण रे तू? आणि कुठून येतो आहेस?"

"मी एक नारळाचा व्यापारी आहे आणि अलेप्पीहून परत येतो आहे." व्यापाऱ्याने चांचरत उत्तर दिले.

"नारळाचा व्यापार कां? वा, मग अलेप्पींत तुला चांगला फायदा झाला असेल ना! जे कांही तुझ्याजवळ पैसे असतील ते देऊन टाक आणि शहाणा असशील तर गप्प बैस!"

"माफ करा हो, मी एक अगदी गरीब व्यापारी आहे, मला तुम्ही माफ करा, मला निर्धन करूं नका" व्यापाऱ्याने विनवून सांगितले.

"मी कोचुन्नी आहे, मी जे सांगतोय ते ऐकलं नाहीस तर त्याचे परिणाम काय होतील ते तुला माहीत आहेच." कोचुन्नीने धमकी दिली.

व्यापाऱ्याने एक लहानशी कापडी पिशवी काढली आणि मुकाट्याने कोचुन्नीला दिली.



"किती आहेत त्यांत?" कोचुन्नीने विचारले.

"फक्त दोनशे पन्नास रुपये आहेत." व्यापाऱ्याने शरमून सांगितले.

"बरं बरं, जा आता तुम्ही" असं म्हणून कोचुन्नीने पुन्हां आपल्या होडीत उडी मारली, नि तो होडींतून निघून गेला.

ह्या सालस व्यापाऱ्याने देवाचे आभार मानले. कारण कोचुन्नीने त्याला कांही शारिरिक इजा, दुखापत, केली नव्हती. त्याच्या बायकोला भारी वाईट वाटले. "आता आपण कुठे जाणार? आपलं हे लहानसं घर नि बाग विकून टाकूं या. म्हणजे व्यापार करायला आपल्याजवळ पैसे उरतील." बिचारीला दुसरा एखादा मार्ग माहीत नव्हता.

व्यापाऱ्याला तिचा हा विचार पटला व तो घरासाठी गिऱ्हाईके शोधायला लागला. त्याला फार अडचण होती. साहजिकच घराला बाजवी किंमत द्यायला कुणीही तयार नव्हतं. व्यापाऱ्यालाही येईल त्या कमी किंमतीला घर फुंकून टाकायची इच्छा नव्हती. पण धंद्यासाठी तर भांडवलाची फारच निकड होती!

एका दिवशी, संध्याकाळच्या वेळी त्याला भेटायला एक इसम आला. तो कोचुन्नी होता. व्यापारी खुर्चीवर बसला होता तो भीतीने उडालाच.

"घाबरुं नकोस. मी तुला कांहीही करणार नाही. मी तुझे पैसे घेतले होते ते फक्त मी तुला परत द्यायला आलो आहे. तू कांही श्रीमंत नाहीस, हे मला तेव्हांही ठाऊक होते. नंतर मी तुझ्याबद्दल आसपास चौकशीही केली, तू फार अडचणींत होतास असंही मला कळलं. पण त्या दिवशी मला पैशांची अत्यंत निकड होती आणि म्हणून मला तुझे कष्टाचे पैसे धाक दाखवून लुबाडण्याची वेळ आली. त्याबद्दल मी तुझी क्षमा मागतो. मी तुझे ते पैसे परत देतो आहे. घे, ही पिशवी घे."

पिशवी देऊन कोचुन्नी तिथून आणखी कांही न बोलता निघून गेला. व्यापारीबाबा थक्क होऊन बघत होता. त्याची मती गुंग झाली होती. ते स्वप्न तर नव्हते ना? त्याने पिशवी उघडली. त्यांत हजार रुपये होते. कोचुन्नीने घेतलेल्या रकमेच्या चौपट! आता त्याला व्यापाराला भरपूर भांडवल मिळाले, जुने कर्ज फेडता आले आणि शिल्लकदेखील पडायला लागले. त्याने आकाशांतल्या बापाकडे पाहिले आणि निमूटपणे प्रार्थना केली, "हे देवबाप्पा! कोचुन्नीवर कृपा कर. कांही झालं तरी तो दयाळू आहे!"





# लांचखोर

**श्री**कांत एक जमीनदार होता. त्याचा एक दिवाणजी होता. त्याच्या हाताखालच्या कर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यांमधे एक शोभन होता. तो अत्यंत लोभी व लांचलुचपत करणारा होता. जेव्हां हे दिवाणजीला कळलं, तेव्हां त्याने शोभनला कडक सूचना दिली, आणि त्याची बदली एका दूसऱ्या गांवात केली. तिथें गेल्यानंतरसुद्धां लहानसहान शेतकरी व व्यापाऱ्यांकडून तो लांच घेऊं लागला. एक दिवस त्या गांवातल्या एका गांवकऱ्यासमोर त्याच्या भावाच्या शेतासंबंधी कांहीतरी समस्या निर्माण झाली. गांवकऱ्याला त्या शेताचे कागद मंजूर करुन घ्यायचे होते. तो गांवकरी शोभनच्या कचेरीतल्या एका दालनांत गेला आणि त्याने तिथल्या मेजावर एक सोन्याची मोहोर ठेवली. नंतर शोभन कचेरींत येत होता, त्याला रस्त्यांतच गांठून त्याने आपल्या भावाच्या कामासंबंधी सविस्तर सांगितले, व म्हटले, "आत्तापर्यंत तो आपल्या कचेरींतच आपली वाट बघत होता. पण कांही जरुरीच्या कामासाठी त्याला जावं लागलं." शोभन कचेरींत पोंचला आणि त्याने ती मोहोर उचलून खिशांत टाकली. आठवडा उलटला तरी कागदांची मंजुरी झाली नाही. त्या गांवकऱ्याने शोभनला विचारले, "साहेब, त्या पट्ट्याचं काम तसंच रेंगाळलंय अजून!"

शोभनने नाराज झाल्यासारखं दाखवून म्हटलं, "तुझा भाऊ गेल्या आठवड्यांत जसा आला होता ना, तशा तऱ्हेने त्याने वरचेवर आलं पाहिजे. म्हणजे नंतर काम होऊन जाईल."

"माफ करा, आता त्याला वरचेवर येता येणार नाही. आता तो दिवाणजीच्या कचेरींत नोकरीला लागला आहे. तो पट्टा मंजूर करायला किती रक्कम द्यायला हवी असे त्याने विचारलंय." गांवकऱ्याने विचारलं.

शोभन स्तंभित झाला. त्याने लागलीच उत्तर दिले. "पट्टा तर केव्हांच तयार झालाय. तू कागद आत्ता घेऊन जा," असं म्हणून त्याने त्या पट्ट्याबद्दलचे कागदपत्र गांवकऱ्याला दिले.

*- राजेश अवस्थी*



# प्रचारक शिकतो धडा !

एक नामवंत धर्मगुरु आपल्या धर्माची महती लोकांना सतत, न कंटाळता, सांगत असे. देवाची प्रार्थना कशी करावी ते सांगण्यासाठी त्याने अनेक देशांत प्रवास केला.

त्यांचा धर्म पाळणाऱ्या एका राज्याचा राजा या धर्मगुरुच्या प्रवचनांमुळे फारच प्रभावित झाला. दूरदूरच्या देशांत आपल्या धर्माची माहिती हा धर्मगुरु चांगल्या प्रकारे सांगेल, या हेतूने राजाने त्याला एक जहाज सुसज्ज करुन दिले. आपल्या या कल्पनेवर राजाच बेहद्द खूष झाला होता.

एका सफरीवरुन मायदेशी परत येतायेता जहाजाच्या कप्तानाने गुरुला एका लहानशा बेटाची माहिती दिली. "गुरुमहाराज, या बेटावर फक्त तिघेजण एकांतवासात राहातात. जहाजासाठी गोडे पाणी घ्यायला मी कांही वेळा या बेटावर थांबलो आहे. ते परक्यांशी कांहीही बोलत नाहीत. मी त्यांना निमूटपणे बसून राहिलेले किंवा मूकपणे प्रार्थना करताना, असेच नेहमी पाहिलेले आहे."

"मग आपण त्यांना मदत करायला हवी! तू मला तिथे नेशील कां?" गुरुने विचारले.

"गुरुमहाराज, आपली आज्ञा पाळण्यांत मला फारच आनंद होईल." कप्तानाने उत्तर दिले.

त्या बेटाजवळून जहाज जाऊं लागले, तसे ते तिथे म्हातारे तपस्वी जहाजाकडे बघत होते ते धर्मगुरुला दिसले. त्यांच्या कमरेला एक फडके आणि वाऱ्याने भुरभुरु हालणारी लांब पांढरी शुभ्र दाढी पाहून धर्मगुरुला त्यांची दया आली, "देवाची त्यांच्यावर कृपा आहे, म्हणूनच या दीन लोकांना मदत करायला देवाने मला इथे पाठवले आहे." धर्मगुरु स्वागत पुटपुटला.

धर्मगुरु जहाजातून उतरुन त्यांच्याजवळ गेला. ते स्तब्ध बसलेले होते. "मित्रांनो, कसे आहात तुम्ही? देवाची तुमच्यावर कृपा आहे ना?" धर्मगुरुने प्रसन्नपणे त्यांना विचारले.



त्या तिघाजणांनी कांही न समजल्यासारखे एकामेकांकडे बघितले. धर्मगुरुने पुन्हां तोच प्रश्न विचारला. तेव्हां त्यांच्या-पैकी एकजण म्हणाला कीं देवाचा कोप असूं शकतो हे त्यांना माहीत नव्हते.



धर्मगुरु गोरामोरा झाला. पण त्याला त्याचे कर्तव्य तर निष्ठेने पार पाडायचे होते. प्रार्थनेचे स्तोत्र व प्रार्थना करायची पद्धत त्या तिघांना शिकवायची, असे त्याने ठरवले.

"मित्रांनो, मला वाटतं तुम्ही जेव्हां प्रार्थना करीत असता तेव्हां तुम्ही कोणती पद्धत वापरता आहात?"

पुन्हां ते तिघेजण एकामेकांकडे बघत राहिले. प्रार्थनेची खास अशी कुठलीच पद्धत त्यांना माहिती नव्हती हे उघड दिसत होतं. बरेच उलटसुलट प्रश्न विचारुन धर्मगुरुला वाटले कीं ते सारखे, "देवा, तू आहेस नि आम्ही आहोत." असे पठण करतात.

"हे एवढंच म्हणत असता होय तुम्ही?" धर्मगुरुने हंसतहंसत म्हटले, "मित्रांनो, प्रार्थना म्हणायचा एक सर्वोत्तम मार्ग व मंत्र मी तुम्हाला शिकवतो. तुम्ही तशी प्रार्थना केलीत तर तुम्हाला निश्चित मनःशांती व मनशक्ती मिळेल."

ते वृद्ध तपस्वी कांहीच बोलले नाहीत. परंतु धर्मगुरुकडून शिकायला त्यांचा नकारही नव्हता.

बिचाऱ्या धर्मगुरुने अगदी प्रेमळपणे त्यांना ध्यानाला बसायची योग्य मुद्रा, बैठक, त्यावेळी म्हणायचे स्तोत्र, हे रीतसर शिकवले, आणि प्रार्थना कशी करायची याचा तपशीलवार धडा दिला. आपण एक फार मोठे कर्तव्य पार पाडले आहे, या समाधानांत त्याचे जहाज मार्गस्थ झाले.

धर्मगुरु कप्तानाला संतोषाने म्हणाला, "हे म्हणजे खोल पाण्यांतला प्रवास आहे. कुठे जायचंय ते मुक्कामाचे ठिकाण माहीत नसले तर जहाज कुठल्या दिशेला जायला हवं ते कळणार नाही व प्रवास अखंड चालू राहील."

"अगदी खरं आहे, गुरु महाराज! बिचारे ते तीन तपस्वी शेवटपर्यंत निरर्थक प्रार्थना करत बसले



असते. तुमच्या दयाळूपणामुळे त्यांचे आता भले होईल बघा!" कप्तानाला देखील गुरुच्या सान्निध्यामुळे आपली आध्यात्मिक उन्नति झाली आहे असं वाटायला लागलं. आपण धर्मगुरुला त्या बेटावर नेलं याचा त्यालाही फार आनंद झाला. त्या अज्ञानी वृद्ध तपस्व्यांना जो इतका महत्वपूर्ण लाभ झाला, तो केवळ आपल्यामुळेच आहे, याची त्याला अपूर्वाई वाटत होती.

सूर्यास्त होईपर्यंत जहाजाचा प्रवास निर्विघ्नपणे चालला होता. लौकरच अंधार पडला. पहाटेच्या सुमारास जोराचे वादळ झाले. डोंगराएवढ्या लाटांवर जहाज वरखाली होत होते. जहाजावरचा प्रत्येकजण जीव मुठींत धरुन, भेदरलेल्या मनाने गंभीरपणे उभा होता. कप्तानाने धर्मगुरुला म्हटले, "गुरुमहाराज, केवळ आपण प्रार्थना केलीत तरच आता आपण वाचण्याची शक्यता आहे."

धर्मगुरुला हे आव्हान म्हणजे एक धर्मसंकट होते. आपण प्रार्थना जरी केली तरी त्याचा फारसा



उपयोग होईल असे नाही, हे त्याला माहीत होते. पण त्या नावाडयांच्यामधे धैर्य व विश्वास निर्माण करणे तर अत्यंत आवश्यक होते ना! तो जहाजाच्या वरच्या भागांत बाहेरच्या बाजूला जाऊन उभा राहिला. सोसाटयाचा वारा व वादळ याची पर्वा न करता त्याने प्रार्थना करायला सुरवात केली.

अचानक त्याला जाणवलं की पूर्वेला वादळाचा जोर ओसरतो आहे. त्या दिशेचे ढग विरळ होत होते, आणि पाण्यावर कांहीतरी बारीक ठिपके वाहात येत होते. पहाटेच्या अंधुक प्रकाशांत त्याला ते ठिपके जहाजाकडे येत असल्याचे दिसले. पाऊस आता थांबला होता आणि वाराही पडला होता. ते ठिपके मोठे होत आता स्पष्ट दिसायला लागले. त्या मानवी आकृती वाटत होत्या. आणि काय आश्चर्य, त्या आकृती म्हणजे ते तिघे तपस्वी होते आणि ते पाण्यावरुन चालत येत होते. ते पाहून धर्मगुरु स्तंभित झाला. त्यांच्याभोवती एक तेजस्वी वलय दिसत होते. त्या तेजोवलयामुळे बहुतेक आकाशांतले अक्राळविक्राळ ढग पळाले होते, आणि वाराही शांत झाला होता.

त्या तिघांना धर्मगुरु दिसल्या बरोबर ते थांबले व त्याला म्हणाले, "अहो पवित्र महाराज, तुम्ही आम्हाला कांही शिकवलत ते आम्ही विसरलो. तुम्ही पुन्हां तेच आम्हाला शिकवाल कां?" त्यांनी हे विचारताना ते तिघे पाण्यावरच उभे होते याची त्यांना जाणीव दिसली नाही. ते सारंच कांही अद्भुत व अचाट होतं.

धर्मगुरु थरथर कांपायला लागला. त्याने त्याच कांपऱ्या अवस्थेत जहाजाच्या लांकडी जमिनीवर गुडघे टेकले व तो याचना करुं लागला. "परमेश्वराच्या लेकरांनो, माझ्या उद्धटपणाबद्दल मला क्षमा करावी. मला चांगलाच धडा मिळाला आहे. मला क्षमा करा हो, मला क्षमा करा!" त्याच्या तोंडून कसेबसे शब्द फुटले.

"धन्यवाद!" ते तिघे वृद्ध म्हणाले, आणि मागे वळून पुन्हां भराभर पाण्यावरुन चालत चालत ते वेगाने परत गेले. धर्मगुरुने त्या लांकडी जमिनीवर लोटांगण घातले आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचा बांध फुटला.

आंतल्या बाजूणे कप्तान बाहेर आला. इथे काय झालं होतं ते त्याला ठाऊक नव्हतं. कप्तान म्हणाला, "अहो गुरुमहाराज, आपण तर हा चमत्कारच घडवलात की!"

धर्मगुरुला अश्रू आवरेनात. चमत्कार कुणी व घडवून आणला होता, हे केवळ तोच ओळखून होता. देवाच्या भक्तीचा योग्य मार्ग त्यांना दाखवण्याची धर्मगुरुची इच्छा होती, पण ते तिघे म्हणजेच भक्तीचे रुप होते ते तो मात्र त्याला ठाऊक नव्हते. -एम्.डी.





# विष्णु पुराण

दशरथ राजाने कोणत्याही तऱ्हेच्या विघ्न-बाधांविना पुत्रकामेष्टि यज्ञ पूर्ण केला. यज्ञकुंडांतून प्रगट होऊन अग्निदेवाने दिलेले पायसदान घेऊन आनंदाने तो राजवाडयांत गेला. तिथे कौसल्या व कैकयीस ते क्षीर-पात्र दिले आणि खीर अर्धी-अर्धी वांटून घ्यायला सांगितले.

त्याला कौसल्या, कैकेयी व सुमित्रा या तीन राण्या होत्या.

कौसल्येने आपल्या खिरींतून थोडी खीर सुमित्रेसाठी वेगळ्या पात्रांत काढून ठेवली. कैकेयीने सुद्धा त्याचप्रमाणे थोडी खीर काढून ठेवली.

खीर खाल्ल्यानंतर तिघी राण्या गरोदर राहिल्या.

चैत्र शुद्ध नवमीस कौसल्येच्या पोटी श्रीविष्णु नीलमेघासमान सांवळ्या कांतीचे 'राम' जन्मले. नंतर कैकेयीस शंख व पद्माच्या अंशाने मौक्तिक नील वर्णाचा भरत जन्मला.

शेष अंशाने तप्तसुवर्णकांतियुक्त लक्ष्मण, व चक्र गदेच्या अंशाने पोवळयासारख्या विद्रुमकांतीने युक्त शत्रुघ्न, सुमित्रेच्या उदरी जन्मले.

चैत्र शुक्ल नवमी रामनवमी म्हणून कोशल राज्यभर आनंदोत्सवाने साजरी होत असताना तिसरा चैत्र आला. अयोध्या नगरींत चक्रवर्ती सम्राटांच्या मोठ्यामुलाच्या जन्मदिनोत्सवा-निमित्त भव्य प्रमाणावर आनंदसोहळे, दानधर्मादि मंगल कार्ये झाली.

नंतर चैत्री पुनवेच्या दिवशी फुललेल्या चांदण्यांत, राजा दशरथ, चार मुलें, तीन राण्या, मंत्री सुमंत, मुलांना खेळवणारा राजघराण्याचा घनिष्ट संबंधी भद्र, दास-दासी, यांच्यासह



राजमहालाच्या गच्चीवर आमोद-प्रमोद करीत होता.

कौसल्या रामाला कडेवर घेऊन चंद्र दाखवून खेळवीत होती. तेव्हां 'मला चंदामामा हवा' असा हट्ट रामाने सुरू केला. कितीही समजावण्याचा प्रयत्न केला तरी रामाचे रडे थांबेना.

तेव्हां सुमंताने एक आरसा आणवून रामापुढे ठेविला. त्यांत चंद्रबिंब पाहून राम आनंदला. चंद्रासोबत स्वतःची छबी बघून राम-चंद्र, राम-चंद्र असे म्हणत राम आपल्या चिमण्या हातांनी टाळ्या वाजवीत नाचू लागला व तेव्हांपासून तो 'रामचंद्र' म्हणविला जाऊं लागला. तेव्हां भद्राने त्याला कडेवर घेऊन आरशात दोघांचा चेहरा दाखवीत विचारले, हे कोण आहेत? राम म्हणाला, 'रामभद्र', याप्रमाणे त्याचे रामभद्र हे नांव प्रसिद्धी पावले.

त्यावेळी लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न रामाशेजारी आले, चौघे भाऊ आरशांत बघूं लागले वर पूर्णचंद्राचे छत्र होते. सर्वांना ते दृश्य रामराज्याभिषेकासारखें वाटले. दशरथाच्या आनंदास गगन ठेंगणे होते. तिन्ही राण्या देहभान विसरुन लेकरांच्या कौतुकांत मग्न झाल्या होत्या. सर्वांस अपूर्व आनंद वाटत होता.

राजकुमार वर्षामासांनी वाढत होते. लक्ष्मण नेहमी सावलीसारखा रामामागे रहायचा व त्यांच्या मागेमागे भरत-शत्रुघ्नाची जोडी असायची; जणूं देह वेगळे, पण प्राण एक!

राजकुमारांचे शिक्षण रघुकुलाचे कुलगुरु वसिष्ठ महर्षी यांच्या मार्गदर्शनाखाली होऊ लागले.

रामाची बुद्धि अतिशय कुशाग्र होती. अल्पवयांतच त्याने सकलशास्त्र, वेद-वेदांगे, धर्मरहस्यें, योगरहस्यादींचे अध्ययन पूर्ण केले.

वसिष्ठमहामुनी रामाला बोध करीत - ''रामचंद्रा! तुमचा वंश सूर्यवंश, सूर्याने निर्मिलेला आहे. तू रविराम आहेस! ईक्ष्वाकू कुलतिलक आहेस! तुझे पणजोबा रघुमहाराज महान् कीर्तिवान होते. तू रघुवंश सुधांबुधिचंद्र आहेस! रघुवीर, रघुराम आहेस!'' असं शुभवचन युक्त आशिर्वाद देऊ लागले -'' असे सूतमहामुनी शौनकादि ऋषींना सांगू लागले. तेव्हां नैमिषारण्यांतील ते ऋषी म्हणाले - ''सूत मुनींद्रा! आम्हाला सूर्यवंशांतील राजांची चरित्रें विस्तारपूर्वक ऐकण्याची इच्छा आहे, सांगण्याची कृपा करावी!'' सूत सांगू लागले.

महाकल्पारंभी विवस्वंत या नांवाने



प्रकाशणाऱ्या सूर्यास वैवस्वत नांवाचा मनू जन्मला.

वैवस्वत मनूस ईश्वाकू आदि दहा पुत्र होते. ते सर्वजण महान् राजे होऊन भूमीचे पालन-कर्ते झाले. याप्रमाणें सूर्यवंश शाखा-उपशाखांनी विस्तारला. इक्ष्वाकू वंशांतील दिलीप, रघू, हे धर्मपालक, प्रजापालक चक्रवर्ती, म्हणून विशेष ख्याति प्राप्त करते झाले.

दिलीप महाराज, संतान प्राप्ती साठी कुलगुरु वशिष्ठांच्या आदेशानुसार, कामधेनूचा अंश असलेल्या नंदिनी या गाईची श्रद्धायुक्त अंतःकरणाने सेवा करीत होते. एकदां ती गोमाता चरत चरत एका गुहेंत गेली, व तिथे एका महाभयंकर अशा सिंहाने तिला धरले. त्या सिंहाला मारण्यासाठी दिलीपराजाने धनुष्यबाण जोडले असता त्याच्या हातांचे स्तंभन झाले.

तेव्हां सिंहाने त्याला म्हटले, ''हे राजा! निसर्गनियमाप्रमाणें ही गाय माझे भक्ष्य आहे व तू माझ्या भोजनाआड येण्याचा अधर्म करीत होतास, म्हणून तुझ्या हातांचे स्तंभन झाले आहे!''

ते ऐकून दिलीपने सिंहास प्रार्थना केली - ''हे मृगराज! त्या गाईला सोडून माझे भक्षण करावे!'' सिंह दिलीप राजाचे ते औदार्य पाहून गाईला सोडून अदृश्य झाला.

नंदिनी राजाच्या भक्तिभावाने संतोषिली व म्हणाली - कीं ते दृश्य सगळे तिनेच निर्मिले होते. नंतर तिने त्याला संतान प्राप्तिचा वर दिला.

दिलीप-महाराजांचा पुत्र रघू होय. रघूने महान् दानवीर अशी कीर्ति संपादिली होती.



एकदां एका अतिथि तपस्व्याच्या मनांतील भाव ओळखून रघूने आपल्या पत्नीस त्या तपस्व्याच्या आश्रमांत नेऊन सोडले. तेव्हां त्या तपस्व्यास स्वतःची चूक कळली. त्याने राणीच्या पायाशी डोके ठेवून क्षमा मागितली व तिला गौरवाने राजाकडे परत आणले. पण दिलेले दान परत घेणें ही रघूची प्रवृत्ती नव्हती. राणीने त्याला तिची मान कापून मारून टाकण्याची प्रार्थना केली. रघूने तिच्या मानेवर उगारलेली तलवार पुष्पमाला होऊन तिच्या गळ्यांत पडली. देवदेवतांनी त्या जोडप्यावर पुष्पवृष्टि केली.

स्वतःच्या मालकीचे असे कांहीच धन न ठेवतां सर्वस्व दान केल्यानंतर, आलेल्या याचकास दान देण्यासाठी धन हवे, म्हणून रघुमहाराजांनी कुबेरावर स्वारी केली. तेव्हां कुबेराचे रक्षक असणाऱ्या यक्षांनी त्यांच्यावर आपल्या



सर्व मोहास्त्रांचा प्रयोग केला, पण ते निरुपयोगी ठरले. कुबेराने रघूस आदरपूर्वक अमित द्रव्यसंपदा देऊन परत पाठविले. रघूने ते सर्व धन कोणी याचकच उरणार नाही, अशाप्रकारे वाटून टाकले.

रघूचा मुलगा 'अज'! अजमहाराज सुद्धा महान् पराक्रमी व धर्मशील होते. भोजराजाची मुलगी इंदुमती हिने अजास स्वयंवरांत वरिले होते. अज इंदुमतीस घेऊन जात असतांना स्वयंवरास आलेल्या सर्व राजांनी मिळून त्याच्यावर हल्ला चढविला. पराक्रमी अजाने त्या सर्वांना परास्त करून पळवून लावले.

अज एकदा इंदुमतीसह उद्यानांत विहार करीत असताना, आकाशमार्गें जात असलेल्या नारदमुनींच्या वीणेवरील पुष्पमाला सुटून येऊन इंदुमतीच्या गळ्यांत पडताच ती मरण पावली.

प्रियपत्नीच्या वियोगाने अज विलाप करीत असतांनाच नारदमुनी तेथे अवतीर्ण झाले व त्यांनी इंदुमतीचे पूर्ववृत्तांत सांगून त्याचे सांत्वन केले.

हरिणी नांवाची दिव्यांगना तृणबिंदु ऋषीच्या तपस्येंत व्यत्यय आणण्यासाठी देवेंद्राने पाठविली. त्या ऋषीच्या शापाने ती मानवयोनींत जन्मली होती. त्याच ऋषीने तिला उःशाप दिला होता, त्यानुसार सुरलोकीच्या फुलांची माळ गळ्यांत पडतांच तिला ती देवांगना असल्याची स्मृति प्राप्त झाली, व मानव शरीराचा त्याग करून ती देवलोकी गेली. ती कथा ऐकून अजराजाच्या मनाचे सांत्वन झाले.

अजाचा पुत्र दशरथ. जेव्हां देव दानवांचे युद्ध व्हायचे तेव्हां ईश्वाकू वंशाचे राजे देवांना सहाय्य करण्यास जात असत. असेच एकदा दशरथ महाराज इंद्रास मदत करण्यासाठी शंबरासुरावर चालून गेले होते. त्यांच्यासह राणी कैकेयीसुद्धा होती. युद्धाच्या धुमाळींत दशरथाच्या रथाचे चक्र धुरीचा खिळा पडून गेल्याने निसटूं लागले, तेव्हां कैकेयीने ते निसटूं दिले नाही. तिने आपल्या हाताचा अंगठा खिळ्याच्या जागी ठेवला. त्यावेळी संतोषून दशरथाने तिला दोन वर दिले. तिने ते वर, ''नंतर जेव्हां गरज भासेल तेव्हां मागेन'', असे सांगून दोन्ही वर ठेव म्हणून राजाकडे ठेवून दिले.

पिकांची नासाडी करणाऱ्या हत्तींची शिकार करण्यासाठी दशरथ एकदां रात्री निघाला असतां, रात्रीच्या अंधारांत कोणी कमंडलूने पाणी भरत असतांना होणाऱ्या आवाजास हत्ती पाणी पीत असावा असे समजून दशरथाने शब्दवेधी बाण



सोडला. त्या बाणाने एका मुनिकुमाराचा वेध घेतला. त्याच्या किंकाळीने दशरथास झाला प्रकार उमजला. राजा दशरथ विव्हल मनाने त्या मुलाला घेऊन आणि त्याच्या कमंडलूत पाणी घेऊन गेला. मुलाऐवजी दशरथ त्या वृद्ध ऋषिदंपतीस पाणी देण्यासाठी आला असल्याचे कळल्याबरोबर त्यांनी दशरथास ''तूं सुद्धा आमच्या सारखाच पुत्रशोकाने मरण पावशील!'' असा शाप देऊन प्राण त्यागिले.

पुढे दशरथ महाराजांना पुत्रशोकाने कसे मरण आले, हे प्रसिद्धच आहे.

सूर्यवंशांत शरणागतास रक्षण देणाऱ्यांत शिबीमहाराजांचे नांव अजरामर आहे.

राजा शिबीच्या निष्ठेची परीक्षा घेण्यासाठी इंद्र व अग्नि, कबूतर व ससाण्याचे रूप घेऊन आले होते. कबूतराने शिबीच्या मांडीवर शरणागती घेतली. ससाण्याला त्या भक्ष्यास सोडणे मान्य नव्हते. शिबी त्या कबूतराऐवजी स्वतःच्या शरीराचे, कबूतराच्या वजनाएवढे मांस देण्यास तयार झाला. तराजूंत शिबी आपल्या शरीराचे तुकडे टाकूं लागला पण कबूतराचे पारडे हलेचना, तेव्हां शिबी स्वतःच पारड्यांत बसला. तेव्हां इंद्र व अग्नि प्रकट होऊन शिबीस अनेक वर देऊन त्याची प्रशंसा करीत परत गेले.

वशिष्ठ ऋषींबरोबर मनोमन स्पर्धा करून त्यांच्या सारखे ब्रह्मर्षी म्हणवून घ्यावे असा आग्रह करणारे व ब्रह्म देवासारखी प्रतिसृष्टि निर्माण करणारे विश्वामित्र सुद्धा सूर्यवंशीच होते.

सूर्यवंशज इश्वाकू कुलोत्पन्न राजा अंबरीश महान् राजर्षी व विष्णूचा परमभक्त होता. स्वतः



लक्ष्मी त्याच्या पोटी श्रीमती या नांवाने जन्मली होती. ती लहानपणापासून श्रीविष्णूस आपला पती मानून विष्णुभक्ति करीत असे. ती त्रैलोक्यांतील अनुपम सौंदर्यवती होती. म्हणून तिला त्रिलोकसुंदरी हे नांवही प्राप्त होते.

एकदां नारद स्वतःच्या मायातीतपणाची प्रौढी पर्वतकमुनीपुढे सांगू लागले. पर्वतक मुनी सुद्धां नारदाबरोबरचे त्रिलोकसंचारी होते. नारद व पर्वतक अंबरीश राजाकडे गेले. अंबरीश महाराजांनी त्यांचे स्वागत करून कन्या श्रीमतीस त्यांचे पायी पडण्यास सांगून आशीर्वाद मागितला.

आत्मप्रौढीमुळे त्या दोघांवर विष्णूच्या मायेचा प्रभाव आला होता. श्रीमतीस बघून त्या दोघांची अवस्था भ्रमिष्ट सारखी झाली व "श्रीमती बरोबर माझे लग्न करून दे," "श्रीमती माझीच आहे." असा हट्ट अंबरीशाकडे करू लागले.

दोघां मुनिवर्यांचे हे वागणें बघून अंबरीश स्तिमित झाला होता. त्याला काय करावे हे सुचेना. तेव्हां श्रीमतीने वडिलांस तिचे स्वयंवर असल्याचे जाहीर करण्यास सांगितले. श्रीमतीने सुचविलेला उपाय राजाला योग्य वाटला.

अंबरीशाने नारद व पर्वतकास म्हटले - "आपण दोघेही श्रेष्ठ आहात. आपण मला पेचांत टाकणें इष्ट नव्हे. म्हणून मी माझ्या कन्येचे स्वयंवर असल्याचे जाहीर करतो आहे. आपण दोघे स्वयंवरसमयी यावे ही माझी प्रार्थना स्वीकारावी."

तोंड लहान करून ते दोघेजण परत गेले. कसेही करून श्रीमतीस आपली करून घ्यावी या मनोराज्यांत गुंग होऊन नारद उपाय शोधूं लागला. व "कांही झाले तरी श्रीमतीने नारदास वरले नाही म्हणजे झाले!" यासाठी पर्वतक उपाय शोधीत होता.

नारद विष्णूजवळ गेले व त्यांनी किरीट, कुंडल, कौस्तुभमणी, वैजयंतीमाला, वगैरे विष्णूंची आभूषणें मागितली. विष्णूने त्याच्या विनंती-प्रमाणे सर्व वस्तू नारदास दिल्या. नारदाला मोह झाला हे विष्णूने ओळखले.

नारद जातांच पर्वतक आला. विष्णूची स्तुती करून त्याने म्हटले की स्वयंवर-समयी नारदाचे मुख माकडासारखे दिसावे असे करावे. विष्णूने तथास्तु म्हटले.







विविध संस्कृतींतल्या कहाण्या

अमेरिकेच्या मूळ रहिवाशांची कथा

# अमेरिकेचे मूळ रहिवासी कसे बनले?



कोण्या एका काळाची गोष्ट आहे. विश्वाची निर्मिती नुकतीच झाली होती आणि देखणे पर्वत, मनोहर दऱ्याखोरी, नद्या, सगळीकडे पसरलेल्या होत्या. कुठेही स्त्री अथवा पुरुष दिसत नव्हते.

एका दिवशी पहाटे रेड इंडियन्सचा देव मॅनिटु मोठ्या प्रसन्न मुद्रेने जागा झाला. पृथ्वीवर एक नजर टाकून त्याने ठरवलं, कीं इथे आता कांही माणसे ठेवायला हवीत. त्याने नदीतून एक मूठभर माती आणली आणि माणसाची आकृति बनवली. स्वतःच्या कल्पनेनुसार त्याला ठाकूनठोकून नीटनेटका आकार दिला. शेवटी ही आकृति पूर्ण झाली. आता तिला मजबूत करण्यासाठी ती भट्टीत घातली आणि लांकडे पेटवली.

जरा वेळ विश्रांति घ्यावी म्हणून मॅनिटू एका वृक्षाखाली बसला. तो दिवसभर काम करून थकला होता आणि त्याला लगेच गाढ झोप लागली. कांही तासानंतर कांहीतरी जळत असल्याचा वास झाला. भट्टींत घातलेल्या त्या लहानशा आकृतीची एकदम देवाला आठवण झाली आणि तो ताडकन उठून बसला. जेव्हां त्याने भट्टी उघडली तेव्हां त्याला ती आकृती काळी ठिक्कर पडलेली दिसली.

"हरकत नाही. काळ्या माणसांची ही एक जात होईल" त्याने मनाशी विचार केला आणि ती आकृती पृथ्वीवर ठेवली.

दुसऱ्या दिवशी मॅनिटुने मातीची दुसरी आकृती तयार केली, पण यावेळेला ती भाजताना त्याने जरा लक्ष दिले. जास्त वेळ भाजली जाऊं नये या काळजीने त्याने ती नीट भाजण्यापूर्वीच बाहेर काढली. यावेळी ती नीट भाजली गेली नाही आणि ती पिवळट पांढरीच राहिली.

"अरे, कांही हरकत नाही. ही गोऱ्या मानवांची जात होईल." मॅनिटुने स्वतःशी बोलत ही आकृति पृथ्वीवर ठेवली.

तिसऱ्या दिवशी मॅनिटूने मातीची आणखी एक आकृति तयार केली. यावेळेला त्याला त्याने थोडे तेल चोपडले. म्हणून भट्टींत जास्त वेळ ठेवूनदेखील ती जास्त जळली नाही. पण हा प्रयोग कांही यशस्वी झाला नाही. उलट ही आकृति काळी किंवा पांढरीगोरी न होता पिवळट रंगाची झाली होती. ते पाहून मॅनिटूला फार आश्चर्य वाटले." बिघडत नाही. मानवाची तिसरी जात पिवळी असेल." त्याने मनांतल्या मनांत म्हटलं.

चौथ्या दिवशी त्याने मातीची चौथी मूर्ती बनवली. आता मात्र काय करायला हवे हे त्याच्या नक्की लक्षांत आलेले होते. त्याने भट्टींत हवीत तेवढीच लांकडे ठेवली आणि मातींत योग्य प्रमाणांत तेल घातले. नंतर त्या भट्टींत तो सारखा वांकून पाहात होता कीं मूर्ती कितपत भाजली जाते आहे. इतक्या काळजीपूर्वक मॅनिटूने ती मूर्ती बनवली आणि भट्टीतून एक आदर्श आकृति बाहेर पडली. तिचा रंग लालसर सांवळा होता.

"ही लाल रंगाची मानवजात होईल!" तो उद्गारला.

"ही मात्र सर्वांत श्रेष्ठ आकृती झालेली आहे." आणि त्याने त्या आकृतीला देखील इतर जातीप्रमाणे पृथ्वीवर पाठवले. तिथे त्यांना 'रेड इंडियन" असे नांव पडले.

रेड इंडियन हे अमेरिकेतले मूळ रहिवासी. त्यांची ही पुराणकथा पृथ्वीवर निरनिराळ्या रंगाच्या मानवजाती कशा निर्माण झाल्या ते सांगते.







# देवनाथची नियुक्ती

प्रमोद देशाचा राजा चंद्रचूड याचे आपल्या प्रजेवर अतिशय प्रेम होते. त्याच्या राज्यांत प्रजा सुखी होती. कार्यक्षम मंत्री व खजिनदार राजाला मदत करीत होते. अचानक खजिनदाराचे निधन झाले. आता त्याच्याजागी लायक व्यक्ती बघण्याची काळजी राजाला लागली.

माजी खजिनदाराला बिभीषण नांवाचा एक मुलगा होता. तो आपल्या पित्यापेक्षांही हुशार, जबाबदार व प्रामाणिक होता हे चंद्रचूड राजाला ठाऊक होतं. पण त्याची सरळ नेमणूक करण्यांत कांही अडचणी उपस्थित झाल्य होत्या.

आपल्या मर्जीतल्या माणसाला राज्याचा खजिनदार हे प्रतिष्ठेचे पद होते. ते मिळावे म्हणून बरेच लोक आशा बाळगून होते त्यांत होता राणीचा भाऊ आणि राजाच्या बहिणीचा नवरा. राणी व राजाची थोरली बहीण आपापल्या माणसाला ते पद द्यावे म्हणून राजाला गळ घालीत होत्या. ही राजापुढे समस्या बनली. राजाने आपले अनुभवी व वृद्ध मंत्री बुद्धिवर्मा यांचा सल्ला मागितला. त्यांनी सांगितलं, "महाराज, प्रजेचे हित पाहाणे हे राजाचे पहिले कर्तव्य आहे. तेव्हां या विषयाची उकल अतिशय शांतपणे व सावधगिरीनेच केली पाहिजे. कुणाचेही मन दुखवले जाता कामा नये. मला वाटतं कीं याबाबतींत आपण राणीसाहेबांचे बंधू रंगसेन आणि आपल्या ताईसाहेबांचे पतिदेव राजगुप्त यांच्याशी प्रथम बोलून पाहावे."

त्यानुसार राजाने लगेच रंगसेन व राजगुप्ताला बोलावणे पाठवले आणि त्यांना म्हटले, "तुम्ही माझ्या कुटुंबातले, घरांतले, आहात. आपल्या दोघांची मला मदत हवी आहे. ज्यांना खजिनदार होण्याची इच्छा आहे, ते दोघे तुमचेच निकटवर्ती आहेत तुम्ही दोघांनी आपापसांत ठरवा आणि कांहीतरी निर्णय एकमताने घ्यावा अशी माझी इच्छा आहे."

रंगसेन व राजगुप्त या दोघांनी आपापसांत

लक्ष्मी प्रसाद



बोलणी केली. दोघांनाही आपलाच माणूस नेमला गेला पाहिजे अशी तीव्र इच्छा होती. म्हणून त्यांचे एकमत होईना त्यांनी राजावरच निर्णय घेण्याचे काम सोंपवले.

तेव्हां चंद्रचूड त्यांना म्हणाला, "तुम्ही दोघेही आपापल्या आग्रहाला घट्ट चिकटून आहात. म्हणून मी तुम्हाला एक मार्ग सुचवतो. खजिनदाराच्या निवडीसाठी मी एक समिति नेमतो, त्यांत तिघे प्रतिनिधी असतील. या तिघांत देवनाथ हे राज्याचे अधिकारीदेखील असतील. तुम्ही नगरांतल्या न्यायाधीशांना भेटा आणि त्यासंबंधातले नियम काय आहेत ते मागून घ्या. त्या नियमानुसार खजिनदार निवडला जाईल."

राजाच्या बोलण्यांतून लपलेला गर्भितार्थ दोघांनाही समजला. देवनाथचे मत अनुकूल करून घेतले तर त्यांचा विजय होता हे दोघांच्याही लक्षांत आले. राजाची ही कल्पना दोघांनाही आवडली.

दुसऱ्या दिवशी दोघांनीही देवनाथ व न्यायाधीशाची भेट घेतली. न्यायाधीशानी नियमावलीवर बोट दाखवून सांगितले, "जर तुम्हाला दोघांनाही सल्लागार समितीवर सदस्य बनून राजाचे प्रतिनिधी व्हायचे असेल, तर त्याची अट अशी आहे कीं तुमच्या कोणत्याही नातलगाला खजिनदाराच्या पदासाठी नेमता येणार नाही."

रंगनाथ व राजगुप्ताने बराच वेळ विचार विनिमय करुन ठरवले कीं ते दोघेजण सल्लागार समितींत जाणार नाहीत. देवनाथलाच गोडीगुलाबीने आपल्या बाजूला वळवून घ्यावे असा दोघांचाही स्वतंत्र विचार चालला होता.

त्याच दिवशी संध्याकाळीं, रंगसेन कुणालाही न सांगता, देवनाथला एकांतात भेटला आणि म्हणाला, "तुझ्या निर्णयावर माझा पूर्ण विश्वास आहे. तरीदेखील मी तुला सांगतो कीं मी महाराजांचा आवडता आहे. माझा शब्द ते कधी डावलत नाहीत. त्यांना सांगून मी तुझा सत्कार करवीन. आणि जर तू माझ्या इच्छेविरुद्ध कांही केलंस तर तुला तुरुंगात देखील धाडूं शकेन. जर माझ्या माणसाला खजिनदाराची जागा मिळाली तर तुझं पुढील आयुष्य सुखासमाधानांत जाईल हे निश्चित!"

अशी त्याला धमकीवजा विनंती रंगसेनाने केली. देवनाथने त्यावर मान डोलावली व रंगसेनाला निरोप दिला.



त्यानंतर राजगुप्त देवनाथला भेटला. आपल्याच माणसाला खजिनदाराचे पद मिळावे. म्हणून त्यानेही आग्रह धरला व त्यानेही धमकीवजा विनंती केली. देवनाथने घाबरुन म्हटले, "महाशय, आपण येण्यापूर्वी रंगसेन मला भेटायला आले होते, आणि त्यांच्या माणसाला हे पद द्यावे म्हणून त्यांनी आग्रह धरला. शेवटी ही जागा तर एकच आहे. त्यांचीही ताकद कमी नाही किंवा प्रतिष्ठा कमी नाही. तेही तुमच्या तोडीचे आहेत. अशा परिस्थितींत मी काय करणार? तुम्हीच सांगा!"

रंगसेन व राजगुप्त या दोघांच्यामधे अशी चुरस लागलेली असेल, असे राजगुप्ताला वाटलेदेखील नाही. राजाने आपल्या बहिणीचा त्याच्याशी विवाह करुन दिला होता, कारण राजगुप्त अत्यंत प्रतिभावान आहे असं राजाला वाटत होतं. आता राहिली रंगसेनाची गोष्ट. तो राणीचा सख्खा भाऊ होता. तेव्हां राजगुप्ताचे पारडे जरा हलके ठरले असते. राजगुप्ताने यावर सर्व बाजूंनी पूर्ण विचार केला आणि देवनाथला म्हटले, "रंगसेनच्या उमेदवारापेक्षां माझा माणूस जास्त लायक आहे. कोणत्याही परिस्थितींत रंगसेनच्या माणसाला ही जागा मिळता कामा नये." असं म्हणून त्याने देवनाथला सावधगिरीचा इशारा दिला.

जे घडलं ते देवनाथने राजाला सांगितले. राजाने त्याला उलट सांगितले कीं, घाबरण्याचं कांहीही कारण नाही. नंतर राजाने रंगसेन व राजगुप्त या दोघांनाही बोलावले, व त्यांना म्हटले, "देवनाथने सर्व माहिती जमा केली आहे. त्याच्या मताने नारायण नांवाची व्यक्ती या पदासाठी योग्य



आहे. आता तुम्हीच मला सांगा, कीं या अशा परिस्थितींत मी काय करुं?''

दोघांनी राजाला सांगितले कीं ते देवनाथच्या मताशी सहमत होते. तेव्हां चंद्रचूडने नाटकीपणाने दुःखी स्वरांत म्हटले, ''नारायणची माहिती मीही जमवली आहे. ती पाहून मला वाटतं कीं तुमचे उमेदवार जास्त चांगले आहेत. त्यांच्यापैकी कुणा एकाला आपण खजिन-दाराच्या जागेवर नेमूं या.''

रंगसेन व राजगुप्तने लगेच एकदम म्हटले, ''महाराज, आमचं दोघांचं हेच मत आहे कीं देवनाथच्या निर्णयांत आम्ही अडथळा आणणार नाही.''

तेव्हां राजाने त्यांना समजावले, ''तुम्ही दोघेही माझे मेव्हणे आहात. तुमचा आनंद तोच माझाही आनंद आहे. देवनाथच्या मताबद्दल मी समाधानी नाही. माझी इच्छा आहे कीं जर खजिनदाराचे पद तुमच्या दोघांपैकी कुणाच्याही माणसाला देण्याऐवजी बिभीषणला देणे जास्त योग्य ठरेल. कारण, त्याच्या वडिलांनी हे पद मोठ्या विश्वासाने आणि जबाबदारीने सांभाळलेलं होतं. त्याचा अर्थ बिभीषण आमचा, आपला माणूस आहे - अगदी त्याच्या पित्या-प्रमाणे योग्य आणि विश्वासपात्र! आता तुम्ही आमच्या माणसाला संधी द्या!''

रंगसेन व राजगुप्ताला वाटलं कीं राजा त्यांचा फार मान ठेवतो आहे; खजिनदाराच्या बाबतींत त्यांचे मत विचारले. म्हणून दोघांनीही बिभीषणची नेमणूक करण्यास संमती दिली, आणि त्याची त्याप्रमाणे नेमणूक झाली.

त्यानंतर राजाने वृद्ध मंत्रीला भेटून म्हटले, ''म्हणतात ना कीं साप छोटा असला तरी लाठी मोठीच असावी. तुमच्या सल्ल्यावरुन मलाही कळले कीं असल्या महत्वाच्या पण नाजूक बाबतींत राजनीतीचा उपयोग करायलाच हवा!''

वृद्ध मंत्र्याने समाधानाने हंसून राजाला सांगितले, ''महाराज, राजनीति कशीही वापरली तरी प्रजेच्या हितासाठी झटणाऱ्या राजाला ती शोभा देते. पण राज्यकर्ता जर स्वार्थी असला तर त्याच्या नांवाला ती कलंक ठरते. आपली राजनीति खरोखरीच प्रशंसेला पात्र आहे, महाराज!''







# यशस्वीचा न्याय निवाडा

एके दिवशी यशस्वी राजाने दिवसभराचे काम पूर्ण केले व आता तो जेवायला जाणार, तेवढ्यांत एक ब्राह्मण त्याच्याकडे दर्शनासाठी आला.

''आजचं काम आता संपलंय. आता महाराज भेटणार नाहीत. उद्यां या आणि जे कांही सांगायचं आहे ते सांगा.'' द्वारपालकाने म्हटलं.

राजाने हे ऐकलं. त्याने 'जेवण वाढूं नकोस' अशी आचाऱ्याला आज्ञा दिली, आणि ब्राह्मणाला आंत बोलावले, व त्याचे काय काम आहे त्याबद्दल विचारपूस केली.

ब्राम्हणाने केविलवाण्या आवाजांत सांगितले, ''महाराज, देशविदेशी हिंडून, कष्ट उपसून, मोठ्या हिंमतीने मी सोन्याच्या दोनशे मोहरा जमा केल्या आहेत. या देशांतली परिस्थिति आता खूपच सुधारली आहे असं जेव्हां कळलं. तेव्हां मी मोठ्या आशेने इथे आलो आहे. रस्त्यांत मला चोरांनी अडवलं नाही. कुणीही माझे पैसे लुबाडण्याचा प्रयत्न केला नाही, कीं मला त्रास दिला नाही. काल संध्याकाळीं मी लवणोत्सवला पोंचलो. प्रवासामुळे मी खूप थकलो होतो म्हणून रात्रीं तिथेंच थांबलो. राजमार्गाच्या शेजारी एका बागेंत मी झोपलो. सकाळीं जेव्हां उठलो तेव्हां माझ्या हलगर्जीपणामुळें माझी मोहरांची थैली एका विहिरींत पडली. त्या विहिरीचे वरचे तोंड वेलींच्या जाळींनी पूर्णपणें झांकले गेले होते. तिथे खाली विहीर असेल अशी मला कल्पनादेखील आली नाही. मला विहिरींत उतरता येईना, आणि काय करावे ते सुचेना. तेव्हां तिथे एक माणूस आला व म्हणायला लागला, ''तुमची पैशाची थैली मी बाहेर काढून देईन. पण तुम्ही मला काय द्याल?'' मी त्याला काय उत्तर देणार होतो? मी त्याला म्हटलं, ''अरे, तुला कांही देण्याच्या परिस्थितींत मी नाही. पण त्यांतून तुला जेवढे हवे आहेत तेवढे मला तू दे.'' तो माणूस विहिरींत उतरला आणि त्याने ती थैली बाहेर काढली. त्यांतल्या मोहरांपैकी फक्त दोन मोहोरा त्याने मला दिल्या आणि उरलेल्या त्याने स्वतःला ठेवल्या. त्यावर मी खूप विरोध केला. तोपर्यंत बघे लोक खूप जमले होते. त्यांनी मलाच उलट सांगितले, ''यशस्वी राजाच्या राज्यांत जो शब्द दिला जातो त्याचे शब्दशः पालन झालेच पाहिजे.'' हा तर

माझ्यावर पूर्णपणे अन्याय झालेला आहे जर आपल्या राज्यांत असाच न्याय होत असेल तर आपल्या वाड्यासमोर बसून उपोषण करण्याखेरीज माझ्याजवळ दुसरा कोणताच मार्ग राहाणार नाही."

राजाने शांतपणे त्याचे बोलणें ऐकले आणि विचारले, "त्या माणसाचे नांव काय? तो काय करतो?"

"मी त्याला फक्त बघितलंय. त्याचं नांव, कामधंदा हे कांही मला ठाऊक नाही." ब्राम्हण अगदी हताश झाला.

"बरं तर! मी याच्यावर उद्या आवश्यक ती कारवाई, करीन. आत्ता माझ्याबरोबर भोजन करा आणि इथेंच रात्री विश्रांति घ्या." राजाने म्हटलं.

ब्राम्हणाने आनंदाने या निमंत्रणाचा स्वीकार केला आणि राजाबरोबर बसून स्वादिष्ट जेवणाचा आनंद मिळवला.

रात्रीं तो वाड्यावरच विश्रांतिसाठी राहिला. पण त्याला कांही नीट झोंप लागली नाही. आपले धन परत मिळेल कीं नाही, हीच चिंता त्याचे मन पोखरत होती.

दुसऱ्या दिवशी राजाने लवणोत्सवच्या सर्व नागरिकांना राजवाड्यावर येण्याचे निमंत्रण दिले. ब्राम्हणाने त्यांतल्यापैकीं त्या माणसाला लगेच ओळखले. राजाने चौकशी केली तेव्हां त्या माणसानेदेखील ब्राम्हणाने जे सांगितलं, तसंच सांगितलं. फिर्यादी आणि आरोपी यांनी सांगितलेली माहिती सारखी होती. तेव्हां महाराज आता काय निर्णय देतील हे कांही नागरिकांना समजेना. महाराजांनी आपला निर्णय सांगितला. "ब्राम्हणाला अठ्ठ्याणव मोहरा द्याव्यात आणि विहिरीतून थैली काढणाऱ्या माणसाला दोन मोहरा द्याव्यात."

नागरिकांनी जरा कुजबूज सुरुं केली. तेव्हां राजा त्यांना म्हणाला, "कधीकधी न्याय व अन्याय दोन्ही सारखेच असल्यासारखे वाटतात. त्यांतला फरक चाणाक्ष बुद्धिवंत सांगू शकतात. या ब्राम्हणाने असं नव्हतं म्हटलं, "तू देशील तेवढे मी घेईन!" उलट त्याने म्हटलं होतं, "तुला जेवढे हवे असतील, तेवढे मला दे!" या लोभी माणसाने ब्राम्हणाला फक्त दोन मोहरा दिल्या आणि उरलेल्या स्वतःकडे ठेवल्या त्यामुळे त्यांचा जो आपसांत निर्णय ठरला होता तो मोडला गेला."

असल्या गुंतागुंतीच्या गोष्टींत यशस्वी राजा अतिशय सूक्ष्म विचार करीत असे आणि मोठ्या हुशारीने न्याय-अन्यायाचा विचार करुन निर्णय घेत असे. म्हणून लोक म्हणत कीं यशस्वी राजाने पृथ्वीवर पुन्हां नव्या युगाचा प्रारंभ केला आहे.





# चांदीची समई

हेलापुरीच्या न्यायालयांत चांदीच्या समईची चोरी झाल्याचा खटला चालला होता. केशव नांवाच्या माणसाची समई चोरीला गेली होती. न्यायाधीशांना केशव म्हणाला, ''साहेब, तो श्रावणी शुक्रवार होता. बायकोने कांही बायकांना हळदीकुंकवाला बोलावले होते. जेव्हां साऱ्याजणी घरोघरी परत गेल्या, तेव्हां समईची चोरी झाल्याचे लक्षांत आले, आणि ही चोरी माधवची पत्नी गुणवती हिनेच केली आहे साहेब!'' तो पुढे कांही सांगणार त्यापूर्वी न्यायाधीशाने त्याला विचारले, ''माधवच्या पत्नीने, गुणवतीनेच, ही चोरी केली आहे, ही शंका तुला कशी काय आली?''

''साहेब, गुणवतीच्या घरांत कांहीतरी शुभकार्य गेल्या आठवड्यापूर्वी झाले होते, त्यांत भाग घ्यायला माझी पत्नीदेखील गेली होती. पूजेत ठेवलेली समई माझ्या बायकोने लागलीच ओळखली. माझी समई मला परत मिळवून द्या साहेब!'' केशवने विनंती केली.

''ती समई तुझीच आहे याचा कांही ठोस पुरावा तुझ्याकडे आहे कां?'' न्यायाधीशाने विचारले.

''साहेब, आमची समई जरा वेगळ्या घाटाची आहे. ओम् अक्षराच्या आकाराची आहे.'' केशव म्हणाला.

न्यायाधीशांनी हंसून म्हटलं, ''अशी गोष्ट आहे कां? आमच्याही घरांत एक ओम् अक्षराच्या आकाराची समई आहे.''

''साहेब, हीच गोष्ट मी आपल्याला सांगणार होतो. पण आपण मधें मला टोकलंत, म्हणून मला सांगता आलं नाही. मला नुकतंच कळलंय कीं जी समई माधवच्या बायकोने आमच्या घरांतून चोरुन नेली, ती तिने आपल्या पत्नीला विकली आहे. ती समई आता तिच्या घरांत नसून तुमच्या घरांत आहे!'' केशवने खुलासा केला.

हे ऐकून न्यायाधीश व तिथे असलेले उपस्थित थक्क आले.

**- नाग भैरव**





# गोवर्धनचा अंदाज

गोवर्धन सधन होता. त्याची शंभर अेकराची चांगली शेती होती. चार प्रकारची व्यापारी दुकाने त्याच्या मालकीची होती. ती चालवण्यासाठी आणि प्रत्येक कामामधे त्याला मदत करायला, त्याने सांगितलेली कामे होत आहेत कीं नाही ते पाहायला, त्याला एक चांगला मदतनीस हवा होता. हे समजल्यानंतर सीताराम, भीम आणि राजा असे तिघे तरुण गोवर्धनला भेटायला आले.

गोवर्धनने प्रथम सीतारामला बोलावले आणि त्याची माहिती विचारली. सीतारामने नम्रपणे सांगितले, ''मी शिकलेला आहे. सुखवस्तु कुटुंबात माझा जन्म झाला आहे. पण स्वत:च्या पायावर उभे राहावे अशी माझी इच्छा आहे. जे काम आपण सांगाल, ते मी मनापासून करीन.''

''पण तुला होशियारपुरला जाऊन धर्मराजला भेटलं पाहिजे. तो उत्तम स्वयंपाकी आहे. त्याच्याकडून स्वयंपाकाची विद्या शिकून ये.'' गोवर्धन म्हणाला.

''आपल्याला कामामधे मदत व्हावी म्हणून सहाय्यक हवा आहे असं मला कळलं होतं. पण आपण तर स्वयंपाक्याची गोष्ट बोलता आहात. आपले हे बोलणे मला जरा विचित्र वाटते आहे.'' सीतारामने म्हटलं.

''त्यांत विचित्र कांहीही नाही. मी फक्त घरांत बनवलेले जेवणच जेवतो. कामानिमित्त जेव्हां बाहेरगांवी जायची वेळ येते, तेव्हां दरवेळेला माझी बायको बरोबर असेलच असं नाही. त्यावेळी तुलाच माझे जेवण बनवावे लागेल.'' गोवर्धनने खुलासा केला.

''मला स्वयंपाक करायला येत नाही. पण कुठलीही गोष्ट मी चटकन शिकूं शकतो. स्वयंपाक शिकायला मला होशियारपुरला कशाला जायला हवं? माझी आई स्वादिष्ट स्वयंपाक करण्याबद्दल प्रसिद्ध आहे. मी तिच्याजवळ पाकविद्या शिकेन.'' सीतारामने सुचवलं.

''चांगला स्वयंपाक बनवणारे अनेक आहेतच



की! पण मला धर्मराजचा स्वयंपाक फारच आवडतो. त्याच्यापासून शिकण्याचा एक खास गुण म्हणजे आसपास मिळेल त्या साधन-सामुग्रीवर तो अनेक तऱ्हेचे चविष्ट प्रकार करुं शकतो. पाणी, इंधन किंवा मीठ नसलं, तरीसुद्धां तो भोजनप्रबंध करुं शकतो. धर्मराजकडून ही विद्या शिकली की समुद्रावर नाव वाहात गेली तरी, किंवा वाळवंटात वाट चुकली तरीही त्यांच्या पोटापाण्याची सोय करणे त्यांना सहज शक्य असते.'' गोवर्धनने अगदी ठामपणे सांगितलं.

त्यावर सीताराम निराश होऊन म्हणाला, ''रावसाहेब, मी आपल्याकडे वेगवेगळ्या धंद्याबद्दल शिक्षण मिळेल या आशेने आलो आहे. मलाही मोठा व्यापारी व्हावे असं वाटतं. पण आपल्याला एक स्वयंपाकी हवा आहे, माझ्यासारख्या माणसाची आपल्याला जरुरी नाही असं वाटतं.''

''मी कांही तुला शिक्षण देण्यासाठी बोलावले नव्हते'' असं सांगून गोवर्धनने त्याला परत पाठवले आणि भीमला आंत बोलावले.

भीमने आपला परिचय देताना सांगितले, ''मी शिक्षित आहे. कठीण काम सोपे करुन ते पार पाडणे मला चांगले जमते. चारपांच नगरांतल्या धनिकांनी त्यांच्याकडे काम करायला मला बोलावले आहे. पण आपले नांव, कर्तबगारी, व मोठेपणा याबद्दल मी बरंच ऐकलंय म्हणून आपल्याकडे काम करावे अशी माझी इच्छा आहे.''

ते ऐकून गोवर्धनने जे सीतारामला सांगितले होते, तेच पुन्हां भीमला सांगितले. भीमने मोठ्या उत्साहाने म्हटले, ''मी स्वयंपाक करण्यांत तरबेज आहे. जेव्हां घरी आईची प्रकृति ठीक नसते, तेव्हां मीच स्वयंपाक करतो. धर्मराजकडे राहून त्याची खुबी व हातोटी मी शिकेन, आणि एक उत्तम आचारी म्हणून नांव मिळवीन.''

गोवर्धनने आपली नाराजी व्यक्त करुन म्हटले, ''हे बघ, धर्मराज फक्त नवशिक्यांनाच स्वयंपाक शिकवतो. तो तुला शिकवायला मुळीच तयार होणार नाही.''

त्यावर भीम लगेच उद्‌गारला, ''साहेब, मला स्वयंपाक करायला येतो हे मी त्याला सांगणारच नाही, मग तो मला निश्चित शिकवेल.''

''तुला त्यातली गोम कळली नाही बघ. ज्यांना पाकशास्त्राची थोडीफार माहिती आहे, त्यांना धर्मराजच्या पाकशास्त्रांतल्या खुब्या शिकता येणार नाहीत.'' गोवर्धनने सांगितलं.

भीमने केविलवाण्या स्वरांत म्हटलं, ''साहेब, मी आपल्याशी उगीचच खोटं बोललो. मला स्वयंपाक येत नाही. पण जर आपण मला नोकरी दिलीत, तर मी अगदी प्रामाणिकपणाने काम करीन.''

गोवर्धनने नकारार्थी मान हालवून म्हटले, ''तू खोटं बोलतो आहेस, हे मी ताडलं होतंच. जर तू प्रथम खरं सांगितलं असतंस ना, तर मी तुला अवश्य नोकरीवर ठेवून घेतलं असतं. तेव्हां तू जाऊं शकतोस.'' आणि त्याने भीमला पाठवून दिलं.

त्यानंतर राजा आला आणि गोवर्धनला सांगायला लागला, ''साहेब, मी गरीब घरांतला आहे. पण मी अत्यंत बेफिकीर होतो. कुठलेही काम मला सांगितले कीं मी ते कसेतरी करुन टाकत होतो. म्हणजे मला कुणी जास्त काम सांगणार नाही हा हेतू! आणि तसंच घरांत होत राहिलं. माझा थोरला भाऊ आणि वहिनी घर चालवतात, आणि ते मला कांहीच काम देत नव्हते. त्यांनी मला ''स्वावलंबी हो'' असा सल्ला देऊन घरांतून बाहेर काढलं. खोटेनाटे सांगून, फसवणूक करुन मी पोट भरण्याचा प्रयत्न केला. पण सत्य उघडकीस आले कीं माझी हकालपट्टी व्हायची. शेवटी लाचार होऊन मी चोरीसुद्धां केली. मला तुरुंगवासाची शिक्षा झाली. तिथे मी स्वयंपाक्याचे काम शिकलो. माझी चांगली वर्तणूक पाहून माझी शिक्षा कमी करण्यांत झाली. पण मी बाहेर आल्यानंतर मी चोर असल्यामुळे



कुणीही नोकरी देईनात. आपण दयाळू आहात. मला एकवार संधी दिलीत तर मी नक्की आपला विश्वास कमावीन.''

राजाचे बोलणे ऐकून गोवर्धनने त्याला धर्मराजबद्दल सांगून पुढे म्हटले, ''तुला स्वयंपाक करायला येतो. म्हणून धर्मराज तुला पाकशास्त्राचे धडे देणार नाही. मला खोटं बोलणारी मंडळी आवडत नाहीत, म्हणून मी तुला काम देऊं शकत नाही. तू चोऱ्या केल्यास, तुरुंगाची हवा खाऊन आलास, तेव्हां तुला कामावर ठेवण्याजोगा कांही तू नाहीस. मी बरोबर बोलतोय ना?''

राजाने उत्तर दिले, ''साहेब, आपण धर्म-राजाच्या स्वयंपाकातली उत्तम प्रत जाणताच. कदाचित मी त्याच्यापेक्षां जास्त चांगला स्वयंपाक करुं शकेन. जर आपल्याला माझ्या

रसोईची चव आवडली नाहीच तर आपण मला काम देऊं नका. आपण म्हणालात कीं आपल्याला खोटेपणाची चीड आहे. आपण कांही दिवस मला काम देऊन पाहा. त्या दिवसांत माझ्या तोंडून एखादा खोटा शब्द जरी आला, तरी तुम्ही मला ताबडतोब कामावरुन काढून टाका. मला अगदी एक, फक्त एकच, संधी द्या.''

गोवर्धनने थोडा वेळ विचार केला आणि राजाला नोकरीवर ठेवले. जेव्हां ही बातमी गोवर्धनच्या बायकोला कळली तेव्हां ती घाबरतच बाहेर आली आणि गोवर्धनला सांगू लागली, ''अहो, हे काय? सुखवस्तू घरांतल्या सीतारामला तुम्ही नोकरी दिली नाहीत, सज्जन भीमला तुम्ही कामावर ठेवून घ्यायला स्पष्ट नकार दिलात. आणि शेवटी दिलीत नोकरी ती कुणाला, तर एका खोटारड्या, लबाड, भामट्याला, त्या चोराला! तो आपलं कांही नुकसान तर करणार नाही ना, हीच काळजी आता लागून राहील.''

गोवर्धनने पत्नीला समजावताना म्हटले, ''सीताराम सधन घरांतला आहे. माझ्याकडून धंद्यातल्या खांचाखोचा शिकून घेईल, आणि आपला स्वतंत्र व्यापार चटकन सुरुं करील. भीम त्याच्या गरजेपुरता खोटेपणा करणारा माणूस आहे. म्हणून मी त्याला नोकरी द्यायला नकार दिला. आता उरली राजाची कथा. त्याने बरेच अपराध केले नि त्यासाठी शिक्षाही भोगली. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनी त्याची शिक्षेची मुदत संपायच्या आधीच त्याची सुटका केली. त्यापेक्षांही जास्त महत्वाची गोष्ट म्हणजे त्याने मला सर्व कांही खरेखुरे सांगितले. कांहीही लपवले नाही. त्यामुळे आपला प्रामाणिकपणा त्याने सिद्ध केला. त्याचे काम मला पसंत पडेलच असा त्याला विश्वास आहे. तो विश्वास खरा ठरेल असे करणे, हे माझेही कर्तव्य आहे, असे मी समजतो. ही खरी माणुसकी. या राजाला आपण नोकरी दिली नाही तर त्याला कुणीही नोकरी देणार नाही. त्यामुळे तो आपल्याकडे टिकून राहाण्याचा कायम प्रयत्न करील.''

आपल्या पतीच्या निर्णय आणि हा खुलासा ऐकून गोवर्धनची बायको खूष झाली. राजानेदेखील गोवर्धनचा विश्वास सार्थ ठरवला आणि त्यांच्याकडे इमानाने नोकरी केली.







# अस्वल्या मांत्रिक

## 11

*(दुर्मुख राजा जेव्हां अरण्यांत भटकत होता, तेव्हां त्याच्या मांडलिक राजाने किल्ला हस्तगत केला. त्याने इच्छा दर्शवली कीं अस्वल्या मांत्रिकाच्या ताब्यांत आपले मस्तक जाण्यापूर्वी कांही क्षणांसाठी तरी त्याला राजाच्या गादीवर बसायचं आहे. अस्वल्या वधिक आणि उग्रदंड तिथे पोंचल्यावर किल्ल्यांतून घोडेस्वार आणि सैनिक बाहेर आले. त्यानंतर...)*

**भाले** सरसावून येणाऱ्या घोडेस्वारांना, आणि त्यांच्या बाजूने तळपत्या तलवारी घेऊन चालणाऱ्या सैनिकांना पाहून चोरांचा सरदार नागमल्ल आणि त्याचे सहाय्यक बावरले. हत्तीवर स्वार असलेले दुर्मुखचे दोन्ही सैनिक देखील क्षणभर चकित झाले, आणि आता काय करायचं म्हणून आपसांत कुजबुजायला लागले.

नागमल्ल सांवरला आणि आपल्या सहाय्यकांना म्हणाला, ''हे बघा, या मांडलिकाचे इतके सगळे शिपाई लढायला तयार असून आपल्यावर हल्ला करतील असं मला वाटलं नव्हतं. तरीही आपण घाबरायचं नाही. अस्वल्या वधिक आणि उग्रदंड राक्षस आपल्या रक्षणासाठी तयार आहेत.''

''नागमल्ल महाराज! मी हत्ती मागे वळवूं कां?'' एका चोराने विचारले.

''नको, तसं केलं तर आपण इतरांच्या नजरेंतून खाली उतरुं. मी जी योजना तयार केली आहे, त्याचा प्रयोग करुन ती कितपत यशस्वी होतेय ते पाहातो. जरी हा प्रयोग फसला तरी वधिक व उग्रदंड आपल्या मदतीसाठी आहेतच.'' नागमल्लने



समजावले. "तर मग त्या सैनिकांनी आपल्या-जवळ येण्यापूर्वी कांहीतरी करा."

एका डाकूने म्हटले आणि कुजबुजणाऱ्या सैनिकांकडे पाहात तो पुढे म्हणाला, "अरे, तुम्ही ही कुजबुज कां करता आहात? इथून पळून जाऊन शत्रूच्या गोटांत जायचे आहे कां? तसं असलं तर एकेकाची चामडी लोळवीन." असे म्हणत त्याने तलवार उपसली.

नागमल्लने हत्तीवर स्वार झालेल्या दोन्ही सैनिकांकडे संतापाने बघितले, आणि आपला फेटा हवेत फडफडवत आपल्या दिशेने येणाऱ्या सूर्यभूपतिच्या सैनिकांना म्हटले, "तुम्ही आपापल्या जागी थांबा. तुमचा राजा कुठे आहे? मी तुमचा मित्र बनून आलो आहे. आम्ही तुमच्या जुन्या दुर्मुखराजाला जिवंत पकडून आणले आहे. जर आम्हाला चांगले इनाम मिळाले. तर त्याला राजाच्या स्वाधीन करुन आम्ही परत जाऊं."

हे शब्द ऐकून जवळ आलेले घोडेस्वार आणि सैनिकदेखील थबकले. घोडदळाचा नायक पुढे येऊन म्हणाला, "यांत कांही लबाडी तर नाही ना? अरण्यांतून इकडे येताना तुम्हाला आमचे मंत्री व महाराज किल्ल्याच्या तटावर उभे आहेत, त्यांनी तिथून पाहिले आहे बरं कां?"

"जर आम्हाला लबाडीच करायची असती, तर दिवसाढवळ्या आम्ही मूठभर लोक तुमच्या किल्ल्याकडे आलो असतो कां? दुर्मुखराजा जिवंत असणे, हे तुमच्या आजच्या राजाच्या दृष्टीने धोक्याचे आहे. म्हणून जर तुमच्या राजाने योग्य बक्षीस देऊन दुर्मुखराजाला ताब्यांत घेतले नाही, तर आम्ही पुन्हां अरण्यांत परत जाऊं." नागमल्लने उत्तर दिले.

त्या नायकाला काय करावे असा गंभीर प्रश्न पडला. कांही क्षण विचार करुन त्याने निर्णय घेतला कीं माघार घेणे हे वीरांना शोभणारे नाही. त्याने मिशीवरुन हात फिरवला, आणि तलवार उपसून तो गरजला, "तू कोण आहेस? तुझी ओळख सांगितली नाहीस?"

हा जरा कमी डोक्याचा असावा असे नागमल्लला वाटले. त्याने ऐटींत आपला फेटा नीटनेटका बांधत म्हटले, "माझं नांव नागमल्ल आहे, पण सगळेजण मला सरदार नागमल्ल म्हणतात. अरण्यांत असणारी मूल्यवान जनावरे व माणसांना जिवंत पकडायचे आणि त्यांना योग्य माणसांना विकायचे, हा माझा व्यवसाय आहे. समजलं?"



"हे मग सरळ कां नाही सांगितलंस? मी आत्ताच आमच्या राजाला, हे जाऊन सांगतो." असं म्हणून त्याने घोडा वळवला, आणि थांबून विचारले, "बरं, हे सांग, तुमच्या मागून जो घोळका आहे, त्यांत एकजण राक्षसासारखा आहे आणि हातांत परशु घेतलेले एक अस्वल आहे. ते खरोखरीचे राक्षस व अस्वल आहेत, कीं वेषधारी आहेत?"

"हे समजावून घेण्यासाठी तुझ्या राजालाच इथें यायला हवं. मी त्यांच्याकडून इनाम घेईन, दुर्मुखराजाला त्यांच्या स्वाधीन करेन आणि राक्षस आणि अस्वलाचा वेष घेणाऱ्या मंडळींशी त्यांचा परिचय करुन देईन." नागमल्लने हंसत सांगितले.

घोडदळाच्या नायकाने समाधानाने मान हालवली, आणि तलवार उंचावून सैनिकांना म्हटले, "अरे ऐका रे! तुम्ही सारे आपापल्या जागेवरुन एक पाऊलदेखील पुढे मागे हाललात तर तुमचे डोके उडवले जाईल. आपल्या मंत्रीजींनी शंका व्यक्त केल्याप्रमाणे हे बहुरुप्येच आहेत. मी लगेच जाऊन महाराजांना ही बातमी सांगतो." त्यांना आज्ञा देऊन नायकाने किल्ल्याच्या उघड्या महाद्वाराकडे घोडा पिटाळला. तिकडे किल्ल्याच्या बुरुजावर उभे राहून मांडलिक राजा व त्याचा मंत्री ही सारी गडबड पाहात होते. घोडेस्वारांचा नायक त्यांच्याजवळ आल्यावर त्यांनी विचारले, "अरे, शत्रूवर चाल करुन जायच्याऐवजी तू त्यांच्याशी बोलणीं कसली करीत होतास?"



नायकाने सविस्तर वृत्तांत सांगून म्हटले, "महाराज! ते सांगताहेत कीं जर, आपण त्यांना लहानमोठे पारितोषिक दिलेत तर ते दुर्मुखराजाला आपल्या स्वाधीन करतील."

दुर्मुखराजाचे नांव ऐकल्यावर सूर्यभूपती चमकला आणि पुढे म्हणाला, "दुर्मुखराजा अद्याप जिवंत आहे? म्हणजे आपल्या गुप्तहेरांनी सांगितलं होतं कीं हिंस्र श्वापदांनी दुर्मुखराजाला खाऊन टाकलंय, ते सगळं खोटंच कीं काय? महामंत्री, तुम्ही तात्काळ त्या हेरांचा शिरच्छेद करण्याची आज्ञा द्या."

मंत्र्याने चिंताग्रस्त चेहरा करुन सांगितले, "महाराज! ते दोघे हेर आत्ता किल्ल्यांत नाहीत. त्यांना पुन्हां अरण्यांत पाठवलेलं आहे. आणखी एक गोष्ट आहे. महाराज! गंभीरपणे विचार केल्यानंतर असं वाटतं कीं तो राक्षस व अस्वल



ही नुसतीच सोंगे नसावीत. ते खरेखुरे असावेत अशी मला तरी शंका आहे. शिवाय ज्या माणसाला दुर्मुखराजा समजून इथें पकडून आणण्यांत आलेले आहे, तो बहुधा खरा दुर्मुख नसेलच.''

मंत्र्याचे हे शब्द ऐकताच मांडलिक राजा संतापाने पेटून निघाला व बोलला, ''मी तुम्हाला सल्लागार नेमले हीच फार मोठी चूक केली आहे. कुणा राजाला सल्ला देण्याची शक्ती तुमच्यामधे दिसत नाही.'' आणि घोडेस्वारांच्या दल-नायकाकडे वळून तो म्हणाला, ''हे सेनापती, त्या मूठभर बावळट लोकांच्याशी आपण कशासाठी बोलणीं करायची? त्यांना धमकी द्या कीं निमूटपणे आमच्या स्वाधीन व्हा, किंवा त्यांना पकडून किल्ल्यांत घेऊन या. बक्षिसाची गोष्टबिष्ट त्यानंतर बघता येईल.''

''महाराज! जर तो खराच राक्षस असला तर तो आपल्यासाठी एक धोकाच ठरेल ना!'' नायकाने घोगऱ्या आवाजांत विचारले.

त्यावर सूर्यभूपतिने जोराने दांतओठ आवळत सांगितले, ''तुझ्याजवळ जेवढी फौज आहे, त्यांच्या बळावर तू एकच काय, शंभर राक्षसांनासुद्धां बंदी बनवूं शकशील! चला, मीच स्वतः चलतो! युद्धासाठी तयार असलेला माझा घोडा कुठे आहे?'' असं म्हणून तो बुरुजावरुन भराभरा खाली उतरला.

एका सैनिकाने घोडा आणला, तेव्हां सूर्यभूपति उत्साहाने घोड्यावर स्वार झाला. जवळच असलेल्या दुसऱ्या घोड्यावर मंत्री स्वार झाला. पुढे राजा नि बाजूला मंत्री व सेनापती यांचे घोडे होते. सारेजण किल्ल्याचे द्वार ओलांडून समोरच्या मैदानांत आले.

त्यांना येताना पाहून नागमल्ल उत्साहाने म्हणाला, ''वा, वा, माझी योजना सफल झाली आहे, मांडलिक, मंत्री, सेनापती, आपल्या जाळ्यांत फसणार असं दिसतंय.''

सूर्यभूपतीने नागमल्लाच्या हत्तीजवळ आपला घोडा आणला आणि त्याने दरडावून सांगितले, ''माझ्या सेनापतीने तुझे म्हणणे मला सांगितले आहे. माझ्या राज्यांत, माझ्या किल्ल्यासमोर येऊन तू माझ्याशी सौदा करणार आहेस ना? अगोदर दुर्मुख व ते दोघे बहुरुप्ये यांना बोलावून आण. किल्ल्यांत गेल्यानंतर मी त्या राक्षस आणि अस्वलाचा वेष घेतलेल्यांना, योग्य ते बक्षिस निश्चित देईन. पण दुर्मुखचे शिर किल्ल्याच्या दारावर लटकवायचे कीं बुरुजावर, हे ठरवल्या-



नंतरच मी बक्षिसाचा निर्णय घेईन.''

नागमल्लच्या लगेच लक्षांत आले कीं त्याची योजना कांही यशस्वी होणारी नव्हती. त्याला दुर्मुखराजा किंवा सूर्यभूपति, या दोघांविषयी खास आदर किंवा असूया वाटत नव्हतीच. पण सूर्यभूपतिने आपल्या घमेंडखोरपणाने जर उग्रदंड राक्षस किंवा अस्वल्या वधिकाचा अपमान केला असता, तर रक्तपात झाला असता. आणि ते नागमल्लला नको होतं.

त्याला काय उत्तर द्यावे याचा नागमल्ल विचार करीत होता, तेवढ्यांत हत्तीवर बसलेल्या दोघा सैनिकांनी चटकन तलवार उंच धरीत जोराने घोषणा केली, ''महाराज दुर्मुख की जय! हे सूर्यभूपति! आता तुझा मृत्यू अटळ आहे. दुर्मुख महाराजांच्या मदतीला एक खरा राक्षस आणि दुसरा मंत्रतंत्र जाणणारा अस्वल्या वधिक आहे.''

दुर्मुखराजाचा जयजयकार ऐकून सूर्यभूपति संतापाने वेडा झाला, आणि बाजूलाच उभे असलेल्या मंत्री व सेनापतीला म्हणाला, ''ऐका! या घमेंडी लोकांना आणि त्यांच्यामागे उभे राहून मौज पाहाणाऱ्या या नाटकी लोकांना माझ्या शक्तीची ताकद दाखवायलाच हवी. तुम्ही कांही स्वार आणि थोडे पायदळ घेऊन यांची अरण्यांत जायची परतीची वाट अडवून धरा.'' आणि तलवार उपसून त्याने नागमल्लाच्या हत्तीकडे आपला घोडा फेकला.

संकटाचा अंदाज घेऊन नागमल्लाने झटकन आपला हत्ती मागे वळवला, आणि उग्रदंड आणि वधिकासमोर जाऊन तो ओरडला, ''अस्वल्या



वधिक महाराज! माझी योजना बारगळली आहे. मांडलिकराजा आपली सारी सेना घेऊन आपल्यावर चालून येतो आहे.''

सूर्यभूपतीने मंत्र्याचा अपमान केलेला होता, तरीदेखील आपली स्वामीनिष्ठा सिद्ध करण्याच्या विचाराने मंत्र्याने आपल्या घोड्याला पुकारले, आणि नागमल्लाच्या हत्तीच्यामागून दौडत तो जोराने ओरडला, ''अरे देशद्रोह्यांनो, आमचे सूर्यभूपति महाराज तुमची सर्वांचीच डोकी उडवतील.''

या दरम्यान दूर उभ्या असलेल्या सैन्याला सेनापतीने पुढे येण्याचा आदेश दिला. तोपर्यंत पुढे मंत्री आणि त्याच्यामागून सूर्यभूपती, असे उग्रदंड व अस्वल्या वधिकासमोर येऊन पोंचले.

आपल्या किल्ल्यावर अंमल गाजवणाऱ्या सूर्यभूपतीला पाहून दुर्मुखराजा भयंकर चिडला,

आणि तलवार वर धरुन, हत्तीवर उभा राहून, त्याने आरोळी ठोकली, ''अरे मांडलिका सूर्यभूपती, मी परक्या देशावर आक्रमण करायला गेलेला पाहून तू माझाच किल्ला बळकावलास काय? मी आत्ताच तुझा शिरच्छेद करतो.'' असं म्हणून दुर्मुख सूर्यभूपतीच्या घोड्यावर उडी घेण्याच्या पवित्र्यांत होता, पण त्या प्रयत्नांत तोच जमिनीवर खाली पडला. पण पुढच्याच क्षणीं झटकन उठून उभा राहिला.

ते पाहून वधिकाने जोरांत टाळ्या वाजवून म्हटले, ''वा वा! राजा खरा हिंमतवान! अरण्यांत चित्त्याशी सामना करायला घाबरणारा राजा, किल्ला बघितल्याबरोबर त्याला आपल्या राज्याची आठवण आली, आणि शत्रूवर तुटून पडायला तयार झाला कीं!''

राजा खाली पडलेला पाहून सूर्यभूपति खूष होऊन बोलला, ''असं म्हणतात कीं शत्रूला जिवंत ठेवणे म्हणजे धोकाच असतो.'' आणि त्याने तलवार सरसावून दुर्मुखच्या दिशेने घोडा पुढे काढला.

त्यावेळीं हत्तीवर पुढे बसलेल्या वनवासी तरुणाने आपल्या धनुष्याला बाण लावून सूर्यभूपतीच्या दिशेने सोडला. पण थोडक्यांत चुकले आणि बाण सूर्यभूपतीच्या ऐवजी त्याच्या घोड्याच्या डोक्याला लागला. घोडा जोराने खिंकाळत मागच्या पायांवर उभा राहिला. सूर्यभूपति खाली पडलाच असता, पण त्याने लगाम खेंचला, म्हणून तो संकटातून वांचला. तितक्यांत दुर्मुखने मंत्र्याला बुक्का मारुन घोड्या-वरुन खाली ढकलले, आणि त्याच्या घोड्यावर स्वार होऊन तो सूर्यभूपतीकडे वळला.

आपण शत्रूच्या जाळ्यांत सांपडलो आहोत. हे सूर्यभूपतिला कळले. तो घाबरुन किल्ल्याकडे जाऊं लागला. आणि दौडताना आपल्या सैनिकांना सावध करुं लागला.

दुर्मुखराजाने घोड्यावरुन, गर्जना केली, ''अरे सूर्यभूपती! नेभळटा! थांब, थांब! हिंमत असेल तर ये लढायला माझ्याबरोबर!'' आणि असं ओरडून तो भूपतीचा पाठलाग करुं लागला.

*(क्रमशः)*







वेताळ कथा

# ज्योतिषीला ज्योतिष

शब्दाचा पक्का विक्रमार्क राजा पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले आणि ते खांद्यावर टाकून तो स्मशानाच्या वाटेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेल्या वेताळाने म्हटले, ''मध्यरात्र झाली तरी तू या भयंकर अरण्यांत निर्भयपणे फिरतो आहेस? कांही महान कार्यासाठीच तू आपले प्राण संकटात घालून असं साहस करतो आहेस असं वाटतं. कांही धाडसी लोकांच्यात आपल्या कुवतीपेक्षां जास्त मोठी इच्छा असते, आणि ती इच्छा पूर्ण करण्यासाठी ते उतावीळ असतात. ते ज्ञानी असतातच असं नाही, पण व्यवहारी



दृष्टीने ते विचार करुन निर्णय घेतात आणि निराश होतात. ते फक्त शास्त्रांचा आधार घेतात आणि आपल्या तर्काला दुजोरा देतात. तू देखील तशा स्वभावाचा असावास असं मला वाटतं. तुला मी एका चांगल्या ज्योतिषाची गोष्ट सांगतो. त्याला धडा शिकवला एका सामान्य तरुणाने! आणि तोही अनुभवाच्या जोरावर! तुझा थकवा दूर होण्यासाठी ही कहाणी मी तुला सांगतो ती त्यांची मी तुला सांगतो ती लक्ष देऊन ऐक.'' आणि वेताळाने गोष्ट सांगायला सुरवात केली.

सीतापूर गांवातल्या सीतारामला भास्कर नांवाचा एक हुशार, सुंदर आणि सुशील मुलगा होता, त्याच गांवातला महती हा एक सामान्य शेतकरी होता. भास्कर आपला जांवई व्हावा ही त्याची तीव्र इच्छा होती. पण भास्करने त्याचा प्रस्ताव नाकारताना सांगितले, ''मी अजून फुटकी कवडीसुद्धां मिळवत नाही. जेव्हां कांही कामधंदा मिळेल आणि मी कमवायला लागेन, तेव्हांच मी तुमच्या मुलीशी लग्न करीन.''

महती कांही भास्करला घरजांवई करुन घेण्याइतका श्रीमंत नव्हता. पण भास्कर हाच जांवई त्याने मनाशी ठरवला होता. त्याच्यासाठी गांवचा ज्योतिषी मृत्युंजय ह्याची मदत घ्यायला महती त्याच्याकडे गेला. भास्कर केव्हां कमावता होईल, हे त्याला विचारायचं होतं.

मृत्युंजयने दोन्ही कुटुंबांच्या कुंडल्या मागवल्या. त्या नीट बघून त्याने भविष्य वर्तवलं, ''तुझी मुलगी संध्या हिच्याशी विवाह झाला, आणि भास्कर मतंगपुरला गेला, तर त्याचे भाग्य फळफळेल.''

भास्करचा ह्यावर विश्वास नव्हता. पण त्याच्या वडिलांचा होता. त्यांनी भास्कर व संध्याच्या विवाहाचा आग्रह धरला. ''माझं ऐक भास्कर, तू संध्याशी लग्न कर नि मतंगपुरला जा. जर मृत्युंजयच्या म्हणण्याप्रमाणे तुझा भाग्योदय झाला नाही, तर तूं परत गांवी ये. तुला आणि तुझ्या पत्नीला मी सांभाळीन. पण तू नकार दिलास तर मात्र तुला तुझा मार्ग पाहावा लागेल.'' सीतारामने मुलाला सांगितले.

भास्करला वडिलांचा आग्रह मान्य करण्या-खेरीज दुसरा उपायच उरला नाही. त्याने संध्याशी लग्न केले नि तिच्यासह तो मतंगपुरला गेला. राहायला लहानशी जागा शोधताना तो एका



घरमालकाकडे गेला व भास्कराने त्याला सांगितले, ''हे बघा भाऊ, मी या नगरात नवीन आलो आहे. मला तुमच्या घरांत भाडेकरु म्हणून राहायची इच्छा आहे. पण थोडीफार कमाई सुरुं झाली की त्यानंतरच मी तुम्ही म्हणाल ते भाडे तुम्हाला देऊं शकेन.''

त्या घरमालकाने भास्करला नखशिखान्त नीट न्याहाळले, व म्हटले, ''आमचं घर चांगलं मोठं आहे. तुम्ही इथे राहूं शकता. पण तुझा स्वभाव आणि समजूतदारपणा याची परीक्षा मी अगोदर घेईन आणि मगच तुला इथे राहायची परवानगी देईन. हे बघ, मी आत्ता बाहेर जाणार आहे. राम, सोम, नाग व किरण या चौघांची भेट घेणार आहे. माझे त्यांच्याकडे पैसे येणे आहे. चौघेही पैसे द्यायला खूप दिवस टाळाटाळ करताहेत.

कांहीतरी सबब सांगून मला बनवायचा त्यांचा प्रयत्न असतो. आता तू मला सांग, कीं मी यांच्यापैकी कुणाकडे गेलो कीं माझी रकम परत मिळेल?''

या घरी राहायला मिळावं म्हणून कांहीतरी उत्तर तर द्यायला हवंच होतं. म्हणून भास्करने सांगितलं, ''हे पहा रावसाहेब, आपण नागच्या घरी जाऊन बघा. तो सगळी रक्कम देईल.''

घरमालक नागच्या घरी गेला. नागने हात जोडून त्यांना नमस्कार केला आणि म्हटले, ''आपण स्वतः आलात होय? अहो, पुरी रक्कम घेऊन मीच आपल्याकडे यायला निघालो होतो!'' असं म्हणून त्याने संपूर्ण रक्कम दिली.



भास्करला त्या घरांत आसरा मिळाला, आणि ही बातमी आगीसारखी पसरली. भास्कर एक मोठा ज्योतिषी आहे. आणि त्याला वाचासिद्धी आहे ही माहिती गांवात फैलावली. मग काय, भविष्य पाहाणाऱ्यांची गर्दी सुरुं झाली. भास्कर चतुराईने प्रश्न विचारुन आवश्यक माहिती काढून घेई आणि त्या व्यक्तीचे भविष्य धोरणीपणाने सांगायला लागला. तो जे सांगे, ते खरं ठरत गेलं आणि त्याचा बराच बोलबाला झाला.

आता मतंगपुरांत भास्कराचे चांगले बस्तान बसले होते. एकदा संध्या त्याला म्हणाली, ''मला वाटतं कीं तुमचं ज्योतिषाचं ज्ञान अगदी खास आहे! आपण हे शहर सोडून राजधानीला जाऊं या. तिथे खूप श्रीमंत लोक असतात, आपणही



बघताबघता श्रीमंत होऊन जाऊं!''

भास्कर हंसून तिला म्हणाला, ''माझा ज्योतिषाचा अभ्यास नाही. माझं नशीब जोरावर आहे म्हणून मी बोलतो ते खरं ठरतं. पण हे कांही कायम असेल असं सांगता येत नाही. तू म्हणतेस तर आपण राजधानीला जरुर जाऊं, पण ज्योतिष सांगायला नव्हे तर व्यापार करायला. आपल्याला जर नशीबाची साथ मिळाली तर आपण नक्की श्रीमंत होऊं.''

संध्याला कांही हे बोलणं पटलं नाही. ती म्हणाली, ''हनुमानासारखी तुम्हाला स्वतःची शक्ती किती आहे त्याची कल्पना नाही. ज्योतिषीपंडित मृत्युंजय यांनी तुमची ही दिव्य शक्ती ओळखली होती. त्यांच्या सल्ल्याशिवाय व संमतिशिवाय, तुम्ही हा ज्योतिष सांगण्याचा व्यवसाय मुळीच सोडायचा नाही.''

भास्करला पत्नीचा आग्रह मोडवेना. म्हणून त्यांनी गांवी परत जाऊन मृत्युंजयला भेटायचे ठरवले. पण, तितक्यांत मृत्युंजयच त्याच्या घरी मतंगपुरला आले आणि म्हणाले, ''अरे बाळ, ज्योतिषामधे जे तू यश मिळवतो आहेस, ते खरोखरच अद्‌भुत आहे. आता मी तुझ्याकडे कशासाठी आलो आहे ते ऐक.

आपल्या गांवात लक्ष्मण नांवाचा एक शेतकरी आहे. त्याचा मुलगा राजाच्या दरबारांत नोकरी करतो. लक्ष्मणने मुलाबरोबर राहायचे ठरवले. म्हणून त्याने आपले पांच अेकराचे शेत विकायचे ठरवले. खरं म्हणजे त्याच्या शेताची किंमत फार तर हजार रुपये झाली असती पण तो दहा हजार रुपये मागतो आहे. म्हणून कुणी विकत घ्यायलाही पुढे येत नाही. शेवटी लक्ष्मण मलाच ते शेत विकत घ्यायचा आग्रह करायला लागला.''

''हा तर जुलूमच झाला. तुम्ही कशासाठी ते शेत घ्यायचं?'' भास्करने विचारले.

''अरे, ती एक लांबलचक गोष्ट आहे. खूप वर्षांपूर्वी हे लक्ष्मणचं शेत ओसाड रान होतं, म्हणून त्याला बरंच कर्ज झालं. त्याला जरा बरं वाटावं व उमेद यावी म्हणून मीच त्याला सांगितलं होतं कीं तुझं कर्ज लौकरच फिटेल आणि तुझी परिस्थिती सुधारेल. मी त्याला हेही सांगितलं होतं कीं त्याच्या मुलाला राजाच्या पदरी नोकरी



मिळेल. त्याचबरोबर त्याच्या शेतामधे त्याला दहा हजार मोहरा गुप्त धन मिळेल हे सुद्धां भविष्य मी ठोकून दिलं होतं. या गुप्तधनाशिवाय इतर गोष्टी खऱ्या ठरल्या. आता ते शेत मलाच विकून या उपकाराची परतफेड करायचा त्याचा बेत आहे. आता हे मी कसे खरेदी करणार? कारण एकतर जमिनीची किंमत जेवढी तो सांगतोय तेवढी नाहीच. काय करावे तेच मला समजत नाही, म्हणून मी तुझा सल्ला घ्यायला आलो आहे.'' मृत्युंजयने येण्याबद्दल सविस्तर खुलासा केला.

भास्कर त्याला असहाय्यपणे म्हणाला, ''या विषयांत मी आपल्याला काय सल्ला देणार?''

''त्या शेतांतल्या गुप्त धनाबद्दल मी जे भाकित सांगितलं होतं, ते खरं ठरेल कां हे तू मला सांग. तू जर दुजोरा दिलास तर मी ते शेत घेईन.'' मृत्युंजय म्हणाला.

''जेव्हां मला कमाईचा कोणताही मार्ग दिसत नव्हता, तेव्हां तुम्ही मला नवी वाट दाखवलीत. आता जे तुम्हाला सांगता येत नाही, ते मला कसं काय सांगता येईल?'' भास्करने आश्चर्याने विचारले.

''अरे बाळ, तुला वाचासिद्धी आहे. माझं ज्ञान आहे, पण तुझं भाग्य आहे. मी तुझ्यावर विश्वास ठेवून आहे. तू तुझा निर्णय सांग.'' मृत्युंजयने अगदी अजीजीने त्याला सांगितले.

नाईलाजाने, भास्करने ते शेत खरेदी करण्याचा सल्ला मृत्युंजयला दिला, आणि मृत्युंजय गांवी परतला.



जे कांही झालं, ते संध्या सारं बघत होती. ती भास्करला म्हणाली, ''आता यापुढे भविष्य सांगायचं सोडून द्या. राजधानीला जाऊन तिथें कांही व्यापार धंदा सुरुं करा! व्यापार सुरुं केलात कीं लौकरच आपण दहा हजार रुपये जमवायचे आणि मृत्युंजय यांच्याकडून ते शेत आपणच खरेदी करुं. त्यांत जे गुप्तधन आहे, ते पुढेमागे आपल्यालाच मिळेल.'' भास्कर संध्याबरोबर राजधानींत आला आणि त्याने तिथें व्यापार सुरुं केला. लौकरच त्यांच्याजवळ दहा हजार रुपये जमले.

ती रक्कम घेऊन ते आपल्या गांवी आले. त्यांना पाहून भास्करच्या पित्याला फारच आनंद झाला.

सीताराम मुलाला व सुनेला म्हणाला, ''अगदी योग्य वेळेवर आलात तुम्ही! आज मृत्युंजय गुरुजींच्या घरी मोठी जेवणावळ आहे. त्यांनी शेत खरेदी केलं आणि आता तर नांगरताना त्यांना त्या शेतांत दहा हजार सोन्याच्या मोहरांचा हंडा मिळाला! त्यांनी दुसऱ्या एका ज्योतिषाकडून अगोदर विचारुन घेतलं होतं आणि ते धन त्यांनाच मिळणार, हे समजल्यावर त्यांनी ते शेत दसपट किंमत देऊन घेतलं बघ. केवढा मोठा माणूस हा!''

हे ऐकून भास्करच्या तोंडून शब्दच फुटेना. त्याला आता प्रश्न पडला कीं पुन्हां ज्योतिष सांगणं सुरुं करावं कीं व्यापारच चालूं ठेवावा?

वेताळाने ही गोष्ट सांगितली आणि राजाला विचारले, ''राजन्, मृत्युंजय एक महान ज्योतिषी आहे तरीसुद्धां शेताच्या खरेदीसंबंधी तो भास्करकडे सल्ला मागायला गेला. त्याने असं कां केलं? त्याला स्वतःच्या ज्ञानावर विश्वास नव्हता कां? भास्करला तर ज्योतिषाचं शास्त्रोक्त ज्ञान नव्हतं. पण त्याची भाकिते कशी खरी होत होती? माझ्या या शंकांची उत्तरे माहिती असूनदेखील जर तू मौन पत्करलेस, तर तुझ्या मस्तकाची अनेक शकले होऊन पडतील.''

विक्रमाकनि उत्तर दिले, ''जो विचारी माणूस जीवनाच्या अनुभवांतून शिकतो, तो नेहमी जागरुक असतो. कित्येक मोठे वैद्य असतात; त्यांच्या कुटुंबातील कुणी आजारी पडलं कीं ते दुसऱ्या वैद्याचा सल्ला अवश्य घेतात. त्याचप्रमाणे एका प्रसिद्ध ज्योतिषाने मृत्युंजयने दुसऱ्या ज्योतिषाचा भास्करचा सल्ला घेतला इतकेच! भास्करची वाणी अचूक ठरत होती. खरी, पण त्याचे भाग्य दरवेळी त्याला साथ देऊन विजयी करीत होते. त्याला नशिबाची जोड मिळत गेली.''

राजाचे मौनभंग करण्यांत वेताळ सफल झाला, शवासहित गायब झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

*(आधार: 'वसुंधरा'ची रचना)*






# भित्तीचित्रांत महाभारत

अजिंठा व वेरुळ इथली महाभारतांतली भित्तीचित्रें जगप्रसिद्ध आहेत. दक्षिण भारतांत तमिळनाडमधे सित्तानवासल, तंजावूर आणि तिरुनंदीकारल, या ठिकाणीं अशी चित्रे आहेत.

दुर्दैवाने, तंजावूरच्या बृहदीश्वर मंदिरातल्या भित्तीचित्रांखेरीज दुसऱ्या दोन जागेची चित्रें अत्यंत खराब अवस्थेंत आहेत. तंजावूरच्या देवळांतला ही चित्रे असलेला दुसरा मजला सुरक्षिततेच्या दृष्टीने सध्यां कांही महिने बंद ठेवण्यांत आला आहे.

अशी भिंतीवरची चित्रें रंगवण्याच्या कलेला उत्तेजन देण्यासाठी, तंजावूरमधल्या दक्षिण विभाग सांस्कृतिक केंद्राने, आपल्या २५० चौरस फुटांच्या भिंती, महाभारताची कथा चित्रित करण्यासाठी खुल्या केल्या आहेत. हे महाकाव्य कथारुपाने सांगणारे २१ चित्रफलक असतील. पहिल्या चित्रांत महर्षी वेदव्यास कथा सांगत असून श्रीगणेश ती लिहीत आहे असे चित्र असेल. शेवटल्या चित्रांत अठरा दिवसांच्या युद्धानंतर दुर्योधनाचा अंत असेल.



या चित्रांसाठी वापरले जाणारे रंग नैसर्गिक असून झाडांचे खोड, पानें, फुलें, फळें आणि दगडांची पूड, यापासून बनवलेले आहेत. हे काम केरळमधल्या एका कुटुंबाकडे दिले आहे. वडील भिंतीवर मूळ रंग देतील, मुलगा चित्रें, रेखाटन करील, आणि

# रोडग्यांतली रत्नें

एक राजा होता. जर अचानक द्रव्यप्राप्ती झाली तर त्याचा विनियोग लोक कसा करतील हे जाणून घेण्याची उत्सुकता त्याला वाटली. एक दिवस त्याने आपल्या आचाऱ्याला दोन सुंदर मोठे रोडगे भाजायला सांगितले. दोन्ही चांगले जाडजूड व टपोरे फुगलेले होते. पण एक नेहमीचाच साधा रोडगा होता. आणि दुसऱ्यांत कांही रत्ने घालून तो भाजलेला होता.

राजाचा एक वृद्ध सरदार, दर आठवड्याला एका दिवशी, गोरगरीबांना दानधर्म करीत असे. राजाने त्या सरदाराला विश्वासांत घेऊन म्हटले. "मित्रा, हा रत्नांचा रोडगा तुला योग्य वाटेल अशा इसमाला दे. आणि हा साधा रोडगा तुझ्याकडे जो भीक मागायला येईल त्याला दे."



नेहमीप्रमाणे दोघेजण त्या सरदारासमोर भिक्षेसाठी येऊन उभे राहिले. एक होता साधू, त्याची लांबलचक दाढी आणि पायघोळ, विशिष्ट रंगाचा अंगरखा पाहून तो फकीर होता, हे उघडच दिसत होतं. दुसरा एक सामान्य भिकारी होता. त्या सरदाराने रत्नांचा रोडगा त्या फकीराला दिला, आणि साधा रोडगा त्या भिकाऱ्याला दिला.

राजवाड्याच्या गच्चीवरुन राजा हे सर्व नीटपणे बघत होता. त्या फकीराने तो रोडगा घेऊन या हातांतून त्या हातांत, असा तोलून पाहिला. त्याला तो जरा वजनदार वाटला. त्याला बहुधा वाटलं. कीं तो रोडगा चांगला भाजलेला नसून अर्धाकच्चा असावा.

"अरे बाबा, हा रोडगा जरा जास्त वजनदार वाटतोय. तुझ्या रोडग्यापेक्षां हा मोठा आहे. मला कांही तितकीशी भूक नाही. आपण ह्या रोडग्यांची अदलाबदल करुं या कां?" फकीराने विचारले.

भिकाऱ्याने मुकाट्याने आपला रोडगा फकीराला दिला आणि फकीराचा रोडगा भिकाऱ्याने घेतला.

राजा स्वतःशीच बोलला, "देव खरोखरच सर्वज्ञ आहे. त्या फकीराला रत्नांचा मोह पडूं नये अशी देवाची इच्छा दिसते. फकीराला श्रीमंत करण्याची देवाची इच्छा नाही." हे आपलं स्पष्टीकरण राजाला पटलं. पण त्या फकीराच्या तोंडावर एका छद्मी हास्याची लकेर राजाला दिसत होती. त्या फकीराला वाटत होतं कीं त्याने



भिकाऱ्याला कच्चा रोडगा देऊन आपण चांगला रोडगा घेतला होता.

ते पाहून राजाची उत्सुकता जास्तच बळावली. त्याने ताबडतोब दोन गुप्त हेर या दोन्ही भिकाऱ्यांच्या मागावर पाठवले. त्या दोन्ही रोडग्यांचं त्या दोघांनी काय केलं हे पाहून, ती माहिती राजाला लगेच द्यायची होती. त्या संध्याकाळी राजाला सविस्तर माहिती मिळाली. फकीर आपल्या झोपडींत परत गेला. त्याने त्याचा अंगरखा काढला, दाढीही लावली होती ती काढून टाकली, आणि त्याने तो रोडगा आणि इतर कांही भिक्षा मिळाली होती, ती खाल्ली. नंतर त्याने चेहऱ्यावर दाढी लावली, फकीराचा अंगरखा घातला आणि तो बाजारपेठेत भीक मागायला पुन्हां निघून गेला.

दुसरा भिकारी जेव्हां आपल्या झोपडींत गेला, तेव्हां त्याने तो रोडगा सुरीने कापला आणि त्यांतली रत्नें पाहून तो आश्चर्यचकित झाला. त्याची बायको तर आनंदाने नाचायलाच लागली. तिने लगेच स्वतःसाठी एक रत्नहार बनवायचा निर्णय घेतला. पण तो भिकारी म्हणाला, "एका सरदाराकडून देवाने हा रोडगा एका फकीरबाबांना दिला आणि त्यांनी हा मला दिला. ही आता माझी सत्वपरीक्षा आहे. आधी त्या उदार सरदारसाहेबांचा शोध घेतला पाहिजे. आणि त्या रोडग्यांत नजरचुकीने रत्ने घातली गेली कशी, त्याचा मागोवा मी नंतर घेईन. किंवा त्या सरदारसाहेबांच्या घरांतून कुणीतरी चोरुन ती या रोडग्यांत लपवली असतील. म्हणजे सुरक्षितपणे बाहेर नेता आली असती. पण तशी संधी त्याला मिळाली नसेल. पण जर सरदारसाहेबांच्या मनांत ती त्या फकीरबाबांनाच द्यायची असतील तर ही रत्ने त्यांनाच मिळायला हवीत. नाहीतर आपण त्यापैकी कांही भाग वापरुं



या आणि कांही भाग आपल्या गरजवंत शेजाऱ्यां-साठी वापरुं या."

त्या गरीब बिचाऱ्याने त्या सरदाराची लौकरच भेट घेतली आणि बरोबर आणलेली रत्नांची पुरचुंडी त्याला दिली. राजाने त्या भिकाऱ्याला भेटायला बोलावले आणि ती रत्ने त्याला ठेवून घ्यायला तर सांगितलेच, पण त्याशिवाय त्याचा नमुनेदार प्रामाणिकपणाबद्दल त्याला भरघोस इनामही दिले.

"नियतिने भोंदू फकीराकडून ही रत्ने काढून घेतली. पण मी मात्र चांगला धडा शिकलो. मी स्वतःचे स्पष्टीकरण रास्त मानून समाधानी झालो असतो, तर मला खरी परिस्थिती कळली नसती. आपल्याला सत्य ठाऊक आहे असं आपण उगीचच समजत असतो आणि गप्प बसतो. पण तसं असतंच असं नाही." राजा म्हणाला. *(एम.डी.)*

# मुक्या जिवाची साक्ष

**सु**धाम गांवात भीम शेतकरी राहात होता. आपल्या चार एकरांच्या शेतांत तो कोहळ्याचे पीक घेत असे, आणि जवळच्या कोलार शहरांतल्या दुकानदारांकडे ते कोहळे विकत असे. एकदा त्याने शेतांत राखण करणाऱ्या कल्लूला सांगितलं, "आज मला एका नातलगाला भेटण्यासाठी परगांवी जायचं आहे. मला परत यायला बहुतेक महिनाभर तरी लागेल. शेताची राखण नीट कर. दुर्लक्ष करुं नकोस."

कल्लूने चारपांच दिवसांमधे एकदातरी दहाबारा कोहळे काढून घेऊन, आणि आपल्या मुलाच्या बैलगाडीत घालून, ते शहरांतल्या दुकानदारांना विकायला सुरवात केली.

महिन्यानंतर भीम परत आला. जाण्यापूर्वी त्याने कोणत्या वेलावर किती कच्ची फळें आहेत ते मोजून ठेवले होते. त्यांतले बरेच कमी झालेले त्याच्या लक्षांत आले. कल्लूनेच ते चोरले असतील अशी भीमला शंका आली. त्याची चोरी पकडण्यासाठी त्याने एक उपाय योजला.

दुसऱ्या दिवशी भीमने सांगितलं, "हे बघ कल्लू, उद्यां उजाडताच तुझ्या मुलाची बैलगाडी घेऊन ये. आपण शहरांत जाऊन तयार कोहळे विकायला नेऊं या." दुसऱ्या दिवशी कल्लू स्वतःच बैलगाडी घेऊन आला. गाडीत पंचवीस कोहळे भरल्यानंतर भीम कल्लूला म्हणाला, "मला आज जरा बरं वाटत नाही. रस्ताही जरा खडबडीत आहे, तेव्हां गाडी हळूहळू जाऊं दे!" कल्लूने त्याप्रमाणे केलं. बैल सरळ शहरांतल्या एका दुकानासमोर जाऊन उभा राहिला. गाडीतले कोहळे पाहून दुकानदार चटकन कल्लूला म्हणाला, "अरे, नेहमी दहाबारा कोहळे आणत होतास ना? आज इतके जास्ती कसे काय आणलेस?"

आता कल्लूची चोरी पकडली गेली होती. भीम त्याला म्हणाला, "बैलाला जिथे पोंचायची संवय असते, तिथे तो आपण होऊन जातो. या मुक्या जिवाने साक्ष दिलीय कीं तू चोर आहेस. तेव्हां मी तुला कामावरुन काढून टाकले आहे."

**- कोलार कृष्णा**







# देवाचे अस्तित्व

**ना**मदेवाच्या गुरुकुलांत विद्यार्थी शिकत होते, त्यांच्यामधे चैतन्य सर्वांपेक्षां जास्त बुद्धिमान होता. प्रत्येक विषयांत तो सखोल अभ्यास करुन ज्ञान मिळवीत होता. नामदेव त्याच्यावर अतिशय खूष होता. त्यांनी आपल्या या प्रिय शिष्याला आपली संपूर्ण विद्या शिकवली होती.

आता चैतन्य अठरा वर्षांचा झाला होता. त्याने आता गुरुकुलांत राहायची आवश्यकता नाही, असं नामदेव गुरुजींना वाटलं, कारण त्याचा शिक्षणक्रम संपलेला होता. त्यांनी निर्णय घेतला, आणि चैतन्यला सांगितले, "पुत्रा, तुझं शिक्षण आता पूर्ण झालंय. त्याचबरोबर तुझ्यामधे चांगले संस्कार आणि विनम्रताही आहे. आता तू घरी परत जा आणि तुझ्या आईवडिलांची सेवा कर. परमेश्वर सदैव तुझ्या पाठीशी राहील."

चैतन्यने मस्तक वांकवून गुरुजींना वंदन केले आणि म्हटले, "गुरुवर्य, आपण मला कितीतरी निरनिराळ्या विषयांचे ज्ञान दिलेत. पण ज्या परमेश्वराचे नांव आत्ता घेतलेत, तो मात्र आपण मला दाखवला नाहीत. जो परमेश्वर मला कधीच दिसला नाही, तो कायम माझ्या पाठीशी राहील कां?"

नामदेवांनी क्षणभर विचार करुन म्हटले, "चैतन्य, तुझ्या प्रश्नाचे उत्तर आत्ता नाही, पण नंतर जरुर देईन. पण त्यापूर्वी एक काम कर. उत्तर दिशेला जे अरण्य आहे, ते ओलांडून गेलास कीं पुढे सुशांतनगर आहे. तिथून कोसभर अंतरावर भवानीपुर गांव आहे. तिथे माझा धाकटा भाऊ राहातो. तिथे जाऊन त्यांची खुशाली विचारुन येशील कां?"

चैतन्यने होकार दिला आणि दुसऱ्याच दिवशी पहाटे तो भवानीपुरला जायला निघाला. गुरुपत्नीने त्याला दोन दिवस पुरेल इतकी शिदोरी बांधून एका थैलीत ठेवून, त्याला दिली.

चैतन्य भराभरा चालत होता. दुपारपर्यंत तो अरण्याच्या मध्यावर पोंचला. त्याला आता तहान लागली होती, म्हणून तो पाणी शोधायला निघाला. ते शोधताना त्याला एक म्हातारा

**आशालता**



आंधळा दिसला. तो ती रानटी पानें चांचपडत, त्यांच्यावर हात फिरवत होता, त्यांचा वास घेत, व मग हवी ती पाने तोडून घेत होता.

चैतन्य त्या वृद्धाजवळ येऊन विचारुं लागला, "आजोबा, काय शोधता आहात?"

"अरे बाळ, शोधायला माझं कांहीही हरवलेलं नाही. मी इथे जवळच आदिवासींच्या वस्तीत राहातो. मला सगळेजण औषधी आजोबा म्हणतात. जी पाने औषधी गुणांची असतात, त्यांना मी अगोदर हाताने चांचपून पाहातो, नंतर त्यांचा वास घेऊन ती तोडतो. मी जन्मापासून आंधळा आहे ना!" वृद्धाने म्हटलं.

"आत्ता तुमच्या हातांत जी वेल आहे तिचा उपयोग कोणत्या रोगाच्या उपचारासाठी होतो हो?" चैतन्यने चौकसपणे विचारले.

"ही विषमार वेल आहे. सांप चावला तर ही अगदी रामबाण औषधी आहे. ही वेल कुस्करून तिचा रस जर सांप चावलेल्या माणसाच्या तोंडात पिळला, तर ते विष लौकरच उतरते, आणि त्या माणसाचा प्राण वांचतो. तुला हवी तर ही वेलीची डहाळी ठेव तुझ्याजवळ! अरण्यांत फिरतो आहेस, लागलीच तर उपयोगी पडेल बघ."

चैतन्यने ती लांबलचक वेल नीट गुंडाळून आपल्या कपड्यांत लपवून ठेवली. त्याने त्या वृद्धाला विचारलं, "इथें जवळ कुठे पाणी मिळेल कां?"

"जवळपासच एक विहीर आहे. जरा शोधलीस तर सांपडेल बघ" वृद्धाने उत्तर दिलं.

चैतन्य जरा दूर अंतरावर गेला आणि चारी बाजूंना त्याने लक्षपूर्वक पाहिले. एका वडाच्या झाडाच्या बाजूलाच एक विहीर होती ती त्याला दिसली. तिथें थांबून त्याने जेवण केले आणि त्या झाडाखाली थोडा आराम करावा म्हणून तो लवंडला. त्याच्या अंगावर कांहीतरी पडल्यासारखे वाटले म्हणून त्याने डोळे उघडले. एक ससा त्याच्या जवळून पळत जाताना त्याला दिसला. तेवढ्यांत वडाची एक फांदी तुटून धाडकन त्याच्याजवळच जमिनीवर पडली. चैतन्यचे नशीब चांगले म्हणून तो वांचला. जर ससा आला नसता तर त्याला झोप लागली असती, आणि फांदी त्याच्या अंगावर पडली असती, तर काय झालं असतं कोण जाणे!

चैतन्य उठून बसला आणि नंतर पुन्हां आपल्या वाटेने जाऊं लागला. अरण्य ओलांडून तो नगराच्या वेशीजवळ पोंचला. तिथें एक गरीब



माणूस, त्याची पत्नी आणि त्यांची मुले त्याला दिसली. ती उपाशी होती आणि भुकेसाठी भीक मागत होती.

चैतन्यने लागलीच जवळचे उरलेले पदार्थ त्यांना दिले आणि तो पुढे निघाला. नगरांत पोचेपर्यंत रात्र झाली. रात्रीं तो एका धर्मशाळेंत उतरला, व तिथें झोंपला. मध्यरात्रीनंतर अचानक तिथे कांहीतरी गडबड झाली आणि त्याला जाग आली. त्याने पाहिलं कीं धर्मशाळेच्या ओसरीवर एक प्रवासी खाली पडला होता, आणि त्याच्या तोंडातून फेस येत होता. तो प्रवासी तडफडत होता. एक काळा सांप सरसरत तिथून जाताना लोकांनी पाहिला होता.

तो साप या प्रवाशाला चावला होता हे चैतन्यच्या लक्षांत आले. त्याने लगेच आपल्या कपड्यांत लपवलेली ती औषधी वेल काढली, ती हातावर घेऊन कुस्करली आणि त्याचा रस पिळून तो त्या प्रवाशाच्या तोंडात घातला. पाहतापाहाता त्याचा काळवंडलेला चेहरा पालटायला लागला. त्याने कांही वेळानंतर डोळे उघडले. तो इसम दुसरा तिसरा कुणी नसून सुशांतनगराचा मुख्य प्रधान होता. नागरिकांचे प्रश्न समजावून घेण्यासाठी तो वेष बदलून तिथें आला होता, त्यावेळीं ही घटना घडली.

प्रधानाने चैतन्याचे आभार मानून त्याचे कौतुक केले. तो म्हणाला, "तू माझे प्राण वांचवले आहेस. मी कितीही केलं तरी तुझे हे उपकार मी फेडूं शकणार नाही. मी दरबारांत तुला चांगली नोकरी देववतो. चालेल ना?"

चैतन्यने कृतज्ञता व्यक्त करुन म्हटले, "मी एका महत्वाच्या कामासाठी भवानीपुरला जातो आहे. मी आपल्याला नंतर येऊन भेटेन." सकाळ



झाल्यावर तो भवानीपुरला गेला, गुरुवर्यांच्या भावाला भेटून त्यांची खुशाली विचारुन तो परत निघाला.

सूर्यास्त होईपर्यंत तो गुरुकुलांत पोचला. त्याने गुरुजींना सारी हकीगत सांगितली. गुरुजी फारच खूष झाले. ते म्हणाले, ''पुत्रा! तू मला परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल प्रश्न विचारला होतास ना? त्याचे उत्तर मी मधें न पडताच तुला परमेश्वराचे दर्शन झाले आहे, तुला भगवान दिसला.''

''मला दर्शन झालं? छे हो, मला कुठे वाटेत देवबिव कांहीही दिसलेला नव्हता.'' चैतन्य आश्चर्याने उद्गारला.

त्यावर नामदेवांनी हंसून उत्तर दिले, ''इथें, तिथें, आत्ता, नंतर, प्रत्येक ठिकाणी परमेश्वर आपल्याला दिसतो. पण एकाच रुपांत तो सीमित राहिलेला नसतो. फक्त त्या सर्वव्यापीची आठवण मात्र आपण ठेवायला हवी.''

गुरुजींचे बोलणे चैतन्याला समजले नाही. तो नुसताच त्यांच्याकडे पाहात राहिला. तेव्हां नामदेव पुढे म्हणाले, ''आता बघ, ज्या वृद्ध आंधळ्या आदिवासीने तुला विषमार वेलीची माहिती दिली, तो देव होता. त्या दाट अरण्यांत विहीरीची जरुर आहे हे जाणून ज्या व्यक्तीने ती विहीर खोदली असेल, ती व्यक्ती देवाचेच रुप होते. ज्याने तुझा प्राण वांचवला, त्या छोट्या सशाच्या शरीरांतही देवाचा अंश आहे! सांप चावल्यामुळे तडफडणाऱ्या प्रधानाला तू देवच वाटला असशील. कारण तू त्याला मरणाच्या दाढेतून वांचवलेस. तुझ्यांत देव आहे हे तुझ्या लक्षांत आले नसेल. इतक्या अनेक रुपांत देव तुझ्यासमोर आला, आणि त्याला पाहूनदेखील त्याच्या अस्तित्वाबद्दल अजून तुझ्या मनांत, संदेह आहे कां?''

गुरुवर्यांच्या बोलण्यामुळे चैतन्यच्या मनांत प्रकाश पडला. त्याला समजले कीं ज्याच्या मनांत दया, करुणा, सहानुभूति असते, त्यांच्या मनांत परमेश्वर वसतो. त्याने गुरुजींना साष्टांग दडवत घातले व घरी जाण्याची परवानगी मागितली.

त्यानंतर आपल्या आईवडिलांना घेऊन तो सुशांतनगरला गेला व मुख्यप्रधानाला भेटला. त्यांच्या मदतीने त्याला दरबारांत चांगली नोकरी मिळाली.



# खास बातम्या

## जागतिक नेत्यांमधे गांधीजी



ब्रिटिश रेड क्रॉस सोसायटीने जगांतल्या गेल्या साठ वर्षांतल्या नेत्यांमधे महात्मा गांधी आणि मदर टेरेसा, यांचा समावेश केला आहे. या निवडीत सुमारे दोन हजार ब्रिटिश नागरिकांनी भाग घेतला. दक्षिण आफ्रिकेचे नेते नेल्सन मंडेला यांना पहिला क्रमांक त्यांनी दिला आहे.

प्रिन्सेस डायनाला दुसरा क्रमांक, गायक बॉबजेल डॉफ याला तिसरा क्रमांक दिला. गांधीजी आणि मदर टेरेसा यांना चौथा व पांचवा क्रमांक या निवडीत मिळाला आहे.

## हे ''हलकं फुलकं'' वाचन नव्हे



भूतानवर एक बहुव्यापक पुस्तक एका जेवणाच्या टेबलाइतके मोठे असून त्याचे वजन १३० पौंड आहे. हे पुस्तक नुकतेच अमेरिकेंतल्या सीॲटलमधें दहा हजार डॉलर्सला विकले गेले. हे जगांतले सर्वांत मोठे पुस्तक आहे, असे प्रमाणपत्र गिनेस बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डसने दिले आहे. या पुस्तकाची रक्कम भूतानमधल्या शैक्षणिक कार्यक्रमांसाठी वापरली जाणार आहे. पुस्तकाचे

## वाचकांसाठी कथास्पर्धा
## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

**खालील गोष्ट वाचा:**



अर्जुनसिंगराजाच्या वाड्यांत शंकर हा राजाचा खास आचारी होता. एक दिवस राणीने त्याला बोलावले, "माझा भाऊ इथें येणार आहे आणि तो राजेसाहेबांबरोबर भोजन करील."

"मी फक्त महाराजांचे जेवण बनवीन." शंकरने सांगितलं.

राणीने लगेच त्याबद्दल राजाकडे तक्रार केली. "सरकार, खरं आहे ते. मी राणीसाहेबांना सांगितलं कीं मी फक्त आपल्यासाठी भोजन बनवीन." शंकर म्हणाला.

"ठीक आहे. समजा, मी तुला शंभर चांदीची नाणी जास्त पगार दिला, तर तू माझ्या मेव्हण्यासाठी स्वयंपाक करशील कां?" राजाने विचारलं.

आता त्या शाही आचाऱ्याने काय उत्तर दिले असेल त्याची कल्पना खालील मुद्दे लक्षांत ठेवून करा.

- जास्त पगाराचा मोह त्या आचाऱ्याला पडेल कां?
- आचारी आपल्या मताशी ठाम राहील कां?
- इतरांसाठी भोजन बनवायला शंकरला सांगतील कां?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : ३१ ऑक्टोबर, २००४**

**नांव** ............................................................ **वय** ....................

**जन्मतारीख** .................... **शाळेचे नांव** ....................................................

**घरचा पत्ता** ............................................................................................

..............................................................................................................

.............................................................................. **पिनकोड** ..............

**पालकांची सही** **स्पर्धकाची सही**

CHANDAMAMA INDIA LIMITED
82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097





# दयाळू

फुलवाडी गांवात पुरुषोत्तम नांवाचा एक व्यापारी राहात होता. त्याला सतरा वर्षांचा एक मुलगा होता. हा मुरारी अत्यंत कोमल मनाचा व दयाळू होता.

एकदा तो आळीतल्या मुलांबरोबर खेळायला गेला. परत आला तो त्याच्या अंगात सदरा नव्हता. खेळताना त्याच्या एक मित्राचा सदरा फाटला. तो अतिशय गरीब घरांतला होता व त्याला रडूं कोसळले. कारण त्याच्याकडे एकच सदरा होता. ते ऐकून मुकाट्याने मुरारीने त्याला आपला सदरा दिला आणि तो घरी आला.

हे कळले तेव्हां पुरुषोत्तम मुरारीला खूप रागावला. तो म्हणाला कीं व्यापाऱ्याच्या मनांत दया या गुणाला कधी जागा नसते!

तेव्हां मुरारीची आई पतीला म्हणाली, "त्याला कशाला रागावताय? तो कांही सुधारणार नाही. जर हा असाच वागत राहिला तर याच्या हातून व्यापारसुद्धां धड होणार नाही. त्याला एखाद्या गुरुजींची शिकवणी ठेवली तर बरे होईल."

पुरुषोत्तमला हा सल्ला रुचला नि पटला. मुरारीला घेऊन तो पंडित सुशर्मा यांच्या घरी गेला व त्यांना सांगितले, "ह्याला नोकरी करावी लागणार नाही. पण हा व्यापारी नीट कसा होईल, ते पाहायला हवं. दातृत्व हा गुण व्यापाराला योग्य नाही."

सुशर्माने हंसून म्हटले, "पुरुषोत्तमराव, मानवाला जे गुण आवश्यक आहेत, त्यांत दया ही अवश्य आहे. जो दुसऱ्याबद्दल दयाळू नसतो, तो मानव कसला? तो तर पाषाणहृदयी असतो. पण दया ही देखील अविचारीपणे दाखवता कामा नये, ती योग्य ठिकाणी हवी, हे खरेच!"

आणि सुशर्माकडे रोज सकाळी व संध्याकाळीं अभ्यासा-साठी मुरारी जायला लागला. एक दिवस सुशर्माने मुरारीला म्हटलं, "मुरारी, तू अगदी



मनापासून अभ्यास करतोस, ते मला फार आवडलं. तुझं मन किती कोमल आहे. पण कुणालाही मदत करताना, ती व्यक्ती त्या दयेला पात्र आहे कीं नाही, याची आधी नीट पारख करायला हवी असते.

तुला पुढे व्यापारी व्हायचं आहे. व्यापारी व्हायला प्रथम लागते गोड वाणी आणि कुशलता. तिथे दया, क्षमा, याला वाव नाही. दुसऱ्यांना मदत करायचा तुझा जो गुण आहे, तो मात्र तू पूर्णपणें विचार करुन नंतरच, हवी ती मदत करीत जा.''

मुरारीने लगेच विचारलं, ''पण गुरुजी, माझा व्यापार आणि दयाळूपणा, याचा आत्ता कसा काय संबंध आहे?''

''तुला ते कळेल लौकरच. पण आज तू माझं एक काम कर. सध्यां वैद्य वरदाचारी आम्हाला औषध देत आहेत. त्यांच्या घरी जाऊन आमची औषधे घेऊन ये. मी पाठवलंय म्हणून सांग त्यांना.'' गुरुजी म्हणाले.

मुरारी वरदाचारींच्या घरी गेला व त्यांना निरोप सांगितला. वैद्यबुवांनी सांगितलं, ''हे बघ, त्यांची औषधे बनवायला तासभर तरी लागेल. आलेले रोगी गेल्यानंतरच मी तुझे काम करुं शकेन.''

औषध घ्यायला आलेल्या प्रत्येक रुग्णाला वैद्य सांगत होते, ''मला रानांतून जडीबुट्टी, झाडपाला आणून देणारा एक लंगडा आहे. त्याच्या वडिलांना हृद्रोग आहे. त्यासाठी सोने आणि पारा वापरुन गोळ्या बनवायला लागतील. त्याचा बराच खर्च आहे. मला जमेल तितकी मदत मी करणार आहे. तुम्हीही त्याला जमेल तशी, थोडीफार मदत करता आली तर करा. तो अजून बाहेर उभा आहे.''

मुरारी आधीच दयाळू, त्याला त्या लंगड्या-बद्दल फारच करुणा वाटायला लागली. त्याने बाहेर येऊन पाहिले तर ओसरीवर एक माणूस काठीला धरुन उभा होता.

सारे रोगी परत गेले तेव्हां मुरारी वैद्यबुवांच्या-जवळ जाऊन म्हणाला, ''त्या लंगड्या माणसाला मदत म्हणून बहुतेक सर्व लोकांनी पैसे दिले. आत्ता माझ्याजवळ पैसे नाहीत. पण ही अंगठी तेवढी आहे. ती मी आपल्याला देतो. त्याच्या वडिलांसाठी औषध बनवायला या सोन्याचा उपयोग होईल.''



मुरारीची ही प्रतिक्रिया ऐकून वैद्यबुवा हंसायला लागले. त्यांनी खिडकीतून वाकून ''वीर'' अशी हांक मारली.

काठीच्या आधाराने तो लंगडा उभा होता, त्याने एकदम काठी ओसरीवर फेकली आणि तो झर्रकन आंत चालत आला. ते दृश्य पाहून मुरारी आश्चर्यचकित झाला.

तेव्हां वैद्याने त्याची पाठ थोपटत म्हटले, ''अरे, मीच हे नाटक केलं होतं. आता तुला कळलं ना, दयेच्या आडून कशी कमाई करता येते ते! तुझ्या वडिलांनी तुला ही अंगठी मोठ्या प्रेमाने दिली होती. आणि तू भावनेच्या आहारी जाऊन ही अंगठी एका लबाडाला द्यायला तयार झाला होतास कीं नाही?''

मुरारीने होकारार्थी मान डोलावली. वैद्याने पुढे त्याला म्हटले, ''माझा व्यवसाय लोकांच्या उपयोगी पडण्याचा आहे, तो माझा धर्म आहे. पण कधी कधी रोग्यांना बरे वाटावे, म्हणून मलाही खोटं बोलावं लागतं!''

सुशर्माच्या आईसाठी औषधाच्या पुड्या तयार होत्या. मुरारीच्या हातांत त्या देऊन वैद्याने सांगितलं, ''तू पुढे जो व्यापार करशील, तो मनापासून आणि श्रद्धेने कर. दयाळूपणा योग्य ठिकाणी अवश्य दाखव आणि नांव मिळव. या लंगड्याचं नाटक तुझ्या गुरुजींच्या सांगण्यानुसार आम्ही केलं होतं.''

औषधाच्या पुड्या घेऊन मुरारी सुशर्माच्या घरी परत गेला व त्यांना म्हणाला, ''गुरुजी, आता मला चांगलं कळून चुकलंय कीं माझ्या भावनाप्रधान स्वभावामुळे मी मागचा पुढचा विचार न करता मदत करीत असतो. पण आता मात्र योग्य व लायक व्यक्तीलाच यापुढें मदत करायची असे मी ठरवले आहे.''

मुरारीच्या विचारसरणींत झालेला हा बदल पाहून सुशर्माला अतिशय समाधान वाटले. त्याचा प्रयत्न सफल झाला होता. आणि पुरुषोत्तम व्यापाऱ्याला मुलाबद्दल वाटणारी चिंता दूर होणार होती.





थोरली सूनबाई चिडली. कारण तिच्या कामाला आधीच उशीर झालेला होता. त्यांतून तिच्या मनांत एक शंका झाली. ह्याच भिकाऱ्याने मागल्या शनिवारी घरांत येऊन सगळे जेवण तर संपवले नसेल? घरांतले पीठ, भाज्यादेखील बहुतेक ह्यानेच चोरल्या असतील कां? ती एकदम ओरडली, "अरे भामट्या! नक्की तूच आमच्या घरांतले पीठ, तेल नि भाज्या चोरुन नेल्या असल्या पाहिजेस. आत्ताच्या आत्ता इथून चालता हो पाहूं!"

भिकाऱ्याने हा आरोप नाकारीत म्हटले, "अहो बाई, मी खरंच चोर नाही. मी कशाला चोरी करीन? मला फक्त थोडे तेल द्या आणि एक भाकरी! तुमच्या सुखासाठी मी प्रार्थना करीन बघा!"

"मला तुझ्या प्रार्थनेची आणि आशिर्वादाची मुळीच गरज नाही, बरं कां!" तिने ठसक्यांत उत्तर दिले. आंत जाऊन तिने एक काठी आणली आणि ती त्या भिकाऱ्याला दाखवत ती म्हणाली, "आता जातोस कीं तुला हा बडगा दाखवून घालवायला हवं?"

"बाई, तुम्ही मला दम देताय होय? थांबा; जो स्वयंपाक आज ज्यांच्यासाठी तुम्ही बनवणार आहात, ते अन्न ते आज स्वीकारणार नाहीत." भिकाऱ्याने तिच्याकडे रोखून बघत म्हटले, आणि नंतर तो निघून गेला.

सूनबाईला वाटलं कीं हा एक वेडा असावा, म्हणून तिने त्याच्याकडे विशेष लक्ष दिले नाही. तिने स्वयंपाक केला आणि ती ह्या सर्व मंडळींची वाट बघत बसली. ते जेव्हां जेवायला बसले तेव्हां तिने भांड्यांवरची झांकणे काढली. आणि काय गोंधळ! एका भांड्यात सगळीकडे किडे वळवळत होते, दुसऱ्या भांड्यात माशा घोंगावत होत्या आणि तिसऱ्या भांड्यात तर मुंग्या आणि मुंगळे फिरत होते. तिने गळा काढला आणि रडतरडत ती स्वयंपाकघरांत धावली.

प्रसंगाचे गांभीर्य शेतकऱ्याच्या लक्षांत आले. "आपल्यावर देवाचा कोप झालेला आहे. आपण कुठेतरी चुकलो आहोत, त्याचा अपमान केला आहे. नाहीतर गेल्या शनिवारी आणि आज, असं अघटित कां घडावं? आपण कांहीतरी उपाय यासाठी करायलाच हवा!"

शेतकरी थोरल्या मुलाला घेऊन दुकानांत गेला. पीठ, भाज्या, तेल वगैरे सामान त्यांनी विकत आणले. आणि त्या तिघीजणींना स्वयंपाक करायला सांगितला.

नंतरच्या शनिवारी, पुन्हां धाकट्या सुनेवर घरी



राहून स्वयंपाक करायची वेळ आली. ती स्वयंपाकाला सुरवात करणार तोच तो ओळखीचा आवाज पुन्हां ऐकू आला. तो भिकारी तेलासाठी याचना करीत होता. धाकटी सूनबाई बाहेर आली आणि तिने विचारले, "कांही दिवसांपूर्वी तू इथें आला होतास आणि मी तुला तेल दिले होते. अजून तुझ्या अंगावरचे पुरळ आणि खाज कमी झाली नाही कां?" ती आंत गेली आणि तिने तेलाचे भांडे आणले. त्याच्या हाताच्या खळग्यांत तिने तेल ओतले आणि ती म्हणाली, "तू तेल लाव आणि जरा वेळाने तळ्यावर जाऊन आंघोळ कर. परत आलास कीं मी तुला जेवायला देते थोडंसं!"

त्याने येताना पुन्हां पानांची पत्रावळ करुन आणली. तिने दिलेले जेवण तो जेवला आणि त्याने तिला आशीर्वाद दिला, "तुला नि तुझ्या नवऱ्याला दीर्घायुष्य लाभो!"

तिथून जाताजाता, त्याने ती पत्रावळ पुन्हां वळचणीला खोंचली, आणि तो चालता झाला. त्याचे हे कृत्य सुनेने पाहिले, परंतु ती कांहीही बोलली नाही.

संध्याकाळीं, तिने शिजवलेले स्वादिष्ट भोजन सर्वांनी चवीने खाल्ले. शेतकरी नंतर म्हणाला, "हे सगळं विचित्र वाटतंय. एका शनिवारी, अन्न नाहीसं होतं. नंतरच्या शनिवारी, अन्नांत अळ्या, किडे होतात! आणि आज जर साधे जेवण चविष्ट बनलंय. देवाचा राग आता गेलेला दिसतोय."

धाकटी सून सर्वांना वाढून नंतर जेवायला बसली. जेवताना तिने त्या भिकाऱ्याने दोन्ही शनिवारी येऊन तेल मागितले, ती गोष्ट सांगितली. तिने दिलेले जेवण जेवल्यानंतर त्याने ती पत्रावळ बाहेरच वळचणीला खोंचल्याचे सांगितले.

शेतकरी लगेच उठला आणि त्या पत्रावळी कुठे ठेवल्या होत्या तिथें पाहायला गेला. त्या तिथेंच होत्या. शेतकऱ्याने एक पत्रावळ ओढली, तर त्यांत हिरेमाणकें भरलेली होती. त्याने दुसरी पत्रावळ खाली काढली, तर त्यांत सोन्याच्या मोहरा भरलेल्या होत्या. शेतकरी, त्याचे मुलगे व सुना, सगळेजण थक्क होऊन बघत राहिले. थोरल्या आणि मधल्या सुनेला त्या भिकाऱ्याची आठवण झाली. दोघीजणींनी त्याला रागावून हांकलून दिले होते.

शेतकरी म्हणाला, "मला वाटतं कीं भिकाऱ्याचे रूप घेऊन शनीश्वर देवच आपल्या घरी आला होता. आता तो प्रसन्न झालेला आहे."

त्यांचे शेजारीपाजारी व इतर गांवकऱ्यांना ही गोष्ट कळली, आणि तेव्हांपासून शनीश्वराला शनिवारी तेल वाहाण्याची प्रथा सुरुं झाली. कारण शनिदेवाची पूजा शनिवारी केली जाते.





थोरली सूनबाई चिडली. कारण तिच्या कामाला आधीच उशीर झालेला होता. त्यांतून तिच्या मनांत एक शंका झाली. ह्याच भिकाऱ्याने मागल्या शनिवारी घरांत येऊन सगळे जेवण तर संपवले नसेल? घरांतले पीठ, भाज्यादेखील बहुतेक ह्यानेच चोरल्या असतील कां? ती एकदम ओरडली, ''अरे भामट्या! नक्की तूच आमच्या घरांतले पीठ, तेल नि भाज्या चोरुन नेल्या असल्या पाहिजेस. आत्ताच्या आत्ता इथून चालता हो पाहूं!''

भिकाऱ्याने हा आरोप नाकारीत म्हटले, ''अहो बाई, मी खरंच चोर नाही. मी कशाला चोरी करीन? मला फक्त थोडे तेल द्या आणि एक भाकरी! तुमच्या सुखासाठी मी प्रार्थना करीन बघा!''

''मला तुझ्या प्रार्थनेची आणि आशिर्वादाची मुळीच गरज नाही, बरं कां!'' तिने ठसक्यांत उत्तर दिले. आंत जाऊन तिने एक काठी आणली आणि ती त्या भिकाऱ्याला दाखवत ती म्हणाली, ''आता जातोस कीं तुला हा बडगा दाखवून घालवायला हवं?''

''बाई, तुम्ही मला दम देताय होय? थांबा; जो स्वयंपाक आज ज्यांच्यासाठी तुम्ही बनवणार आहात, ते अन्न ते आज स्वीकारणार नाहीत.'' भिकाऱ्याने तिच्याकडे रोखून बघत म्हटले, आणि नंतर तो निघून गेला.

सूनबाईला वाटलं कीं हा एक वेडा असावा, म्हणून तिने त्याच्याकडे विशेष लक्ष दिले नाही. तिने स्वयंपाक केला आणि ती ह्या सर्व मंडळींची वाट बघत बसली. ते जेव्हां जेवायला बसले तेव्हां तिने भांड्यांवरची झांकणे काढली. आणि काय गोंधळ! एका भांड्यात सगळीकडे किडे वळवळत होते, दुसऱ्या भांड्यात माशा घोंगावत होत्या आणि तिसऱ्या भांड्यात तर मुंग्या आणि मुंगळे फिरत होते. तिने गळा काढला आणि रडतरडत ती स्वयंपाकघरांत धावली.

प्रसंगाचे गांभीर्य शेतकऱ्याच्या लक्षांत आले. ''आपल्यावर देवाचा कोप झालेला आहे. आपण कुठेतरी चुकलो आहोत, त्याचा अपमान केला आहे. नाहीतर गेल्या शनिवारी आणि आज, असं अघटित कां घडावं? आपण कांहीतरी उपाय यासाठी करायलाच हवा!''

शेतकरी थोरल्या मुलाला घेऊन दुकानांत गेला. पीठ, भाज्या, तेल वगैरे सामान त्यांनी विकत आणले. आणि त्या तिघीजणींना स्वयंपाक करायला सांगितला.

नंतरच्या शनिवारी, पुन्हां धाकट्या सुनेवर घरी



राहून स्वयंपाक करायची वेळ आली. ती स्वयंपाकाला सुरवात करणार तोच तो ओळखीचा आवाज पुन्हां ऐकूं आला. तो भिकारी तेलासाठी याचना करीत होता. धाकटी सूनबाई बाहेर आली आणि तिने विचारले, ''कांही दिवसांपूर्वी तू इथें आला होतास आणि मी तुला तेल दिले होते. अजून तुझ्या अंगावरचे पुरळ आणि खाज कमी झाली नाही कां?'' ती आंत गेली आणि तिने तेलाचे भांडे आणले. त्याच्या हाताच्या खळग्यांत तिने तेल ओतले आणि ती म्हणाली, ''तू तेल लाव आणि जरा वेळाने तळ्यावर जाऊन आंघोळ कर. परत आलास कीं मी तुला जेवायला देते थोडंसं!''

त्याने येताना पुन्हां पानांची पत्रावळ करुन आणली. तिने दिलेले जेवण तो जेवला आणि त्याने तिला आशीर्वाद दिला, ''तुला नि तुझ्या नवऱ्याला दीर्घायुष्य लाभो!''

तिथून जाताजाता, त्याने ती पत्रावळ पुन्हां वळचणीला खोंचली, आणि तो चालता झाला. त्याचे हे कृत्य सुनेने पाहिले, परंतु ती कांहीही बोलली नाही.

संध्याकाळीं, तिने शिजवलेले स्वादिष्ट भोजन सर्वांनी चवीने खाल्ले. शेतकरी नंतर म्हणाला, ''हे सगळं विचित्र वाटतंय. एका शनिवारी, अन्न नाहीसं होतं. नंतरच्या शनिवारी, अन्नांत अळ्या, किडे होतात! आणि आज जर साधे जेवण चविष्ट बनलंय. देवाचा राग आता गेलेला दिसतोय.''

धाकटी सून सर्वांना वाढून नंतर जेवायला बसली. जेवताना तिने त्या भिकाऱ्याने दोन्ही शनिवारी येऊन तेल मागितले, ती गोष्ट सांगितली. तिने दिलेले जेवण जेवल्यानंतर त्याने ती पत्रावळ बाहेरच वळचणीला खोंचल्याचे सांगितले.

शेतकरी लगेच उठला आणि त्या पत्रावळी कुठे ठेवल्या होत्या तिथें पाहायला गेला. त्या तिथेंच होत्या. शेतकऱ्याने एक पत्रावळ ओढली, तर त्यांत हिरेमाणकें भरलेली होती. त्याने दुसरी पत्रावळ खाली काढली, तर त्यांत सोन्याच्या मोहरा भरलेल्या होत्या. शेतकरी, त्याचे मुलगे व सुना, सगळेजण थक्क होऊन बघत राहिले. थोरल्या आणि मधल्या सुनेला त्या भिकाऱ्याची आठवण झाली. दोघीजणींनी त्याला रागावून हांकलून दिले होते.

शेतकरी म्हणाला, ''मला वाटतं कीं भिकाऱ्याचे रूप घेऊन शनीश्वर देवच आपल्या घरी आला होता. आता तो प्रसन्न झालेला आहे.''

त्यांचे शेजारीपाजारी व इतर गांवकऱ्यांना ही गोष्ट कळली, आणि तेव्हांपासून शनीश्वराला शनिवारी तेल वाहाण्याची प्रथा सुरुं झाली. कारण शनिदेवाची पूजा शनिवारी केली जाते.





# पंचायुध

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधि-सत्वांनी युवराज म्हणून अवतार धारण केला. बारशाच्या दिवशी निरनिराळ्या देशातून थोर विद्वान व अनेक ज्योतिषी आले. ते राजाला म्हणाले - ''आपला हा मुलगा कोणी थोर महापुरुष दिसतो आहे! पंचायुधे धारण करून हा जगज्जेता होईल आणि शूर पराक्रमी म्हणून याचा नावलौकिक होईल!'' म्हणून मुलाचे नांव पंचायुध असेच ठेवण्यांत आले.

कांही काळ लोटला. मुलाला समजूत येऊ लागली, तेव्हां राजाने त्याला गांधार देशाच्या तक्षशिला नगरीतील एका सुप्रसिद्ध गुरुकुलात विद्याभ्यासासाठी पाठविले.

पंचायुधने तक्षशिला येथील गुरुकुलात कांही काळ अभ्यास केला व सर्व विद्यांमधे तो पारंगत झाला. गुरुकुलांतून समावर्तन संस्कार झाल्यावर घरी निघतेवेळी कुलगुरूने शिष्याला आशीर्वाद देऊन पांच आयुधे दिली. गुरुवर्यांचा निरोप घेऊन पंचायुध काशीला परत निघाला.

पंचायुधाला वाटेवर एक भयंकर अरण्य लागले. त्या अरण्यांतून चालत असतां पंचायुधाला वाटेत कांही ऋषी व मुनी भेटले. ते म्हणाले - ''बाबा रे, तुला पाहिले तर तू वयाने फारच लहान दिसतो आहेस! या रानांत रोमांच नावाचा एक भयंकर राक्षस राहतो आहे. तू त्याच्या दृष्टीस पडलास तर तो तुला जिवंत सोडणार नाही. म्हणून तू या वाटेने न जाता दुसऱ्या वाटेने जा.''

पराक्रमी पंचायुधाच्या मनावर मुनींच्या त्या सल्ल्याचा काही एक परिणाम झाला नाही. त्याने त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले व तो त्याच अरण्यमार्गे पुढे निघाला. वाटेत एका जागी त्याला ताडामाडाएवढा उंच व अवाढव्य देहधारी रोमांच राक्षस भेटला.

तो राक्षस दिसायला भयंकरच होता. त्याचे डोके हत्तीसारखे मोठे होते. त्याला आग पाखडणारे डोळे होते आणि हत्तीच्या सारखेच दोन मोठे सुळे देखील होते. शिवाय सर्व अंगावर अस्वलासारखे लांब लांब केसही होते.



रोमांच राक्षस पंचायुधाच्या वाटेवर आडवा उभा राहून हुंकारला - ''कोण रे तू? कोठे निघालास? उभा रहा! या जंगलात पाऊल टाकायला तुझी छाती कशी झाली? माझे नांव ऐकूनच लोक थरथर कांपतात. मी तुला आतां गिळतो!''

पंचायुध जरासुद्धा न भितां म्हणाला - ''राक्षस राजा, मी सर्व कळल्यावरच या वाटेने आलो आहे. खबरदार, तू जवळ आलास तर!'' असे दरडावून पंचायुधने धनुष्यावर बाण चढवून नेम धरला व राक्षसावर सोडला.

तो बाण राक्षसाने अंगात घातलेल्या कातड्याला लागला, राक्षसाला लागलाच नाही. तेव्हां पंचायुधाने बाणामागून बाण सोडून रोमांचावर शरवृष्टीच केली. परंतु तो प्रयत्नही निष्फळ ठरला. शेवटी पंचायुधाने विषारी बाण सोडले. परंतु त्यामुळे सुद्धां राक्षसाचे काहीही नुकसान झाले नाही.

आतां मात्र राक्षस मोठ्याने हुंकारला व पंचा-युधावर धावला. पंचायुधाने आपली तलवार उपसली व राक्षसावर वार केला. परंतु राक्षस जागचा हललासुद्धां नाही.

तेव्हां पंचायुध राक्षसाला म्हणाला - ''तू आपल्या मूर्खपणाने मला ओळखलेले दिसत नाहीस. माझं नाव पंचायुध आहे, लक्षांत असू दे. मी या अरण्यांत पाऊल टाकतांना फक्त आपल्या आयुधांवरच अवलंबून राहून इकडे आलो नाही!'' असे म्हणत पंचायुधने मूठ आवळून राक्षसाला एक ठोसा दिला. राक्षस जागचा हलला नाही.

राक्षस जोराने हंसला व म्हणाला - ''पोरा! तुझे हे धाडस पाहून तू कोणी सामान्य माणूस असशीलसे मला वाटत नाहीं. माझ्यासारख्या प्रलयभयंकराशी युद्ध करायचे साहस तू दाखविलेस. इतर लोक मला नुसते पाहूनच बेशुद्ध होऊन पडतात. मग तुला माझी भीति न वाटण्याचे काय कारण रे?''



"भय वाटण्याचे कारणच कां असावे? जो जन्मतो त्याला मरण हे असतेच! शिवाय माझ्या अंगात वज्रायुधासारखं एक खड्ग आहे. ते खड्ग म्हणजे ज्ञान. तू मला गिळलेस, तर ते खड्ग तुला उभे चिरून काढील!"

राक्षस एक दोन क्षणच विचार करीत राहिल्यावर म्हणाला - "पोरा, तू म्हणालास त्यांत कांही अर्थ असावा असे मला वाटूं लागले आहे! ते कांही असो, एवढे खरे की तू निर्भय आहेस, आणि शूर पराक्रमीही आहेस. मी तुझ्यासारख्याला गिळायचं म्हटलं तरी कदाचित् पचवू शकणार नाही. आतां तू तुला जिकडे जावयाचे असेल तिकडे खुशाल जा."

पंचायुधरूप अवतार घेतलेल्या बोधिसत्वांनी रोमांच राक्षसाला आशीर्वाद दिला व म्हटले - "तू मला सोडलेस, ठीकच झालं. परंतु तुझं पुढे काय? तू कितीदा या जगांत जन्म घेऊन कुकर्मे करीत निकृष्ट जीवन जगत राहिला आहेस, आणि अज्ञान अंधकारांत कोणास ठाऊक, किती काळ भटकत राहिला आहेस? तू आणखी कितीही दिवस नाहीं, तर युगानुयुगे जिवंत राहिलास, तरी तुला गती नाही का?"

"तर मग महात्मन्, या अज्ञानांधकारातून बाहेर निघायला कांही मार्ग आहे का? असला तर कृपा करुन सांगा." राक्षसाने विचारले.

"तू या अरण्यांत राहून अरण्यमार्गाने येणाऱ्या-जाणाऱ्यांचा वध करुन त्यांना खातोस व अशा तऱ्हेने तू आपले पाप वाढवीत आहेस. तुझी पापकर्मे जितकी वाढत जातील, तुला तितकाच जास्त काळ हा निकृष्ट राक्षसजन्मच मिळणार, तुला मोक्ष लाभ मिळणेच शक्य नाही. तुला उत्तम मानवयोनीतच जन्म हवा असेल तर तू पापकृत्ये करण्याचे सोडून दे!" असा उपदेश करून बोधिसत्वांनी त्या राक्षसाला मानवांचे हित व्हावे, यासाठी त्याने पालन करण्यालायक व पुण्यप्राप्तीस आवश्यक असलेली पांच सूत्रे सांगितली, व अधम मानवत्व आणणारी पांच तंत्रे सांगितली.

त्या दिवसापासून रोमांच राक्षसाने आपली राक्षसी कृत्ये सोडली आणि तो त्या अरण्यमार्गे येणाऱ्या लोकांचा अतिथि-सत्कार करू लागला आणि धर्मबुद्धी नांवे प्रसिद्ध झाला.

अशा तऱ्हेने बोधिसत्वांच्या उपदेशामुळे भयंकर राक्षस देखील सन्मार्गाने चालू लागला.







# विष्णु पुराण

श्रीमतीच्या स्वयंवराला अनेक देशांचे राजे त्रिलोकाचे प्रमुख हजर होते. विष्णूचे रूप घेऊन नारदाने स्वयंवराच्या मांडवात पाऊल टाकताच सर्व खदखदां हंसू लागले. आपले तोंड माकडा-सारखे बदलले असल्याचे कळल्यावर नारदाच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली.

श्रीमतीने विष्णूचे स्मरण केले त्याबरोबर विष्णु प्रकट झाला. श्रीमतीने विष्णूला वरमाळा घालून त्याला वरले आणि वैकुंठलोकी गेली.

ते पाहून नारद जास्तच चिडला आणि पर्वताबरोबर तो अंबरीषावर संतापला. आपण विचारले तेव्हां श्रीमतीला विष्णूस दिल्याबद्दल अंबरीषाचा सर्वनाश करण्याचे ठरवून त्याला शाप द्यायला तयार झाला. तेव्हां विष्णूचे सुदर्शन चक्र त्याच्या पाठीस लागले.

पर्वत व नाद दोघे वैकुंठलोकी धावले. तेथे श्रीमतीसह विष्णूला पाहून नारद जास्तच भडकला व म्हणाला - "तू सुद्धा श्रीमतीपासून म्हणजे आपल्या बायकोपासून निराळा होऊन विरहव्यथेने विलाप करशील! मला माकडाचे तोंड देऊन तू फसविलेस. तर तुला त्या माकडांचीच मदत घ्यावी लागेल!" या शब्दात नारदाने विष्णूला शाप दिला.

नारदाचा तो शाप ऐकून विष्णूने फक्त स्मित केले. श्रीमती लक्ष्मीचे रूप घेऊन आली. जे घडले त्याबद्दल लज्जित नारदाने व पर्वताने विष्णूचे चरण पकडले.

नारदाने आपल्या अश्रूंनी विष्णूचे चरण धुतले आणि शाप देऊन पोरखेळ केल्याबद्दल तो दुःख करु लागला. तेव्हां विष्णू नारदाच्या डोक्यावर हात ठेवून म्हणाला - "तू त्रिकालवेत्ता आहेस. तुझ्या मुखांतून जे शब्द बाहेर पडले आहेत ते



अमोघ आहेत. तुझ्या तोंडून जो शाप बाहेर पडला तो माझ्याच संकल्पाने! मी रामावतार घेईन ते लोककल्याणार्थच होणार!''

तेव्हांपासून अंबरीष राजाला कोणाकडूनही तसा त्रास होणार नाही, व सुदर्शन चक्र त्याच्या रक्षणार्थ सतत हजर राहील, असे विष्णूने सांगितले.

दुर्वास ऋषींना तपोबलाबरोबर रागही तेवढाच जास्ती होता. एकदां ते आपल्या आश्रमांतून निघत असताना आनंदातिरेकाने विष्णूचे स्तोत्र गात नारद समोर आला.

''ओ हो, नारद वाटतं! कळ लावून कोठेतरी भरपूर पोटपूजा करून घेतलेली दिसते आहे!'' या शब्दांत नारदांची थट्टा केली दुर्वास ऋषींनी.

नारदाने डोळे उघडून तीनतीनदां वाकून दुर्वास ऋषींना नमस्कार करून म्हटले - ''तसं कांही नाही, मुनीवर्य! विष्णुभक्ताला पाहून मला परमानंद होतो! मी देहभान विसरून जातो. मी आतांच अंबरीष राजाला भेटून परत येतो आहे!''

''अंबरीष इतका मोठा भक्त आहे का?'' दुर्वास ऋषींनी चकित होऊन विचारले.

''होय, महामुने! विष्णूचा कृपापात्र असा तो थोर राजर्षी भक्त आहे. एकादशी व्रत व द्वादशीचे पारणे, हे त्याला आपल्या प्राणापेक्षांही जास्त प्रिय आहे!'' नारद म्हणाला.

''नारदा, त्या राजाची एवढी मोठी स्तुती करतो आहेस?'' दुर्वासांनी विचारले.

''त्याला भेटा म्हणजे कळेल की मी ही खोटी स्तुती करीत नाही. तुमच्यासारख्या थोर मुनिवर्यांनी त्याच्या घराला पावन केले तर त्याचा जन्म धन्य होईल. मी म्हणतो ते सत्य तर होईलच, तो आणखी जास्त स्तुतीला पात्र ठरेल!'' नारद नारायण नामाचा जप करीत पुढे निघून गेला.

नारद म्हणाला ते ऐकून दुर्वासाला जणूं कांही आव्हानच मिळाले. ते सरळ अंबरीष राजाकडे निघाले.

दुर्वास ऋषी आले तेव्हां एकादशी व्रत संपवून अंबरीष राजा द्वादशीचे पारण करण्याच्या तयारीत होता. राजाला परमानंद झाला. त्याने मुनिवर्यांची पादपूजा केली व द्वादशीच्या पारणे प्रसंगी जेवायचे निमंत्रण दिले.

नदीवर स्नानसंध्यादी आटोपून येतो असे सांगून दुर्वास स्नानाला गेले. बराच वेळ झाला तरी परतले नाहीत. द्वादशी संपण्याची घडी जवळ येत होती. द्वादशीला पारणें केले नाही तर व्रतभंग होण्याची भीती वाटू लागली. अतिथी अभ्या-



गतांच्या आधी कांही खाणे म्हणजे आचाराविरुद्ध होते.

तेव्हां राजगुरुने ''पाण्याचे कांही थेंब प्राशन केल्यास व्रतभंग होणार नाही आणि पाहुण्यांना सोडून जेवल्याचा दोषही लागणार नाही.'' असे सांगितलें तेव्हां राजाने जलप्राशन करून द्वादशीचे पारणें केले.

त्याच वेळी द्वादशी संपून त्रयोदशी सुरुं झाल्याचे माहीत असूनही दुर्वास ऋषी मुद्दाम उशिरां आले व राजाने द्वादशीचे पारणे केल्याचे कळतांच संतापले. त्यांनी आपली जटा सोडली आणि क्रुद्ध होऊन म्हणाले -

''ए राजाधमा! विष्णुभक्त म्हणून नाटक करतोस आणि अतिथि अभ्यागताचा अपमान करतोस का? माझाच अपमान करायला तू निघालास. तुला यापुढे जिवंत राहायला तुझ्याजवळ किती प्राण आहेत रे? माझे नांव ऐकून त्रिलोक आणि त्रिमूर्ती थरथर कापतात. माझा शाप हा अमोघ आहे! तुला पापात्म्याची गति प्राप्त होवो!'' ते ऐकून अंबरीष राजा दुर्वासांच्या चरणांवर लोळण घालून म्हणाला - ''ऋषीवर्या! व्रतभंग होऊ नये यासाठी मी फक्त जलप्राशन केले. मला क्षमा करा, अशी विनंती करतो!''

दुर्वासांनी अंबरीषाच्या डोक्याला लाथेने मारले व म्हणाले - ''दुर्वासाच्या शब्दकोशात 'क्षमा' हा शब्दच नाही! भक्ती कीं तपश्चर्या, दोन्हींत कोणती थोर, हे तू आतां स्वतःच पाहशील!''

दुर्वासांच्या तपश्चर्येचा महिमा त्यांच्या जटेत गुप्तरूपे असतो. त्यांनी एक लांबशी बट उपटून दुसऱ्या हाताने योगदंड घेतला आणि ती



बट झाडली. त्या बटेतून ठिणग्या बाहेर आल्या आणि त्याच्या पाठोपाठ काळा धूर निघून तो आकाशाला जाऊन भिडला. त्या धुरांतून एक भयंकर कृत्या निघाली.

ती कृत्या गरजली आणि अंबरीषाला गिळायला आपली भयंकर जीभ काढून पुढे सरसावली. त्या पाठोपाठ विष्णूच्या कृपेने त्याचे सुदर्शन चक्र दुर्वास ऋषींच्या आणि त्या कृत्येच्या पाठीस लागले. त्याने त्या कृत्येचा संहार केला. तिचे तुकडे तुकडे झालेले पाहून दुर्वास ऋषी भयकंपित झाले.

कृत्येचा संहार केल्यावर सुदर्शन चक्र दुर्वास ऋषींवर धावले.

दुर्वास ऋषींनी आणखी एक बट आपल्या जटेतून उपटली. त्या बरोबर दुर्वास ऋषींच्या रक्षणार्थ वज्राचा एक पर्वतच उभा राहिला.



सुदर्शन चक्राने त्या पर्वताच्या ठिकऱ्या उडविल्या आणि ते दुर्वासावर धावले.

दुर्वासाने आणखी एक बट उपटून सुदर्शन चक्रावर टाकली. त्यासरशी बर्फाचा एक डोंगरच मधे उभा राहिला. सुदर्शन चक्रांतून निघालेल्या ज्वाळांनी तो पर्वत विरघळून गेला.

दुर्वास ऋषी पळूं लागले, तेव्हां सुदर्शन चक्राचा ताप असह्य होऊन त्यांची जटाच भस्म झाली. अशा तऱ्हेने दुर्वास ऋषींची सर्व तपःशक्ती नष्ट झाली.

डोंगर, पर्वत, नदी आणि ओढे पार करून दुर्वास ऋषी धावत पळत होते. त्यांच्या पाठीस सुदर्शन चक्र लागले होते. मुनिवर्यांना त्याने त्रिलोकाचे भ्रमण करविले. दुर्वास ऋषी ब्रह्मलोकात पळत येत असतां नारदाने त्यांना पाहिले व खदाखदां हंसून तो म्हणाला - ''अहो, दुर्वास ऋषीच ना? कोठे पळतां आहां?'' परंतु त्यांनी त्याचे उत्तर दिलेच नाही. पाठीस लागलेल्या सुदर्शन चक्राकडे बोट दाखवून ते पुढे पळतच राहिले आणि ब्रह्मदेवासमोर येऊन त्यांनी साष्टांग नमस्कार घातला.

''मी विष्णूच्या नाभिकमलातून जन्मलो, मी काय करूं शकणार? मी सुदर्शन चक्रापासून तुझे संरक्षण करू शकेन, असे तुला कसे काय वाटले, दुर्वासा?'' ब्रह्मदेवाने विचारले.

''तू ब्रह्मदेव म्हणून मी आलो, तर तुझा एवढाच का पराक्रम? माझे रक्षण करायला तो महादेव शंकर आहे रे!'' ऋषी म्हणाले.

''होय, होय रे दुर्वासा! ते बरोबर आहे. तुला कैलासलोकी जितके लवकर जाता येईल तितके लवकर जा.'' ब्रह्मदेवाने सांगितले.

कैलासलोकी जाऊन दुर्वासाने शंकराच्या पायधरण्या केल्या की कसेही करून रक्षण कर!

''ते सुदर्शनचक्र विष्णूचे आहे, त्याला अडवून त्याच्याशी वितुष्ट आणू म्हणतोस का? तू जो अहंकार दर्शविलास त्याचे तुला उत्तर मिळणार नाही म्हणतोस का? जा! जा!'' शंकर म्हणाला.

दुर्वास ऋषी वैकुंठलोकी गेले आणि विष्णूसमोर साष्टांग प्रणिपात करून म्हणाले - ''आपले हे सुदर्शनचक्र मागे घे!''

''अंबरीषाच्या रक्षणाची जबाबदारी सुदर्शन चक्रावर मी केव्हांच टाकली होती. तेव्हां आतां मी काय करूं म्हणतां ऋषिवर्य? तुम्ही अंबरीषाकडेच जाऊन त्याला सुदर्शनचक्र मागे घ्यायला सांगा!'' विष्णू म्हणाला.



दुर्वास हताश होऊन उठले. त्यांचा अहंकार लयाला गेला. त्यांचे मुंडन तर आधीच झाले होते. त्यांचे सर्व तपोबल पूर्णपणे नष्ट झाले होते. भक्तीसमोर तपोबल कुचकामाचे असल्याचा प्रत्यय आला. शेवटी अंबरीष राजाकडे ऋषी निघाले. चक्र शांतपणे पाठीमागून जात होते. दुर्वास ऋषी अंबरीषाचे पाय धरायला वाकत असतां अंबरीषाने मध्येच त्यांना थांबविले व सुदर्शन चक्राला ''थांब'' म्हणून खूण केली. चक्र मागे फिरले व अदृश्य झाले.

विष्णूच्या अग्रगण्य शिष्यांमध्ये अंबरीषाने नांव चिरस्थायी झाले.

सूर्यवंशी राजांत गाधी हा एक प्रमुख राजा होता. गाधीचा मुलगा तोच विश्वामित्र. त्यांनी कृताश्वजवळ धनुर्विद्या शिकून घेतली होती. त्यांनी अनेक अस्त्रे संपादन केली.

विश्वामित्र गादीवर बसल्यावर एकदां वशिष्ठ ऋषींच्या आश्रमांत गेले. वशिष्ठ ऋषींकडे एक होमधेनू होती. तिच्या कृपाप्रसादाने त्यांनी विश्वामित्राचे व त्याच्याबरोबर आलेल्या सर्व सरदारांचे उत्तम आदरातिथ्य केले.

''मी दहा लक्ष धेनू देतो, मला ती होमधेनू द्या.'' विश्वामित्राने वसिष्ठांजवळ विनंती केली. वसिष्ठ ऋषींनी नकार दिला.

विश्वामित्र बळजबरीने आपल्या सैन्याच्या मदतीने त्या गाईला ओढून नेऊ लागले तेव्हां वसिष्ठांनी आपल्या तपोबलाने गाईच्या अंगातून अनेक शबर योद्धे निर्मिले.

त्या शबर योद्ध्यांनी विश्वामित्रांच्या सैन्याचा संहार केला आणि त्यांना पळवून लावले.



राजा होऊन राज्य करण्यापेक्षा तपश्चर्या करून थोरपण मिळविणे जास्त श्रेयस्कर, असा विचार करून विश्वामित्रांनी सिंहासन सोडले व अनेक वर्षे घोर तपश्चर्या केली आणि वसिष्ठ ऋषी इतकाच थोर असल्याचे म्हणविले.

तेव्हांपासून विश्वामित्र वसिष्ठ ऋषींहून थोर असल्याचे म्हणविण्यासाठी चढाओढ करू लागला.

रावणाचे अनुयायी आर्यावर्तात येऊन ऋषीमुनींच्या आश्रमांत शिरून त्यांच्या होम आदि धार्मिक कार्यात विघ्नें आणू लागले. ऋषी व मुनींना त्रास देऊ लागले. आश्रमांना आग लावू लागले.

विश्वामित्रांनी एक मोठा यज्ञ करण्याचे ठरविले. मारीच, आणि सुबाहु राक्षस तो यज्ञ होऊ नये यासाठी विघ्नें आणू लागले. ताटका नावाची राक्षसीण ही यज्ञ विध्वंस करू लागली.

विश्वामित्रांना यज्ञकार्यात विघ्ने येत असलेली पाहून फार काळजी वाटली व ते हिमालय पर्वतात सिद्धाश्रमात जाऊन समाधी धरून बसले.

त्या समाधीत विश्वामित्रांना विष्णूने रघुवंशात जन्म घेऊन रामरूपे अवतार धारण केला असल्याचे कळले. लोककल्याण करण्यासाठी अवतार धारण करणाऱ्याला वसिष्ठ ऋषींनी कितीही शास्त्रविद्या शिकविली तरी ती राक्षसांचा संहार करायला उपयोगी पडणार नाही. शस्त्रास्त्रविद्या, धनुर्विद्या शिकून घेणे आवश्यक आहे! ती विद्या शिकवील असा गुरु रामाला हवा. रामाला अस्त्रविद्येचा उपदेश करण्याची शक्ती विश्वामित्राकडे होती.

विश्वामित्रांना समाधी धरून बसले असतां लक्ष्मीने सीता या नांवें जनकराजाकडे जन्म घेतला असल्याचेही दिसले. सीता व राम यांचा विवाह झाला पाहिजे.

रामाच्या हातीच आपले यज्ञकार्य निर्विघ्न पार पडू शकेल. आपल्याला माहीत असलेली सर्व शस्त्रास्त्रविद्या रामाला शिकवून आपण त्याला राक्षसांचा संहार करायला तयार केले पाहिजे अशी प्रेरणा विश्वामित्र ऋषींना झाली. ते रामाला घेऊन येण्यासाठी अयोध्येला निघाले.







# भुतांची पिशवी

एका श्रीमंत जोडप्याला जिन-हो नावाचा एकुलता एक मुलगा होता. जिन-होचे संगोपन करायला त्याच्या आईवडिलांनी एक वयस्कर नोकर ठेवला होता. त्या नोकराचे नांव होते वान-क्यून. त्याच्याकडे गोष्टींचा खजिनाच होता. कांही गोष्टींमधे भयानक विषारी साप होते, क्रूर वाघ सिंह होते, तर कांही कांही गोष्टींत सुंदर राजकन्या, सुस्वभावी पऱ्या, धाडसी नायक आणि दयाळू राजेराण्याही असत.

पण वान-क्यूनच्या प्रत्येक गोष्टींत एखादे तरी भूत असे. जिन-होला या गोष्टी ऐकायला अतिशय आवडायच्या. म्हणून त्या गोष्टी इतरांनी ऐकू नयेत असं त्याला वाटत असे. आपल्या मित्रांना तो या गोष्टी सांगत नसे, आणि त्याच्या नोकराने इतरांच्यासमोर या गोष्टी सांगू नयेत असा त्याचा आग्रह होता. त्यामुळे या गोष्टींमधली सगळी भुते त्याच्याकडेच बंदी बनून राहात होती.

त्याचा नोकर व कथावेल्हाळ असणाऱ्या वान-क्यूनने एक कातडी कामचलाऊ थैली बनवली होती बटव्यासारखे बंद असलेली ती थैली भिंतीवरती खुंटीला टांगलेली होती. दर रात्री झोंपायला जाण्यापूर्वी जिन-होला गोष्ट सांगतांना वान-क्यून ती थैली आपल्या मांडीवर ठेवी, आणि गोष्ट संपली की थैलीचे बंद जरा सैलसर करी. गोष्टीतले भूत थैलीत जाऊन बसे. तीच गोष्ट जेव्हां पुन्हां सांगितली जाई त्याचवेळीं फक्त ते भूत बाहेर येऊं शके. खुंटीला थैली टांगायच्यापूर्वी वानक्यून तिचे बंद अगदी घट्ट बांधून ठेवीत असे.



हा क्रम कित्येक दिवस, आठवडे, महिने आणि वर्षे असाच चालू राहिला. या काळांत जिन-हो किंवा वान-क्यूनने कोणतीही गोष्ट दुसऱ्यांना सांगितली नाही. आणि ती भुते त्या थैलींत बंद होऊन राहिली. आपण केव्हां तरी मुक्त होऊं शकूं ही त्यांची आशा केव्हांच मावळली होती.

कहाणी सांगताना आणि ऐकताना जिन-हो आणि वान-क्यून इतके उत्साही आणि उत्तेजित होत असत कीं त्या कातडी थैलीतल्या भुतांची भुणभुण त्यांना ऐकायला येत नसे.

जिन-हो पंधरा वर्षांचा झाला, हे कुणाच्या



लक्षांतच आलं नव्हतं. कोरियांतल्या त्या काळच्या प्रथेनुसार आता तो लग्नाच्या वयाचा झाला होता. त्याच्या आईवडिलांनी एक सुंदरशी मुलगी शोधून ठेवली होती. ती होती एका धनवान व्यापाऱ्याची मुलगी मिन-जी! त्यांचे लग्न ठरले.

''लौकरच लग्नाचा दिवस उजाडला. उजाडताच जिन-हो व त्याचे वडील समारंभासाठी वधूच्या घरी जाण्यासाठी तयार झाले. घरांत इतरेजन जे मागे राहिले होते, ते नववधूच्या स्वागतासाठी तयारी करण्यांत गुंतले.

म्हातारा सेवक वान-क्यून घरीच थांबला होता. तो घराच्या कानाकोपऱ्यांत हिंडून सगळीकडे सारी तयारी व व्यवस्था ठीक आहे कीं नाही, याची पाहाणी करीत होता. त्याने एकवार जिन-होच्या शयनगृहांत डोकांवून पाहिले. कांहीजण कुजबुजत आहेत असं त्याला वाटलं. थोडा वेळ तो तिथेच थांबला आणि लक्षपूर्वक ते आवाज ऐकत बसला. अचानक त्याचे लक्ष त्या कातडी थैलीकडे गेले. ती पिशवी हलत होती आणि थरथरतही होती. तो कुजबुजीचा आवाज त्या थैलीमधल्या भुतांचा होता असा वान-क्यूनने तर्क केला. चोरपावलाने तो पिशवीजवळ येऊन थांबला आणि त्यांचे बोलणे ऐकू लागला. ती भुते आपापसांत बोलत होती.

''आज ह्या मुलाचे लग्न होणार आहे. आपल्याला त्याने या पिशवीत जखडून ठेवले आहे, त्याचा आज सूड घेता येईल. आपण त्याला मारुन टाकू या. तो मेल्यानंतर कुणीतरी येऊन ही थैली उघडेल आणि तेव्हां आपण सगळेजण मुक्त होऊं.''

''हो, हो, तसंच करुं या. पण कसं करणार?''

''आता मी विषारी विहिरीचे भूत आहे. नवरामुलगा ज्या मार्गाने वधूच्या घरी जाईल, त्याच्या वाटेवरची विहीर मी विषारी पाण्याने भरीन. त्याला तहान लागेल आणि तो नक्की त्या विहिरीचे पाणी पिईल. आणि मग... हा. हा... हा!''

''फार छान कल्पना आहे हं! जर तो पाण्यासाठी थांबला नाही, तर मी विषारी फळ झाडाच्या गोष्टीचे भूत आहे. मी त्याच्या वाटेत इतक्या खाली फांद्या वाकवीन कीं फांदीवरची सुंदर रसाळ फळें तोडण्याचा त्याला मोह होईल. आणि नंतर काय.... हा... हा... हा!''

''जरी तो वधूच्या घरी पाणी न पिता आणि फळें न खाता पोंचला, तरी माझ्या गोष्टीत एक नरम विषारी धारदार पाते आहे. ते मी दाराजवळ ठेवून ते रेशमी उशीखाली लपवीन. त्याने त्याच्यावर पाय ठेवला कीं मग काय... हा.. हा... हा!



''आणि यांतूनही जरी तो वाचलाच तरी माझ्या गोष्टीत तर एक दुष्ट सर्प आहे. तो वधूच्या गादीखाली लपेल. रात्री तो बाहेर येईल आणि नवऱ्या मुलाला चावेल. आणि तेव्हां तर... हा... हा... हा!'' ''फार छान, फारच छान!'' दुसऱ्या भुतांनी एकदम दुजोरा दिला.

म्हातारा वान-क्यून हा सज्जन, स्वामीभक्त सेवक होता आणि जिन-होवर त्याचे फार प्रेम होते. त्या भुतांनी रचलेला हा कट ऐकून तो फार घाबरला. त्याला माहीत होतं कीं जरी ती भुते त्या थैलीत अडकलेली होती, तरी त्यांना दुष्टावा करण्याची शक्ती जरूर होती.

वान-क्यून आपल्या मालकाकडे गेला. मालक एका पांढऱ्या शुभ्र घोड्यावर स्वार झालेला होता. ''मालक, आजचा हा दिवस फारच महत्वाचा आहे. छोट्या मालकांच्या घोड्याच्यापुढे लगाम धरुन चालत जावे अशी माझी इच्छा आहे!'' वान-क्यूनने विनंती केली.

''फारच छान हं! तुला माझी परवानगी आहे.'' जिन-होच्या पित्याने आनंदाने सांगितलं.

वान-क्यून फारच खुष झाला. लग्नाच्या मिरवणुकीत त्याला मानाचे स्थान मिळाले होते म्हणून नव्हे, तर आता वाटेत येणाऱ्या प्रत्येक संकटातून तो आपल्या मालकाचा प्राण वांचवूं शकला असता.

वान-क्यूनला जी भीती वाटत होती त्याचप्रमाणे झालं. जिन-होने वाटेत एक विहीर बघितली आणि तिथे थांबून त्या विहिरीतले पेलाभर पाणी प्यायला मागितले. आता वान-क्यूनला तर ते विषारी पाणी जिनहोला द्यायचं नव्हतं. तो म्हणाला, ''छोटे मालक, पाणी काढायला वेळ लागेल. आणि तोपर्यंत थांबून राहिलं तर तुम्ही घामेजून जाल. उन पहा ना किती कडक आहे ते! आणि हा नवरदेवाचा पोशाख घामाच्या डागामुळे खराब होईल.''

जिन-होला तर खूप तहान लागली होती. पण त्याला वान-क्यूनचे म्हणणे पटले. त्याने घोड्याला थापटी दिली. जरा दूर अंतरावर गेल्यानंतर जिन-होला रस्त्यांत रसदार फळांचे झाड दिसले. ''अरेच्या! ही फळे खाऊन माझी तहान भागेल. वान-क्यून माझ्यासाठी कांही फळे तोडून द्या ना!''

त्या सेवकाने गंभीर चेहरा करुन म्हटले, ''अहो छोटे मालक,'' आणि त्याने जीन-होला जवळ ओढले आणि त्याला विनवले, ''अहो, हे काय करता आहात? आज आपला विवाह होणार आहे. आणि ह्या दिवशी आपण रस्त्यांतली कुठलीतरी फळें खाणार?'' वान-क्यूनने लगाम खेंचला आणि घोडा पुढे जाऊं लागला.



पुढे जात जात लौकरच वरघोडा व लवाजमा वधूच्या घरी पोंचला. दोन नोकर धांवत आले आणि नवरदेवाने घोड्यावरुन उतरल्यावर त्याला पाय ठेवण्यासाठी त्यांनी एक रेशमी उशी आणली. पण वान-क्यूनने झटकन ती उचलून बाजूला टाकली आणि म्हटलं, ''अहो पाहा, ही किती छान नि मऊ आहे. माझ्या मालकांचा पाय घसरुन ते खाली पडायचे! तुम्ही लाकडी चौरंग घेऊन या.''

जिन-हो, त्याचे वडील वधूपिता, सगळेजण हे पाहून चकित झाले. कुणीतरी लांकडी चौरंग आणला. वान-क्यूनच्या हाताचा आधार घेऊन जिन-हो घोड्यावरुन खाली उतरला.

एका सजवलेल्या शोभिवंत उद्यानात नवरदेवाचा गोतावळा पोचला. विवाहसमारंभासाठी एक मंच तयार केलेला होता. चमचमणाऱ्या दागिन्यांनी मढलेली आणि सुंदर वधूवेष परिधान केलेली लाजरी मिन-जी आपल्या मैत्रिणींच्याबरोबर आली आणि तिला मंचावर बसवले गेले. विवाहविधी लौकरच सुरुं झाला. त्यानंतर शानदार भोजन आणि त्यानंतर नृत्याचा कार्यक्रम सुरुं झाला. कार्यक्रमानंतर रात्री त्यांची विश्रांतिची वेळ झाली. वधुवर त्यांच्या खास शयनगृहाकडे जायला निघाले. तेवढ्यांत वान-क्यून एक मोठा सुरा घेऊन घाईघाईने तिथे आला. काय काम होतं ते सांगण्याऐवजी तो सरळ त्यांच्या शयनगृहांत शिरला आणि त्याने पलंगावरची चादर ओढून काढली व गादी उचलली. गादीखाली साप लपलेला होता, त्याला त्याने सुऱ्याने मारुन टाकलं. बघणाऱ्या मंडळींच्या तोंडचं पाणी पळालं होतं. जिन-होचे आणि मिन-जीचे वडील, दोघेही पुढे आले.



''बाबा, आज वान-क्यूनने आमचे प्राण वांचवले आहेत.'' घाबरलेला जिन-हो एव्हांना सांवरला होता. त्याने पित्याला व सासऱ्याला सांगितले.

वान-क्यून दुसऱ्या दिवशीदेखील तिथेच राहिला. नंतर वधुवर जेव्हां आपल्या घरी आले तेव्हां त्याच्या स्वागतासाठी मोठी मेजवानी झाली. वान-क्यून जिन-होच्या शयनगृहांत जाऊन त्यांना म्हणाला, ''कालचं माझं वागणं तुम्हाला विचित्र वाटलं असेल, पण मला याविषयी सांगायचं आहे.''

आणि त्याने त्या चामड्याच्या थैलींत अडकून पडलेल्या भुतांची तक्रार व त्यांची योजना सांगितली.

काय करायला हवं त्याचा निर्णय मिन-जीने लगेच घेतला. ती जिन-होकडे बघत म्हणाली, ''जिन-हो! आजपासून तुला मी एकएक कहाणी सांगत जाईन, आणि एकापाठोपाठ एक अशा त्या सर्व भुतांना आपण मोकळं करुन त्यांना मुक्त करुन टाकूं!''





# ऋणमुक्ती

एका गावात रंगनाथ नांवाचा एक अत्यंत कंजूष माणूस होता. पैसा हातांत असून तो फारच दरिद्री आयुष्य जगत होता.

कांही दिवसानंतर रंगनाथच्या पत्नीचा मृत्यू झाला. त्याचा मुलगा मात्र जरा भोळा व थोडा मठ्ठच होता. रंगनाथ त्याला फक्त भाताची पेज जेवायला देत असे. त्यामुळे तो मुलगा नेहमी भुकेला असे. जरा हातांत एखादा पैसा मिळाला कीं तो दुकानांत जाऊन कांहीतरी पदार्थ खरेदी करुन खात बसे.

रंगनाथने पैसे सांठवण्यासाठी एक उपाय शोधला. घराच्या कोपऱ्यांत त्याने एक खड्डा खणला व त्यांत एक मातीचे मोठे मडके पुरले. मडक्याच्या झांकणावर त्यांत पैसे घालण्यापुरतीच एक छोटीसी खांच त्याने पाडली. वरुन पाहिले तर तिथें मडके आहे हे कळतदेखील नव्हते. रंगनाथची जी रोजची कमाई होत होती, त्यांतले थोडे पैसे तो खर्चायला ठेवून बाकीचे सर्व पैसे त्या मडक्यांत टाकीत होता.

मुलाने वडील काय करतात ते पाहिले होते. आपले वडील असे जमिनींत पैसे कां घालतात ते ह्या मुलाला कांही कळेना. एके दिवशी त्याने वडिलांना विचारलं, ''बाबा, तुम्ही घरांत पुढल्या आठवड्याचा तांदूळ खरेदी करायच्याऐवजी हे पैसे जमिनीत कां घालता?''

रंगनाथने त्याला समजावलं, ''बाळा, जमिनीत आपलाला कर्ज देणारा असतो. त्याला आपण पुष्कळ पैसे देणे लागतोय. आपण गरीब आहोत, म्हणून एकदम सारे कर्ज फेडता येणार नाही. रोज थोडेथोडे देत मी त्यांचे ऋण चुकवतो आहे.''

यावर मुलाचा विश्वास बसला आणि वडिलांच्या चिक्कूपणाचे त्याला कारणही कळले. त्याच्या मनांत त्या धनकोविषयी राग निर्माण झाला. मुलाने विचारले, ''बाबा, त्या कर्ज देणाऱ्यांच्यामुळेच आपण पोटभर जेवूं शकत नाही. त्यांचे पैसे न देता आपण रोज पोटभर जेवलो तर काय होईल?''

२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा



मुलगा आपल्या या सांठवणीत अडथळा निर्माण करील अशी रंगनाथला काळजी वाटली. म्हणून त्याला भीती वाटावी या हेतूने रंगनाथ म्हणाला, "हे बघ बाळा, नीट ऐक! आपले धनको हे कांही सर्वसामान्य, साधे लोक नाहीत. आपण एखाद्या दिवशी जरी पैसे जमिनीत घातले नाहीत तर ते लोक मोठ्या तलवारी, भाले घेऊन येतील आणि आपल्याला मारायची धमकी देतील. त्यांना पाहूनच आपला प्राण झटकन जाईल!"

रंगनाथचे हे बोलणे मात्र मुलाच्या डोक्यांत घट्ट बसले.

कडक थंडीच्या दिवसात एका रात्री एक वैरागी जेवायच्या वेळेला दाराशी आला आणि दार ढकलून आंत येत म्हणाला, "आपण धर्मदाता आहात, मला घासभर अन्न द्या हो!"

त्याला आंत आलेला पाहून रंगनाथला अतिशय राग आला. तो ओरडून म्हणाला, "ही काय तुझ्या बापजाद्यांनी बांधलेली धर्मशाळा वाटली कीं काय तुला?" वैरागी आश्चर्यचकित झाला आणि विनवून म्हणाला, "बाबा, जेवणाचं जाऊं दे, पण निदान आजची रात्र तुमच्या पडवीत मला झोपायला परवानगी द्या. बाहेर इतकी भयंकर थंडी पडली आहे हो!"

रंगनाथ जास्तीच चिडला, "अरे, तुझी सेवा करायला मी काय तुझा कर्जदार आहे कीं काय? चल जा!" असं म्हणून रंगनाथने वैराग्याची मानगूट पकडली आणि त्याला दाराबाहेर ढकलून दिले.

"माझा नसशील कदाचित, पण दुसऱ्या कुणाचा तरी नक्की कर्जदार असशीलच, म्हणून उपास करीत पैसे सांठवतो आहेस. जे कमवतो आहेस, ते भोगायचे भाग्य कांही तुझ्या नशिबांत असणार नाही." वैरागी म्हणाला.

"तुझ्यासारख्यांना घरांत आसरा दिला तर तशीच वेळ येईल. आज रात्रभर थंडीत कुडकुडत बैस म्हणजे कळेल तुला." रंगनाथ म्हणाला, "वेळ आली कीं तुझी पण हीच परिस्थिती होईल बघ. उगीच उद्धटपणाने बोलूं नकोस." वैरागी म्हणाला.

"अरे, एवढं भक्कम घर आहे माझं! माझी कशाला तशी अवस्था होईल? हे बघ, तुझ्या-सारख्या कमनशिबी लोकांसाठी सगळे रस्ते रिकामे पडले आहेत ना!" असं सांगून रंगनाथने धाडकन दार बंद केले.

कांही दिवसानंतर रंगनाथला दुसऱ्या गांवी जायचे होते. त्याने आपल्या मुलाला सांगितले, "बाळ, तू नीट घर सांभाळ बरं कां! रोज जे पैसे मिळतील, ते जमिनीत टाकत जा. रात्रीच्या वेळी त्याच जागेवर खाट ठेवून तिथेच झोपत जा. मी दोनतीन दिवसांत जाऊन येतोच बघ!"





रंगनाथच्या मुलाला हाती येणारे पैसे जमिनीत टाकणे अजिबात आवडत नव्हते. म्हणून खायचे पदार्थ विकत आणून तो खात होता. दोन दिवस उलटले. तिसऱ्या दिवशी रात्रीच्या वेळी कुणीतरी दरवाजा खटखटवला. रंगनाथचा मुलगा उठला आणि त्याने दार उघडले. त्याबरोबर तीन चोर तलवारी आणि भाले घेऊन घरांत घुसले.

त्यांना पाहिल्याबरोबर रंगनाथच्या मुलाला आपल्या वडिलांचे बोलणे आठवले. त्याला वाटलं कीं हेच लोक त्यांना कर्ज देणारे असतील. त्याने दोन दिवस जमिनींत पैसे घातले नव्हते, म्हणून हे लोक त्याच्यासाठीच आले असावेत.

त्या मुलाने चोरांना सांगितलं, "सावकारांनो, मला माफ करा. दोन दिवस माझ्या हातांत कांहीच पैसे आले नव्हते, म्हणून मी जमिनींत पैसे टाकले नाहीत. जर माझे वडील इथे असते तर त्यांनी तुमच्यासाठी कांही ना कांही पैसे नक्कीच टाकले असते. ते आत्ता यावेळी घरांत नाहीत. उद्यां मी तुमच्यासाठी मिळतील ते सगळे पैसे जमिनीत टाकीन."

चोरांना नीटसं कांही समजलं नाही. पण त्यांच्यासाठी कुठेतरी पैसे ठेवले जात आहेत हे मात्र नक्की समजलं. एका चोराने मुलाला विचारलं, "सांग तरी, तुझा बाप कुठे पैसे ठेवतो?"

हे ऐकून रंगनाथच्या मुलाने खाट सरकावली आणि जिथें मडके पुरले होते, ती जागा त्यांना दाखवली. त्या जागेवर खणून चोरांनी तो घडा बाहेर काढला. त्यांत बरेच पैसे होते. चोरांनी ते मडके घेतले आणि ते पळून गेले.

दुसऱ्या दिवशी रंगनाथ परतला. मडके पुरलेल्या जागी केवळ खड्डा दिसल्याबरोबर भीतीने त्याचा थरकांप झाला, आणि "माझे मडके, माझे पैसे!" असे ओरडत, रडत, दुःखाने आपले डोके धरुन तो बसला.

वडिलांचे असे वर्तन पाहून मुलाने त्याला विचारले, "बाबा, तुम्ही उगीच कां बाईट वाटून घेता? ते पैसे चोरांनी कुठे नेले आहेत?"

"मग तू काढून ते मडके दुसऱ्या जागी लपवले आहेस कीं काय?" रंगनाथने विचारलं.

"घाबरुं नका हो! ते पैसे त्यांचेच होते ना, म्हणून त्यांनी ते मडके नेले." मुलाने समजावून सांगितले.

आता रंगनाथ भलताच संतापला. त्याने मुलाचा गळाच पकडला आणि विचारले, "कोण होते ते लोक? माझे पैसे त्यांचे कसे काय झाले रे?"

"बाबा, तुम्हीच तर त्या दिवशी म्हणालात की त्यांनी आपल्याला कर्ज दिलंय, तेच ऋण देणारे लोक आले होते." आणि त्याने त्यांचे वर्णन करुन काय घडलं ते सांगितलं.

"अरे, मी तुला गंमतीत सांगितलं होतं. ते लोक चोर होते. आपण त्यांचं कांहीही देणं लागत नाही बरं कां! तुझ्या बावळटपणामुळें आज मी खंक झालो. अनोळखी लोकांनी रात्रीं दार वाजवलं तर शहाणा माणूस कधी आपण होऊन दार उघडेल कां?" रंगनाथ हताश झाला होता. मुलाला आपली चूक कळली. पुन्हां असे करायचे नाही असा त्याने मनाशी निश्चय केला.

यानंतर रंगनाथने यावर विचार केला. आपले पैसे परत मिळतील या आशेने जर चोरीची फिर्याद दाखल केली तर सगळ्या गांवकऱ्यांना आपल्या पुंजीबद्दल कळेल, म्हणून त्याने रात्रीच्या वेळी चोरांचा तपास करण्यासाठी आसपासच्या गांवातून फेरफटका मारायला सुरवात केली.

एका रात्रीं मध्यरात्र उलटल्यावर तो घरी परत आला आणि त्याने दार वाजवले, पण कांही केल्या मुलाने दार उघडले नाही. त्याला हांका मारल्या, पण कांही उपयोग झाला नाही. आपल्या मुलाच्या वेडगळपणाबद्दल नशिबाला बोल लावीत रंगनाथ घराच्या दाराशीच टेकून बसला. रात्रभर थंडीने कुडकुडत होता, त्यामुळें झोंप येत नव्हती. पहाटे जरा त्याचा डोळा लागला आणि तो तिथेच लवंडला.

त्याच वेळेला त्या वाटेने तो बैरागी जात होता. त्याने रंगनाथला हालवले आणि रंगनाथ उठून बसल्यावर विचारले, "अरे, एवढे भक्कम घर आहे तरी थंडीत असा बाहेरच कां झोपला आहेस?"

"काय सांगू भाऊ? त्यादिवशी तुम्ही जे बोललात, तो शाप मला बाधला बघा! मी माझी संपत्ती ना कुणाला दान दिली, ना स्वतः वापरली! सारी रक्कम चोरांच्या हातांत सांपडली." रंगनाथ म्हणाला.

"ते लोक चोर नव्हते, कर्ज देणारे होते. आता तू कर्जमुक्त झाला आहेस, तेव्हां उलट तू आनंदी असायला हवंस!!" असं म्हणून बैरागी पुढे गेला.

त्या दिवसापासून रंगनाथचा स्वभाव बदलला. तो स्वतः पोटभर जेवूं लागला आणि इतरांनाही व्यवस्थितपणे देऊं लागला. त्याची काळजी करण्याची वृत्ती पालटली.







# नंदनकाननची हांक



**नं**दन कानन म्हणजे देवांचे उद्यान - हा शब्दार्थ! पण दुर्मिळ पांढऱ्या वाघांचे वसतीस्थान म्हणून नंदन कानन जगांत प्रसिद्ध आहे. ओरिसाची राजधानी भुवनेश्वरपासून सुमारे वीस किमी. अंतरावर हे उद्यान गेली पंचेचाळीस वर्षे बहरत आहे. सध्यां तिथें तिसापेक्षां जास्त पांढरे वाघ आहेत.

जगभरांतल्या अनेक प्रसिद्ध प्राणीसंग्रहालयांत किमान पन्नास पांढरे वाघ दिमाखांत वावरत आहेत आणि त्यांतले बहुतेक सर्व नंदनकाननमधून बाहेर गेलेले आहेत. १९८० मधें दीपक व गंगा या वाघांच्या जोडीला तीन पांढरी पिलें झाली. त्यानंतरची पिलें भारतांत व इतर देशांत पाठवली गेली. पांढऱ्या वाघांचे रान हे सुमारे १२ हेक्टेअरचे असून त्यांत मोटारीसाठी रस्ते आहेत. नंदनकाननमधे वीस हेक्टेअरच्या परिसरांत वनराज सिंहाचेसाठी खास राखीव रान आहे.

चंडका अरण्यांत कानजीया तलाव हा एका बाजूला पन्नास हेक्टेअर रुंद आहे व नंदनकानन प्राणी संग्रहालय याच मनोहारी वनराईत आहे. या अरण्यांत व तलावांत ७० प्रकारचे सस्तन प्राणी, २० प्रकारचे सरपटणारे प्राणी आणि ८० जातीचे पक्षी सुखाने एकत्र नांदतात. नंदनकाननचे आणखी एक अनोखे आकर्षण म्हणजे ३४ मत्स्यालयांत ठेवलेले अनेक गोड्या पाण्यांतले मासे. भारतांतल्या प्राणीसंग्रहालयांपैकी इथें प्रथमच ६२० मीटर्स लांबीचा रोप-वे व केबल कार सुरुं केलेली आहे. भगवान बुद्धाचे शब्द आठवतात, ''अरण्य म्हणजे अमर्याद दया आणि दातृत्व जगण्यासाठी त्याची कांही मागणी नसते, पण त्यांतल्या जीवसृष्टीकडून इतरांना मिळणारी फळें मात्र अमाप असतात.''







# अस्वल्या मांत्रिक

## 12

*(दुर्मुखराजाच्या किल्ल्यावर कबजा करणाऱ्या मांडलिक राजावर हल्ला करण्यास राजाने अस्वल्या वधिक व इतरांच्यावर हल्ला करण्यास आपल्या सैनिकांना धाडले. नागमल्ल डाकूने सेनापतीला सांगितले कीं दुर्मुखराजाला त्याने पकडून आणले आहे. तोवर मांडलिक राजा अस्वल्या वधिकाजवळ आला. दुर्मुखने संतापून जाऊन मांडलिकावर हल्ला केला. मांडलिक पळून जाऊं लागला. त्यानंतर ....)*

**मां**डलिक राजाने आपला घोडा आवरला. आपला पाठलाग करणाऱ्या दुर्मुखशी दोन हात करण्या-ऐवजी त्याने किल्ल्याच्या उघड्या दाराकडे घोड्याला पिटाळले. आपला राजा शत्रूला पाहून पळून जातो आहे, हे सेनापतीने पाहिले आणि त्यानेही आपल्या सैनिकांना किल्ल्याकडे वळवले.

तेव्हां सेनापतीचे दोघे धाडसी सैनिक म्हणाले, ''मालक! आपल्यावर हल्ला करणारे सैनिक दहाजणांपेक्षां जास्त नाहीत. म्हणून आपण नव्या व जुन्या राजांना आपसांत लढून देऊं. ते दमले कीं त्यावेळेला या थोड्या सैनिकांना वेढा घालून आपण त्यांचा शेवट करुं शकूं. त्यानंतर आपल्याशी लढणारा कुणीच उरणार नाही, तेव्हां आपण स्वतःच उदयगिरीचा राजा होऊं शकाल.''

सैनिकांच्या तोंडातून ही गोष्ट ऐकल्यावर सेनापतीच्या मनांतही राज्याविषयी लोभ निर्माण झाला. त्याने आपला घोडा वळवून हत्तीवर स्वार असलेल्या वधिकाकडे बघितले. आणि दुर्मुखचे अंगरक्षक, ह्या सर्वांना सूचना देत मोठ्या



आवाजांत म्हटले, ''ऐका, राजा दुर्मुख अविचारीपणाने वागून आपल्या राज्याबरोबर आपले प्राणदेखील गमावणार असं दिसतंय. आमच्या मदतीशिवाय या इतक्या शत्रूंच्यामधे एकटा जाऊन तो आपला जीव गमवीलसं वाटतंय. आपल्यासमोर जो कुणी शत्रू येईल, त्याला आपण कापून काढू, म्हणजे आपल्याला दुर्मुखराजाचा बचाव करता येईल.''

हे बोलणे ऐकून उग्रदंड राक्षसाने दगडी गदा वर उचलली आणि भयानक मोठा आवाज करुन तो गरजला, ''अरे मांडलिकाच्या सैनिकांनो, सावध राहा. दुर्मुखराजाच्या केसाला जरी धक्का लागला तरी मी तुमची सर्वांची तिथल्या तिथे खांडोळी करुन टाकीन.'' असं म्हणून तो किल्ल्याच्या दिशेने चालायला लागला.

उग्रदंड निघाल्याबरोबर राजा होण्याची स्वप्नें पाहणाऱ्या सेनापतीने झटकन आपला घोडा वळवला आणि तो त्याच्या सैनिकांना सांगू लागला, ''ऐका, या राक्षस आणि परशुधारी अस्वल्या वधिकाशी लढलो तर आपले प्राण निश्चितच वांचणार नाहीत. किल्ल्याची तटबंदीच आपले रक्षण करुं शकते. आपण किल्ल्यांत घुसून त्याचे दरवाजे बंद करुन टाकूं.'' हे बोलून तो सैनिकांसह किल्ल्याकडे कसाबसा दौडत गेला.

त्यानंतर हत्तीवर स्वार झालेला अस्वल्या वधिक, नागमल्ल व दुर्मुखचे अंगरक्षक देखील उग्रदंडाच्या मागोमाग आपापल्या वाहनांना पळवीत किल्ल्याच्या मुख्य दरवाज्यापर्यंत पोचले; तितक्यांत मांडलिकराजाने किल्ल्यांत जाऊन झटकन दरवाजे बंद केले. थोड्यावेळानंतर त्याचे जे सैनिक मागे राहिले होते ते आंत जाता येईना म्हणून ते किल्ल्याच्या भिंतीच्या जवळपास विखुरले गेले. एकच हाहाकार माजला.

उग्रदंड राक्षसाने सर्वांत आधी किल्ल्याच्या प्रवेशद्वारापाशी पोंचून दारावर गदेने जोरदार प्रहार केला. त्याचा कांही परिणाम होत नाही हे पाहून तो चकित झाला व वधिकाला म्हणाला, ''अरे वधिका! या मांडलिकाचा सेनापती भित्रा असला तरी चतुर आहे. आता आपण काय करायचे? दुर्मुखराजा किल्ल्याच्या आंत शत्रूच्या गोटांत सांपडला आहे. त्याच्या प्राणांची मला कांही पर्वा नाही. पण मला काळजी एवढीच वाटते कीं तू राजाचे मस्तक अस्वल्या मांत्रिकाला कसे काय देणार?''





उग्रदंड राक्षसाचे हे शब्द ऐकून अस्वल्या वधिक नखशिखांत थरथर कांपायला लागला. कारण जर दुर्मुखराजाचे मस्तक त्याने नेले नाही तर त्याला अस्वल्या मांत्रिकाने जन्मभर अस्वल म्हणूनच जिवंत राहूं दिले असते. मनुष्याच्या जन्माला येऊन माणूस म्हणून कित्येक वर्षं जगल्यानंतर, अस्वलाच्या रुपांत उरलेला जन्म अरण्यांत मधमाशांची पोळी शोधत नि त्यांतला मध खातखात त्याला काढावा लागला असता. यापेक्षां जास्त वाईट जीवन दुसरे कोणते असूं शकेल?

हा विचार मनांत येताच वधिकाने दुर्मुखराजाचे प्राण वांचवायचा निर्धार केला आणि आपला परशू उचलून तो गरजला, ''हे सिरस भैरव!'' व त्याने सारी ताकद एकवटून किल्ल्याच्या दारावर प्रहार केला. पण त्या दारावर लोखंडाचा जाड पत्रा होता, त्यामुळे दरवाज्यावर त्या प्रहाराचा कांहीही परिणाम झाला नाही, उलट वधिकाच्या हातांतला परशू निसटून दूर जाऊन पडला.

हत्तीवर पुढे बसलेला वन्यवासी तरुण चटकन उडी मारुन खाली उतरला व पळत जाऊन तो परशू उचलून हातांत घेत तो तरुण ओरडला, ''मालक! उगीच भावनेच्या भरांत आपण हा मांत्रिकाचा जादूचा परशू तोडून टाकूं नका. जर आपल्याला किल्ल्याच्या आंत घुसायचं असेल तर हे बंद दरवाजे जाळून टाकून त्यांची राख करणें हाच एकमात्र उपाय आहे.''

''अरे पोरा! तुझा हा सल्ला तर फारच समंजसपणाचा आहे. पण तोपर्यंत जर सूर्यभूपतीने दुर्मुखराजाचा वध केला तर? मग माझी काय दशा होईल? याचा तू थोडा तरी विचार केला आहेस कां?'' वधिकाने रागावून विचारले.

''हो, खरंच आहे ते!'' असं म्हणत उग्रदंड राक्षसाने दगडी गदा वर उचलली व तो चारपांच पावले मागे फिरला. आणि जोराने पळत जात किल्ल्याच्या द्वारावर त्याने जोराने प्रहार केला.

राक्षसाच्या मजबूत गदेच्या प्रहाराने किल्ल्याच्या भिंतीचा थोडासा भाग ढासळला आणि भिंतीचे कांही दगड धप्पकन खाली पडले. उग्रदंड राक्षस, वधिक वगैरे सारेजण ती भिंत आपल्या अंगावर कोसळू नये म्हणून पाठीमागे लांब पळाले. आणि नंतर साऱ्यांनी वर बघितले आणि ते थक्क झाले.

ते दृश्य पाहून सारेच हादरले. किल्ल्याच्या



भिंतीवर एक प्रचंड मोठा वानर बसला होता. त्याच्या हातात एक लांब मंत्रदंड होता. त्याच्या मुठीवर अस्वलाचे रत्नजडित तोंड बसवलेले होते, ते चमकत होते.

त्या वानराला आणि त्याच्या हातांतल्या मंत्र दंडाला पाहून अस्वल्या वधिकाने दांतओठ खात उंच स्वरांत ओरडून त्याला विचारले, "अरे, तू खराखुरा वानर आहेस कीं भूत? महान शक्तिशाली अस्वल्या मांत्रिकाचा मंत्रदंड तुझ्या हातांत कसा काय आला? खरं काय आहे ते चटकन सांगून टाक, नाहीतर..."

हा प्रश्न ऐकून वानराने एक कर्कश आरोळी ठोकली आणि त्याने विचारले, "अरे अस्वलाचा वेष करणारा, तू खरा अस्वल आहेस कीं एखादे पिशाच?"

हे ऐकून अस्वल्या वधिक संतापला आणि आपल्या परशू त्याच्यावर ऐकणार त्यापूर्वी उग्रदंड राक्षसाने त्याला थांबण्याची खूण केली आणि हळू आवाजांत म्हटले, "अस्वल्या वधिका! भावनेच्या आहारी जाऊन तू कांहीतरी अनर्थ करुन बसशील. मला शंका येते आहे कीं अस्वल्या मांत्रिक कांहीतरी संकटात सांपडला आहे. अगोदर आपण या भूतवानराकडून त्याबद्दल कांही माहिती मिळतेय कां ते पाहूं या!"

अस्वल्या वधिकाने दोन्ही कानांवर हात ठेवून आपले कान बंद केले व तो उग्रदंडाला म्हणाला, "उग्रदंडा! अरे या भिकार वानराशी बोलून कांही फायदा होणार नाही बघ. अजून किल्ल्यांत अडकलेला दुर्मुखराजा जिवंत आहे कीं मांडलिकाच्या हातून मेला आहे, ते आपल्याला माहीत नाही. जर आपण किल्ल्याचे दरवाजे तोडले नाहीत तर निदान भिंतीवर चढून आंत जावे लागेल. नाहीतर दुसरा कोणता उपाय आहे?"

उग्रदंडाने आश्चर्यचकित झाल्यासारखे दाखवून वधिकाला म्हटले, "वधिका! मला वाटतं खरी परिस्थिती अजून तुझ्या लक्षांत आलेली दिसत नाही. ह्या मायावी वानराने जर अस्वल्या मांत्रिकाचा मंत्रदंड मिळवला असेल, तर निश्चितच मांत्रिक जिवंत नसावा. अशा वेळी दुर्मुखराजाच्यासाठी तू कां संकटांत सांपडतो आहेस? चल, आपण या अरण्यांतल्या डोंगराळ भागांत निघून जाऊं या."

"अस्वल्या वधिक महाराज! उग्रदंड महाशय जे सांगताहेत ते खरंच योग्य आहे." असं म्हणून नागमल्ल डाकूने हत्तीच्या पाठीवरुन खाली उडी



मारली; आपल्या दोन्ही साथीदारांना व अंग-रक्षकांना हत्तीवरुन खाली उतरायची सूचना देत तो म्हणाला, "बोला, उग्रदंड महाराजांचा सल्ला कसा वाटतो? आपण सगळेजण अरण्यांतच एकजूट करुन राहिलो, तर या अरण्यांत येणाऱ्या वाटसरुंना लुटताना आपल्याला या जगांत पाहाणारा कुणीही नसेल."

वधिकाचे डोळे संतापाने लाल झाले. तो म्हणाला, "अरे वन्यवासी सेवका! हा नागमल्ल डाकू जर पळूं लागलाच, तर तू तुझे धनुष्यबाण वापर!" आणि नंतर तो इतरांकडे वळून म्हणाला, "मी अस्वल्या मांत्रिक आणि महान साहसी तरुण वीर कालीवर्मा यांचा शोध घेणार आहे. तुमच्यापैकी जे कुणी माझ्याबरोबर यायला तयार असतील, त्यांनी हात वर करावेत."

उग्रदंड राक्षसाखेरीज इतर सर्वांनी संमती-दर्शक आपापले हात वर उचलले. वन्यवासी तरुणाने साशंक स्वरांत विचारले, "अस्वल्या-वधिक महाराज! हा डाकूंचा नेता नागमल्ल आणि त्याचे अनुयायी आपल्याबरोबर यायला तयार आहेत. पण आपण यांच्यावर विश्वास कसा काय ठेवणार?"

"जर त्यांच्यावर विश्वास ठेवणे धोक्याचे ठरले तर तिथल्या तिथे मी त्यांचा शिरच्छेद करीन. उग्रदंडा! तुझा काय निर्णय आहे? अस्वल्या मांत्रिक महाराजाशी तुझं देखील कांहीतरी काम होतं, असं तू अगोदर म्हणाला होतास ना?" अस्वल्या वधिकाने विचारले.

"जर तो मांत्रिक जिवंत असला, तरच माझं



काम होईल." उग्रदंडाने उत्तर दिलं.

तितक्यांत भिंतीवर बसलेला तो मायावी-मर्कट जोराने ओरडून म्हणाला, "अरेच्या! किल्ल्याच्या आंत लढाई चाललेली दिसतेय कीं काय? कीं लपंडाव खेळताहेत? सर्व सैनिक दोन फळ्यांत विभागले गेले आहेत. कांहीजण सूर्यभूपतीच्या बाजूला उभे आहेत. हे भिकार भागूबाई समोरासमोर तुसते शुंभासारखे एक-मेकांकडे पाहात राहिले आहेत."

हे वर्णन ऐकून अस्वल्या वधिकाला थोडा धीर आला. तो म्हणाला, "उग्रदंडा! दुर्मुखराजा आता माझ्या हातांत जिवंत सांपडणार असं वाटतंय. या अस्वलाच्या रुपांतून माझी लौकरच सुटका होणार असं वाटतंय."

उग्रदंड राक्षसाने आपली दगडी गदा एकवार जमिनीवर आपटून म्हटले, "अरे अस्वल्या

वधिका? तू अजून तुझं जुनंच रडगाणं चालू ठेवलं आहेस. जर अस्वल्या मांत्रिक जिवंत असला तर त्याचा मंत्रदंड कुणीतरी हिसकावून घेऊं शकेल कां?''

आणि त्याने टाळी वाजवून त्या माया-मर्कटाला हांक मारली नि विचारले, ''अरे मर्कटा! तू अस्वल्या मांत्रिकाचा मंत्रदंड तू बरोबर आणला आहेस ही फारच चांगली गोष्ट आहे. पण त्याचं शव तू कुठे टाकलं आहेस?''

''मी त्याच्या शरीराचे तुकडे करुन ते कावळ्यांना आणि गिधाडांना खायला ठेवले होते, पण त्या पक्ष्यांनी शवाजवळ येऊं न देण्यासाठी कालीवर्मा तिथे शवाची राखण करतो आहे.'' हे सांगून वानराने मंत्रदंड भिंतीवर टेकवला आणि लांबवर न्याहाळून बघत तो पुढे म्हणाला, ''अरे, तो अस्वल्या मांत्रिक एखाद्या संजीवनी विद्येच्या मदतीने जिवंत होऊन उठला आहे. तो आता एका रेड्यावर स्वार झाला आहे. त्याच्या बाजूला कालीवर्मा एका घोड्यावर स्वार झालेला आहे, आणि दोघेही इकडेच येत आहेत. त्यांना पकडण्यासाठी चंद्रशिला नगरीच्या जितकेतू राजाचा मंत्री सैन्य बरोबर घेऊन त्याचा पाठलाग करीत आहे. त्या दोघांचा शिरच्छेद मी स्वतःच्या डोळ्यांनी बघीन तेव्हांच मी इथून हलेन, तोपर्यंत इथेंच बसून राहीन.''

मायावी मर्कटाच्या तोंडून निघालेले हे शब्द ऐकून अस्वल्या वधिक ओरडत उठला, ''हे सिरस भैरवा! अरे मायावी वानरा? तू हे काय बरळतो आहेस? तू गोंधळून गेला आहेस कीं काय? कीं आम्हालाच तू बावळट ठरवतो आहेस?''

वधिकाचे बोलणे संपले नाही तोच तिथे घोड्यावर स्वार असलेला कालीवर्मा व पाठोपाठ रेड्यावर बसून येणारा अस्वल्या मांत्रिक तिथपर्यंत येऊन पोंचले. किल्ल्याच्या भिंतीवर उभा असलेल्या वानराकडे बघून मांत्रिक म्हणाला, ''वधिका! मंत्रदंड चोरणाऱ्या या मायामर्कटाला जिवंत सोडता कामा नये!''

दुसऱ्या क्षणीं चींचीं करीत वानर हंसत सुटला, आणि त्याने किल्ल्याच्या आंतल्या बाजूला वेगाने उडी मारली. *(क्रमशः)*







वेताळ कथा

# क्रोधी मुनी

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला त्याने शव खाली उतरवले आणि खांद्यावर घेतले. नेहमीसारखा तो स्मशानाच्या दिशेने जायला लागला, तेव्हां प्रेतांत लपलेला बेताळ राजाला म्हणाला, ''हे राजन्, हे किती कष्टाचे काम तू करतो आहेस. तुझे आजवरचे सारे प्रयत्न असफल झाले आहेत. हे पाहून मला तर वाटतं कीं तुला हे काम करायला उत्तेजन देणारा, किंवा तुझा मित्रा किंवा गुरु असला, तर तुझा त्याच्यावर अपार श्रद्धा असली पाहिजे. कांही श्रेष्ठ व्यक्ती वेळेवरती जे स्पष्ट बोलायला हवे ते बोलत नाहीत. पण त्यांच्या बोलण्यांत गूढार्थ असतो. ते



खुणा करतात त्या फारच थोड्या लोकांना समजतात. उदाहरण म्हणून मी तुला एका म्हाताऱ्या मुनीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन जर ऐकलीस तर तुझा थकवा दूर होईल." आणि वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

फार वर्षांपूर्वी एका अरण्यांत सुतीव्र नावाचा एक मुनी घोर तपस्या करीत होता. दोन भिल्ल तरुण तिथें फिरत होते. त्यांना कांही शिकार मिळाली नाही. शेवटी ते या मुनीजवळ आले. तितक्यांत एक भिल्ल घेरी येऊन पडला. काय करावे ते दुसऱ्या भिल्लाला समजेना. त्याने या मुनीकडे मदत मागितली. जेव्हां मुनी कांहीच बोलेना, तेव्हां त्याने मुनीला पकडून जोराने हालवले.

संतापून मुनीने डोळे उघडले आणि त्या भिल्लाला 'भस्म होशील' असा शाप दिला. भिल्लाचे बघताबघता भस्म झाले. राग शांत झाल्यावर मुनीने त्या बेशुद्ध भिल्लाला शुद्धीवर आणले व त्याला जे घडले ते सांगून म्हटले, "मी शाप देऊ शकतो पण तो शाप परत घेण्याची शक्ती माझ्यांत नाही. तुझ्या मित्राचे हे भस्म तू सुरक्षित ठेव. या शापावर उःशाप कोणता ते मी माझ्या गुरुला विचारुन येतो." आणि मुनी तिथून निघून गेला.

आठवडाभर प्रवास करुन दुसऱ्या अरण्यांत राहाणाऱ्या आपल्या गुरुला, मुनी सुशांतला, सुतीव्र भेटला.

सारं ऐकल्यानंतर सुशांतने म्हटलं, "शिष्या, क्रोध हाच प्रत्येकाचा शत्रू असतो. तुझा क्रोध तुझे तपोबल हरण करतो. शांतीमुळे तुझे भले होईल. शाप दिल्यावर तुझे सारे तपोबल समर्पित केल्यानंतरच तो भिल्ल जिवंत होईल."

त्याऐवजी दुसरा एखादा उपाय सुचवावा म्हणून सुतीव्रने गुरुला विनंती केली. तेव्हां सुशांत म्हणाला,

"विष्णुपुरांत माधव नांवाचा एक सामान्य गृहस्थ आहे. जर त्याने आपल्या पुण्याचा एक भाग दान म्हणून तुला दिला, तर हा भिल्ल जिवंत होऊं शकेल. तू विष्णुपुरला जाऊन त्याला भेट."

सुतीव्र तडक विष्णुपूरला जायला निघाला. वाटेंत त्याला कांही तरुणी वनविहार करीत असलेल्या दिसल्या. त्यापैकी एकजण तर



अप्रतिम सुंदर होती. सुतीव्र तिच्याकडे आश्चर्यचकित होऊन भारावल्यासारखा बघतच राहिला.

सुतीव्रची भलीमोठी दाढी, मिशा आणि त्याची एकटक नजर पाहून ती तरुणी नाखुषीने त्याला म्हणाली, "तुझ्यासारख्यांनी नाक बंद करुन तपश्चर्या करायची सोडून तू माझ्या सौंदर्यावर मोहित झाला आहेस नि माझ्याकडे टक लावून पाहातो आहेस. हे कांही शोभतं कां?"

तिचे हे उद्धट बोलणे ऐकून मुनी संतापला आणि त्याने तिला शाप दिला, "ज्या सौंदर्याचा तुला इतका गर्व आहे ते नष्ट होईल व तू कुरुप स्त्री होशील." शाप देऊन मुनी तिथून निघून गेला. त्या तरुणीचे तात्काळ एका कुरुप तरुणींत रुपांतर झाले. ती ओक्साबोक्शी रडायला लागली.

सुतीव्र विष्णुपूरला पोचला. रस्त्यांत त्याला एक तरुण भेटला. त्याने माधवच्या घरी कसे जायचे ते त्या तरुणाला विचारले. तरुणाने मुनीला नखशिखान्त न्याहाळले नि सांगितले, "माधव यांची मुलगी फार सुंदर आहे. माझं तिच्यावर प्रेम आहे. तुम्ही तिला मागणी घालायला आला असाल, तर मी तुम्हाला ठार मारायला देखील मागेपुढे पाहाणार नाही!"

लगेच सुतीव्र संतापला आणि त्याने तरुणाला, "तू मुका होशील" असा शाप दिला. नंतर तो माधवच्या घरी पोंचला.

माधव घराच्या ओटीवर बसला होता. त्याने





सुतीव्रला प्रेमाने विचारले, ''सुशांत मुनीवर्य ठीक आहेत ना?''

सुतीव्रने माधवला नम्रपणे प्रणाम करुन म्हटले,

''गुरु सुशांतनी सांगितलंय कीं आपण एक महान पुण्यात्मा आहात. आपलं दर्शन झालं हे माझं परमभाग्य आहे.''

तेवढ्यात आंतून एक सुंदर तरुणी बाहेर आली. तिने त्यांच्यासमोर एक लहानशी चटई अंथरली.

सुतीव्रकडे तिने एकदा पाहिले आणि त्याला नमस्कार करुन ती आंत गेली. माधव अडकित्त्याने सुपारी कातरण्यांत मग्न होता.

माधवला गुरु सुशांत पुण्यात्मा कां मानतात, ते जाणण्याची सुतीव्रला फार उत्सुकता होती. माधव काय काम करतात हे सुतीव्रने विचारले. उत्तरादाखल माधव प्रसन्नपणें म्हणाला,

''मी सकाळी उठतो. जमेल तितका स्वच्छ व निर्मळ राहाण्याचा प्रयत्न करतो. घरांतली व बाहेरची कामें करतो. शक्य होईल तशी इतरांना मदत करतो. वेळ मिळेल तेव्हां चांगल्या ग्रंथांचे वाचन करतो. वेळेवर झोंपायला जातो. क्रोध, आवेश व संताप यांच्यापासून स्वतःला वांचवण्यासाठी माझं मन शांत ठेवतो.''

त्याच्या दिनचर्येत देवपूजा व ध्यानधारणा यांचा उल्लेख नव्हता. याचे नवल वाटून सुतीव्रने त्यांना सरळच विचारले,

''दिवसांतून किमान एकदादेखील आपण परमेश्वराची प्रार्थना करीत नाही कां?''

''परमेश्वर दुसरीकडे कुठे आहे? आपण दुसऱ्यांचं भलं करायचं, इतरांना संतुष्ट करायचं, हो तर देवाचीच प्रार्थना आहे, तीच पूजा आहे नि तपस्याही आहे.'' माधवने सरळ, साध्या शब्दांत सांगितले.

ते ऐकून सुतीव्र चिडून म्हणाला, ''तुम्ही माझी टिंगल करता आहात. माझी तपश्चर्या व्यर्थ आहे असंच तुम्हाला सांगायचंय ना?''

''हे बघा मुनीवर्य, मी जे म्हटलं ते स्वतःबद्दल म्हटलं. तुमच्याबद्दल कांहीही म्हटलं नव्हतं. माझ्या मताने तपस्या करणे निरर्थक आहे.''

सुतीव्र जास्तच चिडला व त्यांना डाफरुन बोलला, ''तुमच्यासारख्या नास्तिकांना असं मोकळं सोडता कामा नये. या क्षणींच तुम्ही



पांगळे व्हाल, आंधळे व्हाल आणि बिछान्याला खिळून पडाल.''

पण या शापाचा माधववर कांहीच परिणाम झाला नाही. तो सुपारी कातरत पुढे बोलला, ''मुनीवर्य, तुम्ही तपोधनी आहात. मी तुम्हाला नाखूष केलं ही माझी चूक झाली. पण तुमचा संताप जरा आवरा.''

सुतीव्र अवाक् झाला. हताश होऊन तो म्हणाला, ''माझ्या शापाचा तुमच्यावर कांहीही परिणाम झाला नाही. तुम्ही माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहात.''

''नाही, मुनीवर्य, नाही! ज्यांची चूक झाली त्यांना तुम्ही तुमच्या तपोबलाच्या आधारे शिक्षा दिल्यात. म्हणून तुमचं तपोबल कमी होत जातं. तो भिल्ल, सुंदर तरुणी आणि एक तरुण यांना तुम्ही शाप दिलेत, त्यामुळे तुमचं तपोबल संपलं. आता तुम्हाला एक खरी गोष्ट सांगतो. या शापावर उःशाप मागायलाच तुम्ही माझ्याकडे आला होतात. जोपर्यंत तुमची ही इच्छा पूर्ण होत नाही, तोपर्यंत तुमचा शाप माझ्यावर प्रभावी ठरणार नाही. पण आता तुमची ही इच्छा पूर्ण झालेली आहे. तुम्ही ज्यांना शाप दिलेत, ते आता पहिल्यासारखेच झाले आहेत. आता तुमच्या तपोशक्तीची परीक्षा पाहायची असेल तर तुम्ही मला शाप द्या.'' माधवने नम्रपणे सांगितलं.

पण सुतीव्रने माधवला शाप न देता तो परत जाऊन आपले गुरु सुशांतला भेटला. वाटेंत त्याने दिलेल्या शापांच्या प्रभावाखाली असलेल्या व्यक्ती



पूर्वीसारख्याच दिसत होत्या त्याही भेटल्या. सुतीव्रने गुरुला आपला अनुभव सांगितला आणि त्याचे कारण विचारले.

सुशांतने सांगितले, ''तपोशक्ती निश्चितच महान असते. पण आपल्या जबाबदाऱ्या निष्ठेने पाळणारे व परोपकार करणारे सामान्य लोक तुझ्यासारख्या संतापी मुनीपेक्षां जास्त श्रेष्ठ असतात. सामान्य माणसे पुण्यवंत असतात, पण ते शाप देऊं शकत नाहीत, म्हणून त्यांच्यामुळे इतरांचे नुकसान होत नाही.''

''पण माधवने शापग्रस्तांचे रक्षण करण्यासाठी आपले पुण्य दान दिले. त्यांचेही पुण्य कमी झाले असेल ना! तेवढे पुण्य परत मिळवायला त्यांना किती काळ लागेल?'' सुतीव्रने विचारले.

त्याच्या या प्रश्नावर सुशांतने हंसत उत्तर दिले, "दुसऱ्याची चूक सुधारण्यासाठी आपले पुण्य दान देणे हे फार मोठे पुण्य आहे. म्हणून तुझ्यामुळे माधवचे पुण्य वाढले. त्यांना त्यांचे पुण्य दान करावे लागले खरे, पण त्यामुळे तुझे पाप जास्त वाढले!"

तिथून लागलीच निघत सुतीव्र म्हणाला, "गुरुदेव, जी तपोशक्ती मी गमावली, जे पाप मी डोक्यावर घेतलं, त्याचा परिहार करण्यासाठी मी माझ्या पूर्वीच्या जागी जातो, आणि पुन्हां तपश्चर्येला सुरवात करतो."

ही कहाणी सागून वेताळ पुढे म्हणाला, "राजन, सुशांतने सुतीव्रला जी उत्तरें दिली त्यांत तपस्येने देवाची कृपा मिळवणे याला कमी महत्व दिले होते. संतापी सुतीव्रला म्हणूनच गुरुने माधवकडे धाडले. सुतीव्रला तिथे दिसले कीं माधवमधे एक अद्भुत शक्ती आहे. ते ठाऊक असूनही त्याने परत जाणे हे विसंगत वाटते. सुतीव्रला स्पष्ट सांगितलं असतं कीं तू तपस्या करण्यास योग्य नाहीस, तू गृहस्थाश्रम स्वीकार तर ते ठीक होतं. पण हा निराळा घोळ कशासाठी? सुशांतने जर हे सरळ सांगितलं असतं तर सुतीव्रला ते नीट समजलं असतं. माझ्या शंकांची उत्तरे तुला माहिती असली आणि तरी तू गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमार्कनि उत्तर दिले, "सुतीव्र तापट होता. असले लोक तपश्चर्या करायला अयोग्य असतात, आणि गृहस्थाश्रमांतदेखील बरेवाईट सोसायला असमर्थ असतात. म्हणून सुशांतने सूचक शब्दांत सुतीव्रला निर्णय करण्यास प्रवृत्त केले. अहंकार, क्रोध, हे तामसी गुण सुतीव्रच्या स्वभावांतून नाहीसे झाले होते. त्याजागी सात्विक गुणांनी प्रवेश केला. म्हणून तो पुन्हां तपस्या करायला निघाला."

राजाचा मौनभंग करण्यांत सफल झालेला वेताळ पुन्हां शवासहित गायब झाला आणि झाडावर जाऊन बसला.

*(सरस्वती यांच्या रचनेवरुन)*



## वाचकांसाठी कथास्पर्धा

### सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक

**खालील गोष्ट वाचा:**



एका खेड्यांतल्या रखवालदाराने एका कुविख्यात दरोडेखोराला पकडून दिले. म्हणून राजाराजवर्मनि त्याला एक सोन्याची आंगठी बक्षीस दिली. कांही दिवसांनंतर एका निवृत्त शिक्षकांनी एका लहान मुलाच्या गळ्यांतली चांदीची सांखळी चोरताना एका गुंडाला पाहिले व ते "चोर, चोर!" असे ओरडले. रस्त्यावरच्या लोकांनी चोराला पकडले. त्या शिक्षकाला राजाने हिऱ्यांचा हार बक्षीस दिला.

दुसऱ्या दिवशी दरबारांत एका सरदाराने राजाला विचारले.

"सरकार, त्या रखवालदाराने एका दरोडेखोराला पकडले, तर त्याला आपण फक्त सोन्याची आंगठी दिलीत. पण त्या शिक्षकांना आपण हिऱ्याचा हार दिलात. वास्तविक त्यांनी फक्त चोराला पकडावे म्हणून ते ओरडले होते इतकेच! मग हा फरक कशासाठी?"

- राजाने या कृत्याचे समर्थन कसे केले?
- उत्तर देताना खालील मुद्दे ध्यानांत ठेवा.
- राजाने रखवालदार व शिक्षक यांच्यात खरोखरीच फरक केला होता कां?
- राजाने दरोडेखोर व गुंड यांच्यात फरक केला होता कां?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरुर लिहा.

**शेवटची तारीख : ३० नव्हेंबर, २००४**

नांव ............................................................ वय ....................

जन्मतारीख ........................................ शाळेचे नांव ........................................

घरचा पत्ता ............................................................................................

............................................................................................

............................................................................ पिनकोड ....................

पालकांची सही                                                                 स्पर्धकाची सही

## इतर देशांतल्या दंतकथा (फ्रॅन्स)

# सातवा दिवस

सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी ब्रिटनी या नगराच्या टोकाला एका टेकडीवर एक शानदार वाडा उभा होता. त्या टेकडीच्यापलीकडे समुद्र होता. त्यांत अर्धवट बुडलेले काळे कुळकुळीत खडक होते. त्यापैकी कांही खडक तर मोठ्या गदेसारखे दिसत होते, तर कांहीचे सुळके जणूं ढगांच्याकडे रोखलेल्या मोठ्या तलवारीच्या टोकासारखे वाटत होते. एखाद्या वादळी रात्री, एखादे जहाज, या खडकांवर आपटून फुटत असे.

त्या वाडयाच्या खिडकीतून दोरीझेन ही सुंदर तरुणी त्या अफाट समुद्राकडे तासंतास बघत बसे. एक लांबलचक उसासा सोडून ती उठून जाई व थोड्याच वेळांत पुन्हां येऊन खिडकींत बसे.

तिचा समुद्रावर इतका जीव होता कां? छे, उलट ती समुद्राला घाबरत होती. कारण तो खडकाळ किनारा धोकादायक होता. तिचा धाडसी पती आर्बर हा एका दूरदेशाच्या सफरीवर गेला होता. तो परत येईल तेव्हां त्याच्या जहाजाचा मार्ग जर चुकला तर ते जहाज त्या पाण्यांत बुडलेल्या खडकांवर आदळेल कीं काय, अशी तिला सतत भिती वाटत होती.

तिच्या नवऱ्याची सफर पुरी होऊन तो वर्षभरानंतर परत आला असता. पण आता दोन वर्षे होऊन गेली, तरी त्याची कांहीच बातमी नव्हती. कुणी कांही स्पष्टपणें बोलत नव्हते, पण आर्बर व त्याचे सहकारी बहुधा जहाज फुटून समुद्रावर मरण पावले असावेत, किंवा कुठल्यातरी बेटावरच्या चांचे किंवा दरोडेखोरांनी त्यांना ठार मारले असावे, असाच लोकांचा तर्क होता.

त्या नगरांत ओरेलियस नांवाचा एक खूप श्रीमंत तरुण राहात होता. दोरीझेनचे लग्न होण्यापूर्वी ओरेलियसने तिला मागणी घातली होती. त्याने हा प्रस्ताव पुन्हां तिच्यासमोर ठेवला आणि तिने होकार द्यावा म्हणून तो तिला वारंवार गळ घालूं लागला. आर्बर आता येणार नाही अशी ओरेलियसची खात्री होती. दोरीझेनला त्याचा राग येई, पण तो खूपच श्रीमंत होता आणि गांवात त्याचे वजन होते.





त्यामुळे एका विशिष्ट मर्यादेपलीकडे तिला त्याच्याशी उर्मटपणे वागता येत नव्हते.

"अग दोरीझेन, मी तुझ्यासाठी वाटले तो त्याग करीन, तू जे म्हणशील ते मी करीन. फक्त तू माझ्याशी लग्नाला तयार हो." दोरीझेन मंदिरात प्रार्थना करायला गेली होती तेव्हां तो तिला म्हणाला. तिने ठरवले कीं आता मात्र याला असा चांगला धडा शिकवायचा कीं तो जन्मभर तिच्यासमोर तोंड दाखवू शकणार नाही.

"हे पहा ओरेलियस, तुम्ही माझ्यासाठी कांहीही करायला तयार आहात ना? तर मग आपल्या गांवाच्या किनाऱ्यावर जे खडक समुद्रांत बुडलेले आहेत, ते काढून टाकूं शकाल कां?" तिने विचारले.

"हो, जरूर!" ओरेलियसने उत्साहाने होकार दिला.

"पण मात्र मी ही गोष्ट केल्यानंतर तू सात दिवसांच्या आंत माझ्याशी लग्न केलंच पाहिजेस." त्याने म्हटलं.

"हो, मी वचन देते." ही पीडा एकदाची टळणार या आनंदात तिने शब्द दिला.

"हे तू या प्रार्थनामंदिरात मला सांगते आहेस; आणि देवासमोर दिलेला शब्द पाळावाच लागतो, हे मी तुला वेगळे सांगण्याची जरुरी नाही. तसं जे करतात, त्यांचे सारे कुटुंब नरकांत जाते. त्यांचे पूर्वजदेखील त्यांतून सुटूं शकत नाहीत. त्यांचे आत्मेही नरकांत जातात."

त्या भागांतली ही अंधश्रद्धा आहे, हे दोरीझेन क्षणभर विसरली होती. ती जराशी गोंधळून गेली. पण जेव्हां तिने विचार केला तेव्हां तिच्या लक्षांत आलं कीं तिची अट पूर्ण करणे हे कुणा मानवाला शक्यच नव्हते. तिच्या चेहऱ्यावर हंसूं उमटले आणि ती समाधानाने घरी गेली.



परंतु ओरेलियसच्या चेहऱ्यावरचे हास्य मावळले. ही अशक्य कोटीतली गोष्ट तो कशी काय करणार होता? त्याने खूप विचार केला. बराच वेळ डोके खाजवले, आणि आपल्या विश्वासू मित्रांना त्याने सल्ला विचारला.

"अरे, तुला वेडबिड लागलंय कां? तुला टाळण्याचा हा सोपा मार्ग तिने निवडलाय, हे तुला दिसत नाही कां?" ते मित्र म्हणाले. पण त्यामुळे ओरेलियस जास्तच आग्रही बनला. ती त्याला फसवायला बघत होती ना? कसंही करुन तिला आपल्याशी लग्न करायला भाग पाडलंच पाहिजे.

त्याच्या एका मित्राला भानामती, जादूटोणा या कुविद्या अवगत होत्या. त्या मित्राकडून त्याला हजार मैल लांबच्या डोंगरावर एका गुहेत राहणाऱ्या एका मांत्रिकाची माहिती कळली. ओरेलियसने घोडागाडी तयार केली आणि कित्येक दिवसांचा प्रवास करुन तो त्या मांत्रिकाला भेटला, आणि त्या मांत्रिकाला घेऊन ब्रिटनीला परत आला. मांत्रिकाने



तो खडकाळ किनारा व आसपासच्या भागाची नीट पाहाणी केली. त्याने उपाय सांगितला, "मला हे खडक आठवडाभरासाठी अदृश्य करता येतील. मी तसे मायाजाल पसरवूं शकेन."

"उत्तम! मग माझे काम फत्ते होईलच!" ऑरेलियस उद्गारला. त्या मांत्रिकाने कांहीतरी मंत्र पुटपुटले आणि खरंच, ते मोठमोठे खडक दिसेनासे झाले होते!

ऑरेलियस टेंकडीवर पळतपळत गेला आणि त्याने दोरिझेनला ओरडून हांका मारल्या. पण त्याच्या हांकेला उत्तर द्यायला आर्वर पुढे आला. ऑरेलियस जेव्हां मांत्रिकाला शोधायला गेला होता, तेव्हां आर्वर सुखरूप परत आला होता.

"हॅलो, मित्रा ऑरेलियस, कसा आहेस तू? तू हे खडक नाहीसे करणार आहेस त्याबद्दल माझ्या कानावर आलं. चांगल्या गप्पा ठोकतोस हं! मी इथे नसताना दोरिझेनला तू भेटलास आणि तिचा कंटाळा, उदासी घालवायला मदत केलीस हे फार चांगलं केलंस हं!" आर्वरने त्याचे प्रेमाने स्वागत केले, आणि त्याला वाड्यांत जरा विश्रांति घ्यायला बोलावले.

"मी काय गप्पा ठोकतोय काय? जरा समुद्राकडे बघ आधी!" ऑरेलियस गंभीरपणे म्हणाला.

तेवढ्या वेळांत दोरिझेन घरांतून बाहेर आली. तिने व आर्वरने, दोघांनीही समुद्राकडे बघितले. तिथले सगळे खडक नाहीसे झालेले होते ते पाहून दोघेही आश्चर्याने थक्क झाले. एकाही खडकाचे टोकसुद्धां दिसत नव्हते. दोघेही पांढरीफटक पडली. दोरिझेन तर घेरी येऊन पडली. ती शुद्धीवर आल्यानंतर ऑरेलियसने तिला लग्नाची विचारणा केली. तिने घातलेली अट त्याने पूर्ण करुन दाखवली होती. आर्वर तिला म्हणाला, "दोरिझेन, आपल्या आयुष्यापेक्षां आपण दिलेला शब्द पाळणें हे जास्त महत्वाचे आहे. तू जर वचनभंग केलास तर आपल्या पूर्वजांच्या आत्म्यांनादेखील त्याचा त्रास होईल. आणि ते मला खरोखरच आवडणार नाही." आर्वर गंभीर झाला होता.

दोरिझेन एखाद्या पुतळ्यासारखी स्तब्ध बसली होती. ती भानावर आली आणि ऑरेलियसला म्हणाली, "खडक नाहीसे झाले तर सात दिवसांच्या आंत मी तुझ्याशी लग्न करायचे असा शब्द दिला होता. तेव्हां मी सातव्या दिवशी तसे करीन, त्यापूर्वी मात्र नाही." तिच्या या निर्णयाला ऑरेलियस विरोध करूं शकला नाही. त्याने मनांत ठरवलं कीं सातव्या दिवशी एकदा लग्न पार पडलं कीं तो तिला तिथून दूर अशा एखाद्या गांवी घेऊन जाईल. म्हणजे ते खडक तिथे खरोखरीच होते, हे तिला कधीच कळले नसते.



गेले कांही दिवस आकाश ढगाळ होते. तिथे जमलेले सगळे ढग एकदम फुटावेत तसा गडगडाट झाला, सोसाट्याचे वादळ सुरुं झाले आणि त्यांत पाऊस सुरुं झाला. लोकांना घराबाहेर पडणे अशक्य होते. साऱ्या नगरांत रस्त्यावर एकही माणूस दिसत नव्हता. निसर्गाचे थैमान आणि तांडवनृत्य सुरुं होते. झाडे, खांब, उखडली जात होती. रिकाम्या गाड्या वादळांत उलटून पडत होत्या. लग्नसमारंभासाठी मंदिरात पुजारी येणे अशक्यच होते. तरीही ऑरेलियसने आपल्या वधूला आणण्यासाठी घराबाहेर येण्याचा अनेकवार प्रयत्न केला. पण वाऱ्याने त्याची गाडी उलटली. घोडे घाबरुन खिंकाळत तबेल्याबाहेर येईनात.

सातवा दिवस अशा गोंधळात गेला. दुसऱ्या दिवशी आभाळ निरभ्र झाले आणि ऑरेलियस टेंकडीवरच्या वाड्याबाहेर जाऊन उभा राहिला. दोरिझेन आपल्याशी मंदिरात विवाह करील ही खुळी आशा त्याच्या डोक्यांत भिनलेली होती. ते खडक पुन्हां दिसण्यापूर्वी हे व्हायला हवं होतं. दोरिझेन तयार झाली. आर्वरने तिला पाणावलेल्या डोळ्यांनी निरोप दिला. तिने वाड्याच्या दरवाज्याच्याबाहेर अंगणात पाऊल टाकलं.

पण ऑरेलियस मात्र कावराबावरा झाला होता. दोरिझेन आणि आर्वर यांच्या सत्यनिष्ठेच्या व प्रेमाच्या शक्तीपुढे तो थरथर कांपायला लागला. कारण त्याने असत्याची कास धरली होती. तो खोटे बोलला होता. ते खडक कांही तिथून उचलून टाकलेले नव्हते. तितक्यांत जोरांत गडगडाट झाला आणि विजा चमकल्या. जणूं किनाराच हादरला होता. सर्वांनी त्या दिशेला पाहिले. आणि काय आश्चर्य! ते खडक तिथे हजारो वर्षांपूर्वी होते तसेच आणि त्याच जागी होते. मायाजालाचा प्रभाव संपला होता.

ऑरेलियस बेशुद्ध झाला. आर्वर आणि दोरिझेनने आपल्या सेवकांना हांक मारली आणि तरुण ऑरेलियस शुद्धीवर येईपर्यंत त्यांनी त्याची काळजी घेतली. ऑरेलियस सावध झाल्यानंतर त्याने आर्वर आणि दोरिझेनला अभिवादन केले व म्हणाला, "मला क्षमा करा, या पाप्याला क्षमा करा!" त्याला रडूं आवरेना आणि तो तिथून घाईघाईने निघून गेला. ब्रिटनीमधे त्यानंतर त्याला कधीही कुणीही पुन्हां पाहिले नाही. (एम.डी.)



# खास बातम्या

## दिल्लीतल्या पाठ्यपुस्तकांत सचिन



दिल्ली राज्यांतल्या सरकारी शाळांमधल्या १०,११, व १२वीच्या विद्यार्थ्यांना यंदाच्या शैक्षणिक वर्षापासून सचिन तेंडुलकर ह्या निष्णात फलंदाजाचे चरित्र अभ्यासक्रमांत नेमलेले आहे. हा धडा मुलाखतीच्या स्वरुपांत असून त्यांत हा क्रिकेटपटू आपल्या जीवनांतले कांही प्रमुख प्रसंग सांगतो. त्याच्या यशाची कारणें कोणती, असं विचारल्यावर सचिनने उत्तरादाखल सांगितले आहे, कीं त्याची महत्वाकांक्षा, सातत्याने सराव, आणि तीव्र आकलनशक्ती!

## सर्वांत उंच कचरापेटी

ऍव्हरेस्ट पर्वताचे शिखर हे जगांतले सर्वांत उंच स्थान! पण जामलिंग नोर्केवर विश्वास ठेवायचा असेल, तर दहापंधरा वर्षांनंतर हे उत्तर चूक ठरूं शकेल. ५१ वर्षांपूर्वी एडमंड हिलरी यांच्याबरोबर ऍव्हरेस्टवर स्वारी करणाऱ्या तेनसिंग नोर्के यांचा जामलिंग हा मुलगा. हे शिखर आता हळूंहळूं सर्वांत जास्त उंचीवरची कचरापेटी होणार आहे. अन्नाचे अवशेष, तंबू, कागद, प्लॅस्टिकचे कप, पिशव्या, मोडके बांबू, रिकाम्या बाटल्या, आणि मानवी घाण. ऍव्हरेस्टची शिखरावरची सपाटी म्हणजे जेमतेम २०० चौ. फुटांची जागा. एकावेळी फार तर वीस ते तीसजण तिथे उभे राहूं शकतात. तिथे जाणाऱ्या गिर्यारोहकांची कसून तपासणी यापुढे व्हायला हवी, विमानतळावर घेतात ना अगदी तश्शीच! आणि रिकाम्या हातानेच शिखरावर जाण्याची परवानगी द्यायला हवी.








# मुळांची पानें

## चंपनचे कथाबन

कोणे एके काळी, चंपन नांवाचा ससा एका अरण्यांत राहात होता. त्याच्या घराजवळ असलेल्या झाडाखाली बसून गोष्टी वाचायला त्याला आवडत असे. तो अतिशय प्रामाणिक, दयाळू व हुशार होता. त्याच्या गोष्टी ऐकायला अनेक पशुपक्षी जमत असत.

चंपनने पशुपक्ष्यांना गोष्टी वाचून दाखवायला सुरवात केल्यापासून अरण्याचा राजा असलेल्या सिंहाचा दरबार ओस पडायला लागला. कोल्हे आणि लांडगे यांना सशाचा मत्सर वाटत होता, म्हणून ते त्याच्याकडे जात नव्हते.

एकदा सकाळच्या वेळीं सिंह अरण्यांत फिरत होता. ससा एका पक्ष्याला गोष्ट सांगताना सिंहाला दिसला. गोष्ट संपल्यावर पक्षी उडून झाडावर जाऊन बसला, आणि ससा आपल्या घरांत परत गेला. सिंहाला याची कांही माहिती नव्हती म्हणून त्याने त्या पक्ष्याला विचारले. पक्ष्याने सगळी माहिती सांगितली. सिंहाला राग आला. सशाच्या गोष्टी



ऐकायला येणारे पशुपक्षी दरबारांत येत नव्हते, हे त्याला कळलं. कोल्हे व लांडगे यांच्या प्रमुखांकडे सिंह गेला, आणि कसंही करुन सारे प्राणी दरबारांत परत येतील त्याची व्यवस्था करायला सिंहाने त्यांना सांगितले. सशाला ठार मारायचा त्यांनी बेत ठरवला.

सिंहाने एका साधूचा वेष घेतला आणि कोल्ह्यांकडून बातमी पसरवली कीं ह्या साधूला सशाला आशिर्वाद देण्याची इच्छा आहे. माकडाने ही बातमी सशाला सांगितली. ससा साधूकडे जाण्यासाठी तयार होत होता, तितक्यांत तो पक्षी तिथे उडत आला आणि सशाला ठार मारायचा बेत आहे, याची सावधगिरीची सूचना त्याने सशाला दिली. तोच तिथे एक लांडगा येऊन त्याने दार ठोठावले. ससा म्हणाला, ''मी उद्यां येईन, कारण आता अंधार झालाय.'' त्या पक्ष्याने सर्व प्राण्यांना सकाळी तिथून



स्निग्धा पटेल,
नवी मुंबई

दुसऱ्या अरण्यांत जायला सांगितले होते. त्याप्रमाणे सगळे मित्र दुसरीकडे गेले. तिथे हा ससा त्यांचा राजा झाला. आणि त्या अरण्याचे नांव पडले, ''चंपनचे कथावन.''

अनेक वर्षे उलटली. चंपनला चकू आणि चक्रू नांवांचे दोघे मुलगे होते. वडिलांसारखेच तेही





सायन चंदा
कोलकाता

गुणवंत होतेच, पण ते फारच हुशार होते. सिंहाबद्दल चंपनने त्यांना सांगितलेलं त्यांच्या लक्षांत होतं.

एक दिवस सिंहाचा छावा यांच्याशी खेळायला आला. हे दोघे घरी पळाले आणि त्यांनी वडिलांना सांगितले, ''बाबा, आज एक लहान सिंह आमच्याबरोबर खेळायला आला होता. तो बहुतेक त्या राजा सिंहाचाच बेटा असावा. कदाचित तो आमच्यावर हल्ला करील.'' चंपनने उत्तर दिले, ''नाही बाळा, तो सिंह आता म्हातारा झालाय. तेव्हां काळजी करुं नका.''

दुसऱ्या दिवशी सिंह व त्याचा छावा ह्यांच्यावर हल्ला करायला आले. छाव्याला माहीत नव्हते कीं आपले नवे मित्र हे आपल्या वडिलांचे शत्रू आहेत. छावा सिंहावर खूप चिडला, आणि त्याने परत घरी जायचे नाकारले. सिंह लाजिरवाणा होऊन एकटाच घरी परत गेला. जेव्हां चंपन घरी आला तेव्हां सिंहाच्या छाव्याने आपला निर्णय त्याला सांगितला.

बरेच दिवस मोठ्या सिंहाने कुणावरही हल्ला केला नाही कारण त्याचा छावा शत्रूच्या बनांत राहात होता ना! सिंहाला आपली चूक कळली. तो चंपनच्या कथावनांत गेला आणि त्याने चंपनला विचारले, ''मी तुझा मित्र होईन आणि इथे राहून तुझ्या गोष्टी ऐकेन. तुला चालेल कां?'' चंपनने होकार दिला. आणि ते सारेजण आनंदात एकत्र राहूं लागले.

अधिकारी (हॉटेलला फोनवर) मला एक संपूर्ण भोजन ऑफिसला पाठवा.

हॉटेल मॅनेजर : माफ करा, साहेब. आम्ही ऑफीसांत भोजनाचा डबा पाठवूं शकत नाही.

अधिकारी : कां?

मॅनेजर : आम्ही फक्त घरपोंच डबे देतो.

*- आर. राघवेंद्रन (१२), चेन्नई*






जज : तुला काय पसंत पडेल ते पाहा - दहा दिवस तुरुंगवास किंवा पांच हजार रुपये.

आरोपी : काय झकास कल्पना आहे. मी पैसेच घेईन.

*- सेसिल डीक्रूझ (१०), मुंबई*



पाठलाग करुं लागला. हे तिघे एका झुडुपाआड लपले. पहारेकऱ्यानें त्यांचे बोलणे ऐकले होते, पण तितक्यांत ही मुले तिथून निसटली.

खाली पायथ्याशी तिघेही परत आले आणि सारेजण सरळ पोलीस चौकीवर गेले. तिथे इन्स्पेक्टरला बघितल्याबरोबर ते एकदम म्हणाले, "इन्स्पेक्टरकाका, आज आम्ही दहशतवाद्यांची एक टोळी बघितली."

तो इन्स्पेक्टर स्तंभित झाला. रात्रीच्या वेळी इतक्या उशीरा ही चार मुले तिथे आलेली पाहून तो आधी चकित झाला होता. त्याला फारच आश्चर्य वाटले.

"कुठे? तुम्हाला कुठे दिसले दहशतवादी?"

अर्शिक म्हणाला, "त्यांनी बरमुरा डोंगरावर एक कारखाना सुरुं केला आहे." इन्स्पेक्टरने त्यांची [illegible] हंसतच [illegible]

भेदरुन गेलेला अर्णव इतरांना हळू आवाजात म्हणाला, "मला वाटतं हा इन्स्पेक्टरही त्यांचाच साथीदार असला पाहिजे. आपण जाऊं या परत."

त्यावेळी इन्स्पेक्टर म्हणाला, "अरे पोरांनो, ते दहशतवादी नाहीत. गतवर्षी आपल्या सरकारनेच तिथें बंदुकांचा कारखाना काढलाय. पण ही बातमी जनतेला जाहीर केलेली नव्हती."

आता मुलांची हंसण्याची पाळी होती. इन्स्पेक्टरने मनमोकळेपणे हंसून म्हटले, "पण तुम्ही मुलं मात्र खूप शूर नि धाडसी आहात हं! तुमचं कौतुक केलंच पाहिजे."

आपल्या मुक्कामावर परत येताना स्कॉट म्हणाला, "पण हा प्रसंग आपण जन्मांत कधी विसरणार नाही." स्कॉट हंसायला लागला व सर्वजण त्याला सामील झाले.

जॉन : मी जे करुं शकतो ते आमच्या शाळेंत कुणालाही करता येत नाही, अगदी आमच्या वर्गशिक्षकांनादेखील नाही.
जेरी : काय ते?
जॉन : मी लिहीलेलं वाचणे!

*- जी.आर. वेंकटेश (१२),*
*जग्गयापेट*





प्रवासी (रेल्वे स्टेशनकडे जाताना) : जर मी तुझ्या शेतांतून जवळच्या वाटेने स्टेशनवर गेलो तर मला तीन वाजताची गाडी पकडता येईल कां?
शेतकरी : नक्कीच! आणि जर माझ्या कुत्र्याने तुम्हाला पाहिलं तर कदाचित त्यापूर्वीची गाडीदेखील गांठता येईल.



# रत्नशेखरांचा संकेत

पंडित रत्नशेखर हे प्रशांत नगर राज्याचे गुरु होते. त्यांच्या गुरुकुलांत अनेक विद्यार्थी शिक्षण घेत होते. त्यांचा शिक्षणक्रम पूर्ण झाला कीं ते मुलांना योग्य व्यवसायक्षेत्र निवडण्याबाबत सल्ला देऊन त्यांना निरोप देत. जे विद्यार्थी अत्यंत बुद्धिमान होते त्यांना ते राजदरबारांत नोकरी करण्यास सांगत असत. गुरुजींच्या अशा विद्यार्थ्यांना राजाही मोठ्या आस्थेने कार्यालयांत नोकरी देत असे.

त्या वर्षी जितके विद्यार्थी अभ्यासक्रम पूर्ण करुन गुरुकुलांतून बाहेर जाणार होते, त्यांच्या-पैकी चांगल्या, योग्य, अशा पांच विद्यार्थ्यांना पंडित रत्नशेखरनी राजाकडे पाठवले. पाठवताना पहिल्या विद्यार्थ्याला खडावा घेऊन जायला सांगितले. दुसऱ्या विद्यार्थ्याला वेत, तिसऱ्याला चाळणी, चौथ्याला झाडू घेऊन, आणि पांचव्या विद्यार्थ्याला चमनगोटा करुन राजाकडे धाडले.

जेव्हां हे पांचीजण राजप्रासादाजवळ पोंचले. तेव्हां प्रशांतनगरचा राजा शेजारच्या राजाच्या निमंत्रणावरुन त्यांच्या राज्यांत भेटीला गेला होता. प्रधानमंत्रींच्या देखरेखीखाली, राज्यकारभाराची जबाबदारी युवराज सांभाळत होता.

रत्नशेखरने पाठवलेल्या पांची शिष्यांनी राजसभेत प्रवेश केला. त्यांनी युवराजाला नम्रपणे प्रणाम केला आणि गुरुजींनी बरोबर दिलेल्या वस्तू दाखवल्या.

रत्नशेखर पंडितांचे विद्यार्थी हे निश्चितच उत्तम शिक्षण घेतलेले बुद्धिमान व तरतरीत असणार हे युवराजाला ठाऊक होतं. परंतु ज्या वस्तू या तरुणांनी बरोबर आणल्या होत्या, त्यावरुन त्यांना कोणत्या विभागांत काम दिलं पाहिजे, हे कांही त्याला समजेना. म्हणून ही जबाबदारी त्याने प्रधानमंत्र्यावर सोंपवली.

प्रधानमंत्र्यांनी कांही व्यावहारिक प्रश्न त्या मुलांना विचारले. त्यांची उत्तरे ऐकून त्यांना समाधान वाटले असावे असे दिसत होते. त्यांच्या

चरण तेजा



वस्तू व उत्तरांवरुन मंत्र्यांनी प्रत्येकाला कामाचे क्षेत्र विभागून दिले. खडावा घेऊन येणाऱ्याला त्यांनी खजिनदाराच्या कचेरीत काम दिले. वेत घेऊन येणाऱ्या तरुणाची कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्यासाठी नेमणूक केली. चाळणी घेऊन येणाऱ्याला संरक्षण व्यवस्था खात्यांत पाठवले, आणि केरसुणी घेऊन येणाऱ्याला सेनापती नेमले. शेवटचा उमेदवार जो मुंडण करुन आला होता त्याला त्यांनी उपमंत्रीपदावर नेमले.

बराच वेळ विचार केल्यानंतरदेखील, प्रधान-मंत्र्यांनी राजगुरुंचे शिष्य ज्या वस्तू घेऊन आले होते, त्यांच्या आधाराने हे खातेवाटप कसे काय केले, त्याचा उलगडा युवराजाला झाला नाही. त्याला हे सारं अजब वाटत होतं. त्याने नम्रपणे प्रधानमंत्र्यांना विचारले, "मंत्रीजी, शिष्यांनी ज्या वस्तू आणल्या होत्या, त्यांच्यावरुन तुम्ही ही नेमणूक कशी केलीत? मी खूंप विचार केला, तरी मला कांही याचे उत्तर सांपडले नाही. तुम्ही याचा खुलासा कराल कां?"

प्रधानमंत्र्यांनी हंसून म्हटले, "युवराज, ऐका! पहिला शिष्य खडावा घेऊन आला. खडावांना आपण कितीही तावडलं, तरी त्या निमूटपणे सर्व कांही सहन करतात, विरोध करीत नाहीत. त्याचा अर्थ असा कीं खडावा विनय आणि विश्वास यांचे प्रतीक आहेत. विनयी आणि विश्वासू व्यक्तीच्यासाठी कोषागारांत नोकरी देणे सर्व दृष्टींनी योग्य ठरेल. हाच गुरुजींचाही उद्देश होता. म्हणून त्यांनी त्याला खडावा दिल्या."



युवराजाने "लक्षांत आले" अशा अर्थी हंसत मान डोलावली. "दुसरा शिष्य वेत घेऊन आला. वेत हे अनुशासनाचे प्रतीक आहे. गुरुजींचा अभिप्राय आहे कीं सरकारी कर्मचाऱ्यांना योग्य प्रशिक्षण व कामाचे वळण लावण्यास हा तरुण योग्य आहे. म्हणून मी त्याची नियुक्ती शिक्षण-खात्यांत उच्च पदावर केली. तिसरा शिष्य चाळणी घेऊन आला होता. चाळणी चांगले खाली पाडते आणि नको असेल ते वरच्यावर वेगळे काढते. गुरुजींनी असा संकेत दर्शवला कीं हा शिष्य चांगल्याचा आदर करील, आणि दुष्टांना वेगळे काढील. म्हणून त्याच्यावर सुरक्षेची जबाबदारी सोंपवली. आता केरसुणीचं काम कोणतं असतं? हवेतून किंवा इतर कारणांमुळे घरांत केरकचरा जमतो, तो केरसुणी झाडून टाकते आणि घर स्वच्छ, साफसूफ करते. शत्रूचे सैनिक जेव्हां आपल्या राज्यांत प्रवेश करतात, तेव्हां केरसुणी जशी केराला झटकून टाकते, तसा हा तरुणदेखील शत्रूला झटकून टाकील. त्याला झाडू देऊन पाठवण्यांत गुरुजींनी हा संदेश दिला होता."

"मंत्रीजी, आपली स्तुती करण्यासाठी मी कांही आपल्या बरोबरीच्या पातळीवरचा नाही, पण आपली स्तुती केल्याखेरीज मला राहावत देखील नाही. रत्नशेखर यांनी यांच्यापैकी एकाची चकोटी करुन त्याला कां पाठवले होते? त्यांची ही कल्पना फारच विक्षिप्त वाटते. पण आपण तर त्याला उपमुख्यमंत्रीपद दिलेत; हे मला फारच विचित्र वाटले आहे!"

"होय युवराज! प्रथम मलाही हे सर्व फार विचित्र वाटले होते. पण खूप विचारमंथन केल्यावर गुरुजी काय संकेत देत आहेत ते लक्षांत येऊं लागले. हा पांचवा शिष्य, आपल्या केसांखाली असलेल्या मस्तकाचा अत्यंत बुद्धिमान उपयोग करणारा असला पाहिजे. त्याच्या बुद्धिमत्तेचा देशासाठी उपयोग व्हावा, म्हणून मी त्याची उपमुख्यमंत्री म्हणून नेमणूक केली." प्रधानमंत्र्याने खुलासा केला.

या उत्तराने युवराजाच्या मनांतल्या साऱ्या शंका दूर झाल्या. प्रधानमंत्र्यांच्या चाणाक्ष स्वभावाचे त्याला फारच कौतुक वाटले.





# वराहांचे गांठोडे

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका जमिनदाराचा मुलगा म्हणून अवतार धारण केला. ते वयांत आले तोपर्यंत त्यांच्या कुटुंबाची प्राप्ती आणखी जास्तच वाढली. बोधिसत्वांना एक भाऊ सुद्धां होता.

कांही काळ लोटल्यावर जमीनदार वारला. त्यांच्या कुटुंबाच्या मालकीच्या एका गांवात वसुलीसाठी दोघे भाऊ निघाले. कुळांकडून त्यांना यावयाचे खंडाचे पैसे, धान्य, वगैरे वसूल केल्यावर त्यांच्या जवळ एक हजार वराह (एक सोन्याचे नाणे) त्यांच्या जवळ जमा झाले.

ते पैसे घेऊन दोघे भाऊ काशीला निघाले. त्यांच्या वाटेवर एक नदी लागली, ती पार करून जावयाची होती. नाववाला यायला आणखी थोडा उशीर होता, म्हणून दोघांनी आपल्याबरोबर आणलेले फराळाचे सामान काढले व दोघे खायला बसले. धाकट्या भावाने खाणे झाल्यावर पाणी पिऊन घेतले.

बोधिसत्वांनी संवयीप्रमाणे खायला घेतलेल्या फराळाच्या सामानापैकी थोडे उरविले आणि ते नदीच्या पाण्यांत ऐकून दिले.

बोधिसत्वांनी फराळाचे जे सामान फेकून दिले, ते पाण्यांतल्या एका भुताने घेतले. ते खाल्यावर त्याच्या अंगात एका दिव्य शक्तीचा संचार झाला. त्यामुळे त्या भुताला त्याला फलाहार घालणारा कोण हे कळले.

खाऊन पिऊन झाल्यानंतर बोधिसत्व नदीकांठावर एक पंचा अंथरून झोपले. त्यावेळी त्यांच्या भावाच्या डोक्यात एक दुष्ट विचार आला. तो विचार म्हणजे आलेल्या पैशांतील भावाचा वांटासुद्धां उडविण्याची दुर्बुद्धी त्याला झाली. लगेच त्याने दगडगोटे गोळा करून वराहांच्या गाठोड्यांसारखेच दुसरे एक गाठोडे तयार केले आणि दोन्ही गांठोडी थोरल्या भावाला दिसणार नाहीत अशा तऱ्हेने त्याने ती आपल्या कपड्यांबरोबर लपवून ठेवली.



त्यानंतर कांही वेळाने नावाडी आला व बोधिसत्वांची झोप मोडली. दोघे भाऊ नावेत बसले. नाव नदीच्या मधोमध आली. त्याने योजलेल्या युक्तीप्रमाणे धाकट्या भावाने दगडगोट्यांचे गांठोडे नदीत निसटून पडल्यासारखे दाखवून नदीत पाडले. त्याने हे काम दुष्टबुद्धीनेच केले होते. तरी कांपऱ्या हाताने बोलता बोलता गांठोडे पाण्यात टाकतांना ओरडला - ''दादा, वराहांचे गाठोडे पाण्यांत पडले की रे!''

ते ऐकून बोधिसत्व म्हणाले - ''पडले तर जाऊ दे रे! नाही तरी ते आपले पैसे नव्हतेच, म्हणून तर नदीत पडले! त्यासाठी मनाला लावून घेणे वेडेपणा होईल!'' असे सांगून बोधिसत्व गप्प राहिले.

बोधिसत्वांनी पाण्यांत टाकून दिलेला फलाहार ज्या भुताने खाल्ला होता, त्याने पाण्यांत पडलेले गांठोडे खऱ्या वराहांचेच होते, ते ओळखले, एवढेच नव्हे तर धाकट्या भावाने केलेली लबाडीसुद्धां ओळखली. त्याने एका मोठ्या माशाला चिथवून ते गाठोडे त्याच्याकडून गिळविले.

त्यानंतर तो मासा नजरेआड कोठे जाऊ ये, यासाठी सतत त्याच्यावर नजर ठेवली. बोधिसत्व व त्यांचा धाकटा भाऊ दोघे काशीला परतले. घरी आल्यावर धाकट्या भावाने त्याच्याजवळचे दुसरे गाठोडें सोडून पाहिले. त्यांत त्याला दगडगोटेच मिळाले. त्याची चूक कळल्यावर त्या धक्याने तो आजारी पडला.



नंतर एकदा कोळ्यांनी नदीत मासे धरायला जाळे टाकले. पाण्यांतल्या भुताने त्याला प्राप्त झालेल्या मंत्रशक्तीने वराहांचे गाठोडे गिळणारा मासा जाळ्यांत पडेल असे केले. त्याप्रमाणे तो मासा जाळ्यांत सांपडला. कोळ्यांनी तो मासा राजधानीत नेला. मासा पाहून ग्राहकांनी त्याची किंमत विचारतां कोळ्यांनी त्याची किंमत एक हजार वराहांहून एक वराह जास्त असल्याचे सांगितले.

ग्राहकांना कोळ्याचे डोके फिरले तर नाही असे साहजिकच वाटले आणि ते हसूं लागले. तेव्हां कोळी तो मासा बोधिसत्वांकडे घेऊन गेले. बोधिसत्वांनी त्याची किंमत विचारली.

कोळी म्हणाले - ''तुम्हीच घेणार असाल तर फक्त एक वराह!''

''इतर कोणाला हवा असेल तर काय किंमत

घ्याल? तुमचे हे विचित्र बोलणे ऐकून मला तर आश्चर्य वाटते आहे!" बोधिसत्व म्हणाले.

"इतर कोणाला विकायचा झाला तर एक हजार एक वराहांहून कमीला देणार नाही." कोळी म्हणाले. बोधिसत्वांना आश्चर्यच वाटले. तरी त्यांनी एक वराह देऊन तो मासा विकत घेतला. नंतर पतिपत्नींनी तो चिरून पाहिला तर माशाच्या पोटात एक हजार वराहांचे गाठोडे सापडले. बोधिसत्वांनी ते ओळखलेही.

"अग, हे वराहांचे गाठोडे आपलेच आहे!" असे म्हणत बोधिसत्वांनी घडलेली गोष्ट बायकोला सांगितली व म्हणाले - "परंतु या कोळ्यांना दिव्य ज्ञान असावेसे मला वाटू लागले आहे. माशाच्या पोटांतून निघालेले हे एक हजार वराहांचे गाठोडे माझे असल्याचे या कोळ्यांना कसे काय कळले? म्हणून तर त्यांनी इतरानाच विकायचं झालं तर एक हजार एक वराह घेणार असल्याचं व मला विकायचं झालं तर फक्त एक वराहाला विकायचं असं त्यांनी ठरविलं! त्यांनी जास्त मागितला तो एकच वराह, तो त्यांच्या मेहनतीचा मोबदला म्हणून!" नंतर कोळ्यांना इतकं दिव्यज्ञान कसं काय मिळालं, याविषयी बोधिसत्व विचार करीत असतां एक दिव्यवाणी झाली :

"देवमाणसा, मी पाण्यांत राहणारं एक भूत आहे. एकदां तू फलाहार करीत असतां त्यांतला काही वांटा पाण्यात टाकून दिलास. तो फलाहार मी केला व मला दिव्यज्ञान प्राप्त झाले. नदीत पडलेले वराहांचे गाठोडे मीच माशाकरवी गिळविले आणि मीच कोळ्यांना तुझ्याकडे तो मासा न्यायला प्रेरणा दिली. अशा तऱ्हेने मी तुझे उपकाराचे ऋण फेडण्याचा अल्प प्रयत्न केला. तू आपल्या कपटबुद्धी असलेल्या धाकट्या भावाला यांतले कांही देऊ नकोस."

पाण्यातल्या भुताने केलेले उपकार व त्याची सौजन्य वृत्ती दोन्हींची बोधिसत्वांनी खूप वाखाणणी केली व त्यांना फार आनंदही झाला. परंतु बोधिसत्वांनी, भुताने दिलेला सल्ला मात्र न मानून उदारवृत्तीने धाकट्या भावाला पांचशे वराह दिले आणि आपले भ्रातृप्रेम राखले.







# विष्णु पुराण

लक्ष्मी वेदवती नांवाचा अवतार धारण करून तपश्चर्या करीत असताना रावणाने तिचा बुचडा धरला, म्हणून ती योगाग्निने जळून गेली आणि लंकेत जन्मली.

लंकानगरीसारखंच एक विशाल व सुंदर सरोवर होते. रावण नित्य संवयीप्रमाणे प्रातःकालीच त्या सरोवरांत स्नानसंध्या आटोपून शंकराच्या पूजेसाठी कमळें आणायला गेला. त्याला एक मोठे कमळ सरोवराच्या मध्यभागी दिसले. त्या कमळातून शुभ्र कांती बाहेर फेकली जात असल्याचे दिसले. त्याच्याजवळ जात असतां त्या फुलांत सोन्यासारखं चकाकणारे एक मूल रडत असलेलं दिसलं.

त्या तान्ह्या मुलाला पाहून रावण त्याच्याकडे आकृष्ट होऊ लागला. त्याच वेळी एक देववाणी झाली - "रावणा, ते मूल तुझा व तुझ्या लंकेचा नाश करण्यासाठी जन्मलेले आहे!"

रावणाने ती वाणी ऐकून राक्षस वीरांना त्या अर्भकाला मारून टाकण्याची आज्ञा केली.

अनेक तऱ्हेने प्रयत्न करून पाहूनही ते मूल मरेना. तलवारी व सुरे अदृश्य झाले. अग्नी विझून गेला. दगड, फुलांचे, ढीग झाले. क्रूर जंगली प्राणी पळून गेले.

राक्षस कंटाळून गेले. त्यांनी पंचधातूची केलेली एक पेटी घेऊन त्यांत त्या अर्भकाला ठेवले, आणि ती पेटी समुद्रांत टाकून दिली.

ती पेटी तरंगत जाऊन जमिनीला लागली व भूगर्भात शिरून कोठे तरी अदृश्य झाली.

मिथिला नगरीचा राजा जनक हा फार मोठा ज्ञानीपुरुष व राजर्षी होता. यज्ञ करण्यासाठी जमीन



सपाट व सारखी करण्याकरिता नांगरीत होता. नांगराला 'खण्ण्' असा आवाज होऊन ती पेटी लागली. पेटी उघडून पाहिली तर आंत एक सुंदर मुलगी. जनक राजाने तिला भूदेवीने दिलेला प्रसाद समजून प्रेमाने आपली मुलगी म्हणून उचलून घेतले.

नांगराच्या फाळाने जी खांच पडते तिला 'सीता' म्हणतात, त्या खांचेत सांपडलेली मुलगी म्हणून तिचे नांव 'सीता' झाले. जनकाची मुलगी म्हणून 'जानकी', भूमीत जन्मली म्हणून 'भूमाता', या नांवाने सीता वाढू लागली.

सीता आपल्याबरोबरच्या मुलींबरोबर खेळत असताना आपला चेंडू शोधीत असतांना फुलांनी पुजलेल्या धनुष्याखाली डाव्या हाताने तिने उचलून पाहिले तर तिला चेंडू दिसला, तो तिने उचलला. नंतर ते धनुष्य खेळायला चांगलं आहे असे समजून तिने आपल्या घरकुलांत नेऊन ठेवले आणि ती खेळू लागली.

जनकराजाने ते सर्व प्रत्यक्ष पाहिले व थक्क झाला.

ते धनुष्य शंकराकडून मागून घेऊन जनकराजाचे पूर्वज त्याची पूजा करीत आले होते. त्रिपुरासुराचा वध केला तेव्हां शंकराने त्याच धनुष्याचा उपयोग केला होता. ते धनुष्य उचलावयाचे म्हणजे तीनशे वीरांची गरज असे.

असे धनुष्य सीतेने लहानपणीच उचलले हे पाहून, सीता ही कोणी सामान्य स्त्री नाही, हे जनकराजाने ओळखले. अशा मुलीला वर शोधायचा म्हणजे ते धनुष्य उचलून त्याला दोरी चढविण्याचे काम जो पुरुष करील, तोच योग्य ठरला असता.

त्याप्रमाणे अशा पुरुषालाच आपली मुलगी वरमाला घालील, असे स्वयंवर प्रसंगी जनकराजाने जाहीर केले होते.

सीता अशा स्थितीत मिथिलेत लहानाची मोठी झाली.

इकडे विश्वामित्राने यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणाला पाठवावे, म्हणून दशरथ राजाला सांगितले. तेव्हां दशरथ राजा म्हणाला - ''यज्ञरक्षणार्थ मी या लहान मुलांना कसा काय पाठवूं मुनीश्वर? अद्याप त्यांनी शस्त्रास्त्र विद्या शिकून घेतलेली नाही!''

''त्यासाठींच तर मी आलो आहे! क्षत्रिय-कुमारांना कोणकोणत्या विद्या शिकविणे आवश्यक आहे, त्या सर्व मी त्यांना शिकवीन!'' असे सांगून विश्वामित्रांनी वसिष्ठ मुनींकडे पाहिले.



वसिष्ठमुनी स्मित करुन विश्वामित्रांची स्तुती करूं लागले आणि रामलक्ष्मणाला विश्वामित्रां-बरोबर पाठविण्यास त्यांनी दशरथाला सांगितले. मुनिकुमारासारखे आपले केस बांधून धनुष्यबाण घेऊन, विश्वामित्र मुनींबरोबर रामलक्ष्मण निघाले.

वाटेत जागोजागी थांबून विश्वामित्र मुनी दोघांना धनुर्विद्येचे मंत्रतंत्र शिकवीत.

रामलक्ष्मण विश्वामित्र ऋषींच्या आश्रयाला राहून धनुर्विद्येत पारंगत झाले. विश्वामित्र मुनी यज्ञाची तयारी करीत असताना त्यांत विघ्नें आणण्यासाठी भयंकर आवाज करीत ताटका राक्षसीण विजेसारखी येऊन आश्रमावर पडली.

विश्वामित्र मुनींनी ताटका राक्षसिणीचा वध कर म्हणून रामाला आज्ञा केली. रामाने ताटकेवर शरवृष्टी सुरु केली. ताटकेच्या सर्व अंगात बाण शिरले व ती एका पर्वतासारखी जमिनीवर मरून पडली.

यज्ञ सुरुं झाला. विश्वामित्रांनी रामाला सर्व तऱ्हेच्या अस्त्रांचा प्रयोग कसा करावयाचा उपदेश केला. रामलक्ष्मण, धनुष्यबाण घेऊन सारखे यज्ञभूमीच्या चारी बाजूंनी हिंडत होते. त्यामुळे यज्ञभूमीचे रक्षण उत्तम प्रकारे झाले.

तरी मारीच व सुबाहू नांवाचे दोन राक्षस यज्ञभूमीवर चालून आले. रामाने दोनच बाण सोडले. सुबाहू तत्काळ मरण पावला. मारीचाला जो बाण लागला त्यामुळे तो समुद्रांत जाऊन पडला, आणि कसाबसा स्वतःचे प्राण वांचवून लंकेला पोहोचला.

यज्ञ निर्विघ्नपणे चालू होता. विश्वामित्रांनी



यज्ञसमाप्तीपूर्वी रामाच्या हस्ते अग्निकुंडात हविष्य घालून यज्ञकार्यात भाग घेतल्याचा पुण्यलाभ त्याला करवून दिला. यज्ञकुंडातून ज्या ज्वाळा बाहेर येत होत्या, त्यावर अर्धचंद्राकृती टोक असलेला एक बाण तरंगत असल्याचे दिसले.

विश्वामित्र रामाला म्हणाले - ''रामा, तो तुझा बाण आहे. त्याला यापुढे रामबाण हेच नांव राहील. तो बाण शत्रूचा शिरच्छेद करून परत तुझ्या हातांत येईल!'' असे सांगून विश्वामित्र ऋषींनी तो बाण रामाला दिला. रामाने तो बाण भक्तिभावनेने डोळ्याला लावून भात्यांत ठेवला.

बरेच दिवस यज्ञ चालू होता. त्या अवधीत विश्वामित्रांनी रामाला सर्व अस्त्रांचा उपदेश केला!

''रामा, तू व मी सूर्यवंशीय आहो! मला माहित असलेली सर्व अस्त्रविद्या शिकविण्यासाठी



तुला घेऊन आलो व तुला ती शिकविल्याने माझ्या मनाचे समाधान झाले आहे. तुझ्यासारख्या शिष्याचा गुरु झाल्याबद्दल मला किती आनंद होत आहे!"

"गुरुदेव, मी आपल्या कृपाप्रसादाला पात्र ठरलो, याबद्दल मी स्वतःला धन्य समजतो!" राम म्हणाला.

विश्वामित्रांच्या सिद्धाश्रमांत रामलक्ष्मणांनी युवावस्थेत प्रवेश केला.

एके दिवशी विश्वामित्र ऋषी अस्त्रांचे वैशिष्ट्य रामाला समजावून सांगताना रामाकडे पहात म्हणाले, "रामा, तुझे विशाल नयनारविंद माझ्या आश्रमावर शांत चंद्रिका किरण फेकीत राहून, माझ्या आश्रमाला त्यांनी शांतिस्थान केले आहे. म्हणून तू शांताराम आहेस आणि सुंदररामही आहेस."

"चल माझ्याबरोबर" अशा अर्थी मान हलवून विश्वामित्र निघाले. रामलक्ष्मण त्यांच्या पाठोपाठ चालू लागले. विश्वामित्र मिथिला नगरीच्या दिशेने चालू लागले.

वाटेत गौतम मुनींच्या आश्रमातून जात असतां रामाचा पाय एका दगडाला लागला, व तो अहिल्येचे रूप घेऊन बदलला. अहिल्येने रामाला प्रणाम केला. राम चकित झाला.

त्याचवेळी दीर्घकाळ तप करीत असलेले गौतममुनी तपश्चर्या संपल्यावर तेथे आले.

रामाकडे श्रद्धा भक्तिपूर्वक पहात ते म्हणाले - "रामचंद्रा! माझी पत्नी अहिल्या शापमुक्त झाली. तू पावनराम आहेस!"

अशी कोणती गोष्ट घडली कीं त्यामुळे अहिल्या शापमुक्त झाली असली पाहिजे, याअर्थी राम चकित होऊन सर्वांकडे पाहू लागला.

गौतम मुनी अनन्यभावे रामाकडे पहात म्हणाले - "रामा, होय, तू एक अवतार पुरुष आहेस!"

"विष्णूने जे अवतार धारण केले, त्या अवतारांत रामावतारानंतर कृष्णावतारात कृष्णाने तो अवतार पुरुष आहे हे माहीत असूनही अनेक लीला केल्या, व तो लहानाचा मोठा झाला. राम हा पूर्णपणे मानव म्हणूनच आपले कर्तव्य पालन करीत राहिला. मानव म्हणूनच त्याने मोठमोठी कार्यें केली. हेच रामावताराचे वैशिष्ट्य!" सूतमहर्षी रामकथा पुढे सांगू लागले.

गौतममुनी सर्वांना आश्रमांत बोलावून घेऊन गेले आणि त्यांनी सर्व प्रकारे अतिथि सत्कार केला. विश्वामित्र ऋषी रामलक्ष्मणाला घेऊन



गौतमाश्रमातून निघाले. जनकमहाराजांनी सीतेचे स्वयंवर रचल्याचे जाहीर करण्यासाठी व ऋषी मुनींनी त्या उत्सवास हजर रहावे याचे निमंत्रण देण्यासाठी आपले पुरोहित शतानंद यांना पाठविले होते. शतानंद हे अहिल्या व गौतम मुनी यांचे पुत्र होते. शतानंदाच्या पालखीबरोबर जनक महाराजांनी पाठविलेले शिपाई व सरदार होते. शतानंद विश्वामित्रांना भेटण्यासाठी सिद्धाश्रमाला जात होते.

वाटेतच विश्वामित्र भेटले. शतानंद पालखीतून उतरले. त्यांना नमस्कार करून त्यांनी जनक-राजाचे निमंत्रण पोंचते केले.

विश्वामित्राच्या कृपेने अहिल्येचे शाप विमोचन झाल्याचे ऐकून शतानंद आनंदाने रामाला भेटले, व त्याची अनेक प्रकारे स्तुती केली, आणि मातापित्यांच्या दर्शनाला गेले.

रामलक्ष्मणांना घेऊन विश्वामित्र मिथिला नगरीस गेले. सीता त्यावेळी राजोद्यानात हिंडत होती. तिच्या बरोबर तिची धाकटी बहीण उर्मिला होती.

सीता रामांची परस्पर दृष्टादृष्ट झाली. "आपले हे आले वाटते!" असा विचार मनांत येऊन सीताची गडबड उडाल्यासारखी झाली. तिचे पाय सरळ पडत नव्हते. ती घाईघाईने अंतःपुरात निघून गेली. उर्मिलाचे मन लक्ष्मणाकडे आकर्षित झाले. मोठमोठे बलिष्ठ राजाधिराज कोणीही शिव-धनुष्य उचलूही शकले नाहीत.

राजा जनकाची निराशा झाली. सीता वडिलांच्या बरोबरच उभी होती. तिची दृष्टी रामावर खिळलेली होती. तिने रामाकडे पाहून वडिलांकडे पाहिले, हेतू हा की वडिलांनीसुद्धां रामाकडे पहावे.

विश्वामित्रांनी रामाला पुढे व्हायला सांगितले.



गुरुवर्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून आपण तर निमित्तमात्र आहोत असे समजून राम पुढे सरसावला व त्याने शिवधनुष्याला नमस्कार केला आणि ऊस सहजी उचलून घेणाऱ्या हत्तीसारखे शिवधनुष्य उचलून घेतले आणि धनुष्य वाकवून त्यावर ती दोरी चढवू लागला, परंतु मोठा आवाज झाला आणि काळवत्री दगड फुटताना जसा कडाडल्यासारखा आवाज होतो तसा आवाज होऊन धनुष्य मोडले.

तो आवाज दशदिशांत दुमदुमला. आणि दक्षिण महासागरांत महेंद्र पर्वतावर तपश्चर्या करीत बसलेल्या परशुरामाला ऐकू आला.

परशुरामाला विष्णूने निराळ्या रूपांत गोलोकवासी कृष्णाने सांगितलेल्या गोष्टी आठवल्या. कृष्णाने दिलेले कोदंड विष्णूचा अंश असलेल्या रामाला देण्यासाठी निघाला.

सीतेने रामाच्या गळ्यांत वरमाला घातली, आणि लाजून घाईघाईने पावले उचलीत ती वडिलांशेजारी जाऊन उभी राहिली. सीतारामांच्या विवाहाला हजर राहण्यासाठी महाराज दशरथ सहकुटुंब आले.

बोहोल्यावर सीताराम परस्परांवर लग्नविधी म्हणून तांदूळ घालीत असतां सीतेच्या कमळासारख्या सुकोमल ओंजळीत ते तांदूळ मोत्यासारखे आणि पद्मरागासारखे भासले. रामाच्या डोक्यावर जाईजुई व मोगऱ्यासारखे स्वच्छ भासले. रामाच्या श्यामल शरीरावरुन खाली पडत असतां इंद्रनील मण्यासारखे वाटत होते.

सीतेची धाकटी बहीण उर्मिला लक्ष्मणाला, मांडवी भरताला, शत-रूपाला शत्रुघ्नाला देऊन त्यांचेही विवाह समारंभ सीतारामांच्या विवाहा बरोबर पार पडले.

दशरथ राजा मुलांबरोबर सुनांना घेऊन अयोध्येला निघाला. घाईघाईने येणाऱ्या परशुरामाला पाहून रथांतून खाली उतरुन त्याने नमस्कार केला आणि रामाच्या ऐवजी आपला शिरच्छेद करावा अशी विनंती केली.

परशुराम रामाला म्हणाला - "रामा, तू शंकराचे धनुष्य तोडलेस, म्हणे! ह्या धनुष्यावर दोरी चढव, पाहू!" असें सांगून आपल्या हातांतली कोदंड दिले. ते देत असतानाच परशुरामातील विष्णूचा अंश रामांत शिरला.





# व्यापारांत स्पर्धा

त्या गांवात रोहन व भूषण हे प्रमुख व्यापारी होते. दोघांच्यामधे नेहमी चुरस असे. एक दिवस, एक तरुण भूषणकडे आला. भूषण कामांत गढला होता. त्याने थोड्या वेळानंतर वर बघितले व त्या तरुणाला तो कोण होता व कशासाठी आला होता हे विचारले.

"साहेब, माझे नांव बालाजी आहे. मी रोहनसाहेबांकडे नोकरी करत होतो. ते मला कमी पगार देत होते म्हणून मी त्यांची नोकरी सोडली. आपल्याकडे जर मला काम मिळाले तर मी जरूर करीन." त्यावर भूषणने त्याला विचारले, "इथे आल्यावर तू पगारवाढ मागणार नाहीस याची काय खात्री?" त्यावर बालाजी नम्रपणे म्हणाला, "पगार पुरेसा नसला तर नंतर वाढ व्हावी म्हणून विनंती केली, तर ती कांही चूक नाही ना?"

"घटकाभर समज कीं मी तुला कामावर ठेवले, त्यांत माझा काय विशेष फायदा?" भूषणने विचारले. बालाजी म्हणाला, "आपल्याला काय म्हणायचंय ते मला समजलं नाही."

"मला म्हणायचंय कीं रोहनच्या व्यापाराची वाढ होण्यासाठी कोणते उपाय व योजना विचारात होत्या, हे तू मला सांगू शकशील कां?" भूषणने विचारलं. बालाजीने उत्तर दिले, "माफ करा! मी त्यासंबंधी आपल्याला कांही सांगू शकणार नाही. तिथल्या गुप्त गोष्टी मी सांगितल्या तर तुम्ही मला कामावर ठेवणार नाही."

"तुला अशी शंका कां आली?" भूषणने विचारलं.

"तुम्ही विचाराल की इथल्या गोष्टी तिकडे सांगणार नाहीस याची काय खात्री?" बालाजी म्हणाला.

"बालाजी, तुझं उत्तर तुझी हुशारी तर दाखवतंच, पण त्याबरोबर तुझी ईमानदारीही दाखवतं. माझ्या व रोहनच्यामधे व्यापारांत स्पर्धा आहे. पण कर्मचाऱ्यांच्याबाबतीत नाही हां! ये, ये, या वह्या घे आणि आत्ताच कामाला सुरवात कर."

- चंदन रावत





# काळी मैना

मालविका राज्याच्या अभयारण्यामधे एक छानशी झोंपडी होती. वीरभद्र हा वृद्ध गृहस्थ आपली नात चंद्रहासिनी हिच्याबरोबर या झोपडीत राहात होता. चंद्रहासिनी आता सोळा वर्षांची झाली होती. तिला समजायला लागल्यापासून ती आजोबांसह या अरण्यांतच राहात होती. आजूबाजूच्या साऱ्या वृक्षराजीची तिला माहिती होती. त्या अरण्यांतले प्राणी तिचे मित्र बनले होते.

चंद्रहासिनीचे आपल्या आजोबांवर अतिशय प्रेम होते. ती त्यांना नेहमी विचारायची, ''आजोबा, आपण या अरण्यांत कां राहातो आहोत?''

बऱ्याच वर्षांपूर्वी वीरभद्र धीरसिंह राजाच्या रथाचा सारथी होता. एकदा धीरसिंह आणि शेजारच्या राज्याचा राजा चित्रवर्ण, यांच्यात तुंबळ युद्ध झाले. त्यांत चित्रवर्णाचा भाला धीरसिंहाला लागला आणि तो जखमी झाला. त्या युद्धांत धीरसिंहाला विजय मिळाला खरा, पण त्याचा समज झाला कीं वीरभद्राच्या बेसावध राहाण्यामुळे तो जखमी झाला. म्हणून त्याने वीरभद्राला हद्दपारीची शिक्षा सुनावली.

तेव्हांपासून वीरभद्र चंद्रहासिनीला घेऊन या अरण्यांत राहात होता, कारण ती लहान असतानाच तिचे आईवडील अपघातांत वारलेले होते. एके दिवशी तरुण चंद्रहासिनी झोपाळ्यावर झोके घेत बसली होती, तितक्यांत तिला एक काळी मैना दिसली. एका झाडाजवळ ती पंख फडफडवीत असहाय्य होऊन पडली होती. चंद्रहासिनी तिच्याजवळ गेली आणि तिने तिला हातांत उचलून घेतले. त्या मैनेच्या पंखांना जखम झाली होती हे चंद्रहासिनीला दिसले. तिने झाडीतून पाने शोधली व त्यांचा रस पिळून मैनेच्या पंखावर घातला व तिला दाणापाणी दिले. दोन दिवसांतच तिच्या उपचारामुळे मैना बरी झाली व आपल्या डोळ्यांनी कृतज्ञता व्यक्त करीत चंद्रहासिनीकडे बघूं लागली कांही दिवसांनंतर मैना पूर्णपणें बरी झाली, आणि दोघींची मैत्री झाली.

एके दिवशी राजा धीरसिंह कांही सैनिकांबरोबर त्यांच्या झोपडीपाशी आला. त्यावेळी वीरभद्र कांही कामासाठी बाहेर गेला होता. धीरसिंहाने चंद्रहासिनीला विचारले, ''अे मुली, तुला हे अरण्य पूर्णपणे माहिती आहे?'' हा राजा आहे हे चंद्रहासिनीला लक्षांत यायला वेळ लागला नाही. तिने नम्रपणे म्हटले, ''माहिती आहे महाराज!

''मी कोण आहे ते तुला सांगण्यापूर्वीच कळलं हे चांगलं आलं. मी राजा धीरसिंह आहे. कांही दिवसांपूर्वी माझा एकुलता एक पुत्र शिकारीला या अरण्यांत आला होता. त्यावेळीस एका वृक्षाखाली एक तपस्वी तपश्चर्या करीत ध्यानमग्न होता. एका उर्मट सैनिकाने गंमत म्हणून एक मेलेली काळी मैना त्या तपस्व्याच्या डोक्यावर ठेवली. संतापाने जेव्हां तपस्व्याने डोळे उघडले, तेव्हां त्याला माझा पुत्र दिसला. तपस्वीच्या मनांत आलं कीं हे काम ह्यानेच केलेलं असावं. म्हणून त्याने कांही न विचारता आपल्या मंत्रशक्तीने माझ्या मुलाचे रूप एका काळ्या मैनेत बदलून टाकले. मला ही गोष्ट माझ्या सैनिकांनी सांगितली. मी त्या काळ्या मैनेला शोधायला या अरण्यांत आलो आहे.''

तेव्हां चंद्रहासिनी राजाला म्हणाली, ''महाराज, मी ती काळी मैना नुसती पाहिलीच नव्हे तर ती जखमी, घायाळ असताना तिची शुश्रूषादेखील केली आहे. ती इथेंच जवळपास असेल.'' असं म्हणून तिने टाळी वाजवली.

दोनतीन क्षणांतच ती काळी मैना उडत उडत आली आणि चंद्रहासिनीच्या खांद्यावर बसली. ती मैना पाहून राजाला आपला मुलगा परत मिळाला असंच वाटायला लागलं.



''महाराज, राजकुमारांना त्यांचं मूळ रूप कसं प्राप्त होऊं शकेल ते मला कळत नाही.'' ती काळजीच्या स्वरांत म्हणाली.

''पोरी, हेच मी तुला सांगणार होतो. ज्या तपस्व्याने शाप दिला, त्याच्याकडे मी जाऊन आलो. मी त्याला सांगितले कीं हा अपराध राजकुमाराने नाही, पण दुसऱ्या एका अहंमन्य सैनिकाने केला आहे. राजकुमाराला विनाकारण शिक्षा झाली आहे हे समजल्यावर त्या मुनींच्या मनांत करुणा उत्पन्न झाली. त्यांनी मला हे मंतरलेले पाणी दिले आहे. हे पाणी शिंपडले कीं राजकुमाराला त्याचे मूळ रूप प्राप्त होईल.'' राजाने सविस्तर खुलासा केला.

ती ऐकून चंद्रहासिनी फारच आनंदून गेली. ''महाराज, तर मग या समस्येचा उलगडा आता अगदी सहजपणे होऊन जाईल.''

रामानंद शर्मा

तिच्या बोलण्याचा अर्थ राजाला समजला नाही. त्याने विचारलं. "तो कसा काय?"

"महाराज, माझे आजोबा वीरभद्र आपल्या रथाचे सारथी होते. मी त्यांची नात आहे. माझं नांव चंद्रहासिनी. मागे युद्धाच्या वेळी शत्रूराजाने भाला फेंकून आपल्याला जखमी केले होते, तेव्हां आपणदेखील नीट विचार न करताच माझ्या आजोबांना राज्याच्याबाहेर हाकलून दिलंत. पण माझ्या आजोबांच्या मनांत मात्र हा आपला देश, आपले महाराज, यांच्यावर अटळ श्रद्धा, भक्ती आणि प्रेमभाव आहे. माझ्या आजोबांनाही विनाकारण शिक्षा भोगावी लागली आहे. ते मंतरलेले पाणी आपण त्यांच्यात हाताने या काळ्या मैनेवर शिंपडावे." चंद्रहासिनीने सांगितले.

तेवढ्यांत वीरभद्र परत आला होता. त्याने लगेच महाराजांसमोर साष्टांग नमस्कार घातला आणि हा विषय समजल्यानंतर त्याने ते मंतरलेले पाणी त्या मैनेवर शिंपडले. कांही क्षणांतच त्या मैनेच्या जागी प्रत्यक्ष राजकुमार जयसिंह उभा होता.

राजा धीरसिंहाच्या आनंदाला पारावार उरला नाही. तो म्हणाला, "वीरभद्र, मी अकारण तुला हद्दपारीची शिक्षा दिली त्याचे मला आता फार वाईट वाटते आहे." वीरभद्राने नम्रपणे उत्तर दिले, "महाराज, आपण मला ही शिक्षा दिलीत खरी, पण तीच शिक्षा युवराजांसाठी वरदान ठरली आहे. माझ्यासाठी यापेक्षां दुसरा मोठा आनंद कुठला असणार?"

जयसिंहाने मैनेच्या रुपांत असताना चंद्रहासिनीने त्याचे केलेले कौतुक, शुश्रुषा व संगोपन याबद्दल सविस्तर सांगितले. नंतर तो म्हणाला, "आपली व वीरभद्र आजोबांची संमती असेल तर मला चंद्रहासिनीशी विवाह करायची इच्छा आहे."

"पण आधी तिलाच विचार कीं या प्रस्तावाला तिची संमती आहे कां!" राजाने हंसत हंसत म्हटलं.

चंद्रहासिनीने लाजून खाली मान घातली आणि ती वीरभद्राच्यामागे जाऊन उभी राहिली.

या प्रसंगानंतर महिनाभरांतच युवराज जयसिंह व चंद्रहासिनी यांचा विवाह थाटामाटांत साजरा झाला.










# देवीचा महिमा

एका गढवाली गांवात सगळेच लहानसहान शेतकरी होते. ते अशिक्षित व भोळे होते. प्रत्येकाची झोपडी गवताने शाकारलेली होती. गांवचा पाटील व न्यायाधीश यांची घरे मात्र कौलारु होती. गांवाच्या अगदी मध्यावर देवीचे देऊळ होते.

या शेतकऱ्यांच्यामधे एकी नव्हती. प्रत्येक किरकोळ गोष्टीवरून ते भांडत बसत.

उन्हाळ्याच्या दिवसांत एका झोंपडीला आग लागली आणि ती भडकायला लागली. गांवकरी जोरजोराने ओरडायला लागले. त्यांनी सर्वांना जागे केले आणि जवळच्याच तलावाचे पाणी आणून आग विझवायचा ते प्रयत्न करुं लागले. आग पसरुं नये म्हणून त्यांनी आसपासच्या इतर घरांच्यावरही पाणी टाकले.

आग शांत झाल्यावर सारेजण जेव्हां घरी परतायला लागले, तेव्हां देवीच्या पुजाऱ्याने त्यांना थांबवलं आणि सांगितलं, ''तुम्हा सर्वांच्या लक्षांत आलं नसावं. आपल्या देवीने आपला महिमा दाखवलान, आपल्याला जागे केले आणि वांचवले.''

गांवकऱ्यांना पुजारी काय म्हणतोय ते कांही समजेना. सर्वजण गप्प राहिले. तेव्हां पुजाऱ्याने मोठ्या आवाजांत त्यांना म्हटलं, ''या दाट अंधारात आपल्याला जर देवीने ज्वाळांचा उजेड दाखवला नसता, तर, आग कुठे लागली आहे ते आपल्याला कळलंच नसतं. आणि मग आग विझवणेही शक्य झाले नसते. त्यापेक्षांही महत्वाचे, म्हणजे तुम्ही सर्वांनी एकत्र येऊन आग विझवलीत. गांवकऱ्यांची एकी अशी नेहमीच राहावी, हा देवीचा हेतू आहे.''

*- वरलक्ष्मी*





# अचूक वाणी

हरी आणि गिरी हे दोघे तरुण शेजारी होते. दोघांनाही नोकरी नव्हती. पण दोघांच्या वागण्यांत आकाशपाताळाइतकं अंतर होतं. हरी घरांत आईला मदत करीत असे आणि वडिलांची बाहेरची कामेही करीत असे. गांवातल्या लोकांशी तो नम्रपणे वागत असे. समवयस्क मित्रांशीही त्याचं वागणं प्रेमळ असे. सर्वजण हरीचे खूप कौतुक करीत. मुलगा असावा तर हरीसारखा, असं सारे आईवडील नेहमी म्हणत असत.

गिरीचं वागणं मात्र याच्याविरुद्ध होतं. तो कधीही कुणालाही मदत करीत नसे. सारा वेळ तो झोपा काढीत असे. वडिलांचा आदर करणे त्याला कधी जमले नाही. जेव्हां पाहावं तेव्हां तो कुणाशीतरी भांडणतंटा किंवा वितंडवाद घालीत बसलेला असे. सारेजण त्याला टाळीत असत आणि म्हणत कीं गिरीसारखा मुलगा कुणालाही नसावा!

आपलं नांव बदनाम झालेलं आहे हे गिरीलाही ठाऊक होतं. पण आपले उर्मट, स्वार्थी वागणे त्याला कारणीभूत आहे, हे त्याला पटत नव्हते. गिरी हरीला पाण्यांत पाहात असे, आणि त्याचे अकल्याण व्हावे अशी सुप्त इच्छा त्याच्या मनांत होती. तरीदेखील हरी कधी गिरीवर नाराज झाला नाही. जर कुणी म्हटलं कीं गिरी चांगला नाही, तर हरी त्याला सांगत असे, ''सर्वांचे विचार सारखे नसतात. गिरीची व माझी तुलना करुन त्यांत त्याचा अपमान होतो, म्हणून तो माझ्यावर रागावतो. नाहीतर आमची चांगली मैत्री आहे.''

एके दिवशी गिरीचा मामा शंकर त्याच्याकडे आला. थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारल्यानंतर शंकरने गिरीला म्हटलं, ''अरे, तू किती हुशार आहेस! आमच्या गांवच्या जमीनदारांना दोन तरतरीत तरुणांची जरूरी आहे. एकाने काम करायचं आणि दुसऱ्याने त्यांना बातम्या, माहिती पुरवायची. तू जमीनदाराला माहिती सांगत जा, आणि तुझा शेजारी हरी काम करील! पण त्यांची



एक अट आहे. दोघांनी एकत्र जायचे; तरच ही नोकरी दोघांना मिळेल. ते पगारही चांगला भरपूर देणार आहेत.''

''जर मी एकटाच गेलो तर तुमचे जमीनदार मला नोकरी देणार नाहीत कीं काय?'' गिरीने विचारले.

''नाही, जे पगाराबाबतीत कुरकुरणार नाहीत अशाच तरुणांना जमीनदार कामावर ठेवतील. तुझा मित्र हरी अतिशय सुस्वभावी आहे. तुम्ही दोघे मिळून जर त्यांना भेटलात, तर तुम्हाला दोघांनाही ही नोकरी नक्कीच मिळेल. तुमचं भवितव्य एकदम बदलेल ही मला खात्री आहे.'' शंकरने गिरीला समजावत सांगितलं.

''मला नोकरी मिळो वा ना मिळो, मला त्याची मुळीच पर्वा नाही, पण कांही झालं तरी हरीला नोकरी मिळता कामा नये.'' गिरीने मोठ्या तोऱ्याने बोलला.

''अरे, हरी चांगला मुलगा आहे ना! मग तू त्याच्यावर एवढा जळतोस कां?'' शंकरने विचारलं.

''त्याला वाटतं कीं माझ्याबरोबर त्याची तुलना केली गेली कीं मी आपोआपच वाईट ठरतो. म्हणून मी सांगतो कीं माझे भले होवो न होवो, त्याचे भले मात्र कांही झालं तरी होता कामा नये.''

गिरी फारच मत्सरी आहे हे शंकरच्या लगेच लक्षांत आले. त्याच दिवशी शंकरने हरीला भेटून सत्य परिस्थिती समजावून सांगितली आणि म्हटले, ''तुमच्या दोघांसाठी ही एक सुवर्णसंधी आहे. कसंतरी करुन तू गिरीची समजूत घाल आणि याचा विचार करा.''

हरीने होकार दिला आणि तो गिरीला भेटायला गेला. गिरीने हरीचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले, व नंतर तो म्हणाला, ''हा जमीनदार कांही चांगला माणूस नाही असं मी बऱ्याच जणांकडून ऐकलंय. कांही दिवस गेले कीं तो मला काम करायला सांगेल आणि बातम्या सांगायचं काम तुझ्यावर सोंपवेल. मग मी नीट काम करीत नाही आणि तू नीट बातम्या सांगत नाहीस, असा बोल लावील. बघताबघता हातची नोकरी जाईल बघ. म्हणूनच मी हा प्रस्ताव नाकारला.''

''मला वाटतं कीं हा तुझा केवळ भ्रम आहे. एकवार पुन्हां विचार करुन पहा ना!'' हरीने सुचवलं.

त्यावर चिडून गिरीने म्हटलं, ''ठीक आहे, माझा भ्रम आहे असं समज, पण लक्षांत ठेव. माझी वाणी अचूक आहे. माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडतो, तो खरा ठरतो, हे माझ्या घरातली मंडळीदेखील सांगतात. गेल्या आठवड्यांत मला नासकवणी खायची इच्छा झाली, मी म्हटलं कीं दूध नासलं तर बरं! त्यादिवशी सारं दूध नासलं. तीन दिवसांपूर्वी आई म्हणाली कीं परसांतल्या झाडांना पाणी घाल. माझ्या तोंडून शब्द आला कीं पाऊस पडला तर किती बरं होईल! आणि खरोखरीच मुसळधार पाऊस पडला. आता मी म्हटलंय ना, कीं जमीनदार दुष्ट आहे, तर ते खरं होईल बघ! माझ्यावर विश्वास ठेव.''

''तुझी कल्पना खरी आहे कीं नाही हे मला माहीत नाही, पण हातांत आलेली नोकरी निसटून जाईल, त्याचं मला फार वाईट वाटतंय बघ.'' हरीने दुःखी स्वरांत म्हटलं.

''नोकरी माझ्या हातूनही निसटते आहे कीं! माझ्यामुळे तुला ही चांगली संधी गमवावी लागते आहे असं तुला वाटतंय. पण हे खरं नाही. लौकरच तुला याच्यापेक्षां जास्त चांगली संधी मिळेल बघ. तेव्हां या गेलेल्या संधीचे दुःख होण्याऐवजी तुला मोठा आनंद वाटेल बघ. मी पुन्हां एकदा ठासून सांगतो, माझी वाणी अचूक आहे. माझा शब्द खराच ठरेल.'' गिरीने असं सांगून आपला हेतू स्पष्ट केला.

खरोखरीच चार दिवसानंतर एक आश्चर्य-कारक घटना घडली. हरीचा एक लांबचा नातेवाईक केशव याने 'येऊन भेट' असा निरोप धाडला. केशव शहरांत राहात होता. समुद्रावर सफरी करुन त्याने निरनिराळ्या व्यापार उद्योगांत बरीच संपत्ती गोळा केलेली होती. पण त्याला मूलबाळ नव्हते. आता वय झाले म्हणून त्याला



घरी आराम करायचा होता. आपल्या संपत्तीचा विनियोग समाजाच्या उपयोगी कार्यासाठी करावा अशी त्याची तीव्र इच्छा होती. त्यासाठी त्याला एक सुशील व सज्जन तरुण हवा होता. कुणीतरी त्याला हरीचे नांव सुचवले. तेव्हां केशवला वाटले कीं हरीला संपत्तीचा चौथा हिस्सा द्यावा, त्याला आपल्याजवळ राहायला बोलवावे आणि उरलेल्या संपत्तीचा उपयोग परोपकारासाठी करावा.

निरोप मिळाल्याबरोबर हरी लगेच केशवला भेटायला शहरांत गेला. केशवला हरी आवडला. कांही महिन्यानंतर हरी आपल्या गांवी परत आल्या. सर्वांसाठी त्याने चांगल्या भेटवस्तू आणल्या होत्या. त्याचे आईवडील, भाऊबहीण, गुरुजी, मित्र यांच्यासाठी खास किंमती वस्तू होत्या पण गिरीसाठी त्याने कांहीही आणलेले नव्हते.

गिरी हरीला भेटायला आला आणि आढ्यतेने म्हणाला, "माझ्या अचूक वाणीमुळे तुझी इतकी उन्नती झाली. तुझ्या सुस्वभावी वृत्तीचे लोक नेहमी कौतुक करीत असतातच, पण तू मात्र मला विसरलास नि माझ्यासाठी कांहीच आणले नाहीस."

हे बोलणे ऐकून हरी नाराजीने म्हणाला, "तुझी इच्छा होती की मला नोकरी मिळूंच नये. त्यासाठी तू हातची संधी घालवलीस. ज्याचे हृदय निर्मळ व कोमल असते, त्याची वाणी अचूक असते. तसे तुझे नाही. दूध नासलं, किंवा पाऊस आला, या तुझ्या स्वार्थासाठी असलेल्या गोष्टी होत्या. आणि दुसरी एक महत्त्वाची बाब विसरलास जेव्हां एखाद्याच्या तोंडून वाईट गोष्टी निघून त्या खऱ्या ठरतात, तेव्हां लोक त्याला अचूक वाणी म्हणून नांवाजत नाहीत. लोक म्हणतात कीं त्याच्या जिभेवर काळा डाग आहे. आता राहिली भेटवस्तू. तुला भेटवस्तू देणे म्हणजे अयोग्य व्यक्तीचे कौतुक करणे! त्यामुळें मला नेहमी मदत करणाऱ्या, माझ्या हितचिंतकांचा अनादर झाला असता. कारण तुला त्यांच्याबरोबरीने लेखले गेले असते. म्हणून मी भेट आणली नाही." हे ऐकून गिरी मुकाट्याने खाली मान घालून तिथून निघून गेला.








# अस्वल्या मांत्रिक

## 13

*(दुर्मुखराजा धीर करुन आपले राज्य बळकावणाऱ्या सूर्यभूपतीचा पाठलाग करीत किल्ल्यांत शिरला. अस्वल्या वधिक आणि उग्रदंड किल्ल्याचे दरवाजे तोडण्याचे प्रयत्न करीत होते, तेव्हां मायावी मर्कट तिथें येऊन पोचला, परंतु कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाला तिथे पाठोपाठ आलेले पाहून त्याने किल्ल्याच्या तटावरुन आंतल्या बाजूला उडी मारली. त्यानंतर...)*

कालीवर्मा आणि अस्वल्या मांत्रिकाला पाहून वधिकाला चेव चढला. तिथेच आनंदाने फिरत आणि आपला परशू फिरवीत तो म्हणाला, "महाराज! अहो, कित्येक दिवसानंतर आपणा दोघांचे दर्शन मला लाभले आहे. आता माझी दुर्दशा लवकरच संपेल."

अस्वल्या मांत्रिक रेड्यावरुन खाली उतरला. वधिकाच्याजवळ जाऊन तो म्हणाला, "अरे अस्वला! आत्ताच आनंदाने उड्या मारायला लागू नको. तो विचित्र वानर कांही खरा माकड नाही, तो मिथ्यामिश्र नांवाच्या मांत्रिकाचा शिष्य भ्रांतिमती आहे. त्याने माझा मंत्रदंड चोरलाय, तो आधी आपण परत मिळवला पाहिजे."

उग्रदंडाला बघून कालीवर्मा आश्चर्याने म्हणाला, "अरे अस्वल्या वधिका, हा राक्षस, हत्ती आणि हा परिवार कसा काय जमवलास?"

हे शब्द ऐकून उग्रदंड हळूंच हसला आणि म्हणाला, "भाऊ, कालीवर्मा नांवाचे क्षत्रिय तरुण तुम्हीच ना? तुमची सारी माहिती मी अस्वल्या वधिकाच्या तोंडून ऐकली आहे. म्हणजे हे



अस्वल्या मांत्रिक असावेत होय ना?'' आणि दूरवर उभे असलेले चंद्रशिला नगराच्या राजा जितकेतूचे मंत्री आणि त्यांचे घोडेस्वार यांच्याकडे कालीवर्माचे लक्ष वेधीत तो पुढे म्हणाला, ''कालीवर्मा, मायामर्कटाने आम्हाला सांगितलं कीं तुमचा पाठलाग करणारे हे सैनिक जितकेतू राजाची माणसें आहेत. त्यांच्या संकटातून तुम्ही कसे काय वाचणार?''

अस्वल्या मांत्रिकाकडे वळून कालीवर्मा बोलला, ''गुरुजी! आपली काय आज्ञा आहे? आपण एकवार राजा जितकेतूला आपल्या शक्तीचा परिचय करुन दिला होता. तरी पण त्यांचा मंत्री जीवगुप्ताची आपल्यावर हल्ला करायची हिंमत होतेच कशी? हे मला कांही उलगडत नाही.''

अस्वल्या मांत्रिकाने एकदा किल्ल्याच्या बंद द्वाराकडे नजर फिरवून म्हटले, ''माझ्या गुरुला संकटात टाकणाऱ्या मांत्रिकाचा हा मायामर्कट शिष्य आहे. तो गुप्तपणे माझा पाठलाग करतोय, हे मला माहीत नव्हते. म्हणून अनवधानाने माझा मंत्रदंड मी घालवून बसलो आहे. मला माहीत असतं तर मी नदींत आंघोळ करायला उतरताना हा दंड काठावरच्या झाडाला टेकवून ठेवला नसता.''

अस्वल्या बधिकाने आपला परशू दोन्ही हातांवर आडवा ठेवला आणि मांत्रिकाच्यासमोर येऊन तो म्हणाला, ''मांत्रिकदेवा! आपला मंत्रदंड नसला तरी आपण काळजी करुं नये, हा परशूदेखील मंत्राने भारलेला आहे. ह्याच्या प्रभावापुढे उग्रदंड राक्षसदेखील घाबरला होता. आपण याचा स्वीकार करावा, आणि मला पूर्वचत माणसाचे रूप द्यावे.''

''पण तुला तर आपल्या गुरुला दुर्मुखराजाचे मस्तक अर्पण करायचे आहे ना? ती गोष्ट विसरलास कीं काय?'' उग्रदंड राक्षसाने मधेच विचारले.

दुर्मुखराजाचे नांव ऐकल्यावर मांत्रिक पळभर चक्रावला व म्हणाला, ''अरे बधिका! तो राजा अजून जिवंत आहे कां? मग मांडलिक सूर्यभूपती कोण आहे? किल्ल्याच्या आंत कुणाकुणामधे लढाई चाललेली आहे?''

अस्वल्या बधिकाने दुर्मुखचा पाठलाग करण्याच्या प्रसंगापासून सारी हकीकत थोडक्यांत सांगितली आणि म्हटले ''मांत्रिकदेवा! आपल्याला जे वाटलं होतं, तसा तो राजा दुष्ट



नाही. त्याउपर आपली इच्छा! आपण प्रथम मला मनुष्याचे रूप द्यावे. या अस्वल्याच्या कातड्यां-मधे मी उकाड्याने हैराण झालो आहे.''

''गुरुजी! बिचाऱ्या बधिकाची इच्छा आपण पूर्ण करा ना!'' कालीवर्माने समजूत घातली.

त्यावर अस्वल्या मांत्रिकाने जादूचा परशू हातांत घेऊन एक मंत्र पुटपुटला, आणि परशू बधिकाच्या पायांवरुन अलगद फिरवला. त्याबरोबर बधिकाचे पाय माणसाच्या पायासारखे झाले. त्यानंतर परशूचा स्पर्श साऱ्या शरीरावर फिरत हलकेच मस्तकापर्यंत होत गेला. कांही क्षणांतच अस्वल्या बधिकाचे मानवी शरीरांत रूप बदलले, पण त्याचे डोके मात्र अस्वलाचेच राहिले.

बधिकाला वाटलं कीं तो आता सर्व सामान्य माणसासारखा झाला आहे. म्हणून झटदिशी त्याने मांत्रिकाला साष्टांग नमस्कार घातला व तो म्हणाला, ''मांत्रिकदेवा! अहाहा! किती काळानंतर मी पुन्हां माणसासारखा झालो आहे. मला किती आनंद झालाय ते शब्दांत सांगणेही कठीण आहे.''

हे ऐकून नागमल्ल व इतर सर्वजण हंसू लागले. बधिक त्यांच्याकडे बावचळून बघत राहिला. त्यावर उग्रदंड राक्षसाने आपल्या दगडी गदेने बधिकाच्या डोक्याला स्पर्श करीत म्हटले, ''अरे बधिका, गळ्यापर्यंत तुझे शरीर माणसाचे जरूर आहे, पण मस्तकाचे काय?''

बधिकाने लागलीच दोन्ही हातांनी आपले डोके चाचपून पाहिले आणि जोराने ओरडत तो



म्हणाला, ''मांत्रिकदेवा! किती अन्यायी आहे हे! माणसाच्या शरीरावर अस्वलाचे डोके? अस्वलाच्या शरीरापेक्षां या रुपांत लोक माझी टर उडवतील. हे असले शरीर घेऊन मी जगूं शकणार नाही!''

अस्वल्या मांत्रिकाने गंभीर चेहरा करीत म्हटले, ''हे बघ बधिका! तू काळजी करुं नकोस. सध्यां तू याच्यावरच समाधान मान. तुझे डोके जरी अस्वलाचे राहिले असले, तरी त्यांतली बुद्धिमत्ता तर माणसाचीच आहे ना? माझा मंत्रदंड जो त्या दुष्ट भ्रांतिमतीने मायामर्कटाच्या रुपांत येऊन चोरला आहे, त्यांत माझी थोडी मंत्रशक्ती आहे म्हणून मी तुला पूर्णपणे माणूस बनवूं शकलो नाही. तरीसुद्धां तो मंत्रदंड हातांत मिळाला, की मी तुला तुझे पूर्वीसारखे रूप मिळावे म्हणून जरूर प्रयत्न करीन.''



डबडबलेल्या डोळ्यांनी बघत वधिकाने त्याला सांगितले, "या विचित्र रुपांत मला बघून जितकेतु राजा मला मुख्य वधिकाचे पद कसे देतील?"

वधिकाची चिंता पाहून कालीवर्माला त्याची दया आली. वधिकाच्या खांद्यावर हात ठेवून तो त्याला धीर देत म्हणाला, "अस्वल्या वधिका! तू घाबरुं नकोस. मांत्रिक गुरुजींचा मंत्रदंड हरवला आहे हे जेव्हां राजा जितकेतूचा मंत्री जीवगुप्त ह्याला समजले, तेव्हां तो हिंमत धरुन आमचा शेवट करण्यासाठी सैनिक घेऊन आमचा पाठलाग करीत करीत इथपर्यंत येऊन पोंचला आहे. आपण त्या लोकांपासून सावध राहायला हवं!"

अस्वल्या वधिकाने जीवगुप्त मंत्र्याच्या दिशेने बघितले व भीतीने कांपऱ्या स्वरांत तो म्हणाला, "मला त्या राजाचं कांही ठाऊक नाही, पण हा मंत्री मात्र निश्चित माझे डोके उडवील."

हे ऐकून अस्वल्या मांत्रिकाने जादूचा परशू पुन्हां वधिकाच्या हातांत देत म्हटले, "अरे वधिका! तू जरा धाडसीपणाने वागलास ना, तर हा परशू तुझे रक्षण करील." आपल्या कमरेची तलवार उपसून मांत्रिकाने पुढे सांगितले, "ही तलवार त्या मर्कटाने चोरलेल्या मंत्रदंडा इतकी शक्तिशाली नसली, तरी ही जरुर माझे रक्षण करायला पुरेशी आहे."

"पण मग माझा चरितार्थ, माझी नोकरी याचं काय होईल? इथे असलेल्या डाकू नागमल्ल आणि त्याचे साथीदार यांच्यासारखा कांही मी वाटसरुंना लुटण्याचे नीच काम करणारा माणूस नाही." वधिकाने आपली समस्या मांडली.

त्याचे शब्द ऐकताच नागमल्ल डाकू संतापला आपल्या कमरेला लटकणारी तलवार खाली टाकून म्हणाला, "अरे अस्वल डोक्या! तू मला नीच म्हणतो आहेस काय? अरे, लोकांच्या मदतीने आणि सैनिकाच्या बळावर कुणीही आलतूफालतू राज्यकर्ता असूं शकतो, पण अरण्यांतल्या निर्जन वाटेवरुन जाणाऱ्या वाटसरुंना लुटून जगायचं याला खरी हिंमत आणि शौर्य लागतं बरं! मी माझी तलवार खाली टाकली आहे; तू ही तुझा जादूचा परशू खाली ठेव आणि ये माझ्याशी मल्लयुद्ध खेळायला!" असं म्हणून नागमल्लने आव्हान दिलं.

अस्वल्या मांत्रिक आता चिडला. त्याने सर्वांकडे नजर फिरवली आणि कालीवर्माला म्हटलं, "कालीवर्मा, या मूर्खांना ते कोणत्या संकटात सांपडले आहेत ते अजूनही कळलेलं नाही. सर्वांना पकडून त्यांचा शिरच्छेद करण्यासाठी राजा जितकेतूचा मंत्री कांहीतरी योजना तयार करतो आहे. किल्ल्यांत दुर्मुखराजा विजयी झाला किंवा त्याचा मांडलिक जिंकला, तरी आपण संकटात आहोतच. तो दुष्ट मायावी मर्कट त्यांना आपल्याविरुद्ध चिथावण्याचा जरूर प्रयत्न करील."

तलवार उपसून कालीवर्मा रागावून बोलला, "मांत्रिक गुरुजी काय सांगताहेत ते ऐकूं आलं कां? इथें तुमचा सर्वांचा नेता आता कोण आहे, ते ठाऊक आहे?" उग्रदंड राक्षस सोडून बाकी सर्वजण एकमुखाने ओरडले, "कालीवर्मा की जय!"

कालीवर्माने समाधानाने मान डोलावली व उग्रदंडाकडे आपला मोहरा वळवला. तोच जीवगुप्त मंत्र्याचा एक घोडेस्वार उलटी तलवार हातात घेऊन तिथे पोंचला. आपला घोडा थांबवीत तो स्वार म्हणाला, "सर्वजण लक्षपूर्वक ऐका. महाराज जितकेतू यांचे मंत्री जीवगुप्त यांच्याकडून मी एक खास संदेश घेऊन आलो आहे."

"अरेच्या! म्हणून ही तलवार तू उलटी पकडली आहेस होय? फार छान! सांग, काय संदेश आहे?" कालीवर्माने विचारलं.

"इथें हजर असलेल्या नगराच्या प्रमुख वधिकाला लगेच आपल्यासमोर येण्यास महामंत्री यांनी आज्ञा केली आहे. त्याबरोबर राजाने शिरच्छेदाची शिक्षा केलेला कालीवर्मा नांवाचा गुन्हेगार पळून गेला आहे. त्याला पकडून आणायची मंत्र्यांची आज्ञा आहे." जीवगुप्त मंत्र्याच्या दूताने संदेश दिला.

हे बोलणे ऐकून अस्वल्या मांत्रिक हळूच



हंसला नि वधिकाला म्हणाला, ''काय रे वधिका! मंत्र्यांची आज्ञा ऐकलीस ना? काय करणार आहेस तूं?''

अस्वल्या वधिकाला कांही निर्णय घेता येईना. दोनतीन क्षण खाली मान घालून तो गप्प उभा राहिला आणि नंतर म्हणाला, ''कालीवर्मा राव, आपली काय आज्ञा आहे? हे अस्वलचे मस्तक घेऊन मी नगरांत गेलो तर पोरेटोरे मला दगड मारून माझा प्राण घेतील. यांतून वांचण्याचा कांहीतरी मार्ग मला सांगा!''

आपली तलवार वधिकाच्या शरीरावर टेकवून कालीवर्मा म्हणाला, ''वधिका! तुझी स्वामीभक्ती खरोखरच कौतुकास्पद आहे. आता सर्वांत प्रथम आपण किल्ल्याच्या आंत पोंचायचं आणि त्या मायामर्कटाला पकडायचं. आपण उशीर केला नाही तर दुर्मुखराजाचे प्राण वांचतील. जितकेतू-पेक्षां दुर्मुख हा सर्व दृष्टीने जास्ती चांगली व्यक्ती आहे. आता राहिले या जीवगुप्त मंत्र्याच्या दूताला उत्तर! तुझ्या परशूने तू ह्याचे डोके उडवणार आहेस, कीं त्याची तलवार मोडून टाकून त्याला पळून जाऊं देणार आहेस, हे तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे.''

दुसऱ्याच क्षणीं अस्वल्या वधिकाने ''सिरस भैरव!'' अशी आरोळी ठोकली आणि त्याने त्या दूतावरच उडी घेतली, त्याच्या हातांतल्या तलवारीचे खेचून तुकडे केले व ते दूर फेंकून देऊन तो म्हणाला, ''अरे नालायक दूता! मी जितकेतू राजाचे मीठ खाल्लंय. त्याच्या बदल्यांत मी वधिकाची नोकरी केली. तेव्हां माझे ऋण चुकते झाले आहे. जीवगुप्त मंत्र्याला जाऊन सांग कीं इथून निमूटपणे चालते व्हा, नाहीतर त्याच्या मस्तकाचा बळी मला सिरस भैरवाला चढवावा लागेल.''

हा निरोप ऐकून जीवगुप्ताचा दूतही थिरला, त्याने आपला घोडा परत जाण्यासाठी वळवला, तेवढ्यांत किल्ल्याच्या बंद दरवाजाच्या दिशेने मोठ्या आवाजांत घोषणा ऐकूं येऊं लागल्या, ''कालीवर्मा की जय!''

अस्वल्या मांत्रिकासकट सर्वांनीच त्या दिशेने वर बघितले. किल्ल्याचे दरवाजे धडाधडा जळत होते. *(क्रमशः)*







बेताळ कथा

# चंदनचे ऋण

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने शव खाली उतरवले व खांद्यावर घेतले. स्मशानाच्या दिशेने तो नेहमीप्रमाणे जाऊं लागला. तेव्हां शवाच्या आंत असलेल्या वेताळाने म्हटलं, ''राजन्, तू इतके कष्ट झेलतो आहेस, तरी तू अद्याप निराश झालेला नाहीस. मागचा पुढचा कांही एक विचार न करता, दयाळू मनाने तू कुणा अयोग्य माणसाला मदत करतो आहेस असं वाटतं. योग्य आणि अयोग्य हे नीट पारखूनच वचन द्यायला हवं. जर तू याच्याविरुद्ध वागलास तर गंभीर समस्येत अडकशील. उदाहरण म्हणून मी तुला चंदनची कहाणी सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक म्हणजे तुझा थकवा दूर



होईल." आणि वेताळ चंदनची कहाणी सांगायला लागला.

श्वेतास्य नांवाच्या एका गंधर्व राजाकडे भाग्यनाथ काम करीत होता. तिथे सुप्रिया नांवाच्या एका अप्सरेवर त्याचे प्रेम जडले. तिने त्याला एक सुंदर मोठी हस्तिदंती संदूक देऊन म्हटले, "श्वेतास्यच्या कोषागारांतल्या किंमती रत्नांनी ही पेटी भरून जर मला दिलीस तर मी तुझ्याशी विवाह करीन."

भाग्यनाथने ही गोष्ट श्वेतास्यला सांगितली. थोडा वेळ विचार करुन श्वेतास्य म्हणाला, "मी तुला माझ्या खजिन्यांतली किंमती रत्ने जरूर देईन. जितक्या रत्नांच्या जखमा तू सहन करुं शकशील, तेवढी रत्नें तुझी होतील."

भाग्यनाथने ही अट कबूल केली, पण पहिल्याच जखमेची वेदना त्याला सहन होईना. त्याने "तिथेच थांबावे" अशी श्वेतास्यला त्याने विनंती केली. श्वेतास्य हंसून म्हणाला, "माझी संपत्ती मी कोणत्याही परिस्थितींत कुणालाही देत नसतो. तुझे प्रेम जर खरे असते, तर मी तुला अवश्य मदत केली असती. तू सुप्रियाला विसरुन जावंस हे श्रेयस्कर!"

"तुम्ही मला फसवलंत. ही कसली प्रेमाची परीक्षा? तुमची रत्नें ज्या वेदना देत आहेत, त्या कोणताही प्रेमी सहन करुं शकणार नाही." भाग्यनाथने कळवळून सांगितले.

त्यावर श्वेतास्यने चिडून म्हटले, "चूक तुझी आणि मला दोष कां देतोस? ही संदूक मी तुला नवरत्नांनी भरून देईन. जोपर्यंत तिच्यापासून तुझी सुटका होत नाही, तोपर्यंत गंधर्वलोकांत तुला स्थान नाही. या संदुकीच्या पाशातून कांही तू आता मुक्त होणार नाहीस!"

भाग्यनाथने श्वेतास्यच्या पायांवर लोळण घेऊन म्हटले. "हा शाप सहन करणे मला अशक्य आहे. मला त्यांतून सुटका होईल असा कांहीतरी मार्ग दाखवा."

श्वेतास्यला त्याची दया आली. त्याने म्हटलं, "पृथ्वीलोक हा प्रेममय आहे. तिथें गेलास तर तुला अनेक महान प्रेमी भेटतील. तेच तुला या शापातून मुक्त होण्याचा मार्ग सांगतील."

संदूक घेऊन भाग्यनाथ भूलोकावर आला. त्याने बैराग्याचा वेष धारण केला आणि खऱ्या प्रेमीजनांचा तो शोध घेऊं लागला. तो बरेच दिवस हिंडत होता. एके दिवशी त्याला



जनकपुरच्या चंदनच्या प्रेमकहाणीबद्दल कळले. हा चंदन रामचा, एका शेतकऱ्याचा, सर्वांत धाकटा मुलगा होता.

राम दररोज सकाळी उठून शेतावर जात असे. त्याचे आईवडील व बायको, घरीच राहून घरांतले कामकाज सांभाळत होते. रामच्या थोरल्या मुलाने, वीरने गांवातच किराणा मालाचे दुकान चालू केले होते. असे सर्वजण उद्योगांत गुंतलेले होते. एकटा चंदन तेवढा महाआळशी व सुस्त होता. त्याला किती रागावले तरी कांही परिणाम होत नव्हता.

जवळच्या नगरांतल्या विशाल नांवाच्या एका सधन गृहस्थाची इच्छा होती कीं त्याची मुलगी मल्लिका हिचा विवाह वीरशी व्हावा. त्याच्या निमंत्रणावरुन राम साऱ्या परिवारासह विशालकडे नगरांत गेला. वीरला मल्लिका आवडली. लग्नाचा मुहूर्तदेखील ठरला.

त्यावेळेला चंदनने मल्लिकाची बहीण मनोहारी हिला बघितले. ती बहिणीपेक्षांही सुंदर होती. चंदनला ती आवडली. पण जेव्हां तिला कळलं की चंदन आळशी आहे, तेव्हां तिने त्याच्याकडे अजिबात बघितले नाही.

तिच्या या वागण्याचा चंदनला फारच राग आला. कांहीही झालं तरी हिच्याशीच लग्न करायचे असा त्याने निश्चय केला.

एकदा तो तिला भेटून म्हणाला, "मला तुझ्याशी लग्न करायचे आहे. तुला हे पसंत आहे कां?"

मनोहारीने लगेच उत्तर दिलं, "जर तू माझ्यासाठी नवीन घर विकत घेतलंस तर मी नक्की



तुझ्याशी लग्न करीत."

"ठीक आहे, घेईन नवीन घर! पण तोपर्यंत तू दुसऱ्या कुणाशी लग्न करता कामा नयेस." चंदनने अट सांगितली. "नवीन घर घ्यायला किती वेळ लागेल ते सरळ स्वच्छ सांगून टाक." मनोहारीने सांगितले. "तू इथेंच थांब. मी दादाला विचारुन या प्रश्नाचं उत्तर तुला येऊन सांगीन."

"माझ्यासाठी घर खरेदी करायचं असेल तर तुझ्या दादांची परवानगी हवी की काय?" मनोहारीने जरा रुक्ष स्वरांत विचारलं.

"परवानगी हवी असं नाही. पण घर घ्यायला पैसे लागतात ना?" चंदन म्हणाला.

"तसं नाही हं चालणार. तुझ्या स्वतःच्या पैशांनी तू घर विकत घेतलं पाहिजेस. तुझे दादा व वडील, ह्यांनी जे कमावलंय, ते त्यांच्या



मेहनतीचं फळ आहे. तू कष्टाने जे मिळवशील, ते तुझं धन आहे.'' मनोहारीने स्पष्टपणे सांगितलं.

चंदन बुचकळ्यांत पडला. तो गप्प बसला. पण वीरच्या लग्नानंतर त्याने आपली व्यथा नव्या वहिनीला सांगितली.

ते ऐकून मल्लिका चकितच झाली. तीन चार श्रीमंत तरुण मनोहारीशी लग्न करायला उत्सुक होते, पण त्यापैकी तिला कुणीही पसंत पडला नव्हता. मल्लिकाने ही गोष्ट चंदनला सांगून म्हटले, ''यावरुन मनोहारी पैशाच्या मागे लागलेली नाही हे उघड आहे. तिने तुला घर घ्यायला सांगितले आहे, याचा अर्थ तिला तू आवडला आहेस. जर माझ्या बहिणीशी लग्न करायची तुझी इच्छा असेल तर तुला कष्ट करुन पैसे कमवावेच लागतील. दुसरा कांही पर्याय मला दिसत नाही.''

आता पैसे कसे मिळवावे हा विचार चंदनला सतावू लागला. नेमका त्याच वेळेला, गंधर्व भाग्यनाथ बैराग्याच्या वेषांत तिथे आला. चंदनच्या घरी त्याने सुग्रास भोजन केले आणि सर्वांना आशिर्वाद दिले. चंदनने त्याला आपली समस्या सांगितली.

त्याच्याकडे प्रेमळपणे पाहात बैरागी म्हणाला, ''वा, तू तर अगदी खराच प्रेमवीर दिसतो आहेस. माझ्याबरोबर चल. तीन कठीण कामें मी सांगतो; ती करुन दाखव. एका दिवसांत तू कोट्याधीश होशील.''

चंदन त्या बैराग्याच्या पाठोपाठ गेला. गांवाबाहेरच्या डोंगरावर एक गुहा होती. तिथे दोघेजण गेले. आंत अंधार होता. बैरागी चंदनला म्हणाला, ''इथें पद्मासन घालून बैस. हनुमानाचा जप कर. क्षणभर देखील न झोंपता डोळे मिटून एक दिवस राहा. जेव्हां मी येऊन हांक मारीन, तेव्हांच डोळे उघड. त्यानंतर काय करायचे ते मी तुला सांगीन.''

चंदनने लगेच ध्यान लावले. त्यावेळी अनेक आवाज येऊं लागले. कुणीतरी त्याला जोराने मारत आहेत असं वाटत होतं. तरीदेखील चंदनने आपले आसन हलवले नाही. दुसऱ्या दिवशी जेव्हां बैराग्याने गुहेंत येऊन त्याला हांक मारली, तेव्हांच त्याने डोळे उघडले. त्याबरोबर गुहेंत प्रकाश दिसूं लागला.

बैराग्याने कौतुकाने म्हटले, ''शाबास! समोरच्या भिंतीवर राक्षसाची तसबीर आहे, तिच्याजवळ जा. ती तसबीर जे सांगेल ते कर.''



राक्षसाची ती तसबीर फारच भेसूर होती. पण चंदन निर्भयपणें तसबिरीजवळ गेला. ती तसबीर मोठ्याने हंसू लागली व म्हणाली, ''तुझा उजवा हात माझ्या तोंडात ठेव.''

बेडरपणे चंदनने तसबिरीवरच्या तोंडावर हात ठेवला. त्याबरोबर ते तोंड बंद झाले. चंदनला वाटले कीं त्याचा हातच कुणीतरी चावून चावून खातो आहे. त्याला अतिशय तीव्र वेदना होत होत्या, पण त्याने त्या सोसल्या. थोड्या वेळाने तसबिरीने आपले तोंड उघडून म्हटले, ''माझ्या पोटांत तुला एक किल्ली मिळेल. ती घेऊन माझ्या बेंबीत ठेव.''

चंदनने किल्ली घेऊन ती बेंबीत ठेवली. क्षणार्धात गुहेची ती भिंत दुभंगली आणि बैरागी व चंदन दोघेही आंत शिरले. तिथें त्यांना एक लोखंडी पेटी दिसली. बैरागी चंदनला म्हणाला, ''या पेटींत करोडो रुपयांची हिरे, माणकें व रत्नें आहेत. हिचं झांकण जर तुला उघडायचं असेल तर तुझे ज्या व्यक्तीवर खूप प्रेम आहे, अशा व्यक्तीची शपथ घेऊन, तू मूठ बंद करायची आणि सारी शक्ती एकवटून या पेटीला जोराने धक्का द्यायचा आहेस. या प्रयत्नांत तुझी बोटे तुटतील, रक्ताची धार सुरुं होईल, पण हे काम थांबता कामा नये.''

चंदनने मनोहारीची शपथ घेतली आणि मूठ आवळून त्या पेटीला जोराने धक्का दिला, पण झांकण कांही उघडेना. निराश न होता चंदनने पांचसहा वेळा पेटीला जोराने धक्का मारला. बोटांतून रक्त वाहायला लागले व जखमा झाल्या.



रक्त बघून तो बेशुद्ध झाला. दुसऱ्याच क्षणीं, पेटीचे झांकण उघडले. त्यानंतर बैराग्याचे भाग्यनाथमधे रुपांतर झाले, आणि त्याने चंदनच्या अंगावरुन हात फिरवला. चंदन शुद्धीवर आला.

भाग्यनाथने त्याच्याकडे प्रेमाने बघून म्हटले, ''अरे पोरा, तुझ्या प्रेमामुळे मला मुक्ती मिळाली आहे. त्याचे फळ म्हणून या पेटीतली सारी संपत्ती मी तुला देतो आहे.'' आणि भाग्यनाथने आपली कथा त्याला सांगितली.

ती ऐकून चंदन चकितच झाला. भानावर येऊन त्याने पेटींत डोकावून पाहिले. तिथें त्याला फुत्कार सोडणारे सर्प दिसले. त्याने हे सांगितल्याबर भाग्यनाथ म्हणाला, ''पेटीचं झांकण उघडण्यात तर तू यशस्वी झाला आहेस. तेव्हां तू निश्चित प्रेमवीर आहेसच. पण तू

कुणाचा तरी ऋणी आहेस, म्हणून ही संपत्ती तुझ्या डोळ्यांना दिसत नाही. तडक घरी जा आणि साऱ्या परिवाराला घेऊन इथें ये."

कांही वेळानंतर चंदनच्या बरोबर घरांतली सारी मंडळी आली. पण त्यांच्यापैकी कुणालाच चंदन कुणाचा ऋणी आहे, ते सांगता येईना. भाग्यनाथने त्यांना सांगितलं, "तुम्ही प्रत्येकजण आळीपाळीने पेटींत डोकावून बघा. तुमच्यापैकी जो कुणी चंदनपेक्षां जास्त निष्ठावंत प्रेमी असेल, तरच ही संपत्ती त्याच्या डोळ्यांना दिसेल."

वीरखेरीज इतर सर्वांना आंत फुत्कार सोडणारे सर्पच दिसले. पण सर्वांत शेवटी वीरने जेव्हां डोकावून पाहिले तेव्हां त्याला मात्र त्यांतले सोने, रत्नें ही संपत्ती दिसली. भाग्यनाथने वीरची स्तुती करून म्हटले, "तुमचा परिवार हा एकत्र कुटुंबाचा आहे. म्हणून ही संपत्ती तुम्हा सर्वांची आहे." आणि भाग्यनाथ अदृश्य झाला.

वेताळाने कहाणी सांगून राजाला विचारले, "राजन्, चंदनचे मनोहारीवर किती प्रेम आहे हे जाणून घेण्यासाठी भाग्यनाथने त्याची कठीण परीक्षा घेतली. चंदन त्यांत उत्तीर्ण झाला. अशा वेळी पेटींत इतरांना सर्प दिसतात आणि वीरला मात्र सोने, रत्ने दिसतात; हे जरा विचित्र आणि विसंगत नाही कां वाटत? गंधर्वाने आपले मायाजाल तर यांच्यावर पसरले नसेल? माझ्या या प्रश्नांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तू मौन पत्करलेस, तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन पडतील."

विक्रमार्कने उत्तर दिले, "त्यांत कांहीही विचित्र अथवा विसंगत नाही. प्रेमासाठी प्राणत्याग करणारे देखील उत्तम प्रेमी असतात. पण जे आपल्या कुटुंबाची जबाबदारी सक्षमपणे आणि आनंदाने उचलतात, ते जास्त श्रेष्ठ ठरतात. कारण त्यांना साऱ्या कुटुंबाविषयी प्रेम असते. अशा सामान्य व्यक्तीचे प्रेम मात्र महान व असामान्य असते. यामुळे पेटींतली संपत्ती फक्त वीरच्याच डोळ्यांना दिसली."

राजाचे मौनभंग झाल्यामुळे वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला. *(आधार : सुभद्रा यांची रचना)*







# वानर युवराजाचा झाला नरवीर युवराज

हजार वर्षांपूर्वीपर्यंत इराकमधल्या एका घनदाट जंगलात एक अद्भुत गाणे ऐकूं येत असे. तिथला राजा व इतर अनेकजण नदीच्या ओहळापाशी ते गाणे ऐकायला थांबून राहात. आणि गाणे ऐकल्यानंतर आनंदाने निघून जात. तो गायक उडून जाऊं नये म्हणून त्यावेळीं ते नदीदेखील ओलांडीत नसत.

तो गायक उडून कसा जात होता? अहो, हा गायक म्हणजे एक सोनेरी पक्षी होता आणि तो सोनेरी झाडावरच राहात होता. हे झाड आणि हा पक्षी तिथे कसा आला ते या दंतकथेत आपण पाहूं या.



कोणे एके काळी एक राजा होता. त्याला सहा राण्या होत्या आणि प्रत्येकीला एकेक मुलगा होता. म्हणजे राजाला सहा राजपुत्र होते. पण ह्या राजाला सातवा मुलगाहा होता. फरक इतकाच कीं साही राजपुत्र राजवाड्यांत जन्मले होते आणि सातव्या राजपुत्राचा जन्म नि संगोपन अरण्यांत झाले होते.

राजाला शिकारीचा नाद होता आणि त्याला हरणाचे मांस फार आवडत असे. पण त्याने स्वतः मारलेल्या हरणाचेच मांस तो खाई. आता राजवाड्यांतल्या मुदपाकखान्यांत कांही कमी आचारी होते कां? पण राजासाठी हा खास पदार्थ बनवण्याची जबाबदारी साही राण्यांची होती. त्या आळीपाळीने उत्तम स्वयंपाक करीत होत्या. त्यांतली कोणती राणी सर्वांत जास्त सुगरण होती हे राजाला कधी सांगता आले नाही.

एक दिवस राजा म्हणाला, "आज मी हरणाची शिकार करून आणतो. ते मांस तुम्ही वाटून घ्या आणि प्रत्येकीने त्याचा वेगवेगळा रस्सा बनवायचा, कोण जास्ती स्वादिष्ट रस्सा करते ते मला पाहायचंय." आणि तो सकाळींच शिकारीला गेला. पण काय दुर्दैव, त्या दिवशी त्याला हरीण कांही दिसलं नाही. दुपार होऊं लागली. पण हात हालवीत परत राजवाड्यांत जायची अहंकारी राजाची तयारी नव्हती. त्याने आपल्यासोबतचे रक्षक राजवाड्यावर परत पाठवले आणि राण्यांना निरोप दिला कीं तो सुखरूप होता; पण हरणाची शिकार मिळाल्यानंतरच तो परत येणार होता. वेळ पडलीच तर तो रात्रभर



अरण्यांतच विश्राम करणार होता.

उन्हें टळल्यानंतर राजा उतावीळ होऊं लागला, आणि त्याने घोड्याला टांच दिली. तो अरण्याच्या कडेने जाऊं लागला. त्याने बरेच अंतर काटले, तोपर्यंत सूर्यास्ताची वेळ झाली. त्याला हरीण कांही दिसले नाही, परंतु त्याला अनपेक्षितपणे दुसरेच दृश्य दिसले. एक ओसाड राजवाडा समोर दिसत होता. तो आंत गेला. तिथे त्याला एक रूपवती तरुणी एकटीच बसलेली दिसली. इतके अनुपम सौंदर्य त्याने आजपर्यंत कधीही पाहिलेले नव्हते.

ती सुंदरी एक राजकन्या होती. तिने तिची कथा सांगितली. एका राक्षसाने तिच्या माता पित्यांना आणि त्यांच्या चिमुकल्या राज्यांतल्या सर्व प्रजाजनांना मारून टाकले. त्याला पांच वर्षे झाली होती. आता त्या राक्षसाला हिच्याशी लग्न करायचे होते. पण पृथ्वीलोकांतल्या मानवतरुणीशी जर लग्न करायचे असले तर तिच्या अटी त्याने मान्य केल्याच पाहिजेत, असा त्या राक्षसाला शाप होता.

राजकन्येने एका बेटावर एक सोनेरी झाड आणि सोनेरी पक्षी असल्याचे ऐकले होते. त्या पक्षाचे गाणे जो ऐकेल तो दुष्ट असला तरी त्याचा स्वभाव दयाळू व दिलदार होईल. असेही तिने ऐकले होते. राजकन्येने ते झाड व सोनेरी पक्षी आणण्याची कठीण अट राक्षसाला घातली होती.

ते झाड कुठे आहे ते राक्षसाला माहिती होते, पण ती वाट अत्यंत बिकट होती. जर राक्षस झाड व पक्षी घेऊन वर्षभरांत परत आला नाही, तर त्या प्रयत्नांत तो मरण पावला असे ती समजणार होती. त्यानंतर तिचे इतर कुणाशीही लग्न झाले तरी चालणार होते. पण तिच्या पोटी जो मुलगा जन्माला येईल तो वानरासारखा दिसणारा झाला असता.

त्या शापित तरुणीशी लग्न करण्याचा मोह राजाला आवरेना. तिला घेऊन तो राजवाड्यावर परत गेला. हरीणाऐवजी राजाने एक सुंदर तरुणी आणलेली पाहून साही राण्या हतबुद्ध झाल्या. राजा या नव्या राणीवर फारच खूष होता. हे पाहून साही राण्या तिचा द्वेष करुं लागल्या. पण जेव्हां तिला माकडासारखा दिसणारा मुलगा झाला, तेव्हां मात्र त्या राण्यांना खूप आनंद झाला!

परंतु अहंकारी राजाला मात्र नव्या राणीची आता लाज वाटूं लागली. त्याने तिला राज्याबाहेर हांकलून दिले आणि अरण्यांतल्या त्या ओसाड राजवाड्यांत तिची पाठवणी केली. मात्र तिच्यासोबत त्याने दासदासी पाठवले व आरामशीरपणे तिच्या राहाण्याजेवण्याची नीट सोय केली.

त्या अरण्याजवळच एका विद्वानाने चालवलेले गुरुकुल होते. साही राजपुत्र तिथेच विद्यार्थी म्हणून राहात होते. लौकरच हा सातवा राजपुत्रही त्या गुरुकुलांत दाखल झाला. जरी तो माकडाच्या



पिल्लासारखा दिसत होता, तरी गुरुजींनी त्याला प्रवेश नाकारला नाही. कारण तोदेखील राजाचाच मुलगा होता! पण तो इतका हुशार निघाला कीं गुरुजींना त्याचा अभिमान वाटायला लागला. वर्षभरांत त्याने त्याच्या भावांपेक्षां दसपट ज्ञान व विद्या मिळवली.

साहजिकच सहा राजपुत्र त्याचा मत्सर करुं लागले. एके दिवशी त्यांनी शाळेच्या झोंपड्यांना आग लावली आणि हे व्रात्य काम ह्या माकडराजाचेच होते अशी पित्याकडे कागाळी केली. राजाने सातव्या पुत्राला पकडले आणि भर दरबारांत सैनिकांना सांगितले कीं या गुन्ह्यासाठी या माकडाला एका जुन्या, वापरांत नसलेल्या होडीत बसवावे आणि ती होडी समुद्रांत सोडून द्यावी.

राजाज्ञेचे पालन अर्थातच झाले. पण लौकरच गुरुजी दरबारांत आले. त्यांनी खरी गोष्ट सांगितली कीं कारस्थान सहा राजपुत्रांचे होते; आणि सातवा राजपुत्र निरपराध होता.

''सातव्या राजपुत्राला परत आणा! त्याच्यावर घोर अन्याय झालेला आहे!'' दरबारांतल्या मंडळींनी सांगितलं. पण आता उशीर झाला होता. ती जुनी होडी समुद्रांत खूप खोल अंतरावर गेली होती. वाऱ्याचाही जोर होता. दरबारांतले मानकरी चिडले. त्यांनी साही राजपुत्रांनादेखील राजाने हद्दपार करावे म्हणून आग्रह धरला. राजाने त्या राजपुत्रांना एका नावेत बसवून ती नाव समुद्रांत सोडली. राजाला माहीत होतं कीं कांही दिवसांनंतर ती नाव परत येईल. तोपर्यंत दरबारांतल्या मंडळींचा राग शांत झाला असता.

पण झाले भलतेच! ती जुनी मोडकी नांव एका बेटाला लागली. परंतु त्यापूर्वी ते सहा राजपुत्रही त्या बेटावर पोंचलेले होते. त्या बेटावर दोन नद्या वाहात शेवटी समुद्राला मिळत होत्या. एका नदीचे पाणी दुधासारखे पांढरेशुभ्र होते आणि दुसऱ्या नदीचे मात्र रक्तासारखे लालभडक होते. जेव्हां ते सहा राजपुत्र त्या बेटावर उतरले तेव्हां तिथल्या रहिवाशांनी त्यांना धोक्याची सूचना दिली होती की जे त्या लाल नदीतून होडी नेतील, त्यांचा शेवट निश्चित होता. कारण त्या नदीजवळच एक महाभयंकर राक्षस राहात होता.

जेव्हां या सहाजणांनी वानरराजपुत्राला येताना पाहिले, तेव्हां ते त्याला म्हणाले, ''आम्ही तुलाच शोधायला इकडे आलो होतो. आम्ही या पांढऱ्या नदीतून जाऊन आलो. पण आम्हाला कांहीच मिळाले नाही. आता तू तरी लाल नदीतून जाऊन बघ. तुला कदाचित कांहीतरी घबाड नक्की सांपडेल. आम्ही तुझी वाट बघत इथेच तू येईपर्यंत थांबतो.'' सातव्या राजपुत्राने लाल नदीत नाव घातली आणि तो पुढे जाऊं लागला. त्याबरोबर हे साहीजण आपल्या नावेत चढले आणि त्यांनी घरी परत जाण्यासाठी किनारा सोडला.

वानरराजपुत्राची नाव लालनदीतल्या प्रवाहा-विरुद्ध पुढे जात होती. त्याला भयानक फुत्काराचा



आवाज ऐकूं आला. त्याने पाहिले तर पांच फणे असलेला एक भयंकर सर्प तोंडातून आगीचे लोळ बाहेर ओकीत होता. तो सर्प एका सोनेरी झाडाला वेटोळी घालून बसला होता. त्या झाडाच्या शेंड्यावर एक सोनेरी पक्षी होता. वानरराजपुत्राने या सोनेरी पक्ष्याची आणि झाडाची गोष्ट आपल्या आईकडून ऐकलेली होती. त्याने सर्व शक्ती एकवटून त्या सर्पाच्या पाठीवर उडी मारली आणि त्या सापाचे एक एक डोके त्याने कापून काढले.



शेवटचा घाव घातल्यावर पांची फणे पडले आणि तो सोनेरी पक्षी गाऊं लागला. त्याचे गाणे फारच मंजुळ नि अद्भुत होते. ते गाणे ऐकताना या वानरराजपुत्राचे रूप बदलून त्याचा एक तरणाबांड, देखणा, युवक झाला.

त्या छोट्या बेटावरचे सगळे रहिवाशी त्या पक्ष्याचे गाणे ऐकून तिथें धावत आले. काय घडले होते त्याबद्दल त्यांनाही उत्सुकता होती. लौकरच त्या बेटाचा राजा, राणी व राजकन्या तिथे येऊन पोंचले. त्या पंचमुखी सर्पाला जो कुणी ठार मारील, त्याच्याशी राजकन्येचा विवाह होईल, असे त्या बेटाच्या राजाने अगोदरच जाहीर केलेले होते. म्हणून सातव्या राजपुत्राचे त्या गोड सुंदर राजकन्येशी लग्न झाले. राजाने या जोडप्याला एका सजवलेल्या मोठ्या नावेत बसवून पाठवले. राजपुत्राने तो सोनेरी झाड व सोनेरी पक्षी एवढ्याच भेटवस्तू बरोबर घेतल्या त्याची जुनी नावही त्याने नव्या नावेला बांधून घेतली.

सातवा राजपुत्र जेव्हां आपल्या वडिलांकडे परत आला, तेव्हां त्याचे राजबिंडे रूप पाहून राजा हरखून गेला. आपल्या पुत्राचे धाडस ऐकले तेव्हां तर राजाचा आपल्या कानावर विश्वास बसेना.

पण ती जुनी नाव साक्ष होती, राजपुत्राचा आवाज बदलला नव्हता, आणि बेटावरचे संरक्षक दासदासी सोबत आले होते, त्यांनीही या कहाणीला दुजोरा दिला.

सर्वप्रथम राजाने सातव्या राणीला त्या ओसाड राजवाड्यांतून राजधानींत यायची विनंती केली. पण तिने नकार दिला. म्हणून राजपुत्राने ते सोनेरी झाड तिच्या वाड्यासमोर लावले व तो पक्षीही तिथे झाडावर राहिला. सातवा राजपुत्र पत्नीसह तिथेच राहूं लागला.

ते सहा राजपुत्र राजधानीला कधीच परत आले नाहीत. तेव्हां ते समुद्रावरच बुडाले असावेत असा सर्वांचा समज झाला.

कांही वर्षांनंतर राजाही वारला. त्यानंतर राजपुत्र, आई व पत्नीला घेऊन राजधानीला आला व गादीवर बसला. पण दर आठवड्यांतून एकदा तरी तो पत्नीसह त्या सोनेरी झाडाजवळ जात असे व त्या पक्ष्याचे मंजुळ गाणें ऐकत असे. *(एम.डी.)*



उत्तरांचलची लोककथा

# नवरी पसंत करी नवरा



रामस्वरूप ठाकूर हा त्याच्या गावांतला सर्वांत श्रीमंत गृहस्थ होता. त्याची पत्नी एक मुलीला जन्म देऊन मरण पावली. तेव्हांपासून तो अत्यंत दुःखी होता. त्या छोट्या मुलीचे संगोपन करण्यांत तो आपले दुःख विसरण्याचा प्रयत्न करीत होता. ती मुलगी मोठी झाली आणि फारच सुंदर दिसायला लागली. ठाकूरने तिचे नांव चमेली ठेवले होते. त्या गांवातली ती सर्वांत देखणी मुलगी होती. तिला जो नवरामुलगा पसंत पडेल त्याच्याशीच तिचे लग्न होईल असं तिच्या मैत्रिणी म्हणत. चमेलीला आपल्या रूपाचा अभिमान होता.

पूर्वीच्या काळांत खेडेगांवातल्या न्हाव्यांना सर्व तरुण मुलांची इथ्यंभूत माहिती असे. साहजिकच ठाकुराने गांवातल्या न्हाव्याला बोलावून घेतले आणि चमेलीसाठी एखादे अनुरूप स्थळ सुचवण्यास सांगितले. दोघेही या चर्चेत गुंगून गेले होते. न्हावी एकेका मुलाचे नांव व माहिती सांगत होता आणि त्यांचे गुण-अवगुण ह्याची चर्चा करीत होता. ठाकुराचा आग्रह होता की मुलगा मध्यमवर्गातल्या घरांतला असावा, पण कुलशीलवान व सुसंस्कृत असला पाहिजे.

चमेली स्वयंपाकघरांत त्यांच्यासाठी पोळ्या करीत होती. तिने हे संभाषण ऐकले. ती बाहेर येऊन म्हणाली, ''बाबा, मी गांवातल्या सर्वश्रेष्ठ पुरुषाशीच लग्न करीन, कुणा सामान्य माणसाशी नाही करणार!''

रामस्वरूप आणि न्हावी, दोघेही थक्क झाले. ही मुलगी आपल्या लग्नाबद्दल इतके स्पष्टपणे, आणि धिटाईने बोलेल असं त्यांना वाटले नव्हते. तोपर्यंत ठाकूर कधी मुलीला रागावला नव्हता, पण त्यादिवशी मात्र तो चिडला. ''चमेली, तरुण मुलींनी आपल्या लग्नाच्याबाबतीत असं बोलणं बरं दिसत नाही. वडील मंडळी जे कांही ठरवतील, ते मुलींनी मान्य करावं. मी आपल्या कुटुंबाला साजेसा जांवई शोधतो आहे.''

पण चमेलीचा हट्ट कायम होता. ''बाबा, तुम्ही जो मुलगा पसंत कराल त्याच्याशी मी लग्न



करणार नाही. माझ्या पतीची निवड मला करु द्या. माझी आवडनिवड काय आहे ते एखाद्या न्हाव्याला कसं काय माहिती असणार?'' असं म्हणून ती ओटीवरुन दाणदाण पाय आपटीत स्वयंपाक घरांत परत गेली.

न्हाव्याला हा मोठा अपमान वाटला, आणि ठाकुराला सांगून तो तिथून निघून गेला. रामस्वरूप बराच वेळ तिथेच बसून राहिला. स्वयंपाकघरांतून त्याला मुसमुसण्याचा आवाज ऐकून आला. याबाबतीत चमेलीशी आत्ता कांहीच बोलूं नये असे त्याने ठरवले. चमेली मात्र दिवसभराचे काम आटोपले कीं संध्याकाळीं शांतपणे एकटे बसावे अशा विचारांत होती.

रात्रभर जागी राहून यापुढे काय करावे त्याचा बेत ती ठरवीत होती. तिचे वडील उठण्यापूर्वीच पहाटे घरातून बाहेर पडायचे असे तिने ठरवले. कारण सर्वांत जास्त शक्तीमान, श्रेष्ठ, असा पुरुष तिला शोधून काढायचा होता. तसा पुरुष भेटला कीं त्याच्याशी लग्न करुन मग घरी परत जायचे, असा तिचा विचार होता.

उजाडल्यावर चमेलीने जणूं कांही ती पाणी आणायला जात होती असे वाटावे, म्हणून एक कळशी बरोबर घेतली. पण ती कळशी तिने विहिरीजवळच ठेवून दिली व ती भराभर चालत मोठ्या रस्त्याला लागली. तिकडून एक मिरवणूक येताना दिसली म्हणून ती थबकली.

ती मिरवणूक जवळ आली तेव्हां एका सजवलेल्या घोड्यावर एक श्रीमंत माणूस बसला होता. ते तिला दिसले. कांही माणसें घोड्याच्या पुढे चालत होती, तर आणखी कांहीजण घोड्यावर बसलेल्या या स्वारापाठोपाठ चालत येत होते. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना असलेले लोक त्या स्वाराला मुजरा करीत होते.

तो त्या देशाचा राजा असेल कीं काय? तिच्या मनांत शंका आली. तिने कधी राजा पाहिला नव्हता. त्यामुळे तो कसा दिसतो हे ही तिला ठाऊक नव्हते. जर तोच राजा असला, तर तो सर्व शक्तीमान, श्रेष्ठ असणारच असं चमेलीला वाटलं. तो स्वार देखणा आणि बलदंड दिसत होता. पण तो तिच्याशी लग्न करायला तयार होईल कां?

चमेली त्या मिरवणुकीमागून चालूं लागली. तो जथा एका तळ्यापाशी जाऊन थांबला. त्या घोडेस्वाराला पिंपळाच्या झाडाखाली एक साधू दिसला. त्या साधूच्याभोवती कांही भक्त होते आणि ते त्याला प्रणाम करुन आशिर्वाद घेत होते. घोडेस्वार खाली उतरला आणि त्याने साधूला साष्टांग नमस्कार केला. तो जेव्हां उठून उभा राहिला, तेव्हां त्याच्या सेवकांनी बरोबर आणलेली








[illegible] आशिर्वाद दिले. त्यानंतर घोडेस्वाराचा जथा पुढे निघाला.

चमेलीच्या मनांत आलं कीं जो पुरुष तिला राजा असावा आणि सर्वश्रेष्ठ असेल असं वाटलं होतं, तो एका साधूपुढे नतमस्तक झाला होता. म्हणजे, राजापेक्षां साधू मोठा असेल. तिचे मत बदलले. पण हा साधू आहे, तो तिच्याशी लग्न कसं करेल? साधूइतका श्रेष्ठ माणूस दुसरा कुणीतरी असेल कीं! तिने त्या तळ्यापाशी थांबायचे ठरवले.

थोड्या वेळानंतर, साधू एकटाच राहिला. त्याने समोरची फुलें नि फळें उचलली, आणि तो जवळच्याच एका मंदिरात गेला. ती हळूंहळूं त्याच्या पाठोपाठ गेली. साधूने मंदिरात दिवा लावला आणि ती फळें, फुले, मूर्तीला अर्पण केली. नंतर तो बाहेर आला आणि त्याने मंदिराला प्रदक्षिणा घातली. त्यानंतर साधू तिथून निघून गेला. चमेलीला वाटलं कीं साधूपेक्षां ही मूर्तीच श्रेष्ठ आहे. तिने मनाशी ठरवले कीं या मूर्तीलाच आपला पती मानायचे आणि त्याची सेवा करीत या मंदिरातच राहायचे. ती तिथेच मांडी घालून बसली, तिने डोळे मिटले, आणि त्या मूर्तीने मानवी रूपांत समोर यावे अशी प्रार्थना ती करुं लागली. जेव्हां तिने डोळे उघडले, तेव्हां एक कुत्रा मूर्तीसमोरील प्रसाद खाताना तिला दिसला. ह्या देवाने कुत्र्याचे रूप घेतले कीं काय?



कुत्रा इकडेतिकडे हिंडत दूर गेला आणि चमेली त्याच्यामागेमागे जात राहिली. तो कुत्रा एका घरांत शिरला. तिथल्या मालकाने त्या कुत्र्याला थोपटले, आंजारले, गोंजारले, आणि कुत्र्यानेही शेपटी हालवीत आपला आनंद व्यक्त केला आणि मालकाचे पाय प्रेमाने चाटले. आता मात्र चमेलीची खात्रीच पटली. त्या कुत्र्याचा मालक कुत्र्यापेक्षां श्रेष्ठ होता. तो मालक एक शेतकरी होता. त्याने कुदळ आणली आणि बाहेर अंगणात जाऊन खणायला सुरवात केली. चमेलीला आपल्या वडिलांची, रामस्वरूप ठाकुरची आठवण झाली. तोही मातीच्या ढीगाची पूजा करीत असे.

हे जमीन खणण्याचे, इतके कठीण काम करणारा मनुष्य निश्चितच बलवंत असला पाहिजे. चमेली त्या शेतकऱ्याच्या पाया पडली व तिने म्हटले, ''या खेड्यांत तुम्हीच सर्वांत श्रेष्ठ व बलवंत आहात. तुम्ही माझ्याशी लग्न करावे अशी माझी तुम्हाला विनंति आहे. मी तुमची काळजी घेईन आणि तुमच्या जमिनीची देखील व्यवस्था पाहीन.''

शेतकऱ्याने तिची कहाणी ऐकली, तिच्या सुंदर चेहऱ्याकडे पाहिले, आणि तो म्हणाला, ''चमेली, मी तुझ्याशी लग्न करायला तयार



# निर्लोभी राजकुमार

**प्रा**चीन काळी काशी येथे ब्रह्मदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला शंभर मुलगे होते. सर्वात लहान मुलाचे नांव संवर होते. राजाने आपल्या सर्व मुलांना निरनिराळ्या गुरुगृही विद्याभ्यासासाठी पाठविले होते. सर्वात धाकटा मुलगा संवर याला बोधिसत्वांकडे पाठविले होते.

बोधिसत्वांकडे कित्येक वर्षे राहून संवरने उत्तम ज्ञान संपादन केले आणि सर्व विद्यांत पारंगत झाला. इतर मुलांचा विद्याभ्यास संपल्यावर त्यांचे गुरु आपल्या शिष्यांना घेऊन राजाकडे आले व म्हणाले - ''महाराज, आपल्या चिरंजीवांचा विद्याभ्यास संपलेला आहे व ते सर्व विद्यांत निष्णात झाले आहेत.'' राजाने गुरुदक्षिणा देववून सर्व गुरुंना आदरपूर्वक निरोप दिला.

त्यानंतर राजाने आपल्या राज्यांतल्या निरनिराळ्या प्रांताचे शासक म्हणून आपल्या सर्व मुलांना नेमले व त्यांना त्या त्या प्रांतांत पाठवून दिले. परंतु धाकट्या संवरने आपले गुरु बोधिसत्व यांचा सल्ला विचारला. तो म्हणाला - ''गुरुवर्य, माझ्या वडिलांनी मला माझ्या इतर भावांप्रमाणे कोणत्यातरी प्रांताचा अधिकारी नेमावयाचे ठरविले, तर मी काय करणे योग्य होईल?''

तेव्हां बोधिसत्व म्हणाले - ''बाळा, जर तुझ्या वडिलांनी तुला एखाद्या प्रांताचा शासक नेमायचे ठरविले तर तू नम्रपणे ती जबाबदारी स्वीकारू नकोस. कारण इतर सर्व भाऊ तुझ्या वृद्ध वडिलांना सोडून निरनिराळ्या जागी गेले आहेत, तेव्हां तुझ्या वडिलांच्या सेवेला कोणीतरी राहिले पाहिजे. तू श्रद्धाभक्तीपूर्वक त्यांची सेवा कर, ते तुझे प्रथम कर्तव्य आहे.''

राजा ब्रह्मदत्त एकदा बोधिसत्वांच्या आश्रमांत गेला. संवरने वडिलांना वाकून नमस्कार केला आणि बोधिसत्वांच्या शेजारी येऊन उभा राहिला. राजा त्याला म्हणाला - ''बाळा, तुझा विद्याभ्यास आतां संपला आहे ना?''

संवर म्हणाला - ''बाबा, गुरुवर्यांच्या कृपेने मी सर्व विद्या संपादन केल्या आहेत.''

''तर मग तू आपल्या राज्यांतल्या कोणत्यातरी प्रांताची निवड करुन त्या प्रांताच्या शासनाची जबाबदारी स्वतःवर घे!'' राजा म्हणाला.

संवर म्हणाला - ''बाबा! मी आपल्या मुलांत सर्वांत लहान आहे. जर मी आपणाला सोडून दूर कोठे शासनाची जबाबदारी घेऊन राहूं लागलो, तर आपल्या सेवेला मी अंतरेन. मला राज्य नको व कोणताही अधिकार नको. आपली सेवा करावी फक्त एवढीच इच्छा आहे!''

ते उत्तर ऐकून राजाला आनंद झाला. त्या दिवसापासून संवर आपल्या वडिलांबरोबर राहू लागला. मधून मधून आवश्यक वाटे तेव्हां तो बोधिसत्वांचा सल्ला विचारी.

एकदां संवरने बोधिसत्वांच्या सल्ल्याप्रमाणे राजधानीच्या परिसरात एक ओसाड जमिनीचा पट्टा निवडला. तो समतल करून त्यात फुलांफळांची झाडे लावली. ते एक सुंदर उद्यान झाले. त्यात राजधानीतली प्रमुख मंडळी येऊ लागली. संवरची त्यांच्याशी ओळख झाली.

एकदा संवरने वडिलांच्या अनुज्ञेने राजधानीतल्या सर्ववर्णीयांस एक मेजवानी दिली. त्यानंतर राज्याच्या अधिकाऱ्यांना घोडेस्वार व पायदळ सैन्याला मेजवानी दिली. परदेशातून येणाऱ्या राजदूतांना आणि व्यापारी वर्गाला उतरायला सोयीची होईल अशा महालात व्यवस्था केली. अशा तऱ्हेने संवरची कीर्ती राज्यभरच नव्हे तर परदेशातही पसरली.

अशा तऱ्हेने कित्येक वर्षे लोटली. राजाला वार्धक्य आले आणि राजाने अंथरुण धरले. त्याने मंत्र्यांना बोलावून विचारलं, ''माझ्यानंतर राज्याची जबाबदारी कोणावर टाकावयाची? माझ्या शंभर मुलांपैकी प्रत्येकालाच गादीवर बसण्याचा अधिकार आहे. म्हणून तुम्ही विचार करुन माझ्या मागे योग्य राजकुमाराला गादीवर बसविण्याची व्यवस्था करा.''



राजा वारल्यावर सर्व मंत्र्यांनी आपसांत विचार करुन ठरविले, की संवर सर्व प्रकारे गादीला योग्य आहे. त्यानंतर त्यांनी थाटामाटाने त्याचा राज्याभिषेक केला. त्या दिवसापासून संवर बोधिसत्वांच्या सल्ल्याप्रमाणे व न्यायाने राज्यकारभार पाहू लागला.

राजा वारल्यावर संवर गादीवर बसलेला पाहून इतर नव्व्याण्णव राजकुमारांना राग आला. त्या सर्वांनी मिळून संवरला कळविले की त्याने मुकाट्याने सिंहासन सोडावे. त्यानंतर त्यांनी आपापली सैन्ये जमवून राजधानीला वेढा दिला.

संवरने ते सर्व आपले गुरुवर्य बोधिसत्व यांच्या कानावर घातले व त्यांचा सल्ला विचारला. बोधिसत्व संवरला म्हणाले - ''आपल्या भावांशी भांडण करणे हे महापाप आहे. शिवाय भाऊबंदकीमुळे राज्य नष्ट होईल व प्रजेला त्रास सोसावा लागेल. म्हणून तू आपल्या राज्याचे शंभर तुकडे करून ते सर्व भावांना वाटून टाक!''

संवरने त्याप्रमाणे करायचे ठरवून आपल्या सर्व भावांना कळविले. सर्वात मोठा भाऊ सद्‌प्रवर्तन याला ते ऐकून आश्चर्यच वाटले. तो आपल्या इतर भावांना म्हणाला - "आपण सर्वांनी मिळून राजधानीला वेढा दिला तो असे समजून, की संवरने गादी बळकावली आहे आणि तो आपला शत्रू झाला आहे. परंतु त्याने स्वतःच आपणां सर्वांना वांटा द्यायचे औदार्य दाखवून प्रजेचे प्रेम संपादन केले आहे. तेव्हां आपण त्याच्यावर स्वारी करणे गैर होईल."

एका धाकट्या भावाने विचारले - "तर मग आपण काय करणे योग्य होईल?"

"आपल्या धाकट्या भावाशी सलोख्याने बोलणे योग्य होईल. बाबांच्या सिंहासनावर आपला सर्वांचाच अधिकार आहे. तरी आपणां सर्वांना एकदम सिंहासनावर बसणे शक्य नाही. म्हणून आपण त्यालाच आपला राजा मान्य करून आपापल्या वांट्याच्या बाबांनी दिलेल्या प्रदेशाची व्यवस्था पहात रहावी." सद्‌प्रवर्तन म्हणाला.

सर्वांना तो सल्ला योग्य वाटला. त्यानंतर सर्वांनी संवरचा जयजयकार करीत राजधानीत प्रवेश केला. संवरने गादीवरुन उतरून आपल्या सर्व भावांचा यथोचित सत्कार करून त्यांना बसायला योग्य आसन दिले.

त्यानंतर उपोसतने संवरला विचारले - "तू मनाचे हे औदार्य दर्शवून आमची मने जिंकली आहेस. परंतु तुला ही धर्मबुद्धी आली कशी?"

"दादा! मी मानवमात्रावर प्रेम करतो, व गुरूच्या सल्ल्याप्रमाणे वागतो. मी नियमितपणे कुटुंबातील सर्व सभासदांना योग्य रकमा ठरवून देत आहे आणि राज्याच्या व सैन्यांतल्या सर्व अधिकाऱ्यांना व लहानमहान नोकरांना वेळेवर पगार देण्याची व्यवस्था केली आहे. प्रजेचे हितच सर्वोपरी आहे असे मी मानतो!" संवर म्हणाला.

त्यानंतर थोरल्या भावाने आपल्या सर्व भावंडांच्या वतीने संवरला आशीर्वाद दिला. म्हणाला - "तू अशाच प्रकारे धर्ममार्गावर चालून प्रजेला सुखी कर. आम्ही सर्व नित्य तुझ्या पाठीमागे आहो, व तुला शत्रुभय राहू नये याची काळजी बाळगूं. तू या लोकांतच इंद्रपदासारखा सुखी रहा."

बोधिसत्वांचा शिष्य संवर अशा तऱ्हेने आपल्या सर्व भावांचे व प्रजेचे प्रेम संपादन करून कित्येक वर्षे राज्य करीत राहिला व एक थोर शासक म्हणून त्याची कीर्ती सर्वत्र पसरली.







# विष्णुपुराण

श्रीरामचंद्राने कोदंडावर बाण चढवून दाखविताच परशुराम म्हणाला - "रघुरामा! यापुढे मी क्षत्रियांवर सूड उगविण्याचे सोडून शांतपणे तपश्चर्या करीन. मी दिलेले कोदंड धनुष्य यापुढे तुझेच राहील. तू कोदंडराम म्हणूनही ओळखला जाशील." परशुराम निघून गेला.

अयोध्या नगरीत नवीन वरवधूंच्या आगमनाने आनंदमंगल चालू होते.

एके दिवशी राम सीतेला म्हणाला - "सीता! या दिवशी राजवाड्यापेक्षां आपण सुंदरवनांत विहार करीत असतो तर किती आनंद झाला असता? तू वनलक्ष्मीसारखी विहार करीत असलेली दिसतीस." ते ऐकून सीता लाजली.

त्यांचे दिवस आनंदाने जात होते. भविष्याची कोणाला कल्पना नव्हती.

कांही काळ लोटल्यावर दशरथाला कांही अशुभ चिह्नें दिसूं लागली. मुनि दंपतीने जो शाप दिला होता, त्याची आठवण झाली. मृत्यू जवळ येऊन ठेपला आहे, असे त्याला वाटू लागले.

रामाचा लवकर राज्याभिषेक करून टाकावा, असे वाटून त्याने वसिष्ठ ऋषींकडून सुमुहूर्त निश्चित केला.

तिकडे ब्रह्मलोकांत ब्रह्मदेव चिदानंदात होता. सरस्वती वीणेवर निरनिराळे राग वाजवीत होती.

नारद आणि त्याच्यामागून सर्व देव जरा गर्दीनेच ब्रह्मदेवाकडे आले. नारद म्हणाला, "रामाचा राज्याभिषेक झाला तर राक्षसांचा संहार कसा होईल?"

ब्रह्मदेव कांही बोलला नाही. तो सहेतुक सरस्वतीकडे पाहू लागला. सरस्वती मंदहास्य करीत म्हणाली - "नारदा, जे होणार आहे, ते होणार नाही कां? तू त्रिकालज्ञानी आहेस! आणि



तिकडे पहा. तुझा जणूं कांही वारसच, अशी ती मंथरा कळ लावायला कैकेयीच्या महालात जाते आहे.''

नारदाने व देवांनी पृथ्वीकडे पाहिले. कुबड असलेली मंथरा मुसमुसून रडत जात होती. नारद म्हणाला, ''वाग्देवी माते! लोककल्याणार्थ त्यांच्या तोंडून तू काय वदवतेस, तुलाच माहीत! सर्व तुझी कृपा!'' असे म्हणत नारद गेला. त्याच्या पाठोपाठ सर्व देवही गेले.

कुबड असलेली मंथरा ही कैकेयीच्या माहेराहून आलेली तिची विश्वासपात्र दासी होती. कैकेयी नुकतीच झोपेतून जागी झाली होती, मंथरा कैकेयीकडे पहात उभी राहिली.

कैकेयी म्हणाली - ''काय ग, मंथरे? अशी उदास कां उभी आहेस?''

''काय बोलू म्हणतेस, माझे आई! उद्या रामाचा राज्याभिषेक आहे म्हणे, राज्याभिषेक!'' मंथरा म्हणाली.

कैकेयीने आपल्या गळ्यांतला मोत्याचा हार काढून मंथरेच्या गळ्यांत घातला व म्हणाली - ''किती चांगली बातमी सांगितलीस!''

मंथरा आपले तोंड विकृतपणे हलवीत म्हणाली, ''अग कैकेयी! तू किती भोळी आहेस ग! अगदी दूधखुळी आहेस!''

''म्हणजे'' कैकेयीने विचारले!''

''राम राजा झाला तर तू त्या कौसल्येच्यासमोर दासी होणार! चांगला विचार कर, उशीर करू नकोस आणि कोपगृहात जा. तुला राजाकडून दोन वर मिळाले होते ना, ते आतां मागून घे! तू भरताला कां जन्म दिलास? रामाच्या मागे त्याने छत्रचामर धरावे म्हणून?'' मंथरेने या शब्दांत आपल्या म्हणण्याचा अर्थ तिला समजावून सांगितला.

तिला तिचे वर आता पाहिजे आहेत, असे कैकेयीने सांगितले, आणि राजा म्हणाला - ''ठीक, तुला काय हवे असेल ते घे मागून!''

''एका वराने रामाला चौदा वर्षे बनवास द्यावा. दुसऱ्या वराने भरताचा राज्याभिषेक करावा.'' कैकेयी म्हणाली.

ते ऐकतांच दशरथ बेशुद्ध होऊन पडला.

कैकेयीने रामाला बोलवायला सांगितले.

''पित्याचे वचनपालन करणे आपले कर्तव्य आहे. तो कांही चूक करतो आहे, असे मानणे चूक आहे! रघुवंशात असे कधी घडले नाही.'' रामाने विचार केला. रामाने वल्कलवस्त्रे धारण केली आणि वनवासाला तयार झाला.

नाग फूत्कार सोडतो तसा फूत्कार सोडीत



लक्ष्मण आला आणि ''दशरथाचे आणि कैकेयीचे डोके उडवितो,'' असे म्हणत त्याने तलवार उपसली. रामाने धाकट्या भावाला शांत केले.

रामाच्याबरोबर सीता आणि लक्ष्मण वनवासास निघाले.

अयोध्यावासी त्यांच्या वाटेवर आडवे उभे राहिले. रामाने त्यांना समजावून सांगितले आणि गंगापार जंगलाचा मार्ग धरला. तो प्रथम भरद्वाज मुनींच्या आश्रमात गेला. वडाचा चीक केसांना लावून रामलक्ष्मणांनी मुनिकुमारांसारखी जटाजूट धारण केली.

दशरथ शुद्धीवर आल्यावर राम वनवासाला गेल्याचे त्याला कळले. तो 'हे राम, हे राम!' म्हणत बेशुद्ध झाला. त्यांतच त्याचे प्राणोत्क्रमण झाले.

त्यावेळी भरत व शत्रुघ्न आपल्या आजोळी गेले होते. ते दोघे ती शोकवार्ता ऐकून परतले. भरताने दशरथाची अंत्येष्टी केली. त्याने आईचे तोंडही पाहिले नाही. मंथरेच्या कुबडात लाथ मारायची असे ठरवून शत्रुघ्न निघाला. तिचा तर पत्ताच नव्हता.

रामाला परत आणायला म्हणून भरत छत्र चामरे घेऊन जंगलात गेला.

राम त्याला म्हणाला - ''आपल्या वडिलांचा शब्द राखणे आपल्या दोघांचे कर्तव्य आहे. तू माझा धाकटा भाऊ आहेस, माझे ऐक: राज्याभिषेक करून घेऊन राज्याचे पालन कर!''

भरताने नकारार्थी मान हलवून म्हटले - ''मी फक्त राज्याचे पालन करीन. तुझ्या पादुका सिंहासनावर ठेवीन.'' असे सांगून रामाच्या पादुका घेऊन अयोध्येला परतला.



राम, सीता व लक्ष्मणासह जास्त खोल वनांत गेला.

खर व दूषण या बंधुद्वयांनी दंडकारण्यातील भूमी रावणाचे प्रतिनिधि म्हणून बळकावली होती.

ही जमीन विंध्य पर्वताच्या पायथ्याला होती. ते राक्षसांना बरोबर घेऊन दंडकारण्यात हिंडत असताना त्यांना दंडकारण्यात नव्याने सीतेसह आलेले रामलक्ष्मण हे मानव दिसले.

हिंस्त्र पशूंसारखे त्यांनी राक्षसांसह मोठमोठे दगड, तलवारी, वगैरे घेऊन रामलक्ष्मण व सीतेला घेरले.

रामलक्ष्मणांनी धनुष्यबाण काढून राक्षसांवर बाणांचा वर्षाव करून त्यांना पळविले. रामाने खरदूषणांचा वध केला. कित्येक राक्षस मरण पावले. जे जिवंत राहिले ते पळून गेले.

रहायला योग्य जागेची निवड करण्यासाठी



हिंडत असतां रामलक्ष्मणांना ताडासारखा उंच आणि भयंकर आकृतीचा विराध राक्षस दिसला. त्याने सीतेला उचलून घेतले आणि पळूं लागला. रामाने एक मोठे अस्त्र टाकून त्या राक्षसाला ठार केले.

जे राक्षस जिवंत होते ते शूर्पणखेकडे गेले व तिला खरदूषण ठार झाल्याचे सांगितले.

दंडकारण्यात राहणारे सर्व राक्षस हे शूर्पणखेलाच आपला प्रमुख मानीत. ती रामलक्ष्मणांना ठार करायला म्हणून निघाली.

दंडकारण्यात पांच वटवृक्ष एका जागी होते. ते थंड सावलीचे व शांत असे रमणीय स्थान होते. तेथे पर्णकुटी बांधून राम, लक्षण व सीता रहात असत. त्याच जागेजवळून गोदावरी नदी वहात होती.

पर्णकुटीत राहून राम सीतेसह वनविहाराला जात असे. त्यांचा वनवास सुखाने चालू होता. लक्ष्मण मोठ्या भावाची व वहिनींची सेवा करीत रात्रंदिवस पर्णकुटीचे रक्षण करी.

एके दिवशी शूर्पणखा एकाएकी त्या जागी आली. रामाचे सौंदर्य पाहून त्याने तिच्याशी विवाह करावा, अशी तिने बिनंती केली व सीतेला ठार करायला ती पुढे आली. लक्ष्मणाने तिचे नाक व कान कापून टाकले.

शूर्पणखा लंकेला गेली आणि तिचा जो अपमान झाला होता, तो तिने वर्णन करून तिने रावणाला सांगितला. रावणाने त्या गोष्टीचा प्रतिकार करण्यासाठी सीतेचे हरण करायचे ठरवून मारीच राक्षसाला सुवर्णमृगाचे रूप घेऊन पंचवटीजवळ जायला सांगितले.

सीता तो सुवर्णमृग पाहून खूष झाली. राम त्या सुवर्णमृगाला आणायला गेला व शेवटी त्याला ठार करून घेऊन यायच्या विचाराने बाण मारला. बाण लागतांच सुवर्णमृग मारीच राक्षस झाला व ओरडू लागला - ''हा सीते! हा लक्ष्मण! वांचवा!'' रामाचाच आवाज त्याने काढला होता.

तो राक्षस आहे व रामाला कोणत्याही प्रकारची दुखापत त्याला करतां येणार नाही, असे लक्ष्मणाने किती समजावून सांगितले तरी सीतेने ऐकले नाही.

ती कांही कठोर वाक्यें बोलली. नाइलाजाने लक्ष्मणाने पर्णकुटीच्या समोर तीन रेषा काढून ठेवल्या व त्यांच्या बाहेर न जाण्यास बजावून रामाच्या शोधार्थ निघाला.

सीता पर्णकुटीत एकटी होती. रावण वृद्ध तपस्वी मुनीचा वेष करून आला. सीता भिक्षा घालायला तीनही रेषा ओलांडून पुढे गेली. रावण स्वस्वरूपांत प्रकट होऊन सीतेला उचलून घेऊन गेला. रामलक्ष्मण सीतेच्या शोधार्थ निघाले. राम सामान्य माणसासारखा, सीताविरहाने विलाप करू लागला.

दोघे शोध काढीत जात असतां त्यांना सर्व पंख कांपल्यामुळे असहाय स्थितीत जटायुपक्षी दिसला. त्याने सीतेला वांचविण्यासाठी रावणाशी युद्ध करून पंख घालवून बसल्याचे सांगून रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेल्याचे सांगितले.

दशरथाचा आप्तबंधु अशा जटायूचा दहन-संस्कार करून रामलक्ष्मण पुढे निघाले. वाटेत त्यांना जंगली जनावरांसारखा कबंध राक्षस भेटला. त्याचे हात लांब लांब होते. त्याने रामलक्ष्मणांना धरून ओढले.

कबंध एक विचित्र राक्षस होता. त्याचे पोट पर्वतासारखे मोठे होते. त्या पोटालाच दांत व प्राण्यांना गिळण्याला मोठे तोंड होते. विस्तवासारखा एक डोळा होता. योजनभर लांब पसरता येतील एवढे मोठे हात होते. त्याला डोके असे निराळे नव्हतेच.

रामलक्ष्मणांनी आपल्या तलवारी उपसून कबंध राक्षसाचे हात कापले. कबंध हा एक शापग्रस्त गंधर्व होता. तो शापमुक्त होऊन गंधर्वलोकी निघताला म्हणाला, - ''तुला वानरांची मैत्री लाभेल व तिचा उपयोगही चांगला होईल!'' रामाला तो म्हणाला.

ऋष्यमूक पर्वतावर वानर प्रमुखांबरोबर सुग्रीव बसला होता. त्याने रामाला पाहून हनुमानाला त्याची माहिती काढून यायला पाठविले.

तीन कोटी देव वानररूपे या पृथ्वीवर आले.



त्यापैकी हनुमान हा अंजनीदेवीच्या पोटी पवनाच्या कृपेने जन्मला. आंजनेय हा वायुसुत, मारुती या नावेही ओळखला जात असे.

तान्हा असतानाच हनुमानाने सूर्योदयाच्या सूर्याला फळ समजून ते घ्यायला म्हणून उड्डाण केले व त्याला खायला गेला, तेव्हां इंद्राने त्याच्यावर वज्रायुध टाकले. मारुती मूर्च्छित होऊन पडला. वायूला त्याचा राग आला व इंद्राला काष्ठवत् केले. परंतु सर्व देवांच्या प्रार्थनेनंतर मारुतीला चिरंजीवित्व लाभले व अनेक वर प्राप्त झाले. इंद्राची मुक्तता झाली.

ब्रह्मदेवाने आंजनेयाच्या कानांत विचित्र कुंडले घातली. "ती ज्याला दिसतील व त्यांची जो प्रशंसा करील तोच विष्णू म्हणून ओळखून त्यालाच आपला आराध्य देव मानून त्याची सेवा कर." असे ब्रह्मदेवाने सांगितले.

हनुमान, सुग्रीवाने पाठविल्यावर रामलक्ष्मणांना भेटायला गेला, तेव्हां एक ब्रह्मचारी होऊन गेला. रामाने त्याला पाहिले व लक्ष्मणाला म्हणाला - "पहा, याची कुंडले किती सुंदर आहेत!" असे सांगून रामाने त्याची प्रशंसा केली.

तेव्हां हनुमानाने राम हा विष्णूचा अवतार आहे हे ओळखले व तो त्याचा विश्वासपात्र सेवक झाला. रामाच्या तोंडून सुंदर म्हणवून हनुमान 'सुंदर' या नावेही ओळखला जाऊ लागला.

हनुमानाच्या मध्यस्थीने राम व सुग्रीव यांची अग्नीला साक्ष ठेवून मैत्री जमली.

सुग्रीवाचा भाऊ वाली हा किष्किंधेचा राजा होता. धाकट्या भावाला गैरसमज करून घेऊन तो त्याला ठार करणार होता. तेव्हां सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर येऊन राहू लागला. वालीने सुग्रीवाच्या बायकोला कैदेत ठेवले.

आपत्कालात आपल्या बंधूचे रक्षण करणे आपले कर्तव्य आहे, असे समजून रामाने 'वालीचा वध करुन सुग्रीवाला किष्किंधेचे राज्य देईन' असे वचन दिले.

वालीला त्याच्याशी जो युद्धाला येईल त्याचे बळही प्राप्त होईल असा वर होता. म्हणून सुग्रीव व वाली यांचे युद्ध चालू असता रामाने ताड-वृक्षांच्या आडून सुग्रीवाचा वध केला.



## वाचकांसाठी कथास्पर्धा

## सर्वोत्कृष्ट प्रवेशिकेला रु. २५०/-चे पारितोषिक



खालील गोष्ट वाचा:

म्हाताऱ्या जगन्नाथचा मुलगा व सून तापाच्या साथींत वारली. दोन नातवांचे संगोपन करण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. दोघांनाही सुशील, समंजस तरुण बनावे अशी जगन्नाथची इच्छा होती. त्याने आपला मित्र जगमोहन ह्याला सल्ला विचारला. जगमोहनने जगन्नाथला सांगितले, "मला दोन्ही मुलांशी बोलायचंय." जगन्नाथने नातवांना हांक मारली. जगमोहन त्यांना म्हणाला, "मी प्रश्न विचारतो आहे; त्याला नीट विचार करुन उत्तर द्या. जर परमेश्वर तुमच्यासमोर येऊन उभा राहिला आणि "सुखाने आयुष्य कंठण्यासाठी एखादा वर मागा" असे म्हणाला, तर तुम्ही त्याला काय सांगाल?"

मुलांनी उत्तरें सांगितली. जगमोहन मित्राकडे वळून म्हणाला, "तू ऐकलंस ना? वेळ आली कीं तुझे घर व शेतीवाडी थोरल्या नातवाला दे. धाकट्याची तू काळजी करुं नकोस. तो कुठेही गेला तरी आपले नशीब उजळील."

- खालील मुद्यांचा विचार करुन तुमची प्रतिक्रिया लिहा.
- दोघा नातवांनी काय उत्तरें दिली असतील?
- जगमोहनने जगन्नाथला कोणत्या निकषावर असा सल्ला दिला?

तुमची प्रतिक्रिया १००-१५० शब्दांत लिहा व गोष्टीला समर्पक शीर्षक द्या. खालील कुपन भरुन त्याबरोबर तुमची प्रवेशिका पाठवा. पाकिटावर "वाचा नि सुचवा" असे जरूर लिहा.

**शेवटची तारीख : ३१ डिसेंबर २००४**

नांव .................................................. वय ..........

जन्मतारीख .............................. शाळेचे नांव ..............................

घरचा पत्ता ..................................................................

..................................................................

.................................................. पिनकोड ..........

पालकांची सही                                                  स्पर्धकाची सही

CHANDAMAMA INDIA LIMITED

82 Defence Officers Colony, Ekkatuthangal, Chennai - 600 097.

# अमेरिकन सशाची शेपटी लहान कां असते?

ही एक चिरोकी कथा आहे. चिरोकींचा विश्वास होता कीं पूर्वीच्या काळी पशुप्राणी आजच्यापेक्षां जास्त मोठे, बलवान व परिपूर्ण होते. मानव-जातीबरोबर समान स्तरावर त्यांचे भेटणे, बोलणे, वगैरे व्यवहार होत असावेत अशी कल्पना होती.

अमेरिकन सशाच्या पोटांत भुकेचा डोंब उसळला होता. त्याच्या घरांत म्हणजे बिळांत जर कुणी भोजन आणून दिले असते तर किती आनंदाची गोष्ट झाली असती. त्याच्या मनांत ही कल्पना येत होती व त्याच्या तोंडाला पाणी सुटत होते. "जर कल्पनांचे घोडे बनले तर हा पठ्ठा त्याच्यावर टांग मारीलच!" त्याला एका माणसाचे हे बोलणे आठवले. ससा त्यावेळीं त्या माणसाजवळून पळत होता तेव्हां त्याने हे बोलणे सहजच ऐकलेले होते. पण हा ससा कांही मूर्ख नव्हता. आपल्या बिळांत येऊन कांही कुणी जेवण आणून देणार नव्हते. स्वतःची सोय त्यालाच करायला हवी होती.

हा विचार त्याला अस्वस्थ करीत होता. भोजन शोधून आणायचं म्हणजे सुरक्षित घरांतून बाहेर पडायला हवं. पण बाहेर त्याचंच भोजन बनवायला प्राणी हिंडत असणारच. त्याला दुसऱ्यांचा घास बनण्याची मुळीच इच्छा नव्हती.

त्याने मनांतली भीती दूर सारली आणि हंसतमुखाने तो पुढे झाला. आजपर्यंत अनेकदा मृत्यूच्या विळख्यांतून तो निसटला होता; संकटातून बाहेर कसं पडायचं हे समजण्याची तल्लख बुद्धी त्याच्यापाशी होती.

या विचाराने तो उत्साहित झाला. बिळांतून तो पळत बाहेर आला. जमिनीलगतच्या तोंडापाशी येऊन तो थोडा वेळ थांबला. आपले डोके बाहेर काढून त्याने चारी बाजूंना नीट निरखून पाहिले. सगळीकडे शांत होतं, मैदान मोकळं होतं. तो खुशींत बिळाच्याबाहेर आला. गवताच्या आणि झुडुपांच्या अवतीभोवती मोठमोठी झाडे होती.



अमेरिकन ससा गवताच्या शोधांत इकडेतिकडे हिंडू लागला. त्याने चविष्ट गवताच्या मुळ्या





उपटून काढल्या. त्याच्या वाटेत येणाऱ्या बारिकसारीक किडे, अळ्या व मुंग्यांना त्याने पायाखाली चिरडले. मधून-मधून तो टुकटुकू इकडेतिकडे बघे आणि आपले बिळ फार लांब नाही ना, याची खात्री करुन घेई. संकट जवळ आले तर चटकन बिळांत शिरुन आपला जीव वाचवता येईल म्हणून तो बिळाजवळच बागडत होता.

एक रोप तो मुळासकट उकरुन खुडून टाकणार होता, तेवढ्यांत त्याला पळत्या पावलांचा आवाज ऐकूं आला. त्याने वर बघितले आणि तो खूपच घाबरला. त्याच्या चारी बाजूंनी कोल्ह्यांचा एक कळप तिथे आला होता. एक कोल्हा तर बिळाच्या रस्त्यावरच उभा होता. "झालं, संपलं माझं आयुष्य आता!" ससोबाच्या मनांत शंका निर्माण झाली.

पण त्याने हा विचार लगेच दाबून टाकला. त्यापेक्षां दुसरा चांगला विचार होता जगण्याचा प्रयत्न करण्याचा!

"मी नक्कीच निसटेन." तो मनाशी पुटपुटला. समोरचे सात कोल्हे मात्र याचं मांस किती लुसलुशीत लागेल, असा विचार करीत दांत विचकत होते.

"अहो मित्रांनो", अमेरिकन सशाने प्रसन्नपणे हंसून सांगितले, "अभिनंदन, तुमच्या जेवणाची सोय तर आता झालेली आहेच."

सगळे कोल्हे बावचळले. आजपर्यंत कोणत्याही सावजाला इतके शांत, स्वस्थ, असलेले त्यांनी पाहिले नव्हते. सर्वांनी आपल्या नेत्याकडे पाहिले.

"धन्यवाद." कोल्ह्यांचा नेता एक पाऊल पुढे टाकीत म्हणाला, "पण आम्ही आता वाट पाहात बसणार नाही. आम्हाला फार फार भूक लागलीय. "पण त्यापूर्वी परमेश्वराची प्रार्थना करुन त्याचे आभार मानण्यासाठी कांही क्षण तुम्ही थांबू शकणार नाही कां? मला तर सांगितलंय कीं कोल्ह्यांच्या गटांत, खास करुन सभ्य कोल्हे मंडळींच्यामधे तसा रिवाज आहे." असं म्हणत सशाने धीटपणे त्या नेत्याच्या डोळ्यांकडे टक लावून पाहिले.

"पण आमच्यापैकी कुणालाही गाता येत नाही ना!" नेत्याने कबुली दिली.

"हरकत नाही. मी गातो आणि तुम्ही सगळे-जण नाचा." ससा त्यांच्याकडे पाहून हंसतहंसत गोड स्वरांत पुढे म्हणाला, "मी तुमच्यापैकी प्रत्येकासाठी गाणे म्हणेन. मला पुष्कळ गाणीं तोंडपाठ आहेत. त्यापैकीं सर्वांत चांगली अशी सात निवडक गाणी मी गाईन. जेव्हां जेव्हां मी नवीन गाणे सुरु करीन, तेव्हां मी एका नव्या झाडाच्या बुंध्याला पाठ टेकवून उभा राहीन व गाणे गाईन. तुम्ही सारेजण त्या तालावर नाचा, आनंदाने पावले टाकीत नाचा, आणि गाणे



संपेपर्यंत मागेपुढे वळत, फिरत नाचत राहा. शेवटच्या गाण्यापर्यंत तसा नाच करा. अखेरचे गाणे परमेश्वराची प्रार्थना असेल. ते गाणे संपलं कीं तुम्ही मला आपले भोजन बनवून टाका. झालं ना समाधान?'' कोल्ह्यांच्या नेत्याने आनंदाने संमती दिली.

अमेरिकन ससा जवळच्याच एका मोठ्या वृक्षाला पाठ लावून उभा राहिला. त्या कोल्हाने- त्याला उद्देशून ससा म्हणाला, ''हे पहिलं गाणं खास तुमच्यासाठी मी गाणार आहे हं!'' नेत्याच्या तोंडावर रुंद हसूं पसरलं.

सशाने गायला सुरवात केली. कोल्हे मजेंत नाचायला लागले. त्या मोकळ्या मैदानात वर्तुळ करत ते मागे सरले आणि गाण्याचे गोड स्वर त्या वातावरणांत गुंजत राहिले. तरी पण कोल्ह्यांची नजर सशावर सतत होती. उगीच पळाला बिळाला तर? पण ससा जो झाडाला पाठ टेकवून उभा होता, तो गाणे संपेपर्यंत हलला नाही.

कोल्हे जवळ आले. तसा ससा दुसऱ्या झाडापाशी गेला, आणि पुन्हां त्या झाडाला पाठ टेकवून उभा राहिला. त्याने खाकरुन जरा गळा साफसूफ केला आणि नवीन गाणे सुरुं केले.

यावेळीं कोल्ह्यांना त्याच्याविषयी कमी संशय वाटूं लागला. प्रत्येक गीत संपले कीं तो दुसऱ्या वृक्षाजवळ जाई आणि पाठ टेकवून व्यवस्थितपणे उभा राही. कोल्हे नाचायला तयार होईपर्यंत ससा थांबून राही. त्याच्या चेहऱ्यावर भीतीचा लवलेश नव्हता. किंवा पळून जायचा विचारदेखील त्याच्या मनांत दिसत नव्हता. असा कोल्ह्यांचा विश्वास त्याने संपादन केला.

सहावे गाणे संपले. आता नव्या झाडाजवळ जायची वेळ येऊन ठेपली होती. सशाने आपल्या बिळाचे तोंड कुठे आहे ते क्षणांत पाहून घेतले. ''ओहो, जर सारं कांही सुरळीत झालं तर मी लौकरच माझ्या बिळांत सुरक्षितपणे जाईन.'' ससा मनाशीं म्हणाला, आणि त्याने नव्या झाडाला आपली पाठ टेकवली. ते झाड त्याने हुशारीने निवडलं होतं.

कोल्ह्यांच्या कळपाकडे बघत तो म्हणाला, ''आता हे शेवटचंच गाणं. हे देवाचे स्तोत्र आहे.''

''सशा, तू तर छानच करमणूक करतो आहेस. जर आम्ही इतके भुकेजलेले नसतो तर



आम्ही तुला सोडून दिले असते. पण...'' कोल्हाने आपले टोकदार दांत विचकून म्हटले.

''ते विसरा हं! आपलं आधीच ठरलंय कीं! एकदा ठरलं म्हणजे ठरलं. आपण शब्द पाळायला हवा ना! हे सातवं प्रार्थनागीत संपलं की लगेच तुम्ही मला खाऊन टाका कीं!''

त्या नेत्याच्या संमतीची वाट न पाहाता सशाने एक छानदार धुंद गीताची सुरवात केली व म्हटले, ''हे सातवे नि शेवटचे गीत. या अखेरच्या नृत्यासाठी सगळे तयार व्हा बरं!''

''जरुर!'' कोल्हे खुषींत येऊन म्हणाले.

सशाने गायला सुरवात केली. कोल्हे सशापासून लांब जाऊन नाचूं लागले. वातावरण संगीताच्या मधुर लहरींनी भरुन गेले. त्या उडत्या लयींतल्या सुंदर गाण्यावर नाचताना कोल्हेही मागेपुढे डोलूं लागले, आणि त्यांचे पाय अडखळूं लागले. सशाचे गाणे संपले नि तो ओरडून म्हणाला, ''मी तयार आहे हं!''

कोल्ह्यांना नीट सरळ उभे राहायला जो वेळ लागला, तो सशाला पुरेसा होता. त्याने मुसंडी मारुन धूम ठोकली. इतक्या वेगाने तो आजपर्यंत कधीही पळाला नव्हता. त्याच्या मागून कोल्हेही पळायला लागले, पण ससा कसाबसा बिळापर्यंत पोंचला. त्याने आपले डोके आधी बिळांत घुसवले, नि तो आत शिरला. त्याच्या शेपटीचा भाग मात्र अजून बाहेर होता, तेवढ्यांत कोल्ह्यांचा नेता जोरांत पळत तिथें आला. आणि त्याने तो शेपटीचा भाग आपल्या दातांनी पकडला. वास्तविक त्याला तो तुकडा चावता आला असता, पण त्याला तर संबंध ससा बाहेर ओढून काढायची जिद्द होती. त्याने शेपटी दांतात धरली आणि तो ती शेपटी ओढतच राहिला. सशाने आपले पंजे बिळाच्या भिंतीवर घट्ट रोवले होते.

कांही वेळ ही ओढाओढी चालू राहिली. शेवटी कोल्ह्याने आपली पुरी शक्ती एकवटून शेपटी ओढली, आणि कांहीतरी निराळंच घडलं. शेपटीचा टोकाचा कांही भाग तुटून पडला आणि कोल्हा धाडदिशी मागे आपटला.

''या अमेरिकन सशाने आपल्याला चांगलंच फसवलं'' कोल्ह्यांनी कोलाहल केला.

''आपणच त्याला तसं करुं दिलं!!'' कोल्ह्यांचा नेता गुरगुरला.

ससा आपल्या बिळांत पळत खूप आंतपर्यंत गेला होता. थोड्या सावरल्यानंतर आपल्या शेपटीकडे त्याने पाहिले. आता शेपटी लहानशी झाली होती, तरीही जास्त सुंदर दिसत होती.

''आणि जास्त सुरक्षितदेखील आहे ही लहान शेपटी!''

आपले प्राण बांचल्याबद्दल ससा मनोमन खूष झाला होता. तेव्हांपासून अमेरिकन सशांची शेपूट लहान झाली.





# निरुपयोगी धन

पंचभूत श्रीमंत होता. त्याचे कुटुंब पिढीजात सधन होते. जहाजांतून परदेशी जाऊन व्यापार करण्यापासून ते सावकारीपर्यंत, असे त्याच्या पूर्वजांनी अनेक व्यवसाय केले व भरपूर कमाई केली. इतका फायदा मिळवला की पुढल्या अनेक पिढ्या आरामांत बसून जगल्या असत्या. पंचभूताने जेवढी कमाई केली, ती त्याने तीन मोठ्या पिंपात भरली आणि ती पिंपे जमिनीत पुरुन ठेवली.

एका पिंपात सोन्याच्या मोहरा, दुसऱ्यांत चांदीची नाणी आणि तिसऱ्यांत तांब्याची नाणी भरली होती. रोज त्या जागेवर तो जाऊन येई आणि आपले धन सुरक्षित आहे हे पाहून संतुष्ट होऊन परत येई.

अचानक शेजारच्या राजाने या राज्यावर हल्ला केला. शेजारच्या हा राजा आजपर्यंत कधीही हारला नव्हता, म्हणून त्याला लोक 'अजेय राजा' म्हणत असत. पंचभूतला वाटलं की त्या राज्यांतून दुसरीकडे पळून जाणे हे श्रेयस्कर म्हणून त्याने ते राज्य सोडण्याचा निश्चय केला. पण नाण्यांनी भरलेली पिंपे तर बरोबर नेणे शक्य नव्हते म्हणून त्याने भरपूर मेण वितळवून त्याचा जाड थर पिपांवर दिला. पण जाण्याच्या घाईत तो पिंपांना कुलुपे घालायला विसरला, आणि सहकुटुंब परदेशी गेला.

कांही दिवसांत शत्रूच्या सैन्याने त्या शहराचा ताबा घेतला. सैनिकांची नजर सुरवातीलाच श्रीमंतांच्या घरांवर पडली. त्यांत असणारी सारी संपत्ती त्यांनी गोळा केली. पंचभूतच्या घरांतली जमिनींत पुरलेली पिंपेही त्यांनी बघितली. सेनापतीनेदेखील ती पिंपे निरखून पाहिली, आणि म्हटले, ''ही तर मेणाची पिंपे दिसताहेत. म्हणूनच या घरमालकाने ती इथें सोडून तो निघून गेला. कुणाला विकत घ्यायची असतील त्याला ती विकून टाका.'' त्याने सैनिकांना सांगितले.

सैनिकांनी ती पिंपे विकण्याचा खूप प्रयत्न केला, पण विकत घ्यायला कुणीही पुढे आला नाही. असेच कांही दिवस गेले. शेवटी एक गरीब माणूस सैनिकांजवळ येऊन सांगू लागला, ''साहेब, मी मेणबत्त्या बनवून त्या विकतो, आणि त्यावर गुजराण करतो. ही पिंपे मला तुम्ही स्वस्तांत देता आली तर द्या!''

शत्रूच्या त्या सैनिकांनी लगेच त्याच्या-जवळचे पैसे घेतले आणि म्हटलं, ''ही पिंपे सांभाळता सांभाळता आमच्या नाकी नऊ आले. ताबडतोब इथून ती घेऊन जा बरं!

त्या बिचाऱ्याने मजूर बोलावले आणि ती पिंपे आपल्या घरी नेली. शत्रूसैन्याचा तळ हालला आणि नगरांतली परिस्थिती सुधारली. म्हणून त्या गरीब माणसाने मेणबत्त्या बनवायला सुरवात करावी असे ठरवले. त्याने पिंप उघडून आंत हात घातला. तर त्यांत कांहीतरी कठीण वस्तू असावीसे वाटले. त्याने उत्सुकतेने ते पिंप उघडले तर काय, सोन्याच्या मोहरा शीगोशीग भरलेल्या! थक्क होऊन त्याने आणखी नीट तळाशी हात घालून बघितले, तर मेणाच्या खाली मोहराच होता. तो आता मात्र गोंधळून गेला.

कांही वेळानंतर त्याने दुसरी दोन पिंपे उघडून बघितली आणि त्यांत होती चांदीची नि तांब्याची नाणी! त्याला खूप आश्चर्य वाटले आणि खूपच आनंदही वाटला.

पण हे गुपित त्याने सर्वांपासून लपवून ठेवले. ज्या खोलीत ही पिंपे त्याने ठेवली होती, त्या खोलीच्या दरवाज्याला त्याने भलेथोरले कुलूप ठोकले आणि इतर आवश्यक ती काळजी घेतली. आता त्याला गरिबीची चिंता उरली नव्हती. पण तो श्रीमंत झाला आहे हे देखील त्याला इतरांना कळू द्यायचे नव्हते. त्याने आपल्या साध्या राहाणींत बदल केला नाही.

दिवस चालले होते. आता त्याला वाटू लागले, ''हे पैसे केव्हां खर्च करायचे? जर मी एखादा जमीनदारासारखा थाटामाटांत राहायला लागलो



२५ वर्षांपूर्वीची चांदोबात प्रकाशित झालेली कथा

तर माझं हे बिंग फुटेल आणि मी अडचणींत येईन.''

त्याला कांही उपाय सुचेना. ऐक दिवशी तो आपल्या मित्राला, एका शिंप्याला भेटायला गेला, आणि त्याने नवे कपडे शिवायला टाकले. त्या कापडांबरोबर त्याने मूठभर सोन्याच्या मोहरा शिंप्याच्या हातांत ठेवल्या.

त्या मोहरा पाहून शिंपी गप्पच बसला. थोड्या वेळाने ह्या माणसाला म्हणाला, ''बाप रे, इतक्या मोहरा! मी नाही घेणार ह्या! तू मला माझे शिलाईचे पैसे तेवढे दे. मला तेवढे पुरेत.''

''माझ्याजवळ पिंप भरुन सोने आहे. अरे, मी तुझा मित्र आहे. मित्राकडून घेणं हे कांही पाप नव्हे. तूही कांही श्रीमंत नाहीस. ठेव या मोहरा! नाही म्हणू नकोस रे!'' मेणबत्तीवाल्याने प्रेमाने सांगितले.

पण शिंपीबाबाचा कांही त्याच्यावर विश्वास बसेना. यांत कांहीतरी गडबड आहे आणि हा मित्र माझ्यापासून लपवतो आहे असंच शिंप्याला वाटत होतं.

त्याने विचारलं, ''हे एवढं सोनं तुला कुठे रे मिळालं? तुला वेड तर लागलं नाही ना?''

''चल घरी नि तूच पाहा'' असं म्हणून मेणबत्तीवाला शिंप्याला घरी घेऊन गेला. त्याने सगळी हकीकत सांगितली. सोने, चांदी व तांबे भरलेली पिंपे दाखवली व तो म्हणाला, ''अरे, ह्याचं मी काय करुं? त्यांतली अर्धी नाणी मी तुला देतो. घेऊन जा.''

शिंप्याने मूठभर सोन्याच्या मोहरा उचलल्या आणि तो बोलला, ''आयुष्यभर आराम करायला एवढ्या पुरेशा आहेत. पण माझं एवढं तू ऐक. तुला एवढी संपत्ती खर्चायला हजार वर्षे सुद्धा कमी पडतील. आणि मरेपर्यंत ही पिंपे बघत राहिलास तर तूही सुखी होणार नाहीस. हे निरर्थक धन आहे, निरुपयोगी धन आहे. तू यांतून गरीबांसाठी दानधर्म कर व वांटून टाक. निदान ते थोडेफार सुखी होतील आणि पैशांचा सदुपयोग होईल.''

मेणबत्तीवाल्याला हा सल्ला पटला. त्याने मुकाट्याने गोरगरीबांना ती नाणी वाटली, कांही गरजवंताच्या अडचणी निवारण केल्या. पण हे काम मात्र त्याने कुणाला संशय येणार नाही अशा बेताने केल्या. जे उरलंसुरलं होतं, त्यांत त्याने आरामांत दिवस काढले व तो सुखी झाला.





तुमचे पान

तुमचे विज्ञान

## थंडगार कहाणी

प्रखर उन्हाळ्याच्या दुपारी थंडगार पाणी किंवा बर्फाचा चुरा व त्यावर गोड सरबत, यापेक्षां जास्त उत्साहवर्धक काय असूं शकेल?

पाण्याचे कांही खास गुणधर्म आहेत, त्यापैकी एक म्हणजे शून्य अंश सेल्सिअस तपमानावर गोठण्याचा गुण. परंतु वाहते पाणी मात्र ह्या तपमानावर गोठत नाही. कारण वेगाने वाहणाऱ्या पाण्यांत हवेचं प्रमाण जास्त असतं. त्यामुळे गोठण्याचा बिंदू कमी होत रहातो. त्याशिवाय, बर्फाचे कण जेव्हां गोठतात, ते वाहत्या पाण्यांत पुन्हां मोडतात. त्याशिवाय पाण्याच्या प्रवाहामुळे जी उर्जा निर्माण होते. त्यामुळे पाणी द्रवस्वरुपांत राहाण्यास मदत होते.

फ्रिजमधे जे पाणी आपण ठेवतो. ते बर्फगार होते. पण गोठत नाही, हे तुम्ही पाहिले असेलच. हे पाणी कांही वाहाते नसते. तरीही फ्रिजमधले तपमान नियंत्रित केलेले असते व ते शून्य अंशावर कधीही जात नाही. पण हेच पाणी जर बर्फाच्या कप्प्यांत ठेवले तर ते गोठते. कारण फ्रिजमधला तो कप्पा सर्वात कमी तपमानाचा असतो.



तुमचा परिसर

## पृथ्वीवरचा सर्वात खारट समुद्र



जगांतला सर्वात खारट पाण्याचा समुद्र म्हणजे 'मृत समुद्र' आहे. वास्तविक, इस्राईल व जॉर्डन यांच्या सीमेवर असणारा हे एक प्रचंड मोठे सरोवर आहे. इतर महासागरांपेक्षां ह्याचे पाणी दसपट जास्त खारट आहे. इथल्या पाण्यांत क्षारांचे प्रमाण खूपच जास्त असल्यामुळे त्यांत औषधी गुण आहेत. त्यामुळेच, या समुद्रांत जीवजंतू राहू शकत नाहीत. ह्या समुद्रावरुन पक्षीदेखील उडताना दिसत नाहीत. मिठाचे प्रमाण पाण्यांत जास्ती असल्यामुळेच असे होते. या सरोवराला बाहेर जायचा मार्ग नाही. त्यांतले बहुतेक पाणी उत्तर जॉर्डनमधल्या नद्यांमधून येते.

पृथ्वीतलावरचा सर्वात खालच्या पातळीवरचा भाग म्हणजे हा मृत समुद्र. समुद्रसपाटीपेक्षां हा १३०० फूट खाली आहे. पाण्यांतल्या मिठाचे प्रमाण २५ टक्केपर्यंत आहे. त्यामुळे या पाण्यांत कुणीही आरामांत तरंगत राहू शकतो.

उष्ण हवा आणि पाण्याचे चटकन होणारे बाष्पीभवन, यांच्यामुळे जॉर्डनच्या टेकड्यावर कायमच धूसर वातावरण असते.

माहीत आहे कां?

## एका कपांत आरोग्य

चिनी सम्राट शेननुंग याने अपघाताने शोध लावलेले चहा हे पेय जगांत आता दुसऱ्या क्रमांकाचे लोकप्रिय पेय बनले आहे. पहिला क्रमांक पाण्याने पटकावला आहे. इसवीपूर्व २७३७ मधे चहाचा शोध लागल्यापासून माणसाच्या शरीरावर व मनावर होणारे त्याचे चांगले परिणाम आता मानले गेले आहेत.



काळा चहा हा पूर्णपणे मुरवलेला (व जरा आंबवलेलाही) असतो. पण हिरवा चहा हा थोडा वाफवून मग वाळवलेला असतो. चहांत असलेले कॅफिन (उत्तेजक) हे शरीराला अपायकारक असते अशी समजूत आहे. पण त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट कीं कपभर कॉफींत असलेल्या कॅफीनच्या एक तृतियांश-पेक्षां कमी कॅफीन चहाच्या एका कपांत असते.

आपले ज्ञान वाढवा

## उद्योगधंद्यावरचे प्रश्न



१. भारताला जाणारा मसाला मार्ग कुणी शोधून काढला?
अ. मार्को पोलो,
ब. ह्यूअेन-सँग,
क. वास्को-द-गामा,
ड. क्रिस्टोफर कोलंबस



२. बँकांचे राष्ट्रीयीकरण कोणत्या साली झाले?
अ. १९५२ ब. १९६४,
क. १९६९, ड. १९७५



३. जगांतल्या इतर देशांपेक्षां भारतांत .......चे उत्पादन जास्ती आहे.
अ. सुवर्ण, ब. तांदूळ,
क. अभ्रक, ड. पोलाद



४. भारत सरकारचा नोटा छापण्याचा सिक्युरिटी प्रेस कुठे आहे?
अ. पुणे, ब. कोलकाता,
क. ग्वाल्हेर, ड. नाशिक

(उत्तरे ७० पानावर)